॥ श्री ॥

# खाडिलकरांचा लेखसंग्रह



## भाग दुसरा

( श्री. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर याचे सन १९१८ पासून सन १९२९ पर्यंतचे निवडक लेख आणि अध्यक्षीय भाषणें यांचा संग्रह )




प्रकाशक आणि मुद्रक

श्री. यशवंत कृष्ण खाडिलकर

श्रीदत्तात्रय प्रिंटिंग प्रेस, १३ शेणवीवाडी,
खाडिलकर रोड, मुंबई नं. ४.





आवृत्ति पहिली

सन १९४९

किंमत ६ रुपये

# आभार

'खाडिलकरांचा लेखसंग्रह,' भाग दुसरा, वाचकांच्या हातीं देतांना मनाला समाधान होत आहे. या लेखसंग्रहात १९१८ सालापासून २० सालापर्यंतचे केसरींतील लेख, काकासाहेबांच्या संपादकत्वाखाली चाललेल्या लोकमान्यातील काहीं लेख आणि नवाकाळमधील १९२९ पर्यंतचे लेख संग्रहित केलेले आहेत. त्याशिवाय काकासाहेबांची नाट्य संमेलनापुढील, कीर्तन संमेलनापुढील व साहित्य संमेलनापुढील तीन अध्यक्षीय भाषणे या संग्रहात दिली आहेत.

लेखसंग्रहासाठीं केसरीच्या फायली कै. लो. टिळक यांचे नातू श्री.जयतराव टिळक यानीं व केसरी कचेरीने आपुलकीने दिल्या. लोकमान्य पत्राच्या फायली पुष्कळ प्रयत्न करूनहि मिळूं शकल्या नाहींत. तथापि लोकमान्याचा पहिला अंक श्री. रामभाऊ पटवर्धन सांगली, व लो. टिळकांविषयींच्या लोकमान्या तील लेखमालेचे अंक श्री. दत्ताराम आणि कंपनीचे श्री. गो. शि. लिमये यानीं अत्यंत जपून ठेवल्यामुळे त्यांजकडून मिळूं शकले. याबद्दल श्री. जयतराव टिळक, केसरी कचेरी, श्री. पटवर्धन व श्री. लिमये यांचा मनःपूर्वक आभारी आहे.

केसरींतील लेखांची निवड काकासाहेब खाडिलकरानीं स्वतःच करून ठेवली होती. नवाकाळमधील लेखांची या संग्रहासाठीं निवड त्यांच्या पश्चात करण्याचा प्रसंग आला. व ती निवड करताना मनाचा मोठा गोंधळ उडाला पण केसरींतील लेखांची निवड करताना काकासाहेबानीं जी पद्धति स्वीकार-ल्याचें आढळून आलें त्याच पद्धतीला वाट पुसत नवाकाळमधील लेखांची निवड केली आहे. लेखसंग्रहाच्या पहिल्या भागाप्रमाणेच दुसऱ्या भागासाठींहि श्री. न. र. फाटक यानीं 'लेखसंग्रहाची पार्श्वभूमि व स्थायीभाव' हा लेख या संग्रहासाठीं दिला आहे. संग्रहातील लेख वाचताना या लेखाचा उपयोग वाचकाकडून होईलच.

नवाकाळ कचेरी
मुंबई नं. ४
ता. ५-९-४९

प्रकाशक

# 'लेखसंग्रहा'ची पार्श्वभूमि व स्थायीभाव



आज कै. काकासाहेब खाडिलकरांच्या लेखसंग्रहाचा दुसरा खंड महाराष्ट्रीय जनतेला सादर होत असून त्यात केसरींतील १९१८ ते १९२० पर्यंतचे, लोकमान्यातील १९२१ सालातले आणि त्यानंतर नवाकाळमधील १९२९ फेब्रुवारी पर्यंतचे या प्रमाणे संपादकीय लेख व पुढे त्यांनीं निरनिराळ्या परिषद्–संमेलनातून केलेली भाषणें यांचा समावेश केलेला आहे. लोकमान्यात काकासाहेबांनी लिहिलेले सर्व लेख प्रयत्न करूनहि मिळाले नाहींत. फक्त १९२१ सालातील कै. लो. टिळकांची विचारसरणी व कामगिरी या विषयासंबधीं त्यांनीं पहिल्या पुण्यतिथीच्या निमित्ताने लिहिलेले जेवढे लेख मिळाले तेवढयावरच तूर्त समाधान मानून घ्यावे लागत आहे. नवाकाळमधील लेखांची निवड करताना त्या त्या विषयावरील प्रातिनिधिक वाटणारा लेख घ्यावयाचा असे धोरण ठेवलेलें आहे त्यांच्या नवाकाळमधील बहुतेक लेखांतून सुभाषितासारखे नवे नवे विवेचन असल्यामुळें वरील धोरण अमलात आणताना मनाला एक प्रकारचा संकोच वाटत असताहि विस्तारभयाने सारे लेख घेण्याचा मोह आवरण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. शेवटचा लेख काकासाहेबांचा नव्हता ही गोष्ट महशूर आहे, परंतु त्या लेखावरून त्यांना एक वर्षाची कैद भोगावी लागली, हे त्याचें महत्त्व लक्षात घेऊन त्याला या संग्रहात स्थान दिले. अशाच महत्त्वासाठीं 'महाराष्ट्र कॉंग्रेस कमिटी' (पान २३८) या लेखाचा प्रस्तुत संग्रहात आदर केलेला आहे. या लेखात पक्षापक्षाचा कलह उद्भवला असता जनतेनें स्वहिताची जाणीव बाळगून कसे वागावे, या विषयीं उद्बोधक सूचना असल्या तरी या लेखाविषयी, ज्यांच्यावर त्यात टीका आहे, त्या

पक्षातील काहीं प्रमुखानी कॉंग्रेसकडे बेअब्रूची फिर्याद केली होती, याचें स्मरण पुष्कळाना असेल. काकासाहेबाच्या टीकेची दिशा व धार ही त्या लेखाच्या योगानें अनुभवास आल्याशिवाय रहात नाहीं, म्हणून त्याला टाळणें योग्य वाटले नाहीं.

या सग्रहाचा प्रारंभ कै. टिळकाच्या गुणसंकीर्तनपर लेखानें होत असल्यामुळें ह्याच्या अनुरोधाने टिळक–चरित्रविषयक लेखाचा परामर्श अगोदर घेऊन मग इतर लेखाकडे वळणें उचित होईल. टिळकाचें केळकरानीं लिहिलेलें चरित्र प्रसिद्ध झाल्यावर त्यावर नाखूष असलेल्या टिळकभक्ताशीं बोलताना पुष्कळदा सवड मिळाल्यास आपण तीन चारशे पानें भरतील इतक्या बेताचें टिळकाविषयीं लेखन करणार आहों, असा संकल्प काकासाहेबाच्या मुखांतून बाहेर पडत असे. १९२६ मध्यें यानीं आपला लेखसंग्रह प्रसिद्ध करण्याची कल्पना मनावर घेऊन केसरीच्या १८९६ पासून फायली जमविल्या तेव्हा या निमित्तानें टिळकाच्या चरित्राचेंहि सहज निरीक्षण होऊन सदर संकल्प तडीस नेता येईल, असे उमेदीचे उद्गार ते काढीत असत; परंतु लेखसंग्रहाचा बेत तेव्हां मागें पडल्यावर टिळक चरित्राविषयीं लिहिण्याचा हेतूहि मागें पडला. १९४६ मध्यें लेखसंग्रहाच्या कल्पनेला मूर्त स्वरूप येण्यासाठीं केसरींतील लेखांची निवड करताना टिळकाच्या चरित्राविषयीं त्याच्या अंतरगात प्रेरणा उत्पन्न होण्याजोगें त्याचें प्रकृतिमान उरलें नव्हतें. यामुळें तो संकल्प सिद्धीस जाण्याचा योग आला नाहीं; तरी सुद्धां काकासाहेबानीं टिळकाच्या कर्तृत्वाची मूर्ति आपल्या हृदयात कशी निर्माण केली होती, याचा परिचय त्याच्या टिळकाविषयींच्या लेखावरून जिज्ञासूंना होण्यासारखा आहे.

लो. टिळकाना १९०८ साली मुंबई हायकोर्टानें सहा वर्षांची शिक्षा दिल्यावर काकासाहेबांनीं केसरींत जे दोन लेख लिहिले आहेत, त्यांच्याकडे

या संदर्भात लक्ष देणें अवश्य आहे. ते लेख पहिल्या भागांत ४२७ ते ४४६ या पानात आहेत. टिळकांचें वय शिक्षेच्यावेळीं ५२ वर्षांचें होतें. त्याचें शरीर मधुमेहासारख्या रोगानें व देशकार्याच्या धकाधकीनें जर्जर झालेलें होतें, अशा स्थितींत कित्येक दिवस आपल्या खटल्याचें काम स्वतःच अतिशय परिश्रम घेऊन त्यानीं पार पाडलें आपल्याला बरीच मोठी शिक्षा होणार याचीहि त्याना अटकळ होती, यामुळें त्यांनीं आपल्या बचावाच्या भाषणाला देशोद्धाराच्या उपदेशाचें रूप दिलें ज्यूरीनें त्याना दोषी ठरविल्यावर त्यांनीं जे स्फूर्तिदायक उद्गार अत्यत निर्भयतेनें काढले, त्याना अर्वाचीन राजकीय इतिहासानें चिरजीवपद अर्पण केल्यास नवल वाटायला नको. काकासाहेबाच्या चित्तावर त्या खटल्याच्या प्रसंगाचा व त्या धीरोदात्त उद्गाराचा अतिशय खोल परिणाम झाला होता. पहिल्या भागातील पूर्वनिर्दिष्ट लेखात काकासाहेबानीं टिळकाच्या चरित्राचें व कर्तृत्वाचें जें सार निवेदन केलें आहे, त्यात या परिणामाच्या छटा जशा विविधतेनें दिसतात तशाच टिळकभक्तीच्याहि छटा एकतानतेनें अनुभवास येतात. टिळकाच्या राजकीय कर्मयोगाची काकासाहेबानीं मांडलेली मीमासा (पान ४३१–४३२) पाहिल्यास टिळकाच्या कामगिरीचें गीतोपदेशाची कसोटी लावून आपल्या अंतरगात त्यानीं कसे आकलन व सकलन केलें होतें, याबद्दल अधिक विवेचन करण्याची जरूरी नाहीं. टिळकांनीं आपला खटला स्वतः का चालविला याचें काकासाहेबानीं केलेलें स्पष्टीकरण आणि त्यानंतर टिळकाच्या चरित्राचें सांगितलेलें रहस्य टिळकभक्ताना आज देखील वाचनीय वाटेल. 'टिळक आणि दावर' या मथळ्याच्या दुसऱ्या लेखात काकासाहेबांनीं हायकोर्टातील टिळकांच्या शेवटच्या उद्गारांची महती निवेदन केलेली आहे. या निमित्तानें त्यांनीं दावर याच्या शिव्याशापाच्या भाषणाचा इत्यर्थ टिळकांच्या उद्गारांतील ' स्वराज्यविषयक

तळमळीच्या तुलनेनें लोकाच्या निदर्शनास आणलेला आहे.

१९१४ मध्ये टिळक आपली शिक्षा भोगून परत स्वदेशांत व स्वजनात आल्यानतर त्यानी पुनः आपल्या चळवळीत चैतन्य ओतलें. त्यानतर १९१८ सालीं स्वराज्याच्या शिष्टाईसाठी ते विलायतेस जाण्याला निघाले तेव्हा पुण्यास निघालेल्या त्याच्या प्रचड मिरवणुकीच्या निमित्तानें काकासाहेबानीं लिहिलेल्या लेखात आणखी एकदा टिळकाची राजकारणातील थोरवी गाईलेली असून 'स्वराज्य सघाची दुसरी परिषद्' या लेखातहि तोच प्रकार अनुभवास येतो. केसरीतील 'लोकमान्याची मिरवणूक' हा काकासाहेबाचा केसरीतील शेवटचा लेख ( १० आगस्ट १९२० पान-१३३-१३९ ) टिळकाच्या चरित्राचे आध्यात्मिक स्वरूप लोकाना समजावून देण्यासाठींच लिहिलेला आहे. टिळक-चरित्रावर आजपर्यंत लिहिल्या गेलेल्या लेखात या लेखाला अत्युच्च श्रेणीमध्ये बसवावे लागेल. ता. १ आगस्ट १९४८ रोजीं मुबईच्या रेडियोसाठीं काकासाहेबानीं केलेल्या भाषणाच्या वेळीं याच लेखातील विचार त्याच्यापुढें होते. 'लोकमान्य' दैनिकाच्या पहिल्या अग्रलेखात त्यानीं टिळक-चरित्र केसरींतल्या शेवटच्या लेखाप्रमाणें पुनः एकदा वर्णून टिळक व गाधी याच्या चळवळीची अभिन्नता स्पष्ट केली आहे. त्या लेखातील अखेरचा मजकूर काकासाहेबाची म. गाधीच्या राजकारणातील भूमिका व प्रतिज्ञा यावर झगझगीत प्रकाश टाकणारा आहे. ( पान १४५ )

'गुरुस्थानी असलेल्या लो. टिळकाचें चरित्र डोळ्यापुढें ठेवून, लोकाचा ससार नेटका व्हावा म्हणून त्यानीं सोसलेल्या कारागृहवासासारख्या तपश्चर्येनें उद्दीप्त होणारी राष्ट्रभक्ति नीट जागी ठेवून, आणि त्याच्या परिपक्व उपदेशातील समबुद्धीला आमचें पाऊल वाकडे न पडण्याबद्दल नमन करून, त्यानीं दाखविलेला स्वराज्याचा मार्ग त्याच्या संप्रदायास शोभेल

अशा रीतीनें चोखाळण्यास त्याच्याच नावाचें हे दैनिक पत्र कधींहि कमी करणार नाहीं ' अशी लोकमान्य दैनिकाच्या पहिल्या अग्रलेखात केलेली प्रतिज्ञा यथार्थ असल्याचें सिद्ध करण्यासाठी त्या दैनिकाच्या दोन वर्षांतील संपादकीय कारकीर्दीत काकासाहेबानीं टिळक व गांधी याच्या विचारसरणींत भेद नाहीं हें महाराष्ट्राच्या गळीं उतरण्यासाठी बरेच लेख लिहिले; त्यातले कांहीं या सग्रहात आलेले असून ते बारकाईनें वाचल्यास टिळकाचें चरित्र व शिकवण त्यानीं किती व कशी आत्मसात् केली होती याचा उत्तम प्रकारें अनुभव येतो. ' आज टिळक असते तर ' असा प्रश्न उपस्थित करून त्यानीं खिलाफतीच्या चळवळीशीं फारकत साधली असती, कायदे-मडळाच्या निवडणुकी लढविल्या असत्या, तडजोडीचे धोरण स्वीकारलें असतें, वगैरे मुद्दे महाराष्ट्रासमोर ठेवण्याचा उद्योग कित्येक टिळकानुयायानीं १९२०-१९२३ या सालात अतिशय आग्रहानें व चिकाटीनें चालविला होता. तो उद्योग कसा चुकीचा होता, हें महाराष्ट्राला पटविण्यासाठीं काहीं लेखात टिळक चरित्राची माहिती नमूद करून तर काहीं लेखात प्रखर युक्तिवाद लढवून काकासाहेबानीं गाधीजींच्या चळवळीची जी सेवा केली तिला महाराष्ट्राच्या तत्कालीन राजकीय वाङ्मयात तोड सापडणार नाहीं. भाषा, विचार, आणि माहिती अशा तिन्हीं अंगानीं हे लेख वाचण्याजोगे आहेत. टिळकाच्या गीतारहस्यावर काकासाहेबांचें अपरिमित प्रेम असल्यामुळें ह्या ग्रथाची त्यानीं केसरींतील शेवटच्या लेखात जशी स्तुति केली आहे तशीच लोकमान्यातहि एक स्वतत्र लेख लिहून केली आहे. हे दोन्ही लेख एकत्र घेऊन वाचल्यास टिळकाचें जीवन आणि यानी संशोधिलेलें गीतारहस्य यात मुळींच भेद नसल्याचा काकासाहेबाचा सिद्धान्त वाचकाच्या अंतःकरणावर ठसण्यास उशीर लागणार नाहीं. काकासाहेब कधीं कधीं म्हणत असत कीं टिळकांचें गीतारहस्य अजून विदेहावस्थेत आहे. तें कर्मभूमींत जसे उतरावे तसें

उतरलेलें नाही. जेव्हा त्याचा प्रचार हरिदास, पुराणिक, अध्यापक, देश-कार्यातील वक्तेप्रवक्ते लोकात करायला लागतील व असा प्रचार लोकांच्या दिनचर्येत सहजपणानें उतरलेला आहे असें दिसेल तेव्हाच गीतारहस्य सदेहावस्थेंने कर्मभूमींत उतरलें असे ठरणारें आहे. याचा अर्थ गीता-रहस्याचीं लोकानी पारायणें व पोपटपची करावी असा नसून गीतारहस्यात दाखविलेल्या दिशेने बुद्धीच्या क्षेत्रातील सर्व व्यवहार होऊ लागले पाहिजेत, असे काकासाहेब आपल्या म्हणण्याचा खुलासा करीत असत. त्यानीं १९३० नतर प्राचीन ग्रथाचा अभ्यास करून जी नव्या विवेचनाचीं पुस्तके लिहिली आहेत, तीं त्यानी आपल्यापुरती गीतारहस्याची सेवा कशी केली याची साक्ष पटविणारी आहेत. काकासाहेबानीं टिळक–चरित्र लिहिलें असते तर त्याचें स्वरूप कसे दिसलें असतें, याची कल्पना टिळकावरील लेखानीं करून घेता येते.

१९२२ च्या मार्चमध्ये म. गाधींना सरकारनें तुरुगात अडकविल्यावर जो बुद्धिभेद थाबावा म्हणून काकासाहेबानीं टिळक–चरित्राचा आपल्या अधिकाराने ऊहापोह केला तो बुद्धिभेद पुढे जास्तच भडकला. काकासाहेबाना ‘ लोकमान्या ’ला राम राम ठोकून ‘ नवाकाळ ’ काढावा लागला याच्या मुळाशीं हा बुद्धिभेदच होता. १९२३ च्या मार्चमध्ये ‘ नवाकाळ ’ सुरू केल्यावर या बुद्धिभेदाच्या आधाराची एक नवी फळी कॉग्रेसमध्ये उभी राहिली. देशातील अनेक नामाकिन पुढारी त्या फळीचे पुरस्कर्ते असले तरी कॉग्रेसमध्ये या फळीला बहुमताचा आशीर्वाद कधींच लाभला नाहीं. १९२४ मध्ये म. गाधी तुरुगातून सुटले व त्यानीं या फळीला मार्ग मोकळा करून दिल्यावर अवघ्या दोन वर्षात ती दुभगली. म. गाधी पुनः राजकारणाच्या रणक्षेत्रात आपल्या पूर्वीच्या निष्ठेनें व तशाच जोमानें उतरताच बुद्धिभेदाच्या मोहिमेचा प्रभाव ओसरत गेला, व म. गाधींच्या

विचारसरणीची स्वतंत्रपणें तरफदारी करण्याचें कामहि संपुष्टांत आलें. म. गांधी जो पवित्रा टाकतील तो तसा का टाकावा लागला, याचा खुलासा ते स्वतः आपल्या नियतकालिकांच्या द्वारे अविश्रांतपणें करीत असत; तो खुलासा महाराष्ट्राच्या सामान्य जनतेला समजावून सांगण्याची जबाबदारी कॉंग्रेस पक्षीय मराठी वृत्तपत्रकारांची होती. ही जबाबदारी काकासाहेब आपल्या लेखणीच्या कसलेल्या कुशलतेने व अत्यंत समरसतेनें पार पाडीत होते.

गांधीजी तुरुंगात व बाहेर कॉंग्रेसच्या गोटात फूट अशा स्थितींत गांधींच्या राजकारणाविषयीं लोकांची भक्ति टिकवून धरण्याचें काम अतिशय बिकट होते, परंतु ज्याकरितां कॉंग्रेसचे कित्येक पुढारी गांधींच्या राजकारणाशीं फटकले तो मुख्य विषय कौन्सिलांत जाण्याचा होता. १९२३ मध्ये कायदेमंडळातील खऱ्याखुऱ्या लोकमताला धाब्यावर बसवून मिठाचा कर बिनदिक्कत वाढविल्यामुळे कायदेमंडळातील लढाईच्या परिणामकारकतेबद्दल लोकांचा विश्वास डळमळणें स्वाभाविक होते. हा प्रसंग काकासाहेबांसारख्यांच्या नजरेतून सुटणें शक्य नसल्यामुळे त्यांनीं गांधीच्या राजकारणासाठीं त्याचा उपयोग करून घेतला. नवाकाळ निघाल्या-नंतर राष्ट्रीय निशाणाचा झगडा सुरू झाला. तो लोकांच्या स्वराज्यविषयक स्वाभिमानाचा दर्शक होता. याशिवाय त्यावर्षी कॉंग्रेसमध्ये व कॉंग्रेसबाहेर जे घडलें त्याची माहिती काकासाहेबांच्या १९२३ सालाच्या लेखांतून आलेली आहे. नवाकाळमध्यें टिळकांच्या कर्तृत्वाचीं तत्त्वे काकासाहेबांनीं लोकमान्यांतल्या लेखमालेप्रमाणें विस्तारानें प्रतिपादन केलेलीं नाहींत. १९२३ मधील त्यांचा फक्त एकच लेख 'लो. टिळक आणि समूहाचा आत्मयज्ञ' या संग्रहात घेतलेला आहे. टिळकांच्या कर्तबगारींतील आणखी एका अज्ञात किंवा झाकलेल्या मूल्यावर प्रकाश टाकणारा तो लेख आहे.

१९२४ ते १९२९ या पांच वर्षांत म. गांधींच्या 'दुर्दम्य प्रेरणेमुळें

हिंदी राजकारणाची चक्रे अतिशय वेगाने फिरूं लागली होतीं. सारा देश त्या वेगानें गजबजून गेला होता आणि जनतेच्या जीवनाची चिरकालीन स्थिरता हादरून तिला स्वराज्यानुकूल आकार धारण करण्याची आवश्यकता वाटूं लागली होती. गांधीनीं कौन्सिलांतील राजकारण दास–नेहरूंच्या पुढारीपणाच्या गळयात टाकून खादीचा प्रसार, हिंदु–मुसलमानाचें ऐक्य, अस्पृश्यता निवारण यासारखीं कार्यें आपल्या अंगावर घेतलीं. तुरुंगातून सुटल्यावर थोडयाच अवधीत हिंदु–मुसलमानाच्या एकीसाठीं गांधीजींनीं दिल्लीस मोठा उपवास केला, या उपवासात शक्ति क्षीण झाल्याचा अनुभव येत असताहि उरल्या–सुरल्या शक्तीनें अर्धा तास चरख्यावर सूत काढण्याचे आपलें व्रत त्यानीं सोडले नाहीं. परंतु या उपवासाच्या पूर्वी म. गांधींना आपल्या काहीं अनुयायाच्या उच्छृंखलपणाचा जो अनुभव आला त्याबद्दल काका-साहेबानीं प्रकट केलेलीं मतें अवश्य नजरेखालीं घालण्यासारखी आहेत. महात्माजींनी यावेळीं नमतें घेतलें; परंतु आपला मार्ग सोडला नाहीं. त्यानीं खादीच्या वाढीची संस्था निर्माण केली. चरख्याचें स्वराज्याच्या चळवळींत महत्त्व काय व त्याविरुद्ध निघणाऱ्या आक्षेपात भरीवपणा कितपत आहे, यासबंधाचे १९२४–२५ सालातले लेख पाहिल्यास काकासाहेबाच्या संपादकीय कर्तव्यदक्षतेबद्दल निराळा पुरावा द्यायला नको.

१९२५ च्या विशेष महत्वाच्या घटना बावला खुनाच्या खटल्याचा निकाल, याच दिवसांत इंग्लंडांत उघडकीस आलेलें काश्मीरच्या महाराजाचें एक कुलगडें, दासबाबूंचा मृत्यु, वऱ्हाडचे ना. तांबे यांनीं मध्यप्रांत सरकारात केलेला प्रवेश, खादीच्या प्रसारावरून म. गांधींचा डॉ. रविंद्रनाथ टागोर यांच्याशीं झालेला वाद, आणि दास–नेहरूंनीं स्थापन केलेल्या पक्षातील फाटाफूट या होत. बावलाच्या खुनाशीं मुमताज नामक स्त्रीचा संबंध असल्या-मुळें त्या खटल्यांच्या निकालाबद्दल लिहितांना काकासाहेबांनीं मातृहृदयाचें

जें वर्णन केलें आहे, तें त्याच्या मूलगामी दृष्टीचें एक ठळक प्रमाण आहे. (पान ३५४) या खुनाच्या प्रकरणानें अखेरीस इंदूरच्या तत्कालीन महाराजांवर आपलें राज्य सोडण्याची पाळी आली, त्यासंबंधाच्या लेखात काकासाहेबानीं संस्थानिकाच्या दीनावस्थेची माहिती स्पष्ट केली आहे. 'नीतिभ्रष्ट व निर्लज्ज' या लेखात काश्मीर नरेशाच्या प्रकरणावरून इंग्लंडच्या सामाजिक नीतिमत्तेच्या ऱ्हासाचें घोर स्वरूप उघड केलेलें आहे. दासबाबूंच्या स्मारकावर करण्यात आलेल्या कुत्सित आरोपाचें निराकरण 'मेलेल्याना खाऊन जगणें' या लेखात आहे. गांधी–टागोर वादातील गांधींची भूमिका काकासाहेबानीं 'कटाळवाणा चरखा' या लेखात संदेहातीत केली आहे. दास–नेहरूंच्या पक्षातून बाहेर पडून जयकर-केळकरानीं स्थापन केलेल्या सवत्या सुभ्याचा समाचार 'नवे संभाजी' या लेखात पहायला सापडतो. १९२६ सालांत या सवत्या सुभ्याचा जो मतप्रचार टिळकांच्या नावावर सुरू झाला होता, त्याला 'टिळक आणि प्रतियोगी सहकारिता' या लेखात उत्तर आहे (पान ४१६). या लेखावरील संस्कृत श्लोक गायत्री मंत्रातील कित्येक शब्द गुंफून काकासाहेबानीं 'लोकमान्य' पत्राचें ब्रीद म्हणून तयार केला होता. मागे लोकमान्याच्या पहिल्या अग्रलेखातील एक उतारा दिलेला आहे. तो या श्लोकाचें भाषांतर किंवा हा श्लोक ह्यातील विचाराचें संस्कृत रूपांतर ठरणारा असल्याचें चाणाक्ष वाचकाना सांगायला नको.

१९२७ सालांत चीनमध्यें डॉ. सन्यतसेन यांच्या राष्ट्रीय पक्षाची संघटना प्रबळ झाल्याचा अनुभव येऊ लागला. या संघटनेची माहिती 'नव्या चीनचे दैवत' या लेखात आलेली आहे. याच वर्षी अफगाण अमीर अमानुल्ला हे हिंदुस्थानांतून युरोपच्या प्रवासाला गेले. १९२७ हें शिवाजी महाराजांचें जन्मवर्ष मानणारांनीं मुंबईत ना. जयकरांच्या पुढाकारानें एक

मोठा त्रिशतसांवत्सरिक महोत्सव साजरा केला. त्यास अनुलक्षून काकासाहेबांनीं शिवाजीच्या कामगिरीचें धोरण दाखविणारे लेख लिहिले ते इतिहासाच्या अभ्यासकांना मार्गदर्शक होणारे आहेत. १९२८ मध्यें साऱ्या जनतेचें लक्ष वेधून घेणारा 'बारडोलीचा साराबंदीचा सत्याग्रह' सुरू झाला. १९२९ सालच्या प्रारंभी अफगाणिस्तानात राज्यक्रांति झाली. फेब्रुवारी महिन्यात मुंबईस 'हिंदुमुसलमानाचा भयंकर दंगा' १८९३ सालानंतर छत्तीस वर्षांनी सुरू झाला. 'नवाकाळ'मधील त्याविषयीचा एक अग्रलेख व त्यानंतर चार दिवसानीं प्रसिद्ध झालेली सकीर्ण समालोचनातील काहीं स्फुटें, याच्या आधारें काकासाहेबावर राज्यद्रोहाचा आरोप ठेवून सरकारानें त्यास एक वर्षाची कैदेची शिक्षा फर्मावली. यानतर काकासाहेबानीं 'नवाकाळ'साठीं काहीं लिहिले नाहीं. तीन वर्षापूर्वी एका लहानशा वेदान्ताच्या पुस्तकावर त्यानीं एक १५–२० ओळींचा अभिप्राय लिहिला होता, तो त्यांचा नवाकाळमधील शेवटचा लेख म्हणता येईल. त्याच्या नाटकाशिवायच्या लेखनाचा प्रारंभ एका पुस्तकावरील अभिप्रायाने झाला. शेवट देखील अशा अभिप्रायानें व्हावा हा योगायोग डोळ्यात भरणारा आहे. सदर अभिप्राय लिहिताना काकासाहेबाचा हेतु काय होता हें समजायला आज काहींच साधन नाहीं. परंतु आपल्या वृत्तपत्रीय लेखनाची अतिम सीमा पुस्तकाच्या अभिप्रायानेंच पूर्ण व्हावी, असे त्याच्या मनात तेव्हा असावे, असे वस्तुस्थितीवरून मानायला हरकत नाहीं.

येथवर पूर्वीच्या आणि या सग्रहातल्या लेखाचा त्रोटक आढावा वाचकापुढें ठेवला आहे. त्याच्या अनुरोधानें काकासाहेबाच्या सपादकीय कामगिरीचें स्वरूप निवेदन केल्यास तें अस्थानीं होणार नाहीं. यासाठीं टिळक चरित्रातील निरनिराळ्या घटनाकडे पहाण्याची काकासाहेबांची दृष्टि कशी होती हा प्रश्न प्रथम विचारात घेणें उचित होईल. टिळकाना

१९०८ सालीं सहा वर्षांची शिक्षा झाल्यावर त्या निमित्तानें त्याचें त्यापूर्वीचें २५।३० वर्षांचें चरित्र सागताना काकासाहेबांनीं अनेक प्रकरणाचा निर्देश करून ( पान ४३० ) "स्वराज्याच्या धुवाकडे दृष्टि निश्चल ठेवावयाची व त्या दृष्टीच्या रोखानें त्या त्या परिस्थितींत कोणते कर्म इष्ट आहे त्याचा सिद्धात बाधून त्याप्रमाणें कायावाचामनानें ( तें ) आचरीत असावयाचे....एकदा सिद्धात ठरून कर्माला आरभ झाल्यावर त्या कृत्यास चालत्या गाडयाचें स्वरूप येईपर्यंत अडचणींची, अडथळ्याची, सकटाची, द्रव्यहानीची, किंवा शरीरक्लेशाची त्यानीं केव्हाहि पर्वा केलेली नाहीं.... परिस्थितीशी झगडून आपणास पुढे पाऊल टाकावयाचें आहे, ह्याविषयीं ते सावधान असल्यामुळें स्वतःच्या पावलापुढे परिस्थितीला त्यानीं कधींहि ...जाऊ दिलेलें नाहीं. अतिम साध्याकडे दृष्टि ठेवून राजकीय व इतर चळवळींतील आपले सिद्धात रा. टिळक ह्यानीं ठरविलेले आहेत.... अतिम साध्यासबधानें राजकीय चळवळींतील कर्मयोग्यात सर्वांत पुढच्या रांगेत उभे रहाण्याची पराकाष्ठा करण्यांत त्यानीं कमीं केलेलें नाहीं. स्वदेशभक्तीच्या सूत्रानें त्याच्या निरनिराळ्या चळवळी एके जागीं गोंवता येतात.... बाह्यतः परस्पर विरोधी दिसणारीं कर्में स्वदेशभक्तीच्या दृष्टीनें सुसंगत दिसूं लागतात....राजकीय चळवळीचा अतिम साध्याचा त्याचा सिद्धात कायम ठरलेला आहे; व त्याबद्दल त्याच्यावर कोणाचीच वक्रदृष्टि नाहीं, पण रोजच्या वर्तनात जे नियम रा. टिळक घालून देत असत व त्याबरहुकूम अगीकृत कार्याची, दम न खातां, मेहनतींत कुचराई न करता, परिस्थितीकडे पूर्ण लक्ष पोंचवून व सरकारनें जितकी म्हणून साधनें वापरण्याची परवानगी कायद्यानें दिली असेल त्याचा पूर्ण उपयोग करून जी एकसारखी पाठ पुरवीत असत, त्यामुळें ते काहीं अधिकाऱ्याच्या डोळ्यात खुपत" टिळकाच्या कामगिरीचें तात्त्विक दृष्टीनें

जे रहस्य काकासाहेबानीं या विवेचनाच्या द्वारे ग्रथित केलें आहे त्या रहस्याविषयीं साशंक होण्याची त्यांना पुढें कधीच पाळी आली नाहीं. म. गांधींच्या चळवळीचीं कित्येक उपांगे टिळकांच्या चळवळीहून भिन्न दिसणारीं असली तरी दोघांचा अंतिम सिद्धांत व देशोद्धाराचा कळवळा या दोन्ही गोष्टी सारख्याच जाज्वल्य असल्यामुळें त्यांच्या सूत्रानें गांधींच्या राजकारणाचें टिळकांसंबंधांतील श्रद्धेचा व निष्ठेचा अभिनिवेश, आवेश व उत्साह चढता वाढता ठेवून समर्थन करतां आलें. 'नवाकाळ'च्या पहिल्या 'स्वत.संबंधानें' या लेखांत '१८९६ सालापासून रा. खाडिलकर यांच्या लेखाचें धोरण वाचकांस माहीत असल्यामुळें धोरणासंबंधानें नवी ओळख करून देण्याची जरुरी नाहीं. लो. बाळ गंगाधर टिळक यांचें शिष्यत्व स्वेच्छेनें व आनंदानें स्वीकारून ज्या मतांचा अंगिकार रा. खाडिलकर यांनी केला, तीं मते आज जशींच्या तशी कायम आहेत लो. टिळक यांनीं आपल्या विचारसरणीला जे वळण लावलें, ते वळण म्हणजे सद्गुरूचा मोठा प्रसाद होय, असा रा. खाडिलकर यांचा दृढ विश्वास असून, गेलीं दोन वर्षें 'लोकमान्य' पत्राचे संपादक या नात्यानें सांप्रतच्या नव्या काळांत त्यांनीं जे धोरण स्वीकारलें होते, तेच धोरण नव्या पत्राच्या रूपानें आजपासून वाचकांच्यापुढें मांडण्यांत येत आहे. म. गांधी यांनीं सुरू केलेली असहकारितेची चळवळ म्हणजे लो. टिळक यांच्या धोरणाचें परिपक्व फळ होय, याविषयीं सर्व विचारी लोकांची एकवाक्यता झालेली आहे. ज्या वृक्षाचें बीजारोपण लो. टिळक यानीं केलें, जो वृक्ष लो. टिळक यांच्या हयातींतच वाढीस लागून फलोन्मुख झाला व ज्या वृक्षाचें पूर्ण स्वरूप म. गांधी यांच्या चळवळीमुळे जनतेच्या दृष्टीस पडले, त्या वृक्षाच्या सांवलीखालीं बसून 'नवाकाळ' पत्र आपलें रोजचें काम करणार आहे.' असे काकासाहेबांचें आत्मनिवेदन आलेलें आहे. ह्याचा रंग 'लोकमान्या'च्या

'स्वतःसंबंधाने' या प्रारंभीच्या लेखानहि भरपूर दृष्टीस पडतो. १ आगस्ट १९४८ रोजीं रेडियोवरील संवादांत हेच विचार त्यांनीं प्रकट केले आहेत. या सर्वांची संगति लावल्यास 'मी टिळकाइट आहें' असा जो उद्गार लो. टिळकांच्या नातवाच्या कानीं आयुष्याच्या अखेरीस घातला तो कसा यथार्थ होता, याविषयी खात्री पटेल. गांधींच्या स्वावलंबनपर आध्यात्मिक विचारसरणीचें काकासाहेबांनी १९०९ सालच्या एका लेखांत स्वागत केलें असून टिळक १९१८–१९१९ या वर्षांत विलायतेस असतां रौलट कायद्याच्या निषेधाच्या निमित्तानें झालेल्या देशव्यापी सत्याग्रहाचा काकासाहेबांनीं केसरीमधून जो पाठपुरावा केला आहे तो पाहिल्यास व टिळकांनीं मृत्यूपूर्वीं गांधीजींविषयीं दाखविलेली अनुकूलता (जी 'खुद्द टिळकांचेच उद्गार' या लेखांत नमूद आहे) विचारांत घेतल्यास काकासाहेबांची गांधींच्या राजकारणांतील भूमिका पूर्वीच्या परंपरेलाच धरून भक्कम असल्याचें लक्षांत येईल. 'लोकमान्यांची शिकवणूक' या लेखांत 'लो. टिळक यांचें चरित्र भूतकालाला व्यापून पुढील इतिहासावर पसरलेलें दिसत आहे.' असें एक सूचक वाक्य आलेले आहे. तें वाक्य काकासाहेबांचें टिळकशिष्य या नात्याचें भावी कर्तव्य लक्षांत आणून देणारें आहे. याप्रमाणें टिळकासंबंधी काकासाहेबांच्या साऱ्या लेखांचे परिशीलन केल्यास टिळक चरित्राप्रमाणें त्यांनीं आपल्या रहाणीला व संपादकीय कामगिरीला वळण लावलें होतें याबद्दल शंका रहाणार नाहीं. टिळकांच्या शिकवणुकीला धरून काकासाहेबांनीं स्वराज्याच्या ध्येयाची अखंड सेवा केली, असें तात्पर्य स्वीकारावें लागतें.

काकासाहेबांचे लेख वाचीत असतां त्यामध्यें मनुष्य प्राण्याच्या वैयक्तिक व सामुदायिक जीवनाच्या देशोद्धारमूलक अनुभवांतून निघणाऱ्या अनेक चिरस्थायी तत्त्वांचा साधक बाधक ऊहापोह दृष्टीस पडतो. असा ऊहापोह

करण्याची त्यांची वृत्ति केसरींत प्रवेश करण्यापूर्वीच त्यांच्या ठिकाणीं चालू घडामोडींच्या अखंड चिंतनमननानें परिपाकावस्थेस आलेली होती, असे त्याचे वि. ज्ञा. विस्तारातले लेख वाचल्यास ध्यानात येणारे आहे. नाटकातील संवादातहि अशा तऱ्हेचा ऊहापोह दृष्टीस पडतो. केसरीच्या पहिल्या लेखात त्याचें दर्शन घडतें. पुढे पुढे तर असा उहापोह बहुधा प्रत्येक लेखात आल्याचे पहावयास सापडते. समोर आलेल्या विषयाचीं चर्चा करताना तो विषय मानवी स्वभावातून कसा उद्भवतो या प्रश्नाचें बिनचूक उत्तर काढून त्याच्या अनुरोधानें जनतेला व राज्यकर्त्यांना ज्याच्या त्याच्या कर्तव्याचा मार्ग सुचविणे हा प्रकार काकासाहेबांच्या लेखनात जेवढया मोठया प्रमाणात आढळतो तेवढा दुसऱ्या कोणत्याहि त्या काळच्या वृत्तपत्रसंपादकाच्या लेखनात आढळणार नाही. या प्रकारात उपमादृष्टांतादि शृंगारसाज नाहीं. शक्यतोवर अगदी साध्या भाषेत काकासाहेब आपली विचारसरणी वाचकाना समजावून देत असत. या संबधाचे केसरींतील व लोकमान्यातील लेख सोडून लोकमान्य नवाकाळच्या लेखातील उदाहरणाचा निर्देश करावयाचा म्हटल्यास 'टिळक आणि स्वावलंबन' या लेखातील स्वावलंबनाचे विवेचन, 'टिळक आणि बहिष्कार' यातील चिकाटीच्या गुणाचें स्पष्टीकरण 'विद्वान नाहींत' यामधील विद्वत्ता आणि पराक्रम या दोन गुणाची सामुदायिक उठावणीच्या दृष्टीनें केलेली मीमांसा, 'कटाळवाणा चरखा' यातील नित्यकर्माचें, व यमनियमाचें दाखविलेलें महत्त्व, 'दरिद्र नारायण' यातील दरिद्र्याच्या अंगीं स्वयंसिद्ध असलेल्या स्वोद्धाराच्या सामर्थ्याचें निरूपण, 'कौन्सिलांवर बहिष्कार का घातला?' यातील आरामतलफी राजकारणाच्या विघ्नसंतोषीपणावर प्रकाश टाकणारा युक्तिवाद, वगैरे भाग हा संग्रह काळजीनें वाचणारांच्या सहज डोळ्यात भरणारे आहेत.

मराठी भाषेमध्यें वृत्तपत्राच्या द्वारें अनेक नवे नवे शब्द रूढ झाले आहेत. काकासाहेबाच्या युद्धविषयक लेखांतून लष्करी व्यवहाराच्या परिभाषेचे किती तरी शब्द दाखवितां येतील. राजकीय परिभाषा मराठींत कशी बनत गेली याचा अभ्यास करणारानाहि काकासाहेबाचे अनेक लेख उद्बोधक वाटतील. १८९७ सालीं टिळकाना शिक्षा झाल्यावर जनता किंवा लोकपक्ष या ऐवजीं त्यानीं प्रजापक्ष असा शब्द वापरला आहे. त्यापूर्वी राष्ट्रीयत्व याबद्दल ' राष्ट्रधर्म ' असा शब्द केसरीमध्यें उपयोगात आल्याचें दृष्टीस पडतें. १९१८ सालीं पहिलें महायुद्ध संपता सपता Self-determination हा शब्द उदयास आला. हल्लीं त्याचा मराठी पर्याय स्वयंनिर्णय असा आहे. परतु काकासाहेबानीं प्रारंभीं केसरीच्या लेखात ' स्वसमति ' हा शब्द योजलेला आहे ' आर्गनाइज्ड ' म्हणजे देहधारी, सँक्शन म्हणजे हत्यार, या प्रमाणें त्यानीं वेळोवेळीं पुष्कळ नवे शब्द मराठींत आणण्याचा प्रयत्न केला आहे. आता पहिल्या देहधारी ऐवजी सघटित हा शब्द जास्त प्रचारात आलेला आहे. यासंबंधात आणखीं बरींच उदाहरणें दाखविता येतील.

एखादा विषय विवेचनाला घेतला कीं, त्याचा अतिशय व्यापक दृष्टीनें परामर्श करण्याची काकासाहेबाच्या बुद्धीची ठेवण वाचकाच्या नजरेंतून सुटणार नाहीं असा भरंवसा आहे. टिळक विलायतेस जाण्याला निघाले त्यावेळीं येथें व इंग्लंडात राजकीय दृष्टया महायुद्धाच्या जबरदस्त तडाख्यापायीं हिंदी स्वराज्याच्या मागणीला कसे अनुकूल वारे वाहूं लागले होते याचें काकासाहेबाच्या या सग्रहातल्या पहिल्याच लेखातील विवरण या विषयीं खात्री पटवून देण्यास पुरेसें आहे. पहिली चिरोली चकमक, टिळक पर्स फड, म. गाधी चुकले काय ? हे लेख वरील खात्रीला दुजोरा देणारे आहेत. केवळ मासल्यासाठीं त्याचा उल्लेख केला आहे. त्याच्या

बुद्धीच्या ठेवणीचा आणखी एक गुण, मुख्य ध्येय व त्याला उपयोगी पडणारीं साधनें यावर लोकाची दृष्टि खिळून टाकणें हा होय. एखाद्या विषयाचा आत्मा कोणता व त्याची शोभेची वस्त्र–प्रावरणासारखी अपरिहार्य महत्त्वाची नसलेली अंगें–उपांगें कोणती याचा मनाशीं योग्य निश्चय करून आत्म्याच्या अवस्थेची बारीक छाननी करणें व बाकीची अंगें–उपांगें दृष्टिआड ठेवणें, या पद्धतीचा परिचय काकासाहेबाच्या साऱ्याच लेखांतून होणारा आहे. वृत्तपत्राच्या संपादकीय कर्तव्याचा बोध करून घेण्याला त्याच्या या गुणाकडे होतकरू वृत्तपत्रकारानीं लक्ष देणें अवश्य आहे. 'श्री शिवाजी महोत्सव' (पान ३०१) हा लेख एका इंग्रजी पुस्तकाच्या निमित्तानें लिहिलेला असला तरी शिवाजी उत्सवाचा उपयोग खादीच्या चळवळीला कसा होईल, याची चर्चा केली आहे. साहसप्रियता, कर्तव्यतत्परता व आत्मयज्ञाची रुचि या गुणावर हिंदुस्थानात इंग्रजी राज्याची उभारणी झाली. इंग्रजाच्या या गुणाचीं फळे त्याच्या हातून हिरावून घ्यावयाचीं असतील तर देशात वाटेल त्या साहसात आनंदानें उडी घ्यावयास अनिवार्य प्रेरणा देणारी व उत्साहानें त्या साहसाचीं येतील तीं संकटें सोसण्याची शक्ति पुरविणारी नवी देशहितैकनिष्ठ श्रद्धा उत्पन्न झाली पाहिजे. या नव्या श्रद्धेचा पाया वंगभंगाच्या क्षोभातून अवतरलेल्या स्वदेशीच्या चळवळीचे वेळीं टिळकानी घातला. त्या श्रद्धेला अनन्यभक्तीचें रूप देण्याचें कार्य खादीच्या चळवळीनें गांधी करीत आहेत. एके काळीं अलौकिक आत्मयज्ञ करणाऱ्या शिवाजी महाराजाच्या महाराष्ट्रानें या कार्याला मदत केली पाहिजे, असें आल्हादभरा लेखांचें तात्पर्य आहे.

प्रस्तुत संग्रहाच्या शेवटीं काकासाहेबाची कित्येक अध्यक्षीय भाषणे जोडलीं आहेत. नाट्य असो, कीर्तन असो किंवा साहित्य असो, काकासाहेब या सर्वाचा विचार राष्ट्रहिताची दृष्टि चळूं न देता कसा करीत असत,

याचा पुरावा या भाषणांतून आहे. राष्ट्रहिताची जबाबदारी टाळून यापैकीं कोणताहि विषय यशस्वी रीतीनें चोखाळता येणार नाहीं, असा काकासाहेबाचा या भाषणातील सिद्धांत स्पष्ट दिसणारा आहे. या सिद्धांताच्या उज्ज्वलतेमुळे त्याच्या विचारांना अनेक स्थळीं विलक्षण तेज चढलेलें आहे. १८९३ सालापासून १९४८ पर्यंत म्हणजे उणीपुरी ५५ वर्षें आपल्या बौद्धिक सद्गुणाचें धन राष्ट्रहिताच्या अनन्य भक्तीनें मराठी भाषेच्या द्वारें नाटके, व्याख्यानें, वृत्तपत्रीय लेख आणि पारमार्थिक पुस्तके अशा भिन्न भिन्न शाखांनीं महाराष्ट्र जनतेला, स्वतःकरिता फळाची अपेक्षा न बाळगता अर्पण करणाऱ्या या महनीय पुरुषाच्या नाटकाचा गौरव महाराष्ट्राकडून सतत चाललेला आहे. काकासाहेबाच्या पारमार्थिक पुस्तकांचेंहि परिशीलन होत आहे. व्याख्यानाचा गौरव त्याच्या हयातींत होऊन गेला. त्याचे वृत्तपत्रातील संपादकीय लेखन संग्रहरूपानें प्रसिद्ध व्हावें, अशी उत्कंठा अलीकडे कित्येक वर्षें महाराष्ट्र जनतेकडून तीव्रतेनें व्यक्त होत असे. ती उत्कंठा आता यथामति तृप्त केली जात आहे. काकासाहेबाच्या इतर वाङ्मयाप्रमाणें या वाङ्मयाचाहि महाराष्ट्रात आदर होईल असा पूर्ण विश्वास आहे.

—न. र. फाटक

---



# अनुक्रमणिका

## दुरुस्ती

खुद्द टिळकांचेच उद्गार, टिळक आणि मुसलमान, टिळक आणि खिलाफत या अनुक्रमें पान १४६, १५२ व १५८ वरच्या लेखाच्या तारखा अनुक्रमें २३ जुलै १९२२, २४ जुलै १९२२, व २५ जुलै १९२२ अशा चुकीनें आल्या आहेत. त्या अनुक्रमें २० जुलै १९२१, २१ जुलै १९२१, व २२ जुलै १९२१ अशा वाचाव्यात.

---

॥ श्री ॥

# खाडिलकरांचा लेखसंग्रह

## ( भाग दुसरा )

---

## * स्वराज्याची शिष्टाई

उद्ईक म्हणजे बुधवारीं रात्रीं मुंबईहून मद्रास मेलनें निघून लो. टिळक, श्री. खापर्डे, श्री. करंदीकर, श्री. केळकर व बाबू बिपिनचंद्र पाल हे पांच पुढारी मद्रास-कोलंबोवरून इंग्लंडला स्वराज्याचे शिष्टाईकरता जावयाचे आहेत. गेल्या आठवड्यात लो. टिळक यांचा सन्मान पुणें शहराकडून करण्यात आला. महाराष्ट्राचें केंद्रस्थान पुणें शहर होय आणि त्या पदवीला साजेसाच सन्मान पुणें शहरानें लो. टिळक यांचा केला. रेमार्केटमध्यें भरलेल्या दहा बारा हजार लोकांच्या सभेंत स्वराज्याच्या कार्याविषयीं पुणेंकरांची आतुरता स्पष्ट दिसली; खडवानी मॅन्शनमधील मेजवानीच्या वेळीं पुणें शहरची एकी व व्यापारी वर्गाचा उत्साह दृष्टीस पडला; आणि शनिवारीं रात्रीं निघालेल्या मिरवणुकीनें तर महाराष्ट्रातील गेल्या दोन तीन महिन्यांतील समारंभावर ताण केली. बायका-मुले, हिंदु-मुसलमान, तरुण-वृद्ध, सर्व तऱ्हेच्या सर्व दर्जांच्या जनसमूहानें गायकवाडाचें वाड्यापासून तों मोतीचौकापर्यंत, मिरवणुकीस प्रारंभ होण्यापूर्वींच, रस्ता इतका फुलून गेला होता कीं, गेल्या वीस पचवीस वर्षांतील श्रीगजाननाच्या सर्व मिरवणुकींनीं आपलें पुण्य लो. टिळक यांच्या या मिरवणुकीला

---

* केसरी, ता. २६ मार्च १९१८

अर्पण केल्यासारखें वाटलें! असला अपूर्व सन्मान ह्यापूर्वी गेल्या शंभर वर्षांत पुणे शहरानें दुसऱ्या कोणाचाहि केलेला नाहीं. गेले दोन तीन महिने सर्व महाराष्ट्राने लो. टिळक यांचा सन्मान विलक्षण केला यात शंका नाहीं. त्या सर्व सन्मानाच्या मंदिरावर पुणे शहरानें गेल्या आठवड्यात कळस चढविला! हा सन्मान गुजराथी–मारवाडी व्यापाऱ्यानी केला; हा सन्मान श्रीमंत–गरीब सर्व दुकानदारानीं केला; हा सन्मान पुण्यातील सर्व सुखवस्तु स्त्री–पुरुषानीं केला; हा सन्मान पुण्यातील हरएक मनुष्यानें केला. लो. टिळक पुण्यात वाढलेले, त्यांच्या कामगिरीचें मुख्य स्थान पुणें शहर, लोकात जागृति व्हावी म्हणून पुण्याचा प्रत्येक उंबरठा त्यानीं झिजविलेला, तेव्हा केवळ त्याच्या दर्शनाचे कुतुहलामुळें हा सन्मान झाला असे म्हणतां येत नाहीं महाराष्ट्राच्याच नव्हे तर हिंदुस्थानच्या इतिहासांत शे दोनशें वर्षांनीं होणारी फार मोठी गोष्ट घडून येत आहे व त्या कार्याचे सिद्ध्यर्थ हिंदुस्थानातील जनसमूहानें करावयाच्या उद्योगातील

## स्वयंभू पुढारी

ह्या नात्यानें लो. टिळक विलायतेस जात आहेत, ह्या जाणिवीमुळेंच पुणें शहरानें एवढा अपूर्व सन्मान केला. परमेश्वरी सूत्रानें चार पांच वर्षांपूर्वीची सर्व जगाची स्थिति आज पालटून टाकिली आहे. चार पाच वर्षांपूर्वीचें इग्लंड आज उरलेलें नाहीं. सभोवारची स्थिति पालटलेली आहे आणि स्वराज्याचे दिवस जवळ येत चालले आहेत, हे लोकाच्या ध्यानीं आलेलें आहे. तेव्हा स्वराज्याच्या चळवळीकरता विलायतेस जाणाऱ्या पुढाऱ्याचा सन्मान करण्यास लोकानीं उत्सुकता दाखविली, हें साहजिकच होय. हें कालमाहात्म्य तीनचार वर्षांपूर्वीच पुरें ओळखून, आपल्यांतील दुही मिटवून, होमरूलची चळवळ सुरू करून, काळाचे ओघाला हिंदुस्थानचे कार्याला जुंपण्याची तयारी ज्या पुढाऱ्यांनीं केली, त्यांच्या उद्योगाला दुजोरा न

देण्याइतका इतभागी हिंदुस्थान खास नाहीं, हे महाराष्ट्रानें लो. टिळक याचा गौरव करून सिद्ध केलें आहे. लोकाच्या विश्वासाचें व मदतीचें आश्वासन अशा रीतीनें मिळवीत असताना लो. टिळक यानीं महाराष्ट्रातील निरनिराळया व्याख्यानांत विलायतेतील कार्याचें धोरण व्यक्त केलें. हें धोरण ऐकण्याची सधि ज्याना मिळाली त्याच्या मनात कार्याच्या मोठेपणा-विषयीं आता कोणत्याहि प्रकारची शका रहाणें शक्य नाहीं. हें शुभ कार्य आहे, आणि 'शुभस्य शीघ्रं' या न्यायाने हें कार्य लाबणीवर टाकणें उचित नव्हे. 'इग्रजी साम्राज्यातील सर्व देशाना स्वराज्य दिलेच पाहिजे' या म्हणण्यास महायुद्धामुळें मूर्त स्वरूप प्राप्त झालें, स्वराज्य देण्याचा बादशाही हुकूम जाहीर झाला; व स्टेट सेक्रेटरींचा हिंदुस्थानांतील दौरा संपून स्वराज्याचा रिपोर्ट बाहेर पडण्याची वेळ येऊन ठेपली. अशा वेळीं ज्याच्या हातीं स्वराज्याच्या स्वरूपाची

## साम्राज्यांतील भागी

हिंदुस्थानास देण्याचें आहे, त्या इग्लंडच्या लोकातच आमच्या स्वराज्याची चळवळ करणें जरूर आहे. हिंदुस्थानाला स्वराज्य मिळण्याला इंग्लंडातील लोकांच्या मनाची जी अनुकूल स्थिति पाहिजे ती आज उत्पन्न झाली आहे. गेल्या दोन महिन्यांत रशियाच्या तहानें युरोप खंडाची व आशिया खंडाची सर्व राजकीय स्थिति पालटून टाकली आहे. सर्व रशिया प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें पिळून टाकण्यास जर्मनीनें सुरवात केली आहे, आणि पश्चिम रणभूमींत जरी इग्लडचा जय झाला तरी जर्मनीच्या तोंडांतून रशिया बाहेर पडण्याची आतां फारशी आशा नाहीं. लढवय्याच्या दृष्टीनें रशिया निदान दोनतीन पिढया नामशेषच रहाणार, आणि रशियाच्या लष्करी मृत्यूमुळें तितका काळ रशियाच्या महायुद्धातील दोस्ताना लष्करी

दृष्टया सुतकातच घालवावा लागणार, यांत संशय नाही. रशियाचें लष्कर पुन्हा जिवंत होईतों, म्हणजे आणखी दोन तीन पिढयानी हल्लींची स्थिति पालटून जाईतों, साम्प्रतचें महायुद्ध संपल्यावरहि, अशुभाचें कालहरण करीत जर्मनीस डोईजड न होऊं देण्याच्या तरतुदींत नेहमीं चूर होऊन रहाणें इंग्लंडला भाग आहे. रशियाच्या लष्करी मृत्यूमुळें युरोप खंडावर व आशिया खंडावर ओढवलेलें संकट टाळण्यासाठीं साम्प्रतचें महायुद्ध संपल्या-वरहि इंग्लंडला दोन चार पिढया लष्करी दृष्टीनें एकसारखी कंबर बांधून उभें रहावें लागेल पूर्वी इंग्लडनें कधीहि डोक्यावर घेतलेलें नाही, इंग्लडनेच काय पण दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रानें उचललेलें नाहीं, एवढें मोठें लष्करी ओझें इंग्लडास महायुद्धानंतर उचलावयाचें आहे नेपोलियनला हाणून पाडण्याचा उद्योग ज्या लष्करी तयारीपुढे निस्तेज ठरेल असला दीर्घोद्योग, स्वतःच्या मनगटाचे जोरावर करणे इंग्लडला भाग आहे. रशिया मरण पावल्यामुळे अफगाणिस्तान–बलुचिस्तानपर्यंत जर्मनीचे हात पसरले आहेत, आणि टर्की जर्मनीने बगलेंत मारलेला असल्यामुळें मुसलमानी हृदयांचींहि सूत्रे जर्मनीच्या हातीं गेली आहेत. महायुद्धानंतर जपानी मदतीवर अवलंबून राहून स्वस्थ बसणें योग्य होणार नाहीं. 'माझ्यावर पूर्ण विश्वास टाका व मला पाहिजे तें एकटयानें करू द्या ' असे म्हणणारा भागीदार भागी मोडून एकटाच मालक होण्याच्या तयारीला लागला म्हणून समजावे. अमे-रिकेच्या धर्मार्थ खेळाची मदत आज होत आहेच–त्यामुळें महायुद्ध पार पडलें हें खरें; पण धर्मार्थ खेळाच्या मदतीवर कोणत्या संस्था चिरस्थायी झाल्या आहेत? अंतस्थ शक्तीचीच जुळवाजुळव नीट करावी लागते, तेव्हा कायमचें निभावतें. अमेरिका व जपान यावर भार न टाकता, व महायुद्धा-नंतर प्रसंगविशेषीं हल्लींप्रमाणें इटली व फ्रान्स ह्यांचीहि दोस्ती उपयोगी पडणार नाहीं हें ध्यानीं ठेवून, इंग्रजी साम्राज्याला स्वतःच्या पायावर उभें राहून रशिया गिळकृत केल्यानें माजलेल्या टर्की–जर्मनांशीं झुंजण्याची

सतत तयारी ठेवणें भाग पडत आहे. आजच्या महायुद्धात सर्व युरोपचा खिळखिळाट झाला आहे; कोणालाहि यश मिळो, दोनहि पक्ष निःसत्व झाले आहेत; मग रशियास खाऊन टाकण्यास मिळाल्यामुळें जर्मनी पुनः थोडया अवधींत घष्टपुष्ट झाला तर कसे ? इंग्रजी साम्राज्याला एकट्यालाच तसल्या जर्मनीशी लढणें भाग पडेल. महायुद्ध सुरू असताना व महायुद्ध संपल्यावरहि इंग्लंडची मुख्य करामत स्वतःजवळचें मनुष्यबळ उपयोगांत आणण्याच्या कौशल्यावर अवलंबून रहाणार, हें उघड आहे. इंग्रजी साम्राज्य आरमारी शक्तीवर इतके दिवस अवलंबून होतें, आतां आरमारी शक्ति पूर्वींच्याइतकी उपयोगाची नसून मनुष्यबल अधिक महत्त्वाचें झाले आहे. आरमारी शक्तीचे दिवस मागे पडले, मनुष्यबलाचा काळ सुरू झाला यावेळीं साम्राज्याच्या सत्तेचा भाग कोणाला मिळेल ?

## मनुष्यबलाचें भांडवल

या भागींत जो आणूं शकेल त्याला ही भागी कालमाहात्म्यामुळेंच मिळाली पाहिजे. हिंदुस्थानाइतके मनुष्यबल इंग्रजी साम्राज्यात दुसरीकडे कोठेहि नाहीं. जपानच्या ऐवजी जर हिंदुस्थानावर विश्वास टाकला, अमेरिकेकडे धर्मार्थ मदत मागण्याऐवजीं जर हिंदुस्थानाला स्वराज्याच्या हक्काचे उपयोगात तरबेज करून सोडलें, तर पुढील महायुद्धात जपान व अमेरिका यांच्या मदतीहून अधिक मदत हिंदुस्थानाकडून इंग्लंडास होणारी आहे. ह्या मदतीचें भांडवल बरोबर घेऊन लो. टिळक भागीचे करारमदार मुक्रर ठरविण्याकरितां विलायतेस जात आहेत. मनुष्यबलाचे भांडवल लष्करी दृष्टीनें आज मूर्तिमत बनून इंग्रजी साम्राज्याचे उपयोगीं तें प्रत्यक्ष पडण्यास हिंदुस्थानांतील लोकसंख्येस स्वराज्याच्या यंत्रातून घालून नीट व्यवस्थित करून बाहेर काढणें जरूर आहे. हिंदुस्थानांत तीस कोटी लोक आहेत. हा कच्चा माल नोकरशाहीच्या यंत्रात घालून काढला असता पांचसहा लाख शिपायांची मदत होऊं शकते असा अनुभव पटला आहे. स्वराज्याचे यंत्रांत

जर हा कच्चा माल घातला तर कोटयवधि लष्कराची मदत होऊं शकली पाहिजे असा युरोपचा सिद्धांत आहे. इंग्लंडला महायुद्धानंतरहि मनुष्यबलाची अत्यंत जरूरी लागणार ह्यांत संशय नाहीं. मग हिंदुस्थानाला स्वराज्य देण्याचा कायदा पास करा म्हणून इंग्लंडला सांगण्याची शिष्टाई तरी कशाला पाहिजे? जी गोष्ट साध्या त्रैराशिकानें सहज सिद्ध होणारी आहे, ती गोष्ट इंग्लंडला समजणार नाहीं व इंग्लंड करणार नाहीं असें कसें म्हणावे? आजची युरोपची व आशियाची परिस्थिति कोणालाहि सहज समजण्यासारखी आहे; मनुष्यबलाची योग्यता आज इंग्रजी मुत्सद्यांना जितकी समजते तितकी इतरांना समजणे शक्य नाहीं. स्वराज्य हा एकच इलाज मनुष्यबलास रणांगणावर मर्दुमकी गाजविण्यास लावणारा आहे, हें रशियाच्या अधःपातानें सिद्ध केलें आहे. रशियांत मनुष्यबल होतें, पण स्वराज्य नव्हतें; त्यामुळें झारसाहेबाची सत्ता चुटकीसरशी ढासळून गेली. स्वराज्याशिवाय मनुष्यबल निरुपयोगी होतें, इतकेंच नव्हे तर स्वतःचा व आपणाबरोबर इतरांचाहि हें असलें मनुष्यबल नाश केव्हां करील त्याचा नेम नसतो, हें रशियाच्या लष्करी मृत्यूनें शाबीत केलें आहे. मनुष्यबल व स्वराज्य यांची सांगड जर हिंदुस्थानांत इंग्रजी मुत्सद्यांना घालतां आली नाहीं तर इंग्रजी साम्राज्याचें वैभव ओहोटीस लागल्यावांचून रहाणार नाहीं. ही पालटलेली स्थिति आतां इतकी व्यक्त झाली आहे कीं, विचारी मनुष्यास ह्या नव्या काळाचे विरुद्ध जातां येणें शक्य नाहीं. मग स्वराज्याच्या मार्गांत अडथळा कोणता? जी गोष्ट इंग्रजाच्या व हिंदुस्थानच्या हिताची आहे ती लवकर घडून येण्याला इंग्लंडांत व हिंदुस्थानांत चळवळ कशाला? निश्चयाच्या उद्योगाची येथें जरूरी काय? परमेश्वरानें स्वराज्याचा काळ स्थापित केला; इंग्रजी मुत्सद्यांचें व हिंदी पुढाऱ्यांचें मनोगत एक करून स्वराज्याचा मार्ग देवानें दाखविला; ह्या गोष्टी खऱ्या आहेत. पण ह्या मार्गानें जाणाऱ्या इंग्रजांना व हिंदी लोकांना ठेंचा लागाव्या म्हणून रस्त्यांत

मोठमोठे दगड येऊन पडले आहेत. हे खडक लोभमूलक आहेत; ते मनुष्यानें उत्पन्न केलेले आहेत, व ते मनुष्यानींच फोडून काढले पाहिजेत. मनुष्यांच्या देहाचा व अंतःकरणाचा स्वभाव असा आहे कीं, कोणताहि अभ्यास फार दिवस झाला असताना त्या अभ्याससंबंधाच्या शारीरिक व मानसिक गाठी आपोआप उत्पन्न होतात. बुद्धीनें व परमेश्वरी प्रेरणेनें पूर्वीच्या अभ्यासात फरक करण्याचें ठरविलें तरी ह्या गाठीं नेहमी आड येतात. हिंदुस्थानात नोकरशाहीच्या जागीं स्वराज्य सुरू केलें पाहिजे असें परमेश्वरानें, इंग्रजी मुत्सद्यानीं व हिंदी पुढाऱ्यानीं ठरविलें तरी

## नोकरशाहीच्या गांठी

इंग्लंडात व हिंदुस्थानांत फोडून काढल्याखेरीज स्वराज्याची स्थापना होऊं शकणार नाहीं. नोकरशाहीवरच अवलंबून असणाऱ्या हजारों गांठी हिंदुस्थानच्या मर्मस्थानीं खिळून बसल्या आहेत व ह्या गांठी विलायतेस तर फारच जाचक झाल्या आहेत. नोकरशाहीचा हा घट्ट झालेला भाग हिंदुस्थानच्या काहीं लोकाकडून ‘ स्वराज्य नको ’ असें येथें वदवीत आहे, तर इंग्लंडातल्या लोकाना निराळयाच भ्रमात पाडीत आहे. हिंदुस्थानचें मनुष्यबल स्वराज्याच्या यंत्रात घातलें तर लष्करी सामर्थ्य उत्पन्न न होता उलट स्वराज्ययंत्रच या कच्च्या मालाच्या ओबडधोबडपणानें मोडून जाईल; मग आजचें पाच सहा लाख लष्करहि गेलें व पुढलें साठसत्तर लाखांचें लष्करही गेलें; तेव्हां हातचें सोडून पळत्याच्या मागें लागूं नका असें विलायतच्या लोकांना या गाठी सांगत आहेत. हिंदुस्थानात ही गांठींची सांथ आतां कमी झाली आहे. लखनौच्या व कलकत्याच्या राष्ट्रीय सभांनीं बऱ्याच गाठी फोडल्या आहेत. लो. टिळक यांच्या स्वराज्याच्या दौऱ्यानें व ठिकठिकाणच्या त्यांच्या सन्मानानें या गाठीं निस्तेज ठरल्या आहेत. सर्व हिंदुस्थानानें लो. टिळक यांना आतां असें आश्वासन दिलें आहे कीं, या गाठींमुळें हिंदुस्थानची प्रकृती बिघडण्याची आतां धास्ती उरलेली नाहीं;

पण विलायतच्या गांठी फोडावयाच्या राहिल्या आहेत, व त्या फुटल्यावर हिंदुस्थानात गाठी दृष्टीसच पडणार नाहीत. विलायतच्या गाठी फोडल्याशिवाय हिंदुस्थानातील अवशिष्ट राहिलेल्या गाठी फोडण्याचे नादी लागणे योग्य नाही. कारण आता येथे शिल्लक राहिलेला विरोध हा विलायतच्या गाठीचा अवधाणा होय. विलायतचे अडथळे हिंदी पुढाऱ्यानाच दूर करावयाचे आहेत असे नाही, तर दूरदर्शी इग्रजी मुत्सद्यांचेंहि तेच काम आहे. परमेश्वरी नेमानेमानें या स्वराज्याच्या चळवळीसंबधानें इग्लडचें व हिंदुस्थानचें हित एकमेकात मिसळून गेलें आहे; तेव्हां ज्या पुढाऱ्यावर सर्व हिंदुस्थानचा विश्वास आहे, सर्व हिंदुस्थानासबधानें कोणतीहि हमी देण्याइतक्या पाठबळाचें आश्वासन ज्या पुढाऱ्याना ह्या शिष्टाईचे प्रसगीं सर्वांनी दिले आहे, ते पुढारी विलायतेस गेल्यावर, हिंदुस्थानातील नोकरशाहीच्या जुन्यापुराण्या पण अधिक टणक झालेल्या गाठी फोडताना इग्रजी मुत्सद्यांचें साहाय्य त्यांना मिळाल्यावाचून कसे राहील ? नोकरशाहीच्या आवाळूंना संभाळून बाळगण्यापेक्षा विलायतच्या लोकाना इग्रजी साम्राज्याच्या बचावाची व वैभवाची काळजी अधिक आहे; तेव्हा विलायतेसहि लो. टिळकांच्या विचारसरणीचा, स्वार्थत्यागाचा, व हिंदुस्थानच्या वतीनें बोलण्याच्या स्वयंभू हक्काचा योग्य परिणाम झालाच पाहिजे. हिंदुस्थानातील लोकाचें आपणास पूर्ण पाठबळ आहे, असें आश्वासन असल्या प्रसगीं शिष्टाईस जाणाऱ्या पुढाऱ्याना लागत असतें; व तें आश्वासन गेल्या दोन तीन महिन्यातील ठिकठिकाणच्या समारभांनीं पूर्णपणें दिलें आहे. ह्या आश्वासनामुळे विलायतेंतील सिडनहॅमी लोभाच्या गांठी फोडण्यास त्याना विशेष उमेद आली आहे. परमेश्वरानें आतापर्यंतच्या स्वराज्याच्या उद्योगात जसें यश त्याना दिलें तसेच तेथें विलायतेंतील उद्योगात परमेश्वरानें द्यावें, अशी आपल्या हजारों वाचकाच्या तर्फे ‘ केसरी ’ची यावेळीं परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे !

# * स्वराज्य-संघाची दुसरी परिषद

गेल्या बुधवारी रात्रीं मद्रास मेलनें मुंबईहून निघून लो. टिळक वगैरे मंडळी कोलंबोकडे रवाना झाली. त्यावेळीं मुंबई शहरानें केलेला त्यांचा सन्मान विशेष थाटाचा व मुंबईच्या स्वराज्यावरील प्रेमास साजेसाच झाला. मारवाडी व्यापाऱ्यांनीं पंधरा हजार रुपयांची मदत केली, कापडबाजारातील सभेंत पंधरा हजारांची थैली नजर करण्यात आली, डॉक्टरांनीं पांच हजार रुपये दिले, चायना बागेत थाटाची मेजवानी झाली; स्त्रियांनीं गौरव केला; शांतारामाचे चाळींत जंगी जाहीर सभा भरली, व चाळीस गिरण्यांतील मजुरांनीं प्रत्येकी एक आणा वर्गणी करून हजार रुपये लोकमान्यांना दिले. बुधवार सायंकाळची मिरवणूक उत्साहपूर्वक होती व मुंबईतील सर्व दर्जाच्या व सर्व प्रकारच्या लोकांनी लोकमान्यांचा निरोप अंतःकरणाच्या कळवळ्यानें घेतला. त्या तीन चार दिवसांत मुंबईस सकाळ संध्याकाळ एकसारखे समारंभ होत होते व त्यामुळे व्यवस्थापकांची विशेष तारांबळ झाली होती; तथापि मुंबईतील निरनिराळ्या व्हॉलंटियर कोअरांनी सर्व सभांतून व मिरवणुकीच्या वेळीं उत्तम रीतीनें काम केल्यामुळे सर्व समारंभ उत्तम रीतीनें पार पडले. मुंबईच्या ह्या समारंभांत मंगळवारीं रात्रीं फ्रेंच पुलाजवळील मंडपांत भरलेली स्वराज्यसंघाची दुसरी परिषद विशेष महत्त्वाची होय. विलायतेस जाणाऱ्या शिष्टाईच्या मंडळाला निरोप देण्याच्या दृष्टीनें, गेल्यासालचा आढावा ऐकून उत्साह वाढविण्याच्या दृष्टीनें, व पुढील कामाची दिशा आंखून त्याची तरतूद लावण्याच्या दृष्टीनें ह्या परिषदेचें अभिनंदन केल्याशिवाय कोणाहि स्वराज्यवाद्याला राहवणार नाहीं.

स्वराज्य संघाची पहिली परिषद दहा महिन्यांपूर्वी नाशकास भरली.

* केसरी, ता. २ एप्रिल १९१८

त्यावेळच्या स्थितीत व आजचे स्थितीत किती तरी अंतर! त्यावेळी नाशिकच्या प्रांतिक सभेच्या मंडपात परिषद भरते का पोलिसच्या हरकतीमुळे परिषद बंद ठेवावी लागते अशी चिंता होती. यंदा तगातला काहीच भाग दृष्टीस पडला नाही, इतकेच नव्हे तर असल्या परिषदेला हजर रहाण्याने कोणाची कोणावर इतराजी होईल अशी शंकाहि कोणाच्या मनात आली नाही. नाशिकच्या पहिल्या परिषदेचे दिवस फार मागे पडले व नव्या काळास आता पूर्णपणे सुरवात झाली हे मुंबईच्या परिषदेने सर्वांच्या नजरेस आणले. भीतीचा लवलेश कोठेहि नव्हता. उलट एक प्रकारच्या उत्साहानें व या कामी 'आम्ही यशस्वी होणार' या भरवशाने सर्व परिषद भारून गेली होती. गेल्या साली काळजी होती, यंदा उत्साह होता, गेल्या साली भर दोन प्रहरीहि पडद्याचे सावलीत बागुलबोवा आहेसे वाटलें, यंदा पहाटेच्या शीतल समयी उदयास येत चाललेल्या स्वराज्याचा उत्साहजनक उजेड दृष्टीस पडला! दहाबारा महिन्यात इतके अंतर पडेल, असें पहिल्या परिषदेच्या वेळी कोणाच्याहि स्वप्नी आले नव्हते. पण कालचक्र गेल्या दहाबारा महिन्यात फार झपाट्याने फिरले व पुढील दहा बारा महिन्यात याहूनहि अधिक वेगाने तें फिरेल यात संशय नाही. काळ बदलला ही गोष्ट तर खरीच, पण या बदललेल्या काळी झोपीं न जाता योग्य रीतीने लोकास जागृत करण्याचा उद्योग स्वराज्य संघानें गेल्या सालीं केला ही गोष्ट तितकीच खरी आहे. गेल्या साली स्वराज्य-संघानें नेटानें उद्योग केला म्हणूनच संघाची दुसरी परिषद पहिल्या परिषदेहून निराळ्या स्वरूपाची झाली. पहिल्या साली स्वराज्य-संघाचे सभासद दहा बारा हजार होते, दुसऱ्या वर्षी ही संख्या तिपटीनें वाढली. नाशिकच्या परिषदेस शंभर रुपये वर्गणी देणाऱ्या तहाहयात सभासदाचा वर्ग नवीन निर्माण करण्याचा नियम पास झाला आणि एका वर्षात सहा सातशें तहाहयात सभा-

सद झाले. तहाहयात सभासद होऊन व डेप्युटेशनला मदत करून ठिक-ठिकाणच्या लोकांनीं स्वराज्यसंघाचा फंड इतका वाढविला की, गेल्या सालच्या खर्चवेंच भागून अडीच लाखाची शिल्लक सेक्रेटरीस दाखविता आली. स्वराज्य-संघाच्या कामाचा रिपोर्ट इतका उत्साहजनक होण्यास ठिकठिकाणच्या सेक्रेटरीनी व इतर सभासदानी गेल्या साली दाखविलेला उद्योगीपणा कारणीभूत झाला त्यात संशय नाही. पण लो. टिळक यांचा निरलस उद्योग सर्व ठिकाणच्या उद्योगाना प्रेरित करणारा आत्मा ठरला. लो. टिळक यांच्या स्वराज्याचे दोऱ्याचा गेल्या साली अत्यंत उपयोग झाला. इतर प्रांतांत स्वराज्याची एवढी मोठी चळवळ गेल्या साली दृष्टीस पडली नाही व आपल्या प्रांतांत दृष्टीस पडली, या भेदाचे कारण तेथील लोक स्वराज्याविषयी उत्सुक नाहीत हे नव्हे तर लो. टिळक यांच्याप्रमाणें सतत व चिकाटीने उद्योग करणारा पुढारी इतरत्र नाहीं हे होय. येथील गेल्या सालची स्वराज्याची चळवळ व्यक्तिमाहात्म्याचें फळ होय. तेव्हा पुढील सालीं लो. टिळक शिष्टाईकरता इंग्लडात असताना येथील चळवळ थोडीबहुत मंदावेल की काय अशी भीति वाटणें साहजिक आहे. ही भीति स्वराज्य-संघाच्या मध्यवर्ती कमिटीलाहि वाटली व स्वराज्याचा हिंदुस्थानातील उद्योग शिथिल न पडेल अशी सदर कमिटीने व्यवस्थाहि केली. स्वराज्य-संघाचे अध्यक्ष बॅ. बॅप्टिस्टा हे सांप्रत विलायतेस आहेत व उपाध्यक्षांपैकी लो. टिळक व ना. खापर्डे हे विलायतेस जाण्यास निघाले आहेत, त्यामुळे मूळच्या उपाध्यक्षांपैकी ना. बेलवी तेवढे जाग्यावर शिल्लक राहिले. ना. बेलवी यांच्या बरोबरचे दोन उपाध्यक्ष विलायतेस जाणार तर पाच नवीन उपाध्यक्षांची जोड त्याना देण्यात आली आहे. मुंबईचे ना. मनमोनदास रामजी, बेळगावचे रा. गंगाधरराव देशपांडे, वऱ्हाडचे रा. अणे, नागपूरचे डॉ. मुंजे व कलकत्त्याचे पंडित अंबिका प्रसाद वाजपेयी हे नवीन उपाध्यक्ष होत

स्वराज्य-संघाचे उत्साही व कर्ते जनरल सेक्रेटरी रा. केळकर हेहि विलायतेस जात असल्यामुळे आणखी चार जॉइंट जनरल सेक्रेटरी नेमण्यात आले. पुण्याचे रा. गोखले, मुंबईचे डॉ. साठये, उमरावतीचे रा. बाबासाहेब खापर्डे व नागपुरचे रा. वैद्य हे चार नवे जॉईंट जनरल सेक्रेटरी होत. नवे उपाध्यक्ष व नवे सेक्रेटरी हे सर्व उत्साही, निश्चयी व कार्यक्षम पुढारी आहेत. स्वराज्यावरील आपली निष्ठा त्यांनी कृतीने व्यक्त केली आहे. रा. गंगाधरराव देशपांडे हे पुढील साली पुण्यास राहून स्वराज्य-सेवा करणार असल्यामुळे कर्नाटक, महाराष्ट्र, मुंबई, वऱ्हाड, मध्यप्रांत वगैरे निरनिराळ्या विभागांना आपापला उपाध्यक्ष व जॉइंट जनरल सेक्रेटरी मिळाल्यासारखे झालें आहे. लो टिळक ह्यांच्या गेल्या सालच्या उद्योगाचा संचार सर्वांच्या अंगी आज झालेला आहे. तेव्हा या संचाराच्या जोरावर नव्या सालची स्वराज्याची चळवळ स्वराज्याचे नवे उपाध्यक्ष व जाइंट जनरल सेक्रेटरी नेटानें पुढे चालवतील, असा आमचा पूर्ण भरवसा आहे.

मुंबईच्या परिषदेत स्वराज्य–संघाच्या नव्या अधिकाऱ्यांच्या नेमणुका झाल्या, इतकेंच नव्हे तर नव्या सालच्या कामाचीहि दिशा ठरविण्यात आली. पहिल्या वर्षी सरकारी अधिकारी व स्वराज्यसंघ यामध्ये तेढ उत्पन्न होते की काय, ही भीति होती. ती भीति दुसऱ्या वर्षी नष्ट झाली. स्वराज्य-संघाचे ध्येय इंग्रजी छत्राखालील स्वराज्य हे होय. इंग्रजी सत्तेचेहि हेच धोरण आहे असे बादशाही हुकुमानें प्रसिद्ध झाल्यामुळे सदर तेढीच्या भीतीला थाराच शिल्लक राहिला नाही. ह्या स्वराज्याच्या ध्येयातील पहिला हप्ता म्हणजे लखनौ–कलकत्ता कॉंग्रेसने पास केलेला स्वराज्याचा ठराव होय. हीहि बाब स्वराज्य-संघानें पूर्णपणें मान्य केलेली असल्यामुळे स्वराज्य–संघाने गेल्या सालीं केलेली स्वराज्य–सेवा म्हणजे राष्ट्रीय सभेचीच

सेवा होय. स्वराज्य संघाचे सभासद म्हणजे राष्ट्रीय सभेचे असाधारण सेवक होत. राष्ट्रीय सभेसारख्या अवाढव्य सभेस वर्षभर एकसारखे बोलणें, हलणेंचालणें सोईचें होत नाही; तेव्हा स्वराज्य संघासारख्या आटपशीर चलाख व कळकळीच्या संस्थानीं राष्ट्रीय सभेची सेवा वर्षभर करीत राहिल्याशिवाय राष्ट्रीय सभा कधींहि यशस्वी होणार नाहीं. चुक्याचें प्रायश्चित्त स्वतः भोगावयाचें, आणि उद्योगाची गोड फळे तेवढीं मालकाच्या पदरात टाकावयाची, अशा धोरणानें काम करणाऱ्या एकनिष्ठ सेवकाची जरुरी राष्ट्रीय सभेस फार होती.गेली दोन वर्षे राष्ट्रीय सभेस असले नोकर स्वराज्य-संघाने लाभून दिल्यामुळे राष्ट्रीय सभेचें महत्त्व फार वाढलें आहे. ही राष्ट्रीय सभेची सेवा पुढील सालीहि पूर्वीच्याच निश्चयाने, निष्ठेने व चिकाटीने केली पाहिजे, असे मुंबईच्या परिषदेने ठरविले. स्टेट सेक्रेटरी मॉन्टेग्यूसाहेब तयार करीत असलेल्या योजनेचे धोरण प्रसिद्ध झाल्याबरोबर राष्ट्रीय सभेस आपले मत प्रदर्शित करावे लागेल. लखनौस जें मत प्रदर्शित झालें, कलकत्त्यास जे मत खुंटा हालवून घट्ट बसविल्याप्रमाणें ठाम करण्यात आले, तेच मत तिसऱ्या उच्चाराचे वेळीं पूर्वीच्याच करारी बाण्यानें उच्चारले जाण्यास हरकत पडू नये अशा प्रकारची राष्ट्रीय सभेची सेवा पुढील तीन चार महिन्यात सर्व स्वराज्यवाल्यानीं केली पाहिजे, असें लो. टिळक यानी स्वराज्यसंघाला बजावून सांगितलें. लोकमान्यांच्या ह्या उपदेशाप्रमाणें राष्ट्रीय सभेची सेवा वरीलप्रमाणें करण्याचेंहि व्रत स्वराज्यसंघानें मोठ्या हौसेनें पत्करिले ही संतोषाची गोष्ट होय.

राष्ट्रीय सभेनें स्वराज्याचा पहिला हप्ता म्हणून लखनौस जी मागणी केली व कलकत्त्यास जी मागणी ठरविण्यांत आली, ती मागणी पूर्णपणें पदरांत पडण्याचे दिवस आता आले आहेत. यावेळीं लोभामुळें किंवा

भीतीमुळें आम्ही आपला आंखलेला मार्ग सोडतां कामा नये. राजकारणांत तडजोड नेहमींच करावी लागते. राजकारण तडजोडीची वस्त्रे पांघरीत असतें; इतर वस्त्रप्रावरण त्याला माहीत नाहीं वस्त्रासंबंधानें तडजोडीस हरकत नाही; पण शरीरासंबंधानें व आतील आत्म्यासंबधाने तडजोड यावेळीं उपयोगाची नाहीं. स्वराज्याचा आत्मा सर्व हिंदुस्थानांत खेळला पाहिजे, हे बादशहांनींच आतां ठरविलें आहे. हा आत्मा कोणत्या देहानें आज उद्यां प्रकट व्हावयाचा, हा मुख्य प्रश्न आहे. हा देहावरील वस्त्रालंकारां-संबंधानें, स्वराज्यसंघाचा व राष्ट्रीय सभेचा हट्ट नाहीं, पण देह मात्र राष्ट्रीय सभेनें चित्र काढल्याप्रमाणेच असला पाहिजे. हातपाय तोडल्यामुळें लुला झालेला किंवा कान-डोळे फोडल्यामुळे आंधळा-बहिरा झालेला असतां कामा नये, असा राष्ट्रीय सभेचा हट्ट आहे. हा हट्ट सयुक्तिक आहे, सत्यास धरून आहे, व परमेश्वरी प्रेरणेनेंच उत्पन्न झालेला आहे, असें लोकमान्यांनीं मुंबईच्या परिषदेंत जाहीर केलें. लखनौ कलकत्याचा ठराव अंमलांत येण्यास सांप्रतचा काळ पूर्णपणे अनुकूल आहे, ह्या ठरावाचें माप पुरतें घ्या, कमी घेऊं नका, अशी परमेश्वराची प्रेरणा आहे; तेव्हां ह्या वेळी आलेली राष्ट्रीय सभेची खरी सेवा करण्याची संधी कोण व्यर्थ दवडणार ? मनुष्यबलाच्या भांडवलाचे जोरावर इंग्रजी साम्राज्यांत राष्ट्रीय सभेनें ठरविलेल्या पुऱ्या मापाची भागी पदरी पडण्याची वेळ आली आहे; ह्या वेळेसंबंधानें संशय घेऊन संदेहाचे स्वाधीन मन करून अर्ध्यावर संतुष्ट होणें म्हणजे परमेश्वराला धिक्कारणें होय. हिंदी राष्ट्रांत वरील प्रकारचा आत्मघातकी संदेह उत्पन्न करण्याचा प्रयत्न पुढील दोन चार महिन्यांत करण्यात येईल, हे उघड आहे. अशा संदेहाच्या वेळीं लो. टिळक यांच्या सारख्या पुढाऱ्याच्या अन्तःकरणाच्या प्रवृत्तीच प्रमाणभूत मानल्या पाहिजेत. परमेश्वरी प्रेरणेचा ध्वनि इतरांच्या अंतःकरणांत स्पष्टपणें

ऐकू येत नसतो. लो. टिळक याच्या प्रमाणें एकनिष्ठेनें, पूर्ण स्वार्थत्यागानें, अनन्य भावानें देशसेवा करावी तेव्हाच परमेश्वरी प्रेरणेच्या व्यक्त ध्वनीचें आधारस्थान होण्याइतके अंतःकरण निर्मल होतें. परमेश्वरानें सांप्रतचा अनुकूल काल आणिला आहे, आणि अनंत हस्तानीं कमलावर देत असताना आपले दोन हात पुढे न करता एकच हात पुढें करणें म्हणजे परमेश्वरी कृपेस आपण पात्र नसून करंटे होण्यास लायक आहोंत असे कबूल करणें होय. हा करंटेपणा सोडून द्या, नेटाचा उद्योग करा, म्हणजे मंत्रिमंडळ राष्ट्रीय सभेचा ठराव पूर्णपणे अमलात आणण्याचा हुकूम करीलच करील, अशी परमेश्वरी प्रेरणा लोकमान्याची वाणी स्वराज्य-संघाचे मंडपात वदली आहे; आणि स्वराज्य-संघाच्या सर्व सभासदानी ह्या प्रेरणेवर भरवसा ठेवून दृढ निश्चयाने स्वराज्याचा गाडा पुढे चालविण्याचें ठरविलें आहे. स्वराज्य संघाची मुंबईची परिषद परमेश्वरी प्रेरणेच्या निश्चयानें सुशोभित झाल्या-मुळें गेल्या सालच्या रिपोर्टाचे दृष्टीनें, पुढील व्यवस्थेच्या दृष्टीने, व स्वराज्याच्या उद्योगाच्या धोरणाचें दृष्टीनें ती पूर्ण यशस्वी झाली, यांत नवल नाहीं.

---

# * मुंबईची यशस्वी कॉंग्रेस

बॅरिस्टर हसन इमाम याच्या अध्यक्षतेखालीं गेल्या गुरुवारपासून जादा कॉंग्रेसचें काम सुरू होऊन गुरुवार, शुक्रवार शनिवार व रविवार असे चार दिवस काम चालून सर्व प्रकारानीं ही कॉंग्रेसची बैठक यशस्वी ठरली, हें कळविण्यास आम्हांस संतोष वाटतो. कॉंग्रेसचा मंडप विस्तीर्ण व भव्य होता; प्रतिनिधींची संख्या साडेचार हजाराजवळ होती, आणि उत्सुक प्रेक्षकानीं चारहि दिवस तो मंडप गच्च भरून जात होता. मुंबईतील प्रमुख श्रीमंत लोक सभेस हजर होते, आणि इतर राष्ट्रीय सभांहून अधिक मोठा असा स्त्रियांचा जमाव प्रत्येक दिवशी दृष्टीस पडत असे. सामान्य उत्साह व बाह्य देखावा या दोनहि दृष्टींनीं मुंबईची जादा कॉंग्रेस लखनौ व कलकत्ता याच्या तोडीची झाली यांत संशय नाहीं. सं. प्रांत, बिहार, बंगाल मद्रास, मध्यप्रांत, वऱ्हाड, महाराष्ट्र, गुजराथ, सिंध व पंजाब येथून भरपूर प्रतिनिधि आलेले होते; आणि सर्व पक्षाचे आणि सर्व मताचे पुढारीहि सभेस हजर होते. सर वाच्छा व सुरेंद्र बाबू हे हजर नव्हते व त्यांची गैरहजेरी सर्वांस जाणवलीहि. नेमस्त पक्षाचे हे दोन प्रमुख पुढारी राष्ट्रीय सभेच्या मंडपांत जरी दृष्टीस पडले नाहींत तरी नेमस्त पक्षाचें मुख्य बल सभेंत हजर होतें. नेमस्त पक्षापैकीं पंडित मदन मोहन, महमुदाबादचे राजेसाहेब, ना. ललुभाई सामळदास, सर दिनशा पेटिट, ना. चुनीलाल मेथा, मि. सुब्बाराव, दि. ब. गोविंदराव अय्यर, ना. कामत, रा. हरिभाऊ आपटे वगैरे प्रमुख मंडळी हजर होती. डॉ. रासबिहारी घोष व डॉ. सुब्रह्मण्य अय्यर यांच्याकडून सहानुभूतिपर तारा आल्या होत्या. इतर सर्व पक्षाचे प्रमुख पुढारी हजर होते हे सांगावयास नकोच. जादा कॉंग्रेसच्या

---

* केसरी, ता. ३ सप्टेंबर १९१८

चळवळींत नेमस्त पुढाऱ्यानीं प्रमुख भाग उचललेला होता. निरनिराळ्या ठरावावरील भाषणात नेमस्त पक्ष अग्रेसर होता, इतकेच नव्हे तर सब्जेक्टस् कमिटींतील वादविवादातहि प. मदन मोहन मालवीय याच्या नेतृत्वाखाली या पक्षाने राष्ट्रीय सभेच्या ठरावाना योग्य वळण देण्याचें काम स्वतःचें शिरावर घेण्यास बिलकूल कसूर केली नाही. मॉटेग्यू-चेम्सफर्ड याच्या योजनेसबधाने नाना प्रकारची मते आज हिंदुस्थानभर चोहोंकडे खेळत आहेत. ही सर्व मते केंद्रस्थानी आणून राष्ट्राचे मत म्हणून त्या मताची एक गाठ बनविणे हे राष्ट्रीय सभेचें मुख्य काम आहे. अशा प्रकारच्या भिन्न भिन्न

## मतांची गांठ

मुंबईच्या जादा कॉंग्रेसनें बाधली आणि पुढील कांहीं वर्षांच्या राजकीय चळवळीला मुबईची जादा कॉंग्रेस आदर्शप्रमाणें झाली, याबद्दल मुंबईस जमलेल्या प्रतिनिधींचें व निरनिराळ्या पक्षाच्या पुढाऱ्यांचें जितके अभिनंदन करावें तितके थोडेच होणार आहे. मुबईच्या जादा कॉंग्रेसच्या कामाला बुधवारींच सुरवात व्हावयाची होती. पण मंगळवारीं भरलेल्या ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीमध्ये पं. मदन मोहन मालवीय यानीं बाहेर राहिलेल्या नेमस्ताना आत आणण्यास एक दिवसाची फुरसत मागितली म्हणून सभेचें काम गुरुवारपर्यंत तहकूब ठेवण्यात आले. सर वाच्छा याच्याकडे पडितजी तडजोडीस गेले असताना पडितजींच्या असें अनुभवास आलें की, सर वाच्छा याच्या पक्षाची मनधरणी करण्याचा हिय्या केला ही त्याच्या आयुष्यातील त्यानीं सर्वात मोठी चूक केली. पं. मदन मोहन याच्या चुकीमुळे हजारों लोकाना मोठी गैरसोय सोसावी लागली, आणि व्यवस्थापकांची तर तारांबळ उडाली. सर्वांनीं ही गैरसोय मोठ्या आनदानें सोसली आणि पंडितजीची चूक जरी गैरसोईची झाली तरी त्यामुळे अखेरीस मुसलमान,

हिंदु, नेमस्त व राष्ट्रीय या चारीहि दोऱ्याचा गोफ अधिक घट्ट मुंबईस गुंफला गेला. सर वाच्छा व सुरेंद्रबाबू हे नेमस्तपक्षाचे कित्येक वर्षांचे नामांकित पुढारी असल्यामुळे मुंबईस जरी नेमस्त पक्षाचा मुख्य भाग हजर होता, तरी स्वतःच्या कृतीबद्दल प. मदन मोहन मालवीय व इतर नेमस्त पुढारी अशतः साशंक होते. एक दिवसाच्या तडजोडीच्या खटपटीनें त्याची मने निःशंक झाली, आपली कोठेंहि चूक झाली नाहीं, तर उलट सर वाच्छा हेच हट्टी आहेत अशी खूणगाठ त्याची त्यानाच पटली; आणि स्वच्छ बुद्धीने व मोकळ्या मनानें पवित्र म्हणून राष्ट्रीय सभेच्या कामाचा बोजा शिरावर घेण्यास ते उद्युक्त झाले. राष्ट्रीय सभेच्या मंडपात हजर राहिलेल्या नेमस्त पक्षाची ही दिलसफाई पुढील कार्यास फार उपयोगी पडली. अशा दृष्टीने विचार केला असता बुधवारचा दिवस फुकट गेला नाहीं, तर उलट कामीच लागला असे म्हणावें लागते. मॉटेग्यु–चेम्सफर्ड याच्या योजनेसंबधाच्या भिन्नभिन्न मताची गाठ बनविण्याचें काम लो. टिळक यानीं आपल्या भाषणात म्हटल्याप्रमाणें भोपळे व ऊस यांचा भारा बांधण्याइतके अवघड होते. सभेंत हजर राहिलेल्या भिन्नभिन्न मताच्या लोकात एकमेकाविषयीं आदर, पूज्यभाव व प्रेमभाव नसता तर मुंबईच्या जादा कॉंग्रेसमध्ये समिश्र पक्षाची जोरकस गाठ बनलीच नसती. मंगळवार व बुधवार हे दोन दिवस दिलसफाईच्या कामात गेल्यावर सर्व पुढाऱ्याचे दृष्टिकोन एकतऱ्हेचे झाले; आणि त्यामुळे एकीच्या आनंदाने व उत्साहानें गुरुवारीं कामास सुरवात झाली. राष्ट्रीय सभेच्या सुदैवानें यंदा राष्ट्रीय सभेला बुद्धिमत्तेने, तेजस्वीपणाने व सौजन्याने लायक असेच अध्यक्ष मिळाले. बॅ. हसन हें दिसण्यांत ज्याप्रमाणें शात व प्रसन्न आहेत त्याप्रमाणें विचारांत व आचारातहि स्वच्छ व गंभीर आहेत. मोठया गभीर आवाजानें

ते आपलें भाषण वाचीत असताना साप्रतच्या आणीबाणीच्या प्रसगातून राष्ट्रीय सभेस पार पाडून नेण्यास समर्थ असलेलाच अध्यक्ष आपणांस मिळाला असें सर्वांना वाटलें, आणि शेवटच्या बैठकीच्या अखेरीस कृतकार्य होऊन 'वंदे मातरम्' म्हणून त्यानीं जेव्हा सर्वांस विनयानें नमस्कार केला त्यावेळीं सर्व राष्ट्रीय सभेला कृतार्थ झाल्याचा आनद अनुभवण्यास मिळाला. अध्यक्षाचे भाषणात साप्रतच्या प्रसंगाचें वर्णन स्पष्टपणें केले असून मॉंटेग्यु-चेम्सफर्ड याच्या योजनेतील सर्व दोष खुलासेवार दाखविले आहेत. रिसेप्शन-कमिटीचे चेअरमन ना. पटेल व अध्यक्ष बॅरिस्टर हसन इमाम या दोघांचींहि भाषणें राष्ट्रीय सभेच्या परपरेस साजेशीं झालीं, इतकेच नव्हे तर नवीन दिशा समजून घेण्यास पुरेशीहि झालीं. मगळवार व बुधवार हे दोन दिवस अनुकूल परिस्थिति उत्पन्न करण्यात गेले आणि गुरुवारी स्वागत कमिटीचे चेअरमन व राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष या दोघानीं आपल्या भाषणानी राष्ट्रीय सभेच्या कामास फार चागला प्रारभ करून दिला मॉस्लेम लीगच्या रिसेप्शन कमिटीचें चेअरमन सर फाझलभाई करीमभाई व लीगचे अध्यक्ष महमुदाबादचे राजेसाहेब याचीं भाषणे राष्ट्रीय सभेच्या कामास उचलून धरणारीच झाली. यदा लीग व कॉंग्रेस हें दोनहि प्रवाह पूर्णपणें एकमेकात मिसळून वहात होते. सभा भरण्याच्या जागा भिन्नभिन्न होत्या खऱ्या; पण मन व बुद्धी ही एकच होतीं. कॉंग्रेसला मॉस्लेम लीगचे पुरस्कर्ते हजर होते आणि लीगच्या बैठकींना राष्ट्रीय सभेचे पुढारी हजर होते. लीग व कॉंग्रेस यामधील भिन्नभाव यदा पूर्णपणें नाहिंसा झाला. कारण कॉंग्रेसच्या सब्जेक्टस् कमिटीच्या वेळीं लीगच्या कमिटीचे लोक हजर राहून वादविवादात त्यानीं पडण्यास हरकत नसावी, अशी परवानगी अध्यक्ष हसन इमाम यांनीं पहिल्या दिवसाच्या अखेरीस

राष्ट्रीय सभेमधून मागितली आणि राष्ट्रीय सभेनेहि टाळ्यांच्या गजरात ती दिली! गुरुवार रात्रीपासून सब्जेक्टस् कमिटीत हिंदू व मुसलमान या दोघातीलहि नेमस्त व राष्ट्रीय पुढारी विचार करू लागले आणि तीन दिवसाच्या विचारानंतर मॉटेग्यु-चेम्सफर्ड याच्या योजनेसंबधाने राष्ट्रीय सभेचें मत मुक्रर ठरून रविवारीं सकाळी आठ वाजता सुरू झालेल्या बैठकीत प. मदनमोहन मालवीय यानीं स्वराज्याच्या योजनेसंबंधाचा ठराव सभेपुढे मांडला. मुंबईच्या जादा कॉंग्रेसचे मुख्य काम या ठरावानंच आहे. लखनौ येथे आमच्या स्वराज्याचा मसुदा तयार झाला कलकत्त्यास तो मसुदा ताकून सुलाखून पक्का ठरला. मॉटेग्यू चेम्स-फर्ड या जोडीनें तो मसुदा नाकारल्यामुळें मुंबईच्या जादा कॉंग्रेसवर मोठी जोखीम येऊन पडली. मॉटेग्यूसाहेबानी जबाबदार राज्यपद्धतीचा रस्ता आखला आणि आपले रेलहि टाकले. हे रेल उचलून काढून स्वतःच्या रस्त्यावर आणून टाकावयाचें कीं आपले डबे त्या रेलवर नेऊन उभे करा-वयाचे असा प्रश्न राष्ट्रापुढे येऊन पडला. कोणी म्हणत, आपले डबेहि नकोत, मॉटेग्यूसाहेब बसवतील त्या वडारी गाडीत बसूं या. कोणी म्हणत मॉटेग्यूंचा रस्ता नको, रस्ताहि आमचा आणि डबेहि आमचे, असाच हट्ट धरू या. अशा प्रकारचा तटा पडल्यामुळे आपापसातील या भांडणात राष्ट्रीय सभेने तटजोडीच्या कुशलतेनें आणि राष्ट्रकार्याच्या दूरदृष्टीनें मॉटेग्यूसाहेबाच्या योजनेच्या पायावरच आणि चौकटीच्या आतच आपली स्वराज्याची इमारत उभारण्याचें ठरविल्यामुळे सर्व संकटातून राष्ट्रीय सभा पार पडली, इतकेच नव्हे, पूर्वींहून राष्ट्रीय सभा अधिक सबल झाली. मॉटेग्यू-चेम्सफर्ड याच्या योजनेत हिंदुस्थान देश स्वराज्यास अद्याप लायक नाहीं असें म्हटलें आहे. या मताचा मुंबईच्या जादा कॉंग्रेसने पूर्ण निषेध केला

आहे, आणि हिंदी राष्ट्र आज स्वराज्यास लायक आहे असे जाहीर केले आहे. ग्रामपचायती, म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्ड येथें स्वातंत्र्य, प्रातिक सरकारांत अंशभाग व मध्यवर्ती सरकारांत सध्या कांही नाहीं, अशा तऱ्हेची मॉटेग्यूची योजना त्रिधारी आहे. खाल-पासून वरपर्यंत चोहोकडे स्वराज्याला आजच प्रारभ झाला पाहिजे आणि पधरा वर्षांच्या आंत पूर्ण स्वराज्य मिळालें पाहिजे, असा ठराव राष्ट्रीय सभेने पास करून मॉटेग्यूसाहेबाचे रेलवरील डबे कुचकामाचें ठरविले. मॉटेग्यूसाहेबाची व्यवस्था अव्यवस्थित आहे असे ठरविताना प्रजाजनांच्या जन्मसिद्ध हक्काचा उच्चारहि स्वराज्याच्या बिलातच झाला पाहिजे, असे राष्ट्रीय सभेने जाहीर केले. शरीराचें व मालमत्तेचें सरक्षण व सगोपन निर्विघ्नपणें करण्याचा हक्क प्रजाजनाना असून व्यक्तीव्यक्तींचे निरनिराळे सघ बनविणें व तसे करताना सभाचा, व्याख्यानाचा व छाप-खान्याचा उपयोग निर्विघ्नपणे करण्याचा हक्कहि प्रजाजनांना आहे. व्यक्ति, मालमत्ता आणि छापखान्यासारखी उन्नतीची साधनें याना सामान्य कायद्याहून निराळ्या व मुद्दाम केलेल्या दडपशाहीच्या कायद्याचे अडथळे असता कामा नयेत. हे शरीरस्वातंत्र्य, हे द्रव्यस्वातंत्र्य आणि हे बुद्धि-स्वातंत्र्य स्वराज्याच्या बिलात जाहीर करा, अशी मुंबईच्या जादा कॉंग्रेसनें जोराची मागणी केली. या जन्मसिद्ध हक्काच्या उच्चाराबरोबरच व कबुली-बरोबरच हिंदुस्थानातून बाहेर जाणाऱ्या व आत येणाऱ्या मालावर योग्य ती जकात ठेऊन सर्व राष्ट्राच्या संपत्तीचें सगोपन व सवर्धक करण्याचा हक्क हिंदुस्थानास मिळाला पाहिजे असा ठराव सभेत पास झाला. स्वराज्यास आम्ही लायक आहो; दिल्ली दूर न मानता दिल्लीसच स्वराज्यास प्रारभ झाला पाहिजे; स्वतःचा व राष्ट्राचा बचाव करण्याचे जन्मसिद्ध हक्क आम्हांस मिळाले पाहिजेत, असें मुंबईच्या जादा कॉंग्रेसने प्रारभीच्या तीन ठरावात

स्पष्टपणें जाहीर केलें. सभोंवारची परिस्थिति निर्बल करण्याचें हें काम संपल्यानंतर मॉटेग्यू चेम्सफर्ड साहेबांच्या योजनेंतील पायावरच

## स्वराज्याचें नवें मंदीर

उभारण्यास राष्ट्रीय सभेनें सुरवात केली. ह्या योजनेसंबंधाचा ठराव मुख्य होय आणि इतर ठराव सभोंवारची भूमि स्वच्छ करण्याकरिता व आजूबाजूची विघ्नें टाळण्याकरिता केलेले आहेत. मॉटेग्यूसाहेब व चेम्सफर्डसाहेब यानीं जबाबदार राज्यपद्धतीसंबधानें मनःपूर्वक केलेला प्रयत्न आमच्या लक्षांत उतरला असून हल्लींच्या स्थितीहून काहीं ठिकाणी पुढें पाऊल पडत आहे; तथापि ही योजना निराशाजनक व असमाधानकारक असून राष्ट्रीय सभेनें सुचविलेले महत्वाचे फेरफार या योजनेंत केल्याशिवाय स्वराज्याची पहिली भक्कम पायरी असें त्या योजनेस कोणीहि म्हणणार नाही. राष्ट्रीय सभेनें जे समिश्र पक्षाचें म्हणून मत योजनेसंबंधानें दिलें तें वरील प्रकारचें होय. हे सर्व हिंदी राष्ट्राला पसंत पडेल यांत मुळींच शंका नाहीं. मॉटेग्यू-चेम्सफर्ड स्कीमच्या योगानें हिंदी राष्ट्रांत नुसतें उजाडलें आहे हें या ठरावाच्या प्रारंभी कबूल केलें आहे. उजेड दिसूं लागला खरा, पण सर्व जीवन वाढीस लावणाऱ्या सूर्याचे किरण दिसूं लागल्याशिवाय राष्ट्राच्या जीवनक्रमास केव्हाहि प्रारंभ व्हावयाचा नाहीं. हे किरण कोणते, ते कोणत्या ठिकाणीं कसे पडले पाहिजेत, याची खुलासेवार याद राष्ट्रीय सभेच्या या ठरावाला जोडलेली आहे. प्रांतिक सरकारात ज्याप्रमाणें राखून ठेवलेलीं खाती व दिलेली खातीं असे विभाग केलेले आहेत तसे विभाग हिंदुस्थान सरकारातहि झाले पाहिजेत, म्हणजे स्वराज्यास प्रारंभ दिल्लीसच झाला पाहिजे, असा महत्त्वाचा फेरफार प्रथमदर्शनीं सुचविण्यात आला आहे. उगीच निष्कारण घासाघीस होऊन बिल पास होणें लांबणीवर पडूं नये

म्हणून प्रांतिक सरकारकडे पोलिस व न्यायखातें हीं सहा वर्षेंपर्यंत ठेवण्यात आलीं असून बाकींची सर्व खाती या योजनेंत लोकनियुक्त कायदे-कौन्सिलाच्या हवाली करण्यात आलीं आहेत. प्रांतिक कायदे कौन्सिलच्या उरावर बसविलेली ग्रँड कमिटी, वरिष्ठ कायदे कौन्सिलाच्या मानगुटीवर बसलेलें स्टेट कौन्सिल हीं काढून टाका, निदान तेथे लोकनियुक्त सभासद अर्धे तरी ठेवा, आणि गव्हर्नरांना व लाटसाहेबाना दिलेली सर्टिफिकिटाची व खर्च-वेंचाची नवी शक्ती काढून टाकून तिजोरी कायदे—कौन्सिलच्या हवाली करा, असे राष्ट्रीय सभेचें म्हणणें आहे. लष्कर, आरमार, परराष्ट्रीय संबंध, पोलिस, कायदेकानू व न्यायखातें ह्याच्या संबधाचे खर्च भागविताना जर पैशाची टचाई पडली तर एक वर्षापुरतें रेग्युलेशन काढून आपल्या तात-डीच्या गरजा भागवून घ्याव्यात, व इतर प्रसगीं कायदे-कौन्सिलच्या मार्फतच खर्चवेंचाची व्यवस्था लावून घ्यावी, असलें धोरण मुंबईच्या जादा कॉंग्रेसनें आखलेलें आहे. अडचणीच्या व तांतडीच्या वेळीं सरकारनें काय करावें हा प्रश्न या धोरणामुळें सुटतो आणि स्वराज्याच्या हक्काभोंवतीं घात-लेल्या तुरुगाच्या भिंतीहि उलथून पडतात. पोलिस व न्यायखातें खेरीज-करून प्रांतिक सरकारचीं सर्व खातीं आज द्या, वरिष्ठ सरकारच्या खात्यात वाटणी करून पधरा वर्षांत पूर्ण स्वराज्य द्या, सरकारी खात्याना लागाव-याच्या खर्चवेंचाची अडचण पडूं न देता त्या खर्चवेंचाच्या नावानें स्वराज्याच्या हक्काच्या पायात श्रृंखला घालूं नका, असलें थोडक्यात राष्ट्रीय सभेच्या नव्या मदिराचे स्वरूप आहे. हें नवें मदिर उभारताना लखनौच्या मंदिरां-तील मुख्य मुख्य दिवाणखाने मॉटेग्युसाहेबाच्या योजनेच्या पायावर मुबईच्या जादा कॉंग्रेसनें आणून ठेवलेले आहेत. अशी तडजोड झाल्यानें नेमस्ताचीहि तक्रार राहिलेली नाहीं आणि राष्ट्रीयाचेंहि समाधान झाले

आहे. मुंबईच्या जादा कॉंग्रेसचें यश यातच आहे. मुसलमान व हिंदु, राष्ट्रीय व नेमस्त, पुढारी व अनुयायी या सर्वांचा एकोपा मुंबईस पूर्णपणे झाला; आणि सर्वांनाच यश मिळालें! या यशाचे मुख्य वाटेकरी अध्यक्ष हसन इमाम हे तर आहेतच, पण त्यांच्या बरोबरच मॉस्लेम लीगचे पुढारी आणि सब्जेक्टस् कमिटीतील निरनिराळ्या मताचे पुरस्कर्ते यांच्याहि पदरात हे यश टाकणें जरूर आहे. त्याचप्रमाणें रिसेप्शन कमिटीचे चेअरमन ना. पटेल, जादा कॉंग्रेसचे सेक्रेटरी डॉ. साठे, बॅ. जयकर वगैरे मंडळी, जादा कॉंग्रेसची तयारी करणाऱ्या व व्यवस्था ठेवणाऱ्या निरनिराळ्या पोटकमिटया आणि पांच सहा दिवस सभेचे काम लांबलें तरी हौसेनें सेवा करणारे स्वयंसेवक हे सर्व ह्या यशाचे भागीदार असून मुंबई शहराची या जादा कॉंग्रेसच्या संबंधानें करावी तेवढी प्रशंसा थोडीच होणार आहे. अध्यक्ष साहेबांनी शेवटी म्हटल्याप्रमाणे मुंबई शहर इमारतींच्या भव्यपणात व बाहेरच्या देखाव्यातच सुंदर नसून अंतःकरणानेहि सुंदर आहे, ह्या प्रशंसेस मुंबईचे राष्ट्रभक्त ह्यावेळी पूर्णपणे लायक ठरले यांत संशय नाही.

---

# * दिल्लीची राष्ट्रीय सभा

गुरुवार ता. २६ डिसेंबरपासून दिल्ली येथे सुरू झालेली राष्ट्रीय सभा मगळवार ता ३१ डिसेंबर रोजी समाप्त झाली. राष्टीय सभेच्या स्वागत मंडळाचे चेअरमन हकीम अजमलखान आणि राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष पं. मदन मोहन मालवीय यांचीं भाषणें विचारपूर्ण झालीं. दोघांनींहि आपलीं भाषणें इंग्रजींत लिहिलेलीं होती, तथापि हकीम अजमलखान यांचें भाषण देशी भाषेतच वाचून दाखविण्यांत आलें. प मदन मोहन मालवीय यांनीं आपल्या भाषणाचा मुख्य भाग इंग्रजींत लिहून आणलेला होता व तो इंग्रजींतच वाचून दाखविला. तथापि भाषणाच्या प्रारंभीं व शेवटीं त्यानीं हिंदी भाषेत अर्धा अर्धा तास आपले विचार बोलून दाखविले. इंग्रजींत यंदा भाषणें फार कमी झालीं. ऊर्दू आणि हिंदी भाषेतून कॉंग्रेसचें बरेसचें काम या वर्षी चाललें, असे म्हणण्यास हरकत नाही सयुक्त प्रातातून कॉंग्रेसकरतां सात आठशें शेतकरी वर्गातले प्रतिनिधि यदा आलेले होते, आणि प्रेक्षकातहि कॉंग्रेसला नेहमीं न येणाऱ्या वर्गातील लोक बरेच दिसत होते. यामुळें देशी भाषाना कॉंग्रेसच्या मंडपांत यंदा विशेष महत्त्व प्राप्त झालें होतें. कोणताहि वक्ता बोलण्यास उभा राहिला असता प्रथम 'हिंदी' असा आवाज सर्व मंडपभर उत्पन्न होत असे आणि वक्ता मुंबई मद्रास किंवा बगाल या बाजूचा असून त्याला हिंदी येत नाही असे समजल्यावरच इंग्रजींत भाषण करण्याची परवानगी प्रतिनिधीकडून त्याला मिळे. देशी भाषा, देशी रिवाज, देशी विचार या सर्वांकडे यदा कॉंग्रेसचें लक्ष अधिक वेधलेलें दिसत होतें. कॉंग्रेसचा मडपहि एका दृष्टीनें देशी थाटाचा

---

* केसरी ता. ७ जानेवारी १९१९

होता. दहा पंधरा हजार लोक बसतील इतका विस्तीर्ण मंडप आंतून देशी तऱ्हेनें शृंगारलेला होता, आणि दिल्लीतील प्राचीन इमारतीचें अनुकरण करण्याकरता मडपाच्या साध्या छपराच्या मध्यभागीं एक मोठा घुमट बसविलेला होता. लखनौ किंवा कलकत्ता या दोनहि ठिकाणच्या मडपाहून दिल्लीचा मंडप अधिक विस्तीर्ण होता. लखनौचा मडप सुंदर असून विशेष नटविलेला होता, कलकत्त्याचा अगदीं साधा होता, दिल्लीचा बाहेरून साधा, आतून शृगारलेला आणि बारा हजार लोक बसतील एवढा मोठा, पण खाबाची गर्दी विशेष झाल्यामुळें थोडासा गैरसोईचा झालेला होता. मडप एवढा मोठा होता तरी शेवटच्या दिवसाशिवायकरून बाकी सर्व दिवस अगदीं गच्च भरून जात असे. सुमारें सहा हजार प्रतिनिधी आणि तितकेच प्रेक्षक याची गर्दी मडपात सर्व काळी सारखीच होती. इतका अपूर्व उत्साह लखनौस किंवा कलकत्त्यास दिसला नाही. स. प्रात किंवा पजाब येथें कॉंग्रेसविषयी भक्ति विशेष नाही, असा आक्षेप कॉंग्रेसवर आजपर्यंत लादण्यात येत होता. पण या आक्षेपाला दिल्लीच्या कॉंग्रेसनें हरताळ फासला. यंदा पंजाबचे प्रतिनिधी हजारावर होते आणि दिल्ली प्रातातल्या लोकानी तर कॉंग्रेससंबंधानें सर्वोवर ताण करावयाची असाच निश्चय केलेला दिसत होता. कॉंग्रेसच्या मडपात नेहमीं दृष्टीस पडणारा १०–१२ हजार लोकांचा तो विस्तीर्ण जमाव स्वराज्याच्या आशेनें इतका भरलेला दिसत होता कीं, राजकीय बाबीविषयीं पंजाब, दिल्ली व सयुक्त प्रात येथील लोकांची अनास्था आहे असें यापुढें कोणासहि म्हणता येणार नाही. सर्व जमाव कॉंग्रेसच्या चर्चेत मोठ्या आस्थेनें व कळकळीनें मन घालीत होता. ज्या योगानें पूर्ण स्वराज्यचे हक्क लाबणीवर पडतील असल्या कोणत्याहि विचारास या मोठ्या जमावाच्या विचारसरणींत स्थळच मिळत नव्हते. स्वराज्याचे दिवस जवळ आले आहेत आणि हिंदुमुसलमानांनीं एकजुटीनें

व निश्चयानें जर उद्योग केला तर फलप्राप्ती झालीच पाहिजे, अशा तऱ्हेचा उत्साह मंडपातील समाजात पसरलेला होता. या उत्साहामुळें कॉंग्रेसचें काम सर्व दृष्टींनीं यशस्वी झालें. ज्या उत्साहानें लोक मंडपात आले तोच उत्साह वक्त्यानीं वृद्धिंगत केला, आणि कॉंग्रेसच्या ठरावानीं त्याच उत्साहाचें दृढीकरण करण्यांत आलें. मॉंटेग्यू–चेम्सफर्ड याच्या योजनेसंबंधानें लोकमत प्रदर्शित करण्याचें काम दिल्लीच्या कॉंग्रेसच्या हातून चांगल्या रीतीनें पार पडलें हें तर खरेंच, पण त्याहूनहि अधिक महत्त्वाची कामगिरी म्हणजे पंजाब, दिल्ली व सं. प्रांत हा भाग दिल्लीच्या कॉंग्रेसनें हलवून सोडला. दिल्लीच्या सत्तेत भागी न देण्याचा संकल्प नोकरशाहीनें केलेला असतांना कॉंग्रेसची राजकीय चळवळ इतक्या जोराची होईल, असे पुष्कळांना वाटलें नव्हतें. पण तो अंदाज चुकीचा ठरला ही संतोषाची गोष्ट होय. नुसती मुंबई जागी होऊन काय उपयोगाची, दिल्ली जागी झालीच पाहिजे, असे उद्गार काहींनीं मुंबईच्या जादा कॉंग्रेसमध्यें काढले होते, पण दिल्लीच्या कॉंग्रेसने आता

## दिल्ली जागी झाली

असेंच सर्वांना म्हणावें लागेल. दिल्लीच्या लोकांच्या मनांत अध्यक्ष पं. मदन मोहन मालवीय यांची मोठी मिरवणूक काढावयाची होती. पण या मिरवणुकीस पोलिसनें खो घातल्यामुळे लोकांचीं मनें खट्टू झालीं. या खट्टूपणामुळे उत्पन्न झालेला चेव कॉंग्रेसच्या मंडपात हरएक प्रसंगीं दृष्टीस पडत होता. पोलिस, कायदा, व न्याय ही खातीं लोकांच्याच हातात असलीं पाहिजेत अशा प्रकारचा निश्चय सर्वांचा झालेला आहे, असे सदर चेवामुळें हरएक प्रसंगीं दृष्टीस पडत होतें. स्वसंमतीचें तत्त्व सर्व जगाला लागू करण्यात येत असून अध्यक्षाचा सन्मान करण्याच्या लहानसान बाबींतहि आपल्या इच्छेप्रमाणें आपणांस वागतां येऊं नये हें शल्य दिल्लीच्या हृदयांत

एकसारखें सत्त असलेलें दिसत होते. पंजाब, दिल्ली व संयुक्त प्रांत येथील पुढाऱ्यानीं काँग्रेसच्या कामासंबंधानें यंदा विशेष मेहनत केली होती आणि त्या मेहनतीचें फळ म्हणून दिल्ली आगी झाली होती; आग्या झालेल्या दिल्लीला पोलिसनें अशा रीतीनें प्रारंभीच टोंचल्यामुळें पुन्हां दिल्ली झोंपी जाईल अशी भीति बाळगण्याचें कारण उरलें नाही. महायुद्धाची परिसमाप्ति आणि स्वसंमतीच्या तत्त्वाचा तह यांची वाटाघाट हिंदुमुसलमानांत एकसारखी चालली होती. प्रेसिडेंट विल्सन आणि इंग्रजी मंत्री लाईड जॉर्ज यांच्या निरनिराळया उद्गारांचें विवेचन काँग्रेसच्या मंडपांत, मंडपाबाहेर आणि इतर सर्व ठिकाणीं एकसारखें चाललें होतें. स्वागत मंडळाचे चेअरमन हकीम अजमलखान किंवा अध्यक्ष मदन मोहन मालवीय यांच्या भाषणांतहि स्वसंमतीच्या तत्त्वाचा अनुवाद वारंवार ऐकूं येत होता. इतकेंच नव्हे तर राष्ट्रीय सभेच्या निरनिराळया ठरावावरील वक्त्यांनाहि स्वसंमतीचें तत्त्व मूलाधारासारखें झालें होतें. या स्वसंमतीच्या तत्त्वाकडे सर्व जगाचें लक्ष सांप्रत गेलेलें आहे. तेव्हा राष्ट्रीय सभेवरहि त्या तत्त्वाचा शिक्का यंदा पडावा यांत कांहीं नवल नाहीं. राष्ट्रीय सभेंत जे ठराव पास झाले त्या ठरावांतहि तीनच ठराव विशेष महत्त्वाचे होते, आणि या तीनहि ठरावांना

## स्वसंमतीचे ठराव

असें म्हणावयास हरकत नाहीं. मॉटेग्यू-चेम्सफर्ड–स्कीमसंबंधाचा, स्वसंमतीच्या तत्त्वासंबंधाचा आणि औद्योगिक कमिशनसंबंधाचा असे तीन प्रमुख ठराव यंदा पसार झाले. हिंदुस्थानची राज्यव्यवस्था कोणत्या स्वरूपाची असली पाहिजे हें कोणी ठरवावयाचें, लोकांनीं का नोकरशाहीनें ? स्वसंमतीच्या तत्त्वाकडे पाहिलें असतां लोकांनीच आपल्या राज्यव्यवस्थेचें स्वरूप निश्चित केलें पाहिजे असें म्हणणें भाग पडतें. आज युरोपांत युकोस्लाव्ह किंवा जुगोस्लाव्ह आणि कॉकेशस पर्वतांतले आर्मिनियन

किंवा तांबड्या समुद्राच्या काठचे अरब यांना जर तहाच्या परिषदेचे वेळीं हें तत्व लावण्यास प्रेसिडेंट विल्सन व लाईड जॉर्ज हे तयार होत आहेत, तर हिंदुस्थाननेंच असें कोणचें मोठें पाप केलें आहे किं, या तत्त्वाला अनुसरून राजकीय पक्षाचा विचारहि हिंदुस्थाननें करूं नये ? जगाला जो न्याय लागू तोच न्याय हिंदुस्थानालाहि लागू झाला पाहिजे. हिंदुस्थान कांहीं जगाबाहेरचें राष्ट्र नाहीं. हिंदुस्थानची प्राचीन सुधारणा किंवा हल्लींची स्थिति दोहींकडे पाहिलें असताहि हिंदुस्थानास स्वसंमतीचें तत्त्व न लावणें म्हणजे पृथ्वीच्या पाठीवरील एक पचमांश लोकांना अन्यायानेंच वागविणें होय असे दिसून येईल. स्वसमतीच्या तत्त्वाला अनुसरूनच दिल्लीच्या राष्ट्रीय सभेतील वक्ते व प्रतिनिधी स्वराज्याच्या हक्काना आज आम्ही लायक आहोंत असें वारंवार प्रतिपादन करीत होते. हिंदुस्थानास स्वसंमतीचें तत्त्व लावलें आहे असें इंग्लंडने उद्या जर जाहीर केलें तर हिंदुस्थानच्या मागणीचें स्वरूप कोणत्या तऱ्हेचें होईल हें आजच निश्चित करण्यास दिल्लीच्या कॉंग्रेसचें ठराव उपयोगी पडणारे आहेत. राज्यव्यवस्थेचें स्वरूप तुमचें तुम्हीच ठरवा, असा हुकूम इंग्लंडनें केल्यानंतर हें स्वरूप ठरविणाऱ्या संस्था तरी हिंदुस्थानात कोणत्या आहेत ? राष्ट्रीय सभा, मुस्लिम लीग, नेमस्तांची परिषद, वरिष्ठ कायदे कौन्सिल व प्रांतिक कायदे कौन्सिल इतक्या संस्थांचीं मतें घेऊन बहुमत कोणत्या बाजूचे आहे हें एकदा ठरविले म्हणजे तेंच हिंदुस्थानचे मत होय, असे म्हणण्यास हरकत नाही. लखनौ येथें स्वराज्याचा पास झालेला ठराव स्वसंमतीच्या तत्त्वाला धरून होता, हें वरील कसोटी लावली असता तेव्हाच ध्यानांत येईल. हिंदुस्थानसरकारच्या कायदे—कौन्सिलातील सभागृहानें जो स्वराज्याचा मसुदा तयार केला त्याच मसुद्यातील तत्त्वे घेऊन लखनौचा ठराव बनवलेला होता. तेव्हां लखनौच्या ठरावाला कायदे कौन्सिलें व राष्ट्रीय सभा याची

संमति होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. मुंबईच्या जादा कॉंग्रेसच्या वेळीं काहीं नेमस्त कॉंग्रेसमधून फुटून नेमस्ताची परिषद भरविण्यात आली. पण या नेमस्ताच्या परिषदेनें तरी काय केलें ? जादा कॉंग्रेस, नेमस्ताची परिषद आणि वरिष्ठ कायदे--कौन्सिल या तीनहि संस्थांच्या ठरावाकडे जर पाहिलें तर मुंबईच्या जादा कॉंग्रेसच्या ठरावातील मागण्या सर्वसमत असून स्वसंमतीचें तत्त्व लागू केलेल्या हिंदुस्थानच्याच मागण्या त्या ठरावांत नमूद केलेल्या आहेत, असे दिसून येईल. दिल्लीच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष पं. मदन मोहन मालवीय यांनी आपल्या भाषणांत या मुद्याचा सविस्तर विचार केला असून सर्वसंमत अशा मागण्याची यादीच्या यादी वाचकापुढें मांडली आहे. नेमस्त परिषद आणि राष्ट्रीय सभा यांच्या मध्यें विशेष तफावत नाहीं, हें ही यादी वाचली असता कोणाच्याहि ध्यानात येईल. दोघांमध्यें फरक आहे तो मागण्यासंबधाने नाही तर अंतःकरणाच्या वृत्तीसंबधानें आहे. दोघांच्याहि मागण्या एकाच स्वरूपाच्या, दिल्लीच्या सत्तेत भागी मिळाल्याशिवाय स्वराज्याचे खरे हक्क मिळाल्यासारखे होत नाहीत हें दोघांनाहि कबूल; जकाती लोकांचे हातात असल्याशिवाय औद्योगिक भरभराट होणार नाहीं, हें दोघांचेहि ठाम मत, अशा प्रकारची विचारसरणीतील एकी असतांना आपल्या मागण्या प्राप्त न झाल्या तरी नेमस्त पुढारी नोकरशाहीकडे सस्मित व आनंदित मुद्रेनें पहाणार आणि नोकरशाही जवळ आली असतां प्रफुल्लित चेहरे करून आनंदाच्या टाळ्या वाजवणार ! उलट पक्षी राष्ट्रीयसभा आपणास समाधान झालें नाही असे सांगून निराशेच्या स्वरानें आपल्या मागण्यांची मागणी करणार ! तेव्हां हा फरक विचारसरणीचा नसून वर्तनातील धोरणासंबधाचा आहे. अमुक इतक्या मागण्या प्राप्त झाल्याशिवाय राष्ट्राचें खरें हित होणार नाही असे सिद्ध झाल्यावर आनंदी चेहरा करतां येणें हें प्रामाणिक

लोकाना कसे साधणार? व तसे तें साधले नाहीं तर नेमस्तानी तरी राष्ट्रीय सभेला का दोष द्यावा? दिल्लीच्या कॉंग्रेसमध्यें बोलण्यास उभे राहून ना. शास्त्री यानी असे जाहीर केले की, मॉटेग्यु–चेम्सफर्ड याच्या योजना दुरुस्तीशिवाय निरर्थक असून काही तर रस्त्याच्या बाजूला उभे केलेल्या शिपायाच्या निर्जीव बाहुल्यासारख्या आहेत. या योजनेत जर जीव यावयाचा असेल तर राष्ट्रीय सभेनें सुचविलेल्या दुरुस्त्या त्यात अवश्य झाल्या पाहिजेत. रगी बेरगी निर्जीव बाहुल्या लहान मुलाची खेळणी होत असतात, मोठया माणसाच्या सुखाचें साधन असल्या बाहुल्या होऊ शकत नाहींत. लहान मुलाना जर स्वसमतीचें तत्त्व लावलें तर ते खेळण्याच्या वस्तूसबधानेच लागू पडतें. हिंदुस्थानला

## खेळण्याच्या वस्तू

नको आहेत. बाल्यावस्था संपून तरुण वयातील कल्याणप्रद सर्व जबाबदाऱ्या शिरावर घेण्यास हिंदुस्थान आज लायक व तयार झाला आहे; इतकेच नव्हे तर अशा लायकीचा आत्मविश्वास ज्यावेळी मनुष्याच्या मनाला पटूं लागतो त्यावेळची उत्सुकताहि आज हिंदुस्थानात दिसत आहे. दिल्लीच्या राष्ट्रीय सभेने जर काही सिद्ध केलें असेल तर ते हेच होय. मुबईच्या जादा कॉंग्रेसचा मॉटेग्यू–चेम्सफर्ड स्कीमसबंधाचा ठराव दिल्लीच्या राष्ट्रीय सभेनें पुन्हा पास केला; इतकेंच नव्हे तर त्या ठरावाच्या पुढेंहि एक पाऊल टाकलें. दिल्लीच्या राष्ट्रीय सभेच्या या ठरावासबधानें मडपात थोडासा मतभेद दृष्टीस पडला. पुढे पाऊल आज टाकू नका असे मिसेस बेझंट याचें म्हणणे होते, आणि ना. शास्त्री तर राष्ट्रीय सभेला नेमस्ताच्या परिषदे-इतके मागे ओढून घेण्यास तयार झाले होते. ना. शास्त्री याचें भाषण राष्ट्रीय सभेने शात चित्तानें ऐकून घेतले; आणि कॉंग्रेसमध्ये पुनः परत आले त्याबद्दल त्याचा गौरवहि सर्व प्रतिनिधींनीं केला. तथापि त्यांच्या पिछेहाटीच्या

उपसूचनेस सहा हजार प्रतिनिधींच्या सभेत पाच सहाहून अधिक मतें पडलीं नाहींत. नव्या सुधारणासंबधानें मुंबईच्या जादा कॉंग्रेसचें मत दिल्लीच्या राष्ट्रीय सभेनें पूर्णपणें स्वीकारलें, इतकेंच नव्हे तर ना. शास्त्री यांच्या उपसूचनेमुळे खुंटा हलवून बळकट केल्यासारखी स्थिति झाली. पंजाबी काय, सं. प्रांताचे लोक किंवा दिल्लीचे लोक काय, कोणालाहि नेमस्तांची हास्यवदन दाखवण्याची वृत्ति पसंत पडली नाहीं. सरळ प्रामाणिकपणानें खरें खरें बोलून दाखवावें हाच मार्ग सर्वांना पसंत पडला; आणि मुंबईच्या जादा कॉंग्रेसनें प्रामणिकपणानें लोकमत प्रदर्शित केलें होतें असा छाप दिल्लीसहि सदर ठरावावर मारण्यांत आला. दिल्लीच्या ठरावानें एका बाबींत मुंबईच्या पुढें पाऊल टाकलें. ती बाब म्हणजे प्रां. सरकारांत खात्यांची वाटणी न करतां आजच सर्व खातीं लोकांच्या हवालीं करावींत ही होय. मुंबईच्या कायदे-कौन्सिलनें हीच मागणी केली. मद्रास, बंगाल, सं. प्रांत येथील नामदारांनींहि हीच मागणी केली. या मागणीला इतर ठिकाणचे नामदार विरुद्ध नाहींत अशी स्थिति गेल्या तीन चार महिन्यांत झाल्यामुळें सर्व प्रांतांत ती दृष्टीस पडली. प्रांतांचें जें मत तेंच राष्ट्रीय सभेचें मत; प्रांतांची बेरीज केली असतां राष्ट्रीय सभा होते. प्रांत निराळे आणि राष्ट्रीय सभा निराळी असा भेद करतां येत नाहीं. प्रांताप्रांतांना काय पाहिजे हें प्रांतांनीं ठरविल्यानंतर त्या त्या प्रांताचे प्रतिनिधि राष्ट्रीय सभेंत हजर असतांना प्रांताप्रांताची मागणी उचलून धरल्याशिवाय ते प्रतिनिधि कसे राहतील ? मुंबई इलाख्यांत तेवढीं सर्व खातीं लोकांच्या हातीं असावी आणि पंजाबांत असूं नयेत, असें मुंबई इलाख्याचे प्रतिनिधी कसें म्हणूं शकतील ? प्रांताप्रांतांत व लोकांलोकांत लावालावी करून देण्याचें काम नोकरशाहीचें आहे, राष्ट्रीय सभेचें नव्हे. या लावालावीस राष्ट्रीय सभेनें स्थळ दिलें नाहीं हें योग्य झालें. मिसेस बेझंट यांच्या मतें हा असला प्रश्न पुढें यावयासच

नको होता. आणि आला नसता तर एका अर्थी बरें झालें असतें हेंहि खरें आहे. पण खुद्द अध्यक्ष साहेबानीं आपल्या प्रास्ताविक भाषणात या मुद्याचा उल्लेख केल्यानतर आणि प्रां. कायदेकौन्सिलच्या मताना पुष्टि मिळविण्याकरितां ठिकठिकाणचे प्रतिनिधी मुद्दाम सभेला आलेले आहेत असें दृष्टीस पडल्यानंतर मुंबईच्या जादा कॉंग्रेसपुढे एक पाऊल जाण्याशिवाय कॉंग्रेसला गत्यतरच नव्हतें. स्वसंमतीचे तत्त्व हिंदुस्थानास लावलेंच पाहिजे म्हणून आग्रह धरणाऱ्या प्रतिनिधीना प्राताप्राताच्या कायदेकौन्सिलांच्या मताचा सन्मान करणें भागच होतें. मुंबई इलाख्याच्या कायदे–कौन्सिलनें सर्व खाती लोकाच्या हातीं दिलीं पाहिजेत असें ठासून सागावयाचें आणि राष्ट्रीय सभेनें मात्र सहा वर्षांनीं सर्व खातीं हवालीं केलीं तरी चालतील असे म्हणावयाचें हें स्वसंमतीचें तत्त्व कोणतें? मुंबईच्या कायदेकौसिलात नेमस्ताच्या परिषदेचे सभासद आहेत इतकेंच नव्हे तर नोकरशाहीच्या तंत्राने वागणारेहि काही सरकारनें नेमलेले देशी सभासद आहेत. नोकरशाहीच्या तत्रानें वागणाऱ्या या सभासदानाहि जी मागणी नोकरशाहीचें पित्त खवळून सोडणारी वाटली नाहीं ती मागणी अव्यवस्थितपणाची व तडजोडीला सोडून होय असे राष्ट्रीय सभेला तरी कसें वाटणार? नेमस्त नामदार जी मागणी कायदेकौन्सिलात करतात, नोकरशाहीच्या कार्खेतले नामदार जी मागणी करतात, तीच मागणी राष्ट्रीय सभेनें केली असताना नेमस्ताच्या दृष्टीच्या किंवा सरकारच्या दृष्टीच्या तडजोडीशी बिघाड होऊं शकत नाहीं असें दिल्लीच्या राष्ट्रीय सभेस वाटल्यास त्यात नवल तें काय? या मुद्यासंबंधाने बेझंट बाईंना शेंपन्नासच मतें पडलीं आणि राष्ट्रीय सभेने मुंबईच्या जादा कॉंग्रेसच्या पुढे एक पाऊल टाकण्याचें ठरविलें. या ठरावावर भाषणें होताना राष्ट्रीय सभेंत

## किरकोळ मतभेद

दृष्टीस पडला ही गोष्ट खरी आहे; पण त्या मतभेदामुळें राष्ट्रीय सभेच्या कह्या अभिमान्यात फाटाफूट होऊन राष्ट्रीय सभेच्या चिंधडया कांहीं काळानें होतील अशी बीजें या प्रसगात बिलकूल नव्हतीं. मतभेद म्हणजे फाटाफूट व मारामाऱ्या असें ज्याना वाटतें त्यांना वरील प्रकारचा भ्रम झालेला आहे. राष्ट्रीय सभेचें हित व यशहि ज्याना पाहवत नाहीं अशा कांहीं अँग्लो–इडियन पत्राच्या सुराशीं आपला सूर या बाबींत कांहीं नेमस्त पत्रानीं मिळवावा हेंहि त्याच्या शीलास धरूनच आहे. पण थोडासा विचार केला असता हा मतभेदाचा प्रकार फाटाफुटीस कारणीभूत होण्यासारखा बिलकूल नाहीं हें कोणाच्याहि ध्यानी येईल. सहा वर्षांनीं सर्व खातीं द्या म्हणणें आणि आज द्या म्हणणें एवढया मतभेदामुळें राष्ट्रीय सभेंत कशी फाटाफूट होणार? ज्याला किरकोळ मतभेद म्हणतात तशाच स्वरूपाचा हा मतभेद नव्हे काय? आपली किरकोळ स्वरूपाची सूचना पसार न झाल्यास सेक्रेटरीच्या कामाचा बोजा उचलण्यास बेझंट बाईनीं स्वयस्फूर्तीनें पुढें येऊं नये आणि दुसऱ्याच्या झालेल्या नेमणुकींनाच संमति द्यावी यांत कोणतें गैरशिस्त आहे? आम्हास तर या बाबतींत कोठें मारामारी किंवा फाटाफूट दिसत नाहीं. निरोगी व वाढत्या शक्तीच्या लक्षणांतच असल्या प्रकाराचा समावेश केला पाहिजे. दुसरी एक मतभेदाची बाब राष्ट्रीय सभेपुढें आली तीहि अशाच तऱ्हेची होती. स्वसंमतीच्या तत्त्वाला धरून राष्ट्रीय सभेचे यंदाचे सर्व ठराव तयार करण्यांत आलेले होते. हें असें व्हावें हें कालमाहात्म्य होय. कोणासहि हें चुकवितां आलें नसतें! सर्व जगाला नवें वळण देणारें महायुद्ध नुकतेंच संपून जगाची नवी रचना ठरविणारी तहाची परिषद युरोप खंडांत ज्या तत्त्वाची कांस धरून बसली आहे त्या स्वसंमतीच्या तत्त्वाच्या छत्राखालीं राष्ट्रीय सभेचें काम चालल्यासारखें न दिसावें

तर व्हावें तरी काय ? युरोपांतील लोकानाच बुद्धि आहे, अंतःकरणें आहेत, शरीरें आहेत आणि हिंदुस्थानांतील लोकांना यांतील कांहीं नाहीं असें का मानावयाचें ? सर्व जगावर जो प्रकाश पडतो, सर्व जगभर जो वारा सुटतो, आणि सर्व पृथ्वीतलावर जे जीवन वहात रहातें तो प्रकाश, तो वायु, किंवा तें पाणी हिंदुस्थानच्या वांट्याला बिलकूल आलें नाहीं असें कसें होईल ? युरोपनें स्वसंमतीच्या तत्त्वाला मस्तकावर धारण केलें असतां हिंदुस्थानची राष्ट्रीय सभा त्या तत्त्वापासून दूर दूर कशी राहील ? हें तत्त्व हिंदुस्थानाला लागूं केलें पाहिजे असा ठराव राष्ट्रीय सभेनें पास केला आणि तहाच्या परिषदेनें राष्ट्रीय सभेच्या वतीनें प्रतिनिधि घेतले पाहिजेत व तहाच्या परिषदेंतच स्वसंमतीच्या तत्त्वाचे हक्क हिंदुस्थानास मिळाले पाहिजेत असें राष्ट्रीय सभेनें ठरविलें. हिंदुस्थानच्या वतीनें तहाच्या परिषदेंत बसण्याकरतां लो. टिळक, महात्मा गांधी व सय्यद हसन इमाम यांना राष्ट्रीय सभेनें आपल्यातर्फे निवडलें आहे, असें ठरावात नमूद करण्यांत आलें. या ठरावावर नोकरशाहीच्या तर्फेच्या अँग्लो-इंडियन पत्राची अशी टीका आहे कीं, स्वसंमतीच्या संबंधाचे हे ठराव पोरकट स्वरूपाचे असून राष्ट्रीय सभेच्या व्यावहारिक इभ्रतीस कमीपणा आणणारे आहेत. हिंदुस्थान सरकारला तहाच्या परिषदेंत जागा मिळण्याची जेथें मुष्कील तेथें राष्ट्रीय सभेसारख्या संस्थानीं आपले वकील पाठवावयाचे म्हणजे व्यवहारी लोकांच्या दृष्टीनें आपलें हंसेंच करून घेण्यासारखें आहे. राष्ट्रीय सभा कोणत्या झाडाचा पाला आणि लो. टिळक कोणत्या साटीकोपऱ्यांतले पुरुष कीं, राष्ट्रीय सभेला व लो. टिळकांना प्रेसिडेंट विल्सन यांनीं ओळखावें ! आणि तहाच्या परिषदेंत थोडीशी जागा द्यावी ! व्यवहारदृष्टया

## लहान तोंडीं मोठा घास

घेण्यापैकींच हें कृत्य होय. तेव्हां असलें हास्यास्पद कृत्य जी राष्ट्रीय

सभा करते तिच्या म्हणण्याकडे मुत्सद्यांनीं लक्ष देण्याचें कारण नाहीं. शाब्दिक स्वप्नसृष्टींत फाजील संचार करण्याची सवय लागल्यामुळें राष्ट्रीय सभेचा अधःपात लवकर होईल, असे कांहीं अँग्लो-इंडियनी पत्रानीं तारे तोडले आहेत. राष्ट्रीय सभेच्या ठरावामुळें प्रे. विल्सन याजकडून तहाच्या परिषदेंत बसण्याकरितां लो. टिळक यांना आमंत्रण येईल अशी राष्ट्रीय सभेंतील कोणत्याहि प्रतिनिधींची अटकळ सदर ठराव पास करताना नव्हती व आजहि नाहीं. तहाच्या परिषदेनें हिंदुस्थानास स्वसंमतीचें तत्त्व लावण्याचा प्रश्न घेतला पाहिजे, असे राष्ट्रीय सभेच्या प्रतिनिधींना वाटलें व आजहि वाटत आहे. हें वाटणें व्यवहाराला सोडून बिलकूल नाहीं. सर्व जगाचा व्यवहार आज ह्याच मनोवृत्तीनें व्यापलेला आहे. जगाच्या व्यवहारात हिंदुस्थाननें स्वतःस गुंतवून घेण्याचा प्रयत्न करणें किंवा तशा प्रयत्नास उत्तेजन देणारे ठराव पास करणें ही गोष्ट हिंदुस्थानच्या उन्नतीस आजकाल अत्यंत जरुरीची आहे. जगाच्या व्यवहाराच्या प्रचंड ओघापासून हिंदुस्थानास आज-पर्यंत मुद्दाम होऊन अलिप्त ठेवण्यात आलें आहे. आणि अशा रीतीनें अलिप्त राहण्यातच आपलें कल्याण आहे, असें पराधीन बुद्धीच्या व दुर्बळ हृदयाच्या कांहीं लोकाना वाटूं लागलें आहे. जगाच्या ओघापासून हिंदु-स्थानास अलिप्त ठेवण्यात नोकरशाहीचा फायदा आहे खरा, पण हिंदु-स्थानचा फायदा नाहीं. जगाच्या ओघात जाऊन पडण्यास हिंदुस्थाननें धडपड केलीच पाहिजे. जगातील लहान मोठीं सर्व राष्ट्रें व सर्व लोक असली धडपड करीत असताना हिंदुस्थाननें स्वस्थ बसणें म्हणजे निर्जीवतेचेंच चिन्ह होय. टाकाल तेवढया भाकरीवर आम्ही संतुष्ट नाहीं हें जसें राष्ट्रीय सभेनें औद्योगिक कमिशनसंबंधानें विस्तृत ठराव करून जाहीर केलें, तसेंच नोकरशाहीनें ठरवून दिलेल्या बुद्धीच्या डबक्यांतील पाण्यावरहि आम्ही

खुष नाहीं असें राष्ट्रीय सभेनें तह्याच्या परिषदेसंबंधाचा ठराव पास करून जाहीर केलें. डबक्यातून बाहेर पडून सर्व जगाला व्यापणाऱ्या समुद्राच्या रोखानें राष्ट्रीय सभेनें यावर्षी पाऊल पुढें टाकलें आहे. डबक्यांतच हिंदु-स्थानास बुडवून ठेवण्याची इच्छा करणाऱ्या नोकरशाहीला हें पसंत पडलें नाहीं पण ह्यांत व्यवहारशून्यता कोठेंच नाहीं. स्वप्नातील आनंद चाखण्याचा वेडगळपणा ह्यात बिलकूल नाहीं. प्रेसिडेंट विल्सन व मि. लाईड जार्ज हे महात्मे स्वप्नसृष्टींतले नव्हत; तह्याची परिषद म्हणजे आजकाल घडत असलेलीच गोष्ट आहे, आणि स्वसंमतीचें तत्त्व हें जगाला हलविणाऱ्या परमेश्वरी तेजांतला एक अंश आजकाल होऊन बसलें आहे. नोकरशाही भूतकाळापैकीं एक बाब होऊं लागली आहे; आणि स्वप्नांत किंवा काळोखात दुबळया लोकांना भिवविण्यापलीकडे अधिक शक्ति या भूतांच्या हातीं ठेवण्याची परमेश्वरी इच्छा नाहीं, असें महायुद्धानें जाहीर केलें आहे. ह्या सर्व गोष्टी आज प्रत्यक्ष व्यवहारात आहेत आणि या जगाच्या व्यव-हाराशीं स्वतः संलग्न होण्याचा ठराव राष्ट्रीय सभेनें पास केल्यास हिंदुस्थानांतील नोकरशाहीच्या बगलबच्चांशिवाय इतर कोणीहि राष्ट्रीय सभेस व्यवहारशून्य म्हणणार नाहीं. जगाच्या व्यवहाराशीं स्वतःची सांगड घालण्याचा यंदा करण्यांत आलेला प्रयत्न कायमचा टिको आणि जगाच्या सामान्य ओघापासून मिळावयाच्या फायद्यांना हिंदुस्थान ह्यापुढें केव्हांहि पूर्वीप्रमाणें न मुको, असेच उद्गार सर्व राष्ट्रभक्तांच्या तोंडून या प्रसंगीं निघाल्यावांचून रहाणार नाहींत.

---

# * पहिली चिरोली चकमक

सर व्हॅलेंटाईन चिरोल याजवर लो. टिळक यांनीं केलेल्या अब्रु नुकसानीच्या फिर्यादीच्या निकालासंबधानें रा. दादासाहेब करंदीकर याची तार गेले शुक्रवारीं आली. खटल्याचा निकाल चिरोलच्या वतीचा झाला असाच त्या तारेंत मजकूर आहे. रूटरचीहि तार वरीलप्रमाणेंच प्रसिद्ध झालेली आहे. शुक्रवार ता. २१ फेब्रुवारी रोजीं खटल्याचें काम सपून ज्यूरीनें लो. टिळक याच्या विरुद्ध निकाल दिला, ही बातमी एक दोन दिवसातच म्हणजे २२-२३ तारखेलाच दिल्लीस सरकारी मडळींना प्रथम पोंचली आणि दिल्लीहून खासगी तार म्हणून मुबईस २४ तारखेस प्रसिद्ध झाली. खटल्याच्या पहिल्या तीन चार दिवसाचा सविस्तर गोषवारा विलायतच्या पत्रातून गेल्या डाकेनें हिंदुस्थानात आला आहे. शिवाय खटला चालत असताना रूटरनें राजकीय दृष्टीचे मुद्दे तारेनें पाठवले आहेत. खटल्यासंबंधाची ही सर्व हकिकत गेल्या व या अंकांत प्रसिद्ध केली आहे. रूटरनें दिलेल्या तारांचें स्वरूप, सर व्हॅलेंटाइन चिरोल यांच्यातर्फे सर एडवर्ड कार्सन यानीं केलेलीं भाषणें व निकालाची तार हिंदुस्थान सरकारच्या गोटात तातडीनें कळविण्याची झालेली घाई इत्यादि गोष्टी लक्षात घेतल्या असता या नुकसानीच्या खासगी खटल्यास राजकीय व सरकारी स्वरूप देण्यात येऊन लो. टिळकाचा खटला बुडवण्यात आला, असें कोणासहि वाटल्यावांचून रहाणार नाहीं. या खटल्यात प्रथमपासूनच या दृष्टीनें राजकीय स्वरूप होतें ही गोष्ट खरी आहे. केवळ खासगी स्वरूपाचा हा खटला नव्हता. लो. टिळक व त्याचे अनुयायी यांच्याविरुद्ध

* केसरी, ता. ४ मार्च १९१९

सर व्हॅलेटाइन चिरोल यांनीं केलेलीं विधानें खोटीं आहेत हें कायद्याच्या कोर्टांत ठरविणें लो. टिळक यांना इष्ट वाटलें, याचें कारण खासगी नफानुकसानीचें नसून राजकीय चळवळीच्या दृष्टीचेंच होतें. राष्ट्रीय पक्षाच्या राजकीय चळवळींना सर व्हॅलेनटाइन चिरोल याचीं विधानें अत्यंत त्रासदायक व जाचक असल्यामुळें लो. टिळकाना या खटल्याचा खटाटोप करावा लागला. या उद्योगास सुरवात झाली त्यावेळीं राजकीय स्वरूपाचा हा खटला आहे ही गोष्ट सर्वांच्या लक्षात होती, किंबहुना खटला राजकीय स्वरूपाचा असल्यामुळेंच विलायतेंतील हें दुखणें विलायतेसच नष्ट करून राष्ट्रीय पक्षाचा मार्ग विलायतेस खुला करणें आवश्यक वाटून विलायतेस खटला चालवण्याची खर्चाची मोठी जोखीम शिरावर घेण्यात आली. खटला राजकीय स्वरूपाचा आहे हें प्रथमपासूनच लक्षात होतें, तरी सरकारी हात या खटल्यात इतक्या उघडपणें दिसेल अशी कल्पना खटल्याच्या सुरवातीच्या वेळीं नव्हती. मुंबईस कमिशनचें काम सुरूं झालें त्यावेळीं प्रथम सरकारी हात दिसला आणि विलायतेस काम चाललें असताना तो हात चांगलाच प्रकट झाला. रूटरच्या तारा व सर एडवर्ड कार्सन यांचीं विधानें वाचलीं असतांना नोकरशाहीचा हात कोणते खेळ खेळत होता हें तेव्हाच लक्षात येतें. लो. टिळक याच्याविरुद्ध झालेल्या निकालावर अपील असल्यामुळें निकालातील कायद्याच्या प्रश्नासंबंधानें वाटाघाट करण्याची वेळ अद्याप आलेली नाहीं. तथापि या खटल्यात दिसून आलेल्या नोकरशाहीच्या या ढवळाढवळीसंबंधानें दोन शब्द लिहिणें जरूर आहे. विलायतच्या लोकाकडून आपल्या सनदशीर चळवळीस न्याय मिळाल्याशिवाय राहणार नाहीं असा लो. टिळकाचा पूर्ण विश्वास असून या विश्वासाला अनुसरूनच आजपर्यंतच्या त्यांच्या सर्व राजकीय चळवळी व राजकीय स्वरूपाचे खटले याची उभारणी करण्यांत आलेली आहे. हा विश्वास

## चिरोली ठेंच

लागून मस्तकाला कळ जाऊन, पाय रक्तबंबाळ होऊन जमिनीवर सपशेल पडलेला या खटल्यानंतर पहात असतांना कांहींना आनंद होईल व विलायतच्या न्यायप्रियतेबद्दलच्या लोकमान्याच्या कल्पना लोकमान्याना बऱ्याच भोंवल्या याबद्दल ते राष्ट्रीय पक्षाला टोमणेहि मारतील. नोकरशाहीपैकीं ज्यांनीं या खटल्यात ढवळाढवळ केली त्यानाहि संतोष होऊन विलायतेस राष्ट्रीय पक्षाची राजकीय चळवळ कोणींहि कितीहि जोरानें केली असतांना हिंदुस्थानातील आपल्या अरेरावी हक्कांस धक्का लागूं शकणार नाहीं अशा आनंदातहि ते मग्न होतील. या गोष्टी खऱ्या आहेत. पण सरकारी हात दिसूं लागल्यानतरहि ज्या विश्वासानें लो. टिळक यानीं हा खटला चालविला त्याचेकडे पाहिलें असतां त्यांचा सनदशीर मार्गावरील विश्वास डावपेंचाच्या स्वरूपाचा नसून अंतःकरणाच्या स्फूर्तीचाच आहे हें सर्वांच्या ध्यानात येईल. सनदशीर राजकीय चळवळीचे दोन भाग असतात. लोकमत तयार करून राजकीय हक्क मिळवण्याची व पचनीं पडण्याची शक्ति कायदेशीर व सनदशीर रीतीनें उत्पन्न करणें हा या चळवळीचा मुख्य भाग आहे. आम्ही आमच्या पायावरच उभे राहिलें पाहिजे. याचकाप्रमाणें इतराकडे पहाण्याची वृत्ति टाकून दिली पाहिजे, वगैरे सिद्धात पुढें ठेवून स्वावलंबनाचा मार्ग शिकविणारे सर्व पुढारी वरील पहिल्या भागाकडे विशेष लक्ष पुरवीत असतात. राष्ट्रीय पक्षाचें ब्रीद स्वावलंबनाचें असून या मताचाच पुरस्कार लो. टिळकानीं केलेला आहे. या स्वावलंबनासंबधानें त्याचा विश्वास जितका दृढ आहे तितकाच दृढ सनदशीर चळवळींतील दुसऱ्या भागासंबंधानें आहे. हा दुसरा भाग म्हणजे हिंदुस्थान सरकारच्या स्थितीसंबंधाचा होय. हिंदुस्थानानें स्वतः आपल्या पायावर उभें राहिलें पाहिजे हें जितकें खरें आहे तितकेंच हिंदुस्थानानें सभोंवारच्या स्थितीकडे लक्ष पोंचवन

या परिस्थितीच्या सूत्रांत स्वतःचें सूत्र गुंतवून घेतलें पाहिजे हें तत्त्व देखील खरें आहे परिस्थितीची दृष्टि व स्वावलंबन याच्या मिलाफानें कार्यसिद्धि होत असते. ही परिस्थितीची दृष्टि ओळखून जगाच्या राजकीय चळवळीचा ओघ मिळाला पाहिजे तरच यश मिळेल; एरवीं मिळणार नाहीं. स्वतःच्या पायावर उभें रहाण्याच्या खटपटीसंबंधानें लो. टिळक याचा जसा सनदशीर मार्गावर पूर्ण विश्वास आहे, त्याप्रमाणें जगाच्या सूत्राशीं हिंदुस्थानचें सूत्र सागडण्याच्या कामींहि लो. टिळक याचा सनदशीर मार्गावरच पूर्ण विश्वास आहे. जगाच्या परिस्थितीचा फायदा हिंदुस्थानातील लोकाच्या स्वावलंबनाच्या उद्योगाला मिळवून देण्याचा सनदशीर व कायदेशीर मार्ग कोणता? हिंदुस्थानचा व इंग्लडचा स्वराज्य व साम्राज्य अशा दृष्टीचा जडलेला संबंध तुटला जाण्यात हिंदुस्थानचें बिलकुल हित नाहीं, अशी लो. टिळकाची अंतःकरणपूर्वक ठाम समजूत असून या निश्चित मताला धरूनच महायुद्धाच्या प्रारंभापासूनच जगाच्या परिस्थितीसंबंधानें त्यानी आपलें व आपल्या पक्षाचें वर्तन अढळपणाने आखून ठेवलेलें होतें. महायुद्धाच्या वेळीं व महायुद्ध-समाप्तीच्या हल्लींच्या काळात निर्बल लोकांचे व देशाचें संरक्षण करणाऱ्या ज्या स्वसमतीच्या तत्त्वाला इंग्लडच्या जबाबदार मुत्सद्यानीं व पुढाऱ्यानीं उचलून धरलें त्याच राजकीय तत्त्वांना अनुसरून इंग्लडच्या लोकाच्या पुढाऱ्यांच्या मार्फतच जगाच्या परिस्थितीशीं हिंदुस्थानचा उद्योग संलग्न करण्याची खटपट लो. टिळक सांप्रत करीत आहेत. लोकमान्यांची हिंदुस्थानांतील चळवळ कायदेशीर रीतीनें व सनदशीर रीतीनें स्वावलंबनाच्या मार्गाची आहे. त्याप्रमाणें विलायतेंतील खटपटहि कायदेशीर व सनदशीर असून स्वावलंबनाच्याच स्वरूपाची आहे. जगाच्या राजकीय जीवनाशीं हिंदुस्थानचे राजकीय जीवन गुंतवून सोडण्याचें काम विलायतेंतील हिंदी चळवळीने यापूर्वी केलें आहे, पण आजपर्यंतचें ते काम

६

परावलंबी झालें. हिंदुस्थानात नोकरशाहीला प्रसन्न करून हक्क मिळवावयाचे हा जसा येथें काहींचा परावलंबी प्रयत्न चालू आहे तसा इग्लंडांतहि त्याचाच परावलंबी प्रयत्न चालू आहे. इंग्रजी लोकाच्या, इंग्रजी इतिहासाच्या व इंग्रजी मुत्सद्याच्या वर्तनातील कायदेशीर राजकीय तत्त्वावर मुख्य मदार ठेवून लोकांत जागृति व तद्वारा शक्ति उत्पन्न करणें याला ज्याप्रमाणे हिंदुस्थानातील सनदशीर स्वावलंबनाची चळवळ म्हणावयाचे, त्याप्रमाणें विलायतचे लोक व विलायतचे मुत्सद्दी जगाच्या परिस्थितीचा विचार करताना कायदेशीर रीतीनें ज्या राजकीय तत्त्वावर विसबून राहतात त्याच स्वसमतीच्या राजकीय तत्त्वाची कास धरून इंग्रजी लोकाच्या मुत्सद्याच्या मार्फतच जगाच्या राजकीय ओघात जाऊन पडणें ही हिंदुस्थानाबाहेरची सनदशीर स्वावलंबनाची राजकीय चळवळ होय. महायुद्धामुळें या असल्या परदेशाच्या चळवळीकडे हिंदुस्थानातील राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्याचें लक्ष वेधलें असून येथील स्वराज्याच्या चळवळीवरहि या असल्या दृष्टीचा परिणाम गेलीं तीन चार वर्षे होऊ लागला आहे. परदेशातील या सनदशीर आणि स्वावलंबी चळवळीच्या सुरवातीलाच चिरोलची ठेंच लागून हिंदुस्थानांतील स्वावलंबी चळवळीला जे अडथळे आहेत तेच अडथळे जसेच्या तसे परदेशातहि कायम आहेत अशी इशारत या खटल्यानें सर्व राष्ट्रीय पक्षाला दिली आहे. स्वराज्याच्या चळवळीमुळें येथें नोकरशाहीच्या पोटात जसें दुखतें तसेंच विलायतेंतील राष्ट्रीय पक्षाच्या चळवळीमुळें नोकरशाहीचेंच पोट दुखतें. हिंदुस्थानांतील राजकारणाचा जगाच्या राजकारणाशीं संबंध नोकरशाहीच्या मार्फतच पाहिजे असा नोकरशाहीचा हट्ट साहजिकपणे असणार; आणि या स्वार्थी हट्टाच्या विरुद्ध जेव्हा जेव्हा आमची परदेशींची सनदशीर चळवळ जाईल तेव्हा तेव्हा हिंदुस्थानातल्याच पद्धतीनें परदेशांतहि आमच्या सनदशीर व कायदेशीर मार्गाच्या आड

उभी राहण्यास नोकरशाही क्षणाचाहि आळस करणार नाहीं, हें चिरोलच्या खटल्यानें निदर्शनास आणलें आहे. आपल्यासारखा खटला होण्याबरोबर

## चिरोली सूड

उगवण्यास हिंदुस्थानातील नोकरशाहीला व हिंदुस्थान सरकारास सर व्हॅलें-टाइन चिरोल यांनीं पाचारण केलें आहे. राष्ट्रीय पक्षाला चिरडून टाकणें इष्ट आहे हें सिद्ध करण्याकरिताच मीं पुस्तक लिहिलें आणि या पुस्तका-संबंधाच्या अब्रूनुकसानीच्या फिर्यादींत राष्ट्रीय पक्षास हार खावी लागली असल्यामुळें आतां तर या पक्षावर अजिबात वरवंटा फिरविण्यास तुम्ही चुकूं नका व ही संधि व्यर्थ जाऊं देऊं नका अशा आशयाची विनंति हिंदु-स्थान सरकारला व नोकरशाहीला सर व्हॅलेंटाइन चिरोल यांनीं गेल्या आठवड्यांत केली आहे. खटल्यातील प्रश्नोत्तराकडे पाहिलें, सर एडवर्ड कार्सन याच्या विचारसरणीकडे पाहिलें, किंवा चिरोली सूडाच्या कल्पनेकडे पाहिलें तर एकच गोष्ट प्राधान्येंकरून डोळ्यांपुढें येते ती ही कीं, नोकर-शाहीच्या कृत्यावर टीका करणारे लोक अत्याचारी, खुनी, अराजक ठरवून वाळल्याबरोबर ओलेंहि जाळून मोकळें होण्याचा हिंदुस्थानात जसा प्रयत्न आमच्या स्वराज्याच्या सनदशीर चळवळीविरुद्ध चालू आहे तसाच प्रयत्न विलायतेंतहि आमच्या स्वावलंबनाच्या चळवळीविरुद्ध चालूं ठेवून इतर कोणत्याहि कारणाने पेटलेल्या आगींत आम्हांस ढकलून टाकण्यास नोकरशाहींतील काहीं लोक बिलकूल कमी करणार नाहींत. असल्या आगींत राष्ट्रीय पक्षास जिवंत जाळण्याचा पूर्वी बऱ्याच वेळां प्रयत्न झालेला आहे, व त्या वेळीं आगीच्या दिव्यांतून तावून सुलाखून राष्ट्रीय पक्ष बाहेर पडलेला आहे. आणि चिरोली सुडाच्या दिवट्या हातांत भरून पेटवण्यांत येणाऱ्या आगींतूनहि राष्ट्रीय पक्ष पूर्वीप्रमाणेंच अधिक तेजस्वी होऊन बाहेर पडेल यांत संशय नाहीं. आयर्लंडातील अल्स्टरच्या बंडखोरांचे

पुढारी सर एडवर्ड कार्सन यांनीं घडून आलेल्या गोष्टी व त्यावरील टीका, यांच्या क्रमाकडे दुर्लक्ष करून मागाहूनचे टीकाकारच पूर्वीच्या गोष्टी घडवून आणतात असला व्युत्क्रम कोटिक्रम करण्यास धजावें यात काहीं आश्चर्य नाहीं. हिंदुस्थानातील नोकरशाहीनें याच पद्धतीची कास आजपर्यंत कित्येक वेळा धरली आहे व सांप्रतच्या रौलेट बिलाच्या वेळातहि असल्याच हातचलाखीवर नोकरशाही अवलंबून राहिली आहे. ही हातचलाखी उघडकीस आणणाऱ्या राष्ट्रीय पक्षाच्या वतीनें जर तुम्ही निकाल दिलात तर हिंदुस्थानसरकारचें काय होईल आणि हिंदुस्थानातील गोरे अधिकारी कोणत्या संकटांत पडतील याचा विचार करा, असे एडवर्ड कार्सन यांनीं दरडावून सांगितल्यावर चिरोलचे खटल्याचा निकाल राष्ट्रीय पक्षाविरुद्ध व्हावा यात नवल तें काय ? महायुद्धाच्या परिसमाप्तीच्या वेळीं इंग्लंड, फ्रान्स वगैरे देशांत मजुरांचे संप विकोपास जाऊन अस्वस्थता उत्पन्न झाली असताना आणि अत्याचार, खून, अराजकता इत्यादि अस्वस्थतेचीं वादळें युरोपाप्रमाणें इंग्लंडातहि उत्पन्न होण्याचीं चिन्हें दिसत असताना सर एडवर्ड कार्सन यांनीं त्याच खुनाचा व अत्याचाराचा बागुलबोवा जर ज्यूरीला दाखविला तर ज्यूरी भयाभीत झाल्यावाचून कशी राहील? युरोपांतील ज्या वादळाचा फायदा घेऊन रौलेटबिलांना विलायतेंतील मुत्सद्यांची अंशतः संमति येथील नोकरशाहीनें मिळविली आहे, त्याच वादळाचा फायदा घेऊन लो. टिळक यांचाहि खटला बुडवण्यात आला आहे. आपलीं तत्त्वें सत्याला धरून आहेत, सनदशीर आहेत, त्याबद्दल राष्ट्रीय पक्षास बिलकुल संशय नाहीं; आणि याच मार्गानें गेलें असताना अखेरीस यश मिळेल असा राष्ट्रीय पक्षाचा दृढ विश्वास आहे. सनदशीर व कायदेशीर मार्ग न सोडता सत्याला धरूनच राष्ट्रीय पक्ष चळवळ करीत असल्यामुळें हिंदुस्थानात दोन चार प्रसंगाच्या आगीच्या दिव्यांतून

तो पार पडला आहे. अशा रीतीने येथें आगीच्या ज्वाळा सोसल्यामुळेंच हिंदुस्थानातील स्वराज्याच्या चळवळींत स्वावलंबनाची ज्योत पेटलेली दिसत आहे. हिंदी स्वराज्याच्या चळवळीला जगाच्या राजकीय उलाढालींशीं एकजीव करून सोडण्यास विलायतेस जी सनदशीर पण स्वावलंबनाची ज्योत पेटवणें भाग आहे, त्या ज्योतीकरता चिरोलच्या खटल्याची पहिली चकमक गेल्या आठवडयात उडाली आहे. या चकमकींतून निघणाऱ्या ठिणग्या राष्ट्रीय पक्षाचें अंग ठिकठिकाणीं पोळण्यास कमी करणार नाहींत हें राष्ट्रीय पक्ष ओळखून आहे. पण असल्या चकमकींतूनच तेजाचे किरण निघत असतात व परदेशीं करावयाच्या सनदशीर चळवळीची ज्योत पेटत असते, असा राष्ट्रीय पक्षाचा विश्वास आहे. तेव्हा या पहिल्या चकमकीच्या ठिणग्याना न भिता आपल्या तरणोपायाकरिताच हें किरण आहेत हें ओळखून पूर्वीहून दुप्पट जोराने, ईर्ष्येनें व विश्वासानें परदेशातील आपली चळवळ पुढें चालविण्यास राष्ट्रीय पक्ष चुकणार नाहीं, अशी आम्हास आशा आहे.

---

# * बॅ. बॅप्टिस्टा यांचा अनुभव

गेले गुरुवारीं सकाळीं नागोया आगबोटीनें बॅ. बॅप्टिस्टा विलायतेहून मुंबईस परत आले, आणि शुक्रवारीं सायंकाळी मुंबईतील होमरूल लीगच्यातर्फे त्यांचें स्वागत सार्वजनिक रीत्या करण्यांत आलें. ह्यासंबंधाची हकीकत आजचे अंकांत दुसरीकडे दिलीच आहे. बॅ. बॅप्टिस्टा हे वीस एकवीस महिने विलायतेंत होते, आणि विलायतेंतील मजूर पक्ष व हिंदी स्वराज्य ह्याची सांगड घालून देण्याच्या कामीं त्यानीं चागलें यश संपादिलें असल्यामुळें हिंदुस्थानांतील सर्व स्वराज्यवाद्यांनीं कृतज्ञतापूर्वक त्याचें स्वागत करावे व त्यानीं मिळवलेल्या यशाबद्दल त्याचें अभिनंदन करावे हें साहजिकच आहे. युरोपखंडाबरोबर इंग्लडातील लोकमताची स्थिति गेल्या दोन वर्षांत फार बदलली आहे, आणि ह्या संक्रमणाचेच वेळीं इग्लडांत स्वराज्याचें काम बॅ. बॅप्टिस्टा करीत असल्यामुळें त्यांचा इग्लडांतला अनुभव हिंदुस्थानास ह्यावेळीं फार उपयोगी पडल्यावाचून राहणार नाहीं. युरोपखंडात आजचा दिवस मजूर पक्षाच्या हातीं आहे. इंग्लडातहि आज मजूर पक्ष अधिकारारूढ झालेला नसला तरी उद्याचा दिवस मजूर पक्षाच्या हातीं गेल्यावांचून राहणार नाहीं, असें बॅ. बॅप्टिस्टा ह्यांचें म्हणणें आहे. भाडवल व शरीरकष्ट ह्याच्यामधील तंटयात युरोपखंडांत भाडवलाची शेंडी कष्ट करणाऱ्याच्या हातात सापडली आहे तशी स्थिति दोनचार वर्षांच्या अवधींत इंग्लडातहि दिसून आल्यावाचून राहणार नाहीं. महायुद्धात इग्लडनें मिळवलेल्या अपूर्व विजयामुळे रशिया, जर्मनी, हंगेरी वगैरे ठिकाणीं जे किळसवाण्या निर्दयतेचें स्वरूप मजुराच्या हालचालींना प्राप्त

---

* केसरी १ एप्रिल १९१९

झालें आहे तें हिडीस स्वरूप इंग्लडच्या मुत्सद्यांना सहज टाळता येईल, पण मजुराच्या पक्षाची वर उसळत चाललेली लाट अजिबात मागे फरतवून पूर्वीची स्थिति इंग्लडांत पुन्हा सुरू करणें कोणाहि मनुष्याला आता शक्य नाही. मुख्य मंत्री मि. लॉईड जॉर्ज हे स्वतः मजूर पक्षाचेच पुढारी होण्यास सर्वतोपरी लायक असून काही प्रसंगामुळें युनियनिस्ट पक्षाच्या गोटात ते चुकून गेले आहेत. दोनचार वर्षाच्या अवधींत मि. लॉईड जॉर्ज, मि. मॉटेग्यू ह्याच्यासारखे आजचे सत्ताधारी युनियनिस्ट पक्षाला सोडून मजुराच्या पक्षाचे पुरस्कर्ते म्हणून पार्लमेंट सभेंत त्या पक्षाचींच कामे करू लागतील, अशी बॅ. बॅप्टिस्टा ह्याची अटकळ आहे. मजुराच्या पक्षात हातापायाना राबावयाला लावून केवळ मोलमजुरी करणारांचाच तेवढा समावेश होतो असे नाही, तर भांडवलवाल्याच्या आश्रयाखाली असलेल्या व आश्रयाखालीं नसलेल्या सर्व बुद्धिमानाचाहि त्यात समावेश होतो. मोठया भांडवलवाल्याची आणि मोठे भांडवलवाले होऊ इच्छिणारांची स्वतःची बुद्धि एका बाजूस ठेविली असता बाकी राहिलेली इंग्लडातील सर्व राष्ट्रीय बुद्धि आज मजुरांच्या पक्षाची इंग्लडांत आहे. युरोपखंडांत किंवा इंग्लडात आज जे स्वतः मोठे भांडवलवाले, मोठया उद्योगधंद्याचे मालक, मोठे जमीनदार किंवा मोठे सरदार नाहींत किंवा त्या मोठयाच्या पदवीला चढूं इच्छितहि नाहींत, त्या बुद्धिवान लोकांचा, म्हणजे हिंदुस्थानातील चातुर्वर्ण्याच्या भाषेनें बोलावयाचें असल्यास युरोपातील सर्व ब्राम्हण वर्गाचा आजचा कल सोशियालिझमकडे आहे. राजकीय सत्तेलाच तेवढे सामाजिक रूप द्यावयाचे असे नाहीं, तर औद्योगिक व आर्थिक सत्तेलाहि सामाजिक मालकीचें स्वरूप दिलें पाहिजे हा सिद्धात युरोपखंडातील राजकारणांत प्रस्थापित होऊ लागला आहे. इंग्लडहि त्याच मार्गाला लागले असून इंग्लंडातहि मि. लॉईड जॉर्ज ह्याच्यासारखे बुद्धिमान कर्ते पुरुष आज अप्रत्यक्षपणे

व उद्यां प्रत्यक्षपणें मजूर पक्षाचीं मतें अमलांत आलींच पाहिजेत असा हट्ट धरून बसल्यावाचून रहाणार नाहींत. काबाडकष्ट करणाऱ्याच्या वर्गाबरोबरच युरोपखंडाप्रमाणें इंग्लंडांतील ज्याला आज इंटेलिजन्शिया असें म्हणतात तो बुद्धिवानाचा वर्गहि मजुरांच्या पक्षाचाच असल्यामुळें पार्लमेंट सभेंतील सांप्रतची युनियनिस्ट पक्षाची सरशी दोनचार वर्षांहून अधिक काळ टिकणार नाहीं, असा अंदाज आहे. तहावर सह्या झाल्यानंतर एक वर्षाहून अधिक काळ युनियनिस्ट पक्षाच्या हातीं सत्ता राहणें मुष्किलीचें आहे. संपत्तीच्या मोठ्या संचयांना सामाजिक मालकीचें स्वरूप देण्याच्या झगड्यांत मि. लॉईड जॉर्ज, मि. माँटेग्यू ह्यांच्यासारख्या पुढाऱ्यांचें आणि युनियनिस्ट पक्षांतील भांडवलवाल्यांचें पटेनासे होऊन पार्लमेंटची नवी निवडणूक दोन तीन वर्षांत होईल, व त्यावेळीं पार्लमेंट सभेंत मि. लॉईड जॉर्ज यांच्या नेतृत्वाखालीं मजुरांचाच पक्ष अधिकारारूढ होईल, किंवा तसें न झाल्यास हल्लींहून चांगल्या प्रबल स्थितींत मजुरांचा पक्ष पार्लमेंट सभेत दिसूं लागेल, असा भरंवसा बॅ. बॅप्टिस्टा ह्यांना वाटत आहे. ह्या दृष्टीनें विचार केला असतां इंग्लंडांतील हिंदुस्थानच्या स्वराज्याची चळवळ चांगल्या रीतीनें यशस्वी होण्याचा काळ दोन चार वर्षांहून अधिक दिवस पुढें ढकलला गेलेला नाहीं, हें कोणाच्याहि ध्यानांत येईल. तेव्हां इंग्लंडांत स्वराज्याच्या ज्या चळवळीवर बॅ. बॅप्टिस्टा ह्यांनीं राष्ट्रीय पक्षातर्फे ठराव करून ठेविलेला आहे ती चळवळ आणखी दोन चार वर्षें एकसारखी चालविल्यावाचून राष्ट्रीय पक्षास गत्यंतर नाहीं. या कामीं दोन चार वर्षांच्या अवधींतच यश खात्रीनें मिळणार ह्याविषयीं बॅ. बॅप्टिस्टा ह्यांना बिलकूल शंका वाटत नाहीं, इतकेंच नव्हे तर

## आजचें पार्लमेंट

देखील आमच्या स्वराज्याच्या विरुद्ध जाण्यास बिलकूल धजणार नाहीं,

असें त्यांचें म्हणणें आहे. युनियनिस्ट पक्षाच्या पुढाऱ्याशीं संगनमत करून मि. लॉइड जॉर्ज ह्यानीं महायुद्धात यश मिळविले, तेव्हा तहाच्या वेळींहि महायुद्धाचें काम पुरते करण्याकरता युनियनिस्ट पक्षालाच इंग्लडनें निवडून दिलें. सोशियालिझमसबधाचा वाद कल्पनेपेक्षाहि अधिक वेगानें युरोपखंडाला ग्रासून इंग्लडकडे आज धाव घेत आहे; आणि तहावर सह्या होण्यापूर्वीच तहाच्या प्रश्नापेक्षा सोशियालिझमचे प्रश्न इंग्रजी साम्राज्यालाहि अधिक महत्त्वाचे होऊ पहात आहेत. अशा वेळीं युनियनिस्ट पक्षांतील भांडवलवाले सोशियालिझमच्या विरुद्ध असले तरी हिंदुस्थानांतील स्वराज्याच्या चळवळीविरुद्ध राहणें शक्य नाहीं. कारण सोशियालिझमचीं म्हणजे मोठे मोठे उद्योगधंदे सामाजिक मालकीचे करण्याचीं तत्त्वें अंमलात येऊ लागल्यास बोल्शेव्हिझमची भीति युरोपखंडाप्रमाणें इंग्लडासहि वाटून इंग्लड नवी रचना करण्यास जरी प्रतिकूल झालें, तरी देखील नव्या रचनेच्या सदराखालीं इंग्लंडातील लोकांच्या दृष्टीनें हिंदुस्थानची मागणी येथील नोकरशाहीस नवी असली तरी इंग्लंडातील लोकाना ही फार शिळी व मागासलेली बाब होय. इंग्लडातला युनियनिस्ट पक्षहि आमच्या स्वराज्याच्या फार पुढें गेलेला आहे. त्या पक्षाच्याहि दृष्टीनें हिंदी स्वराज्याच्या मार्गानें जावयाचें म्हणजे जुन्या व मळलेल्या रस्त्यानें डोळे मिटून डुलक्या घेत जाण्याइतकेंच बिनधोक्याचें आहे. असल्या रस्यानें जात असताना एखाद्या तत्त्वाच्या मोहक अंमलाखालीं सांपडून निशाबाजाप्रमाणें काही झुकाड्या जरी गेल्या किंवा रस्त्याच्या बाजूला काहीं काळ लोळत जरी पडावें लागलें तरी देखील त्यात काहीं विशेष नसून हिंदी स्वराज्याचा रस्ता बोल्शेव्हिझमच्या भीतीच्या दृष्टीनें सुखकरच समजला जाईल, अशी युनियनिस्ट पक्षाच्या मनाची स्थिति आज आहे. बॅ. बॅप्टिस्टा यांचें असें म्हणणें आहे कीं, पार्लमेंट सभेच्या निवडणुकींत युनियनिस्ट पक्षाची सरशी झाल्यामुळें हिंदुस्थानांतील स्वराज्य-

वाद्याची निराशा होण्याचें कांहींच कारण नाहीं. लिबरल पक्षाची किंवा मजूर पक्षाची जर सरशी झाली असती तर मॉटेग्यु–चेम्सफर्ड ह्यांच्या योजनेच्या फार पुढचें स्वरूप हिंदी स्वराज्यास आज प्राप्त झालें असतें. पण युनियनिस्ट पक्ष आल्यानें मॉटेग्यू–चेम्सफर्ड ह्यानीं देऊं केलेले हक्कहि मागें घेण्यांत येतील अशी काहींना वाटणारी भीति अगदीं निराधार आहे. सिडनहॅम कंपू मॉटेग्यू–चेम्सफर्ड ह्यांच्या योजनेच्याहि विरुद्ध आहे ही गोष्ट खरी, पण ह्या कंपूला विलायतेस विचारतो कोण ? साम्प्रतच्या काल-माहात्म्यामुळे सिडनहॅमसाहेब कोणत्या झाडाचा पाला होऊन बसले आहेत. बिकानेरच्या महाराजासारखे हिंदी संस्थानिक पूर्वीच्या व आजच्या स्टेट-सेक्रेटरीसाहेबाच्या देखत सिडनहॅमी कंपूचा असा खरपूस समाचार घेत आहेत कीं विकारवश झालेल्या एखाद्या राष्ट्रीय पक्षाच्या वक्त्याला देखील ह्याहून अधिक शिव्या सिडनहॅमी कंपूला देण्याचा मोह शिल्लक रहाणार नाहीं. इंग्लंडच्या सामान्य लोकात सिडनहॅमसाहेबाना किंमत नाहीं. महा-युद्धाचे वेळीं इंग्लंडच्या वसाहती जर इंग्लंडच्या बरोबरीची स्वतंत्रता पर्यायानें उपभोगूं लागल्या आहेत तर हिंदुस्थानला तेवढें स्वराज्य का नको ? अशी विचारसरणी इंग्लंडच्या सर्व पक्षांच्या लोकानीं सहजगत्या स्वीकारिली असल्यामुळे सिडनहॅमसाहेबाचा चेलेपणा स्वीकारण्यास येथील पोलिस खातें व कोल्हापूर संस्थानचे नोकर ह्या ठिकाणाशिवाय कोणीहि पुढे येत नाहीं. हिंदुस्थानचे ग. ज. साहेब लॉर्ड चेम्सफर्ड, मुंबई इलाख्याचे हल्लींचे गव्हर्नर जॉर्ज लॉइड वगैरे मोठमोठे आधिकारीहि सिडनहॅमी कंपूच्या विरुद्ध आहेत. मुंबईच्या हल्लींच्या गव्हर्नरसाहेबाच्या विश्वासास पात्र झालेला मुंबईचा टाइम्सहि सिडनहॅमी कंपूवर नॅशनॅलिस्ट पक्षाप्रमाणें तोंडसुख घेत आहे. सिडनहॅमसाहेबाना हिंदुस्थानात आता जे थोडेसे अनुयायी उरले आहेत ते पोलिस खात्यातच काय ते उरले आहेत. आणि या अन-

थायांना इंग्लंडांतील किंवा हिंदुस्थानांतील लोकांचा व मुत्सद्याचा पाठिंबा नसून पोलिसच्या धोरणाची री ओढणाऱ्या एका संस्थानांतील कांहीं नोकराचा तेवढा पाठिंबा आहे. अशा स्थितींत सिडनहॅमी कंपूच्या उद्गारांना भिऊन मॉटेग्यु–चेम्सफर्ड ही जोडी देत असलेले हक्कहि पदरांत पडणार नाहींत, अशी भीति बाळगणें मूर्खपणाचें होय. असल्या भीतीला तुम्हीं बिलकूल थारा देऊं नका आणि आपल्या निरनिराळ्या चळवळींना त्या भीतीमुळे उगीच गांगरून जाऊन आखडून धरूं नका, असें बॅ. बॅप्टिस्टा ह्यांनीं मुंबईच्या सभेंत निक्षून सांगितलें. हिंदुस्थानांतील सर्व पक्षाच्या लोकांनीं जाणून बुजून कट करून मॉटेग्यु–चेम्सफर्ड यांच्या रिपोर्टाचें बिल मारावें म्हणून जरी मनांत आणलें तरी तें आज मरणार नाहीं; चेम्सफर्डसाहेबांनीं त्याला ढकलून दिलें तरी तें दूर होणार नाहीं; नोकरशाहीनें त्याच्या गळ्याला नख लावलें तरी त्याचा कोंडमारा होणार नाहीं; हिंदुस्थानातल्या लोकांनीं नको नको म्हटलें तरी हिंदुस्थानच्या गळ्याला तें मिठी मारणारच ! वेळच आज अशी आली आहे कीं, हिंदुस्थानच्या स्वराज्याकडे दुर्लक्ष करण्यात युनियनिस्ट पक्षालाहि कांहीं फायदा उरलेला नाहीं. चिरोलचे खटल्यात लो. टिळक ह्यांना यश न मिळाल्यामुळें हिंदी स्वराज्यासंबंधानें बोलण्याचालण्यास व इतर कामें करण्यास अडचण पडते कीं काय अशी वाटत असलेली भीति अनुभवानें खोटी ठरण्याइतकें इंग्लंडच्या लोकमताचें स्थित्यंतर झालें आहे, असा बॅ. बॅप्टिस्टा ह्यांचा राष्ट्रीय पक्षाला निरोप आहे. पार्लमेंट सभेंत कमांडर वेजवुड ह्यांच्या अध्यक्षतेखालीं हिंदुस्थानांस पूर्ण स्वराज्य दिलें पाहिजे असें म्हणणाऱ्या सभासदांची कमिटी स्थापिली गेली असून ह्या कमिटीच्या तर्फे पार्लमेंटच्या जागेंत भरलेल्या सभेंत ‘एका प्रमुख हिंदी गृहस्थाचें भाषण’ झाल्याची बातमी रूटरनें पाठविली आहे. इंग्लंडचे लोक नोकरशाही व प्रजाजन ह्यांमधील संबंधाच्या

दृष्टीनें हिंदुस्थानकडे आज पहात नसून महायुद्धाचे वेळीं वसाहतींहून अधिक उपयोगी इंग्लंडला पडलेले राष्ट्र ह्या दृष्टीनें हिंदुस्थानाकडे पहात आहेत; आणि इंग्लंडचा व हिंदुस्थानचा हा संबंध पुढेहि तसाच उपयोगीं कसा पडेल हें युरोप खंडातील स्वसमतीच्या आणि सोशियालिझमच्या नव्या कसोटीवर उगाळून पहाण्यास ते साहजिकपणें उत्सुक आहेत. हिंदुस्थानचा संबंध सलोख्याचा, प्रेमाचा व विश्वासाचा रहावा आणि तो तसा राहण्यास

## परराष्ट्रीय कसोटी

पार्लमेंटनें जवळ बाळगून हिंदुस्थानच्या स्वराज्याचा प्रश्न सोडवावा, असें इंग्लंडातील युनियनिस्ट पक्षासहि आज वाटत आहे. इंग्लंड ह्या राष्ट्राच्या व तेथील लोकांच्या हिताकडे पाहून आपलपोटेपणानें हिंदुस्थानातील नोकरशाहीनें वागलें असता त्याचें कर्तव्य पार पडलें असें मानण्याचे दिवस निघून गेले आहेत. आपल्या राष्ट्राचें हित पाहणें हे तर प्रत्येकाचें कर्तव्य आहेच, पण हें कर्तव्य चांगल्या रीतीनें पार पाडण्यास राष्ट्राहून अधिक उच्च कोटींत असलेल्या सर्वसामान्य सत्याच्या तत्त्वाकडे अवश्य लक्ष पोंचवलें पाहिजे अशी भावना महायुद्धानें उत्पन्न केली आहे. पर-राष्ट्रीय (Super-National) तत्त्वाचे पुरस्कर्ते प्रे. वुइल्सन व मि. लॉइड जॉर्ज ह्यांच्यासारखे अधिकारारूढ असलेले मुत्सद्दी आहेत. ह्या पर-राष्ट्रीय कसोटीला एका बाजूस झुगारून देण्यात युनियनिस्ट पक्षाचेंहि हित नसल्यामुळें येथील पोलिसखात्यांतील काहीं अरेराव्यांच्या मुत्र्नतीखातर युनियनिस्ट पक्ष हिंदी स्वराज्याच्या आड येईल याहि म्हणण्यात काहीं अर्थ नाहीं प्रे. वुइल्सन, मि. लॉइड जॉर्ज ह्यांच्यासारखे मुत्सद्दी व त्यांच्या प्रभावळींतील लेखक हे सर्व हिंदी स्वराज्याच्या विरुद्ध नाहींत. राष्ट्रसंघास आधारभूत असलेल्या प्रमुख मुत्सद्याच्या परिवारात बॅ. बॅप्टिस्टा व लो. टिळक ह्यानीं राष्ट्रीय पक्षाचें सोवळेंभाडें दूरून जुळवून फेंकून देण्याचा प्रयत्न करण्यास कमी

केलें नाहीं; आणि ह्या प्रयत्नांतील अनुभवावरून बॅ. बॅप्टिस्टा ह्यांनीं मुंबईच्या सभेंत सर्वांना असें सांगितलें कीं, हिंदुस्थान देश प्रे. वुइल्सन ह्यांच्या स्वसंमतीच्या तत्त्वाच्या बाहेरचा समजला जाणें शक्य नाहीं. स्वसंमतीचें तत्त्व हिंदुस्थानास लावावें अशा अर्थाचा ठराव राष्ट्रीय सभेनें केल्यामुळें कांहीं व्यवहारदक्ष नेमस्तानीं राष्ट्रीय सभेची टवाळी केली. पण बॅ. बॅप्टिस्टा ह्यांचा असा अनुभव आहे कीं, ह्यासंबंधानें स्वराज्यवाद्यानीं जर अधिक जोराची चळवळ केली तर आज जी गोष्ट प्रमुख सत्ताधाऱ्यांकडून व मुत्सद्यांकडून तत्त्वतः मान्य करण्यांत आली आहे तीच गोष्ट अंमलबजा॰ वणीच्या दृष्टीनेंहि प्रत्यक्ष व्यवहारांत आल्यावांचून रहाणार नाहीं. प्रे. वुइल्सन व त्यांचा परिवार हे हिंदुस्थानची गणना सुधारलेल्या राष्ट्रांतच करतात. अर्थात् हिंदुस्थानास स्वसंमतीचा नियम लागू करण्यास तत्त्वतः कोणताच अडथळा राहिला नाहीं. राष्ट्रीय सभा ज्यावेळीं हिंदुस्थानास स्वसमतीचें तत्त्व पाहिजे असें म्हणतें त्यावेळींहि आयर्लंडातील सिनफेन पक्षाप्रमाणें किंवा दक्षिण आफ्रिकेंतील रिपब्लिकन पक्षाप्रमाणें हिंदुस्थानचा व इंग्लंडचा संबंध नको असें बिलकूल म्हणत नाहीं. हा संबंध हिताचा झाला व पुढेहि हिताचाच राहील, अशी राष्ट्रीय सभेची व लो. टिळक ह्यांचीं पूर्ण खात्री असून ह्या संबंधावर त्यांचा अढळ विश्वास आहे. स्वसंमतीच्या तत्त्वामुळें हिंदुस्थानच्या परराष्ट्रीय संबंधांत किंवा लढाईच्या खात्यांत अल्पस्वल्पहि सत्ता हातीं घेण्याची महत्वाकांक्षा आजकालचें राजकारण म्हणून उत्पन्न होण्याची वेळहि अद्याप आलेली नाहीं, ही बाब राष्ट्रीय सभेनें आपल्या स्वराज्याच्या मसुद्यांत कबूल केलेली आहे. लो. टिळक ह्यांनीं विलायतेंतील एका भाषणांत सांगितल्याप्रमाणें मॉंटेग्यू-चेम्सफर्ड ह्यांचा रिपोर्ट जे हक्क हिंदुस्थानास दिले पाहिजेत असें स्वच्छपणें आज कबूल करीत आहे तेच अंतस्थ कारभाराचे हक्क कोणच्या पायरीनें व किती कालांत मिळाले पाहिजेत, हें

ठरविताना स्वसंमतीचें तत्व आजच्या आज हिंदुस्थानास लावण्यास कोणचीहि अडचण शिल्लक राहिलेली नाहीं. पहिली पायरी किती भरीव असावी व पुढच्या पायऱ्यांच्या कालमर्यादा कोणत्या असाव्यात हें ठरविण्याचें काम नोकरशाहीकडे, हिंदुस्थानसरकारकडे किंवा स्टेटसेक्रेटरीकडे पार्लमेंटनें न ठेवता तें स्वसमतीच्या तत्त्वाप्रमाणें हिंदुस्थानच्या लोकांवरच सोंपविलें पाहिजे. हिंदुस्थानचा इंग्लंडला होत असलेला उपयोग, राष्ट्रसंघांतील स्वसमतीच्या तत्त्वाचा फायदा हिंदुस्थानला देण्यास प्रे. वुइल्सन व मि. लॉइड जॉर्ज ह्यांच्या कपूची असलेली तयारी, आणि युरोपखंडात व इंग्लंडात रूढ होत चाललेलीं तत्त्वे, ह्या सर्वांचा विचार करता होमरूल लीगनें व राष्ट्रीय सभेनें इंग्लंडात चालविलेली स्वराज्याची चळवळ हल्लीहून अधिक नेटानें चालविणें हिंदुस्थानच्या फायद्याचें असून बॅ. बॅप्टिस्टा ह्यांच्या उपदेशाप्रमाणें ह्या कामाकडे सर्वांकडून योग्य लक्ष पुरविण्यात येईल ह्यांत संशय नाहीं.

---

# * मुंबई-दिल्लीचा हरताळ

महात्मा गांधी यांच्या सत्याग्रहाच्या चळवळीस गेल्या आठ दहा दिवसात आस्ते आस्ते विराट रूप येऊं लागल्यामुळें रौलेटच्या नव्या कायद्याविरुद्ध सर्व हिंदुस्थान एकमतानें उठल्यासारखा दिसूं लागला आहे. रौलेटच्या बिलाला लाटसाहेबाची समति मिळाल्यानंतर येणारा रविवार हा निषेधाचा दिवस चोंहोंकडे पाळण्यांत यावा अशी विनति महात्मा गांधी यानीं सर्व हिंदुस्थानास केली. गेल्याच्या मागील रविवारापूर्वी लाटसाहेबांची सदर संमति मिळाल्यामुळें ता. ३० मार्च रोजींचा रविवार काहीं ठिकाणीं पाळला गेला, आणि काहीं ठिकाणीं ता. ६ मार्चचा रविवार पाळला गेला. दिल्ली, अमृतसर, नागपूर, सातारा, बेळगाव वगैरे ठिकाणीं पहिला रविवार पाळला गेला. मुंबई, लाहोर, मद्रास, कलकत्ता, पुणें वगैरे शहरीं दुसरा रविवार पाळला गेला. रौलेटच्या कायद्याविरुद्ध निषेध प्रदर्शित करण्याकरितां सभा भरवून स्टेट सेक्रेटरीसाहेबानीं व बादशहांनी आपली संमति या कायद्यास देऊं नये अशा आशयाचे ठराव चोहोंकडे पसार झाले. लाटसाहेबानीं आपली समति दिल्यानंतरहि असल्या निषेधाच्या ठरावाना मुंबईच्या गेल्या रविवारच्या जंगी जाहीर सभेंत ना. जिना, मि. पेटिट, ना. पटेल, बॅ. बॅप्टिस्टा, मि. नटराजन वगैरे सत्याग्रही नसलेल्या मंडळींनींहि आपला पूर्ण पाठिंबा देऊन सत्याग्रहाच्या चळवळीला लाख-पन्नास हजार लोकांच्या देखत महात्मा गांधी यांच्या शेजारीं उभे राहून एक तऱ्हेची मदत केली. मुंबईस गेल्या रविवारीं सायंकाळीं फ्रेंच पुलाजवळ जमलेल्या सभेच्या जागेंत तीस चाळीस हजार लोक होते आणि 'आसपासच्या रस्त्यावर लाखाहून अधिक

---

* केसरी-८ एप्रिल १९१९

मोठा जमाव जमलेला होता. सकाळीं समुद्रस्नानाच्या वेळींहि तेवढाच मोठा हिंदुमुसलमानाचा समुदाय चौपाटीवर हजर होता; आणि समुद्रापासून माधवबागेपर्यंत निघालेली प्रचंड मिरवणूक ज्यांनीं पाहिली त्याच्या तोंडून धार्मिक उत्सवाच्या वेळीहि निघणाऱ्या मिरवणुकीना या मिरवणुकीने मागे टाकलें असेच उद्गार निघाले! रविवारीं चोहोकडे करण्यांत आलेला उपवास आणि तन्निमित्त देवदर्शनार्थ निघालेल्या मिरवणुकी या दुःखद प्रसंगासबंधाच्या होत्या. अर्थात् त्याचें स्वरूपहि दुःखदच होतें. आपल्या मनांतील हें दुःख प्रदर्शित करण्याकरिता सर्व दिवसभर मुंबईच्या लहान-थोर सर्व व्यापाऱ्यानी आपापले बाजार व दुकानें बद ठेविलीं होती. मुंबई-प्रमाणें पुण्यासहि रेमार्केट, बुधवार, रविवार, नाना, भवानी, वेताळ व लष्कर या पेठातील दुकाने बद होतीं. प्रो. पराजपे याच्या अध्यक्षतेखालीं सार्वजनिक दोन सभा होऊन गर्दीतील आकस्मिक अपघातामुळें दोन-तीन इसमाचे पाय मुरगळलेहि. मुंबईच्याहि सभेत दोन चार इसमाना घेरी आली! मद्रास, कलकत्ता, लाहोर, सिंध, हैद्राबाद वगैरे ठिकाणची हकीकत सामान्यतः एकाच स्वरूपाची आहे. रौलेटचें बिल पास झालें म्हणून सर्व व्यापारधद्यावर व्यापाऱ्यानीं व इतरानीं महात्मा गाधी याच्या विनतीला अनुसरून स्वेच्छेने व सद्बुद्धीने हरताळ पाडला आणि महात्मा गाधी याची

## सत्याग्रहाची चळवळ

आपणास पसंत आहे असे पर्यायानें महात्मा गाधी याना उलट कळविलें. रौलेटचा कायदा लोकाना पसत नाही इतकेच नव्हे तर हा कायदा पास झाल्यामुळें होणारें दुःख इतक्या तीव्रतेचें आहे कीं, त्या दुःखानें व्याप्त होऊन आपण होऊन दुसऱ्या दुःखाची व तुरुगवासाची आराधना करण्या-शिवाय दुसरा तिसरा मार्ग हताश झालेल्या निर्बल लोकाना आता सुचत नाहीं, असे या सत्याग्रहाच्या चळवळीनें गेल्या आठ दहा दिवसात सरकारास

कळविलें आहे. ता. ३० मार्च रोजीं दिल्लीस पडलेल्या हरताळामुळें दिल्लीच्या स्टेशनाजवळ आणि दिल्लीच्या चांदणी चौकातील घड्याळाच्या टॉवरजवळ सोल्जरानी लोकाच्या समूहावर गोळ्या झाडल्यामुळे ८—१० असामी मेले व ५०—६० जखमी झाले, असे लोकाचे ह्मणणे आहे. सरकारतर्फे प्रसिद्ध झालेल्या हकीकतींत मेलेले व जखमी मिळून २०—२१ चीच सख्या दिली आहे. ही सख्या २०—२१ आहे की, ५०—६० आहे, लोकानीं सोल्जराची कुरापत काढली का अधिकाऱ्यानी आपल्या मनाचा समतोलपणा सोडून देऊन गागरल्यामुळे ह्मणा किंवा चढेलपणाने ह्मणा गोळीबारास हुकूम दिला, वगैरे मुद्याची चर्चा एका बाजूस ठेविली तरी सत्याग्रहाच्या चळवळीमध्ये खुद्द राजधानीच्या भूमीवर पाचपचवीस मुसलमानाचें व पाचपचवीस हिंदूंचे रक्त सोल्जराच्या गोळीबारामुळे शिंपडले गेलें ही गोष्ट सर्व लोकाच्या डोळ्यापुढे एकसारखी उभी राहिल्यावाचून राहणार नाही मरणारे बिचारे मरून गेले, पण त्याच्या रक्तानें मातृभूमि लाल झाली, या गोष्टीची आठवण केव्हाहि मरणार नाही, गोळीबारानें ही आठवण मारता येत नाहीं; दडपशाहीच्या कायद्यानीं ही आठवण दडपली जात नाहीं, आणि पुढे सोसाव्या लागणाऱ्या भयप्रद दुःखाच्या वर्णनानें ही आठवण मागें पडत नाही! स्वतः जिवत राहण्याचा जोर या आठवणींत आहे, इतकेच नव्हे तर या आठवणीपासून निरनिराळ्या गोष्टी एकामागून एक उत्पन्न होऊन कालातरानें आठवण जरी बुजाली तरी नवीन गोष्टीची परपरा तुटत नाही. मेलेल्याची स्मशानयात्रा दिल्लीस ज्या वेळीं निघाली त्यावेळीं ३०—४० हजार मुसलमानाबरोबरच ३०—४० हजार हिंदु स्मशानयात्रेस हजर राहिले. मुसलमानाच्या शवाला हिंदूंनीं खादा दिला आणि हिंदूंच्या शवाला मुसलमानानी खादा दिला. दिल्लीच्या जुम्मामशिदीत शुक्रवारच्या प्रार्थनेच्या वेळीं हिंदूंना हजर राहण्याची परवानगी मिळून प्रार्थनेनतर मुख्य

मौलवी साहेबाच्या व्यासपीठावर उभे राहून स्वामी श्रद्धानंद यांना उपदेश करण्याचा आग्रह करण्यात आला. दिल्लीच्या हिंदू-मुसलमानांनीं महात्मा गांधी यांची सत्याग्रहाची चळवळ अशा रीतीनें उचलून धरल्यामुळे रौलेट बिलाचा पूर्ण निषेध झालाच, पण पंजाब व स. प्रांत येथील हिंदु-मुसल्मानांमधील विरोध पूर्णपणें लयास गेला. हिंदु-मुसलमानांमध्ये एकी चांगल्या प्रकारे झाली असे लखनौच्या कॉंग्रेसच्या वेळीं जाहीर करण्यात आलें, आणि त्यानंतर एकीवर कळस गेल्या शुक्रवारच्या दिल्लीच्या जुम्मा मशिदींतील हिंदु-मुसलमानांच्या संमेलनाने चढविला. खुद्द अकबर बादशहाला स्वतःची बादशाही शक्ति खर्च करून जें संमेलन घडवून आणणें दुरापास्त झाले असतें ते संमेलन गेल्या शुक्रवारीं दिल्लीस घडून आलें. मुलतान, लाहोर, अमृतसर, मुंबई, पुणें वगैरे शहरांनीं सर्व बाजारावर जो हरताळ पाडला तो कोणी पाडला? महात्मा गांधी यांची विनंति या हरताळाला कारणीभूत झाली ही गोष्ट तर खरीच, पण वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेल्या विनंतीमुळें असला सर्वव्यापी हरताळ चोहोकडे दृष्टीस पडेल असे कोणास थोड्या दिवसापूर्वीं वाटलें होतें काय? उपवासाची व हरताळाची विनंति प्रथमच प्रसिद्ध झाली त्यावेळीं, कोण असले हरताळ पाळतो म्हणून काय कमी नावें ठेवण्यात आलीं? पुण्या-मुंबईस तर दुकानें बंद न राहण्याबद्दल काय कमी खटपट झाली? राहिलीं तर थोडीशी दुकानें बंद राहतील असा खुद्द पोलिसांचाहि अंदाज आदल्या दिवशीं रात्रींपर्यंत नव्हता काय? मग रविवारीं हा असला हरताळ एकाएकीं कसा दृष्टीस पडला? हा हरताळ स्वयंस्फूर्तीने पडला, दुकानदारांनीं आपण होऊन पाडला, कोणी कोणावर जुलूम केला नाहीं, इतरांचें नुकसान करण्याची द्वेषबुद्धि या हरताळाच्या बुडाशीं नव्हती. रौलेट बिलामुळे आपणास दुःख होत आहे आणि या दुःखाचा प्रतिकार करण्यास हा योग्य मार्ग आहे या स्वाभाविक समजुतीनें

हा हरताळ पाडला गेला. प्रतिकाराचा मार्ग महात्मा गांधी यांनीं सुचविला पण दुःख अंतःकरणांत न मावून अंतःकरणाबाहेर कोणत्या तरी प्रत्यक्ष कृतीनें तें वाहून पडण्याइतके उत्पन्न कोणीं केलें? महात्मा गांधींनीं उत्पन्न केलें नाहीं, व त्यांच्या भाषणांनीं किंवा लेखकांच्या लेखांनींहि उत्पन्न केलें नाहीं; रौलेट बिलानें तें उत्पन्न केलें. दिल्लीस झालेला रक्तस्राव गांधींच्या माथीं मारण्याचा उद्योग काहीं ॲंग्लो-इंडियन पत्रें करीत आहेत आणि सत्याग्रहाच्या विरुद्ध असलेले आमच्यांतीलच काहीं लोक या निंद्य उद्योगास दुजोरा देत आहेत! महात्मा गांधी यांच्या मस्तकावर या रक्तस्रावाची जबाबदारी ठेवण्यापेक्षां रौलेट बिलें पास झालींच पाहिजेत म्हणून खोट्या पक्षाचा ज्यांनीं आग्रह धरला त्यांच्याच डोक्यावर ही जबाबदारी केव्हांहि येऊन पडते. दिल्लीस झालेल्या शांततेच्या भंगाबद्दल जर कोणास जबाबदार धरावयाचें असेल तर कायदेकौन्सिलांतील सर्व नेटिव्ह सभासद व सर्व लोकमत विरुद्ध असतांहि, इंग्लंडचा व युरोपचा इतिहास विरुद्ध असतांहि, इंग्लंडचे उदारमतवादी मि. लॉइड जॉर्ज व मि. मॉंटेग्यू यांच्या-सारख्या मुत्सद्यांचीं सन्मान्य मतें विरुद्ध असतांहि, आमचे लाटसाहेब लॉर्ड चेम्सफर्ड व मुंबई इलाख्याचे कालचे व आजचे गव्हर्नर हे अंतःकरणाच्या आंतील गुप्त जागेंत या बिलाला शाप देत असले पाहिजेत असें सर्वांना वाटत असतांहि, ज्यांनीं हीं बिलें पुढें आणण्याचा आणि आणल्यानंतर पास करून घेण्याचा

## दुराग्रह

धरला त्यांच्याच कपाळावर साम्प्रतच्या क्षुब्ध परिस्थितीचें सर्व पातक मारलें पाहिजे. अशा रीतीनें मनाची क्षुब्धता झाली असतांना कठोर व उग्र मार्गाकडे जाण्याची प्रवृत्ति दाबांत ठेवून सत्याच्या प्रेमळ राजरस्त्यानें जावयास सांगणाऱ्या साधूला जबाबदार धरणें म्हणजे चोरांना सोडून

संन्याशाला सुळी चढविणे होय. दिल्लीस अशा प्रकारचा हरताळ सर्व उद्योगधंद्यावर पडला असता शांततेचा भंग झालाच पाहिजे, तेव्हां बाजार बंद ठेवण्याची सूचना करणारालाच शांततेच्या भंगाबद्दल जबाबदार धरलें पाहिजे असे विरुद्ध पक्षाचें म्हणणें आहे. अशा बाबीत शांततेचा भंग झालाच पाहिजे, हा मुद्दाच मुळी खरा नव्हे. शांतता राखून शांत चित्तानें व प्रेमळ वृत्तीनें दुःखे भोगा आणि असह्या तपश्चर्येनें जाण्याची शक्ति वाढवा, असा महात्मा गांधी यांचा उपदेश आहे. उपदेशांत दांडगाई किंवा द्वेषबुद्धि कोठेंच नाही. बाजार बंद ठेवण्याची कृतीच अशी आहे कीं या कृतीमुळें कांहीं ना कांही तरी दांडगाई करावीच लागते, असे म्हणावे तर तेंहि खरें नाही. पुण्याचा बाजार बंद होता, पण कोणीहि कोणाशीं दांडगाई केली नाही. ज्या मुंबईच्या बाजारापुढे दिल्लीचा चांदणीचौक म्हणजे आज कांहींच नाहीं, तो सर्व हिंदुस्थानचें मुखनाक असलेला मुंबईचा बाजारहि बंद होता. पण कोठेंच दंगाधोपा नाही व रक्तस्रावहि नाही. दिल्लीस दंगाधोपा व रक्तस्राव झाला व मुंबईत दंगाधोपा व रक्तस्राव नाही, असा फरक कां? दिल्लीच्या बाजूस या चळवळीत मुसलमान जितके पडले तितकेच पुण्या-मुंबईसहि पडले. एका ठिकाणीं तेवढा दंगा झाला व दुसऱ्या ठिकाणी झाला नाही, याचे कारण महात्मा गांधी यांच्या उपदेशांत सांपडावयाचे नाही किंवा सत्याग्रहाच्या चळवळीमुळे कृतीला जें वळण येत आहे त्या वळणांतहि दृष्टीस पडावयाचें नाही. हे कारण शोधून काढण्यास स्थानिक अधिकाऱ्यांच्या वृत्तीकडेच पाहिले पाहिजे. पंजाब प्रांतांत, दिल्लीच्या प्रांतांत, व उदारबुद्धि लॉर्ड चेम्सफर्ड यांच्या परिवारांत सिडनहॅमी कित्ता गिरविणारे जर अधिकारी नसते तर रौलेट-बिलें यापूर्वीच मागे गेलीं असतीं आणि दिल्लीसहि दंगा झाला नसता. मुंबईस दंगा झाला नाहीं, याचें कारण लॉर्ड विलिंग्डन यांच्या कारकीर्दीत सिडनहॅमी ग्रहणांतून मुंबई सुटली

आणि हल्लीचे गव्हर्नर जॉर्ज लॉईड यांच्या वेळीं तर सिडनहॅमी दृष्टीलाहि मुंबईस फारसा आधार नाहीं. दिल्ली येथील शांततेच्या भंगामुळें गांधी यांना आपली चळवळ मागें घेण्यास सांगण्यापेक्षां दिल्ली-पंजाब येथील अधिकारी बदलून लॉर्ड चेम्सफर्ड यांच्या सद्बुद्धीचा तुरुंगवास नष्ट करणें अधिक शहाणपणाचें नाही काय? हल्लीप्रमाणें लॉर्ड चेम्सफर्ड यांनी सद्बुद्धि जर शृंखलाबद्ध झाली नसती तर त्यांनीं रौलेट-बिलाचा उपद्व्याप केव्हांच केला नसता. नोकरशाहीच्या पाशांत सांपडल्यामुळें हिंदुस्थानांतील कांहीं सत्ताधारी चांगल्या मुत्सद्यानांहि आपली सद्बुद्धि लपवून ठेवावी लागत आहे. नोकर शाहींतील कांहीं रूढीमुळें आपले विचार आपल्या मनांतच कोंडून ठेवणें कांही गव्हर्नरांना भाग पडत असल्यामुळें रौलेट कायद्याच्या सांप्रतच्या प्रसंगाच्या वेळीं त्यांच्या मुत्सद्दीपणाचा फायदा प्रजाजनांना न मिळतां कांहीं

## कायदे मोडणें

व निमूटपणें तुरुंगवासाचीं दुःखें सोसण्याच्या तपश्चर्येचा मार्ग स्वीकारणें महात्मा गांधी व त्यांचे सत्याग्रही अनुयायी यांना भाग पडलें आहे. नाइ-लाज म्हणून ही गोष्ट करण्यास ते प्रवृत्त झाले आहेत. महात्मा गांधी यांच्या कायदे मोडण्याच्या कृतीस चालू आठवड्यांत सुरवात व्हावयाची आहे. कायदे मोडून दुःखाला कवटाळण्याची चळवळ सुरू करणें म्हणजे बदमाषांना व बोल्शेव्हिकांना उत्तेजन देण्यासारखेंच होय असा कालिमा या तपश्चर्येच्या तेजावर कांही मदधी फासू पहात आहेत. बदमाष व बोल्शेव्हिक हे कायदा मोडण्याच्या कृतीपुरते म. गांधी यांच्याशीं समानधर्म होऊं शकतात, ही गोष्ट आम्हांस कबूल आहे. पण एका क्षुल्लक उपांगांत समानधर्मत्व असल्यानें एकाची दुसऱ्यास उपमा देतां येत नाहीं, हेंहि विसरतां कामा नये. चोर, दरवडेखोर व बोल्शेव्हिक रोज खातात, पितात,

त्यानाहि ब्युरोक्रॅटाप्रमाणें दोन हात, दोन पाय, दोन डोळे आहेत; एवढयाच साम्यावरून जसा एखादा ब्युरोक्रॅट चोरहि होऊ शकत नाही किंवा दरवडेखोरहि होऊ शकत नाही, बदमाषहि होऊ शकत नाहीं किंवा बोल्शेव्हिकहि होऊ शकत नाहीं, त्याप्रमाणें महात्मा गांधी हेहि केवळ कायदे मोडण्यानें निंदेला किंवा तिरस्काराला पात्र होऊ शकत नाहीत. कायदा पाळणे ही बाबहि काहीं प्रसगीं निंदास्पद ठरली जाईल; आणि कायदा मोडणें ही गोष्टहि प्रसगी वीराना, महात्म्याना व तपस्व्याना भूषण-दायक होईल. साप्रतचा प्रसंग कोणत्या स्वरूपाचा आहे हे महात्मा गांधींनीं ठरविलेहि नाही व जाहीरहि केलेले नाही. रौलेट बिलाची चर्चा कायदे कौन्सिलात ज्यानी ज्यानीं केली त्यानी आजच्या प्रसगाची रूपरेषा आखलेली आहे. सत्य कोणत्या बाजूचे आहे हे ठरविण्याचा मक्ता महात्मा गांधी एकटे घेऊ इच्छित नाहीत. साप्रतच्या वादातील सत्य महात्मा गांधीच्या बाजूचें आहे, असा निकाल त्यांच्या स्वतःच्या अतःकरणाच्या प्रवृत्तीनें तर दिलाच आहे, पण तेवढयावर ते थांबलेले नाहीत. कायदे कौन्सिलात सर्व नेटिव्ह सभासदानीं याच प्रवृत्तीला दुजोरा दिला आहे. सर्व हिंदुस्थानभर निरनिराळ्या प्रकारच्या सस्थानी व हरएक दर्जाच्या विचारी पुरुषानीं रौलेटचा कायदा दुराग्रहाचा आहे इतकेच नव्हे तर या कायद्याच्या वेळीं राजकीय हक्क मिळाले तरी ते न मिळाल्यासारखेच आहेत, अशीच आपल्या अंतःकरणाची ग्वाही दिली आहे. तेव्हा सत्पक्ष कोणता व असत्पक्ष कोणता याविषयी हिंदु-मुसलमानाच्या दृष्टीनें तरी बिलकूल मतभेद राहिलेला नाही. तेव्हा महात्मा गाधी यांची कायदा मोडण्याची कृति कोणत्याहि दृष्टीनें, खुद्द अधिकाऱ्यांच्याहि दृष्टीने, निंदास्पद होऊं शकत नाहीं. ते विदेही ( Self-less ) स्थितींत आहेत हें सर जेम्स मेस्टन यानाहि मान्य आहे. प्रसग सत्याचा आहे, आणि पुढारी आहे विदेही साधू, एवढया गोष्टी सर्वांना

मान्य आहेत. या गोष्टी मान्य करणारेहि सत्याग्रहाच्या चळवळीवर असा आरोप करतात की, अनुयायी कोठे साधू आहेत ? आणि साधू वृत्तीनेच कायदे मोडले जातील म्हणून कशावरून ? सर्वच अनुयायी साधू नाहीत, याबद्दल वाईट वाटण्याचे कारण नाही. इतके साधू एका ठिकाणीं घेऊन तरी काय करावयाचे? त्याना कोणत्या चळवळीचें काम तरी पुरणार ? तेव्हा अनुयायी साधू नाहीत आणि साधू वृत्ति टिकणार नाहीं, या मुद्यावर चळवळीला शक्य तितका पाठिंबा देऊ नका, असा उपदेश करणें म्हणजे मातृभूमीचें जाणून बुजून नुकसान करणें होय. कोणते कायदे कोणी व कसे मोडावयाचे यासबंधाने शका कुशका काढीत बसण्यापेक्षा आणि वृथा वादांत काळ घालविण्यापेक्षा निरनिराळ्या कमिट्यांशीं असला वादविवाद करून निरनिराळी मते घेऊन महात्मा गाधी स्वतः जे कायदे मोडतील ते सर्व कायदे आपापल्या शक्तीप्रमाणें व बलाप्रमाणें सांप्रतच्या प्रसगीं कोणाहि देशभक्तानें मोडल्यास त्याला पाप लागण्याची बिलकूल भीति नाहीं. यांत दोष बिलकुल नाहीं, प्रत्यवाय नाही, पूर्वीच्या कामाचा नाश नाहीं, शक्तिनुसार थोडेसे झालें तरी तें कल्याणास्पदच होऊन निदान रौलेट कायद्याचे सकट टळेल. यशापयश सर्वांच्या जुटीवर व मदतीवर अवलबून आहे. तथापि त्याबद्दल आज अनुकूल अटकळ बाधण्याइतकी मदत गेल्या आठ दहा दिवसात महात्मा गाधी याना मिळाली आहे. शिवाय एवढी मोठी गोष्ट मात्र आज निर्विवाद आहे की, यात कोणच्याहि प्रकारचें पाप नसून आपण निंदास्पद गोष्ट केली अशी चुटपुट मनाला लागून राहण्याचा प्रसग कोणावरहि या कामीं येणार नाहीं.

---

# * धामधुमीचा आठवडा

रविवार ता ६ एप्रिल रोजी चोहोकडे हिंदुस्थानांत सत्याग्रहाच्या चळवळीसंबधानें बाजार बंद होऊन उपवास, उपासना वगैरे स्वरूपाचे व्रत पाळले गेल्यानंतर गेल्या मंगळवारी म. गांधी यांनी मुंबईस सत्याग्रहाच्या चळवळीस उघडपणे सुरवात केली. आदले दिवशी म्हणजे सोमवारी सत्याग्रहाची मुख्य कमिटी भरून म. गांधी यांनी पूर्वी प्रसिद्ध केलेली पण सरकारने प्रेस ॲक्टखाली जप्त केलेलीं पुस्तके उघडपणे विकण्याचे, आणि 'सत्याग्रही' या नावाचें एक वर्तमानपत्र छापखाना वगैरे रजिस्टर न करतां छापून प्रसिद्ध करण्याचे ठरविण्यात आले.या ठरावाप्रमाणे मंगळवारी म.गांधी यांनीं स्वतः आपल्या सरकारजमा झालेल्या ' हिंद स्वराज्य ' या गुजराथी पुस्तकाच्या प्रती उघडपणे विकण्यास सुरवात केली. शेट जमनादास द्वारकादास, मि. उमर सोबानी, मि. बँकर, श्री. सरोजिनी नायडू, श्री. अनसूयाबाई, अहमदाबादचे मि. चंदूलाल देसाई वगैरे सत्याग्रही पुढाऱ्यानीं सदर पुस्तकाच्या प्रती उघडपणे बाजारात विकल्या आणि पोलिसलाहि मुंबई व अहमदाबाद येथे दिल्या ! रविवार ता. ६ रोजी सत्याग्रह चळवळीचें देवक बसले व मंगळवारीं शुभ कार्यास सुरवात झाली. पण कार्याच्या देवकाचा रविवार व पुढील आठवडा शांततेनें पार न पडता गुरुवार, शुक्रवार व शनिवार हे गेल्या आठवडयातील तीन दिवस पूर्वीच्या कोणत्याहि चळवळीला मागे टाकण्याइतक्या धामधुमीचे गेले. या संबधाची सविस्तर हकीकत आजचे अंकात दुसरीकडे दिलीच आहे. ती वाचली असता गेल्या आठवडयात कोणतें

**उग्र वावटळ**

सर्व हिंदुस्थानभर फिरत होतें, याची कल्पना वाचकास सहज होईल.

---

* केसरी ता. १५ एप्रिल १९१९

सत्याग्रहाची चळवळ म्हणजे अत्यंत निरुपद्रवी चळवळ; प्रेमळ वृत्तीनें आत्म्याची शक्ति जागी करून त्या शक्तीच्या जोरावर सात्विक रीतीनें इष्ट कार्यसिद्धि घडवून आणण्याची ही तपश्चर्या आणि या तपश्चर्येच्या अग्रस्थानीं म. गांधी यांच्यासारखा विदेही पुरुष बसलेला! अशा स्थितींत देवकाच्या दिवशीं आणि कार्याच्या आठवड्यात चोहोंकडे वावटळें उत्पन्न व्हावीं ही गोष्ट सत्याग्रही वसिष्ठाच्या धेनूच्या शेपटींतून उत्पन्न झालेल्या वादळा-इतकीच सर्वांना सखेदाश्चर्यकारक वाटली यात संशय नाहीं. ता. ६ रविवारच्या देवकाच्या दिवसात कायदे मोडण्याचा कोठेंहि भाग नव्हता, पण त्याच्या अगोदरच्या रविवारीं दिल्लीस दुकानें बंद करण्याच्या कामीं बोलाचाली होऊन लष्करानें घातलेल्या गोळ्यांमुळें सात आठ इसम मरून दिल्लीच्या भूमीवर देशभक्तांचें रक्त शिंपडलें गेलें. सात्विक देवता जागृत करण्याच्या आत्मयज्ञाच्या प्रारंभीच अशा रीतीनें दिल्लीच्या सोल्जराकडून तामस वृत्ती जागृत केल्या गेल्यामुळें प्रारंभाला देवकाचा समारंभ सर्व हिंदुस्थानात चोहोंकडे शांततेनें पार पडला, आणि विघ्नें या शुभकार्यास येणार नाहींत असा सर्वांस विश्वास वाटला. या विश्वासानें प्रेरित होऊन आणि स्वतःच्या कार्यातील प्रेमळ वृत्तीचा सात्विकपणा पूर्णपणें ओळखून म. गांधी यांनीं गेल्या मंगळवारीं आपल्या शुभकार्यास प्रारंभ केला. मुंबईस सत्याग्रहाचा हा पहिला दिवस योग्य रीतीनें पाळल्यावर आणि कायदे मोडण्याचें कर्म सर्व विधींना अनुसरून प्रेमळ वृत्तीनें केल्यावर म. गांधी गेले बुधवारीं तेथील इष्टमित्राच्या आमंत्रणावरून दिल्लीस जावयास निघाले. गुरुवारीं संध्याकाळीं ते दिल्लीजवळ गेले. १०।१५ मिनिटांनीं त्यांची आगगाडी दिल्लीच्या प्रांतात प्रवेश करणार तों कोसी स्टेशनवर सरकारी अधिकाऱ्यांनीं त्यांना दिल्ली व पंजाब येथील सरकारचे हुकूम आणून दाखविले. दिल्लीच्या प्रांतात व पंजाबचे प्रांतांत जाण्याची

त्यांना मनाई करण्यात आली आहे, अशा अर्थाचे हे हुकूम होते. हे अटकेचे हुकूम वाचून म. गांधी यांना आनंद झाला, आणि तुरुंगवासातील ज्या तपश्चर्येकरता त्याचें मन उतावीळ झालेलें होतें त्या तपश्चर्येची घटका जवळ येत चाललेली पाहून ते सस्मित वदनानें अधिकाऱ्यांना म्हणाले कीं, मनाईचे हुकूम तोडण्यास मी तयार असून आपणहि मला अटकेत ठेवण्याचें आपलें कर्तव्य एकमेकाविषयीं मनात राग न बाळगता अवश्य करावे. म. गांधी यांच्या व्रताचे वारस असलेले त्यांचे शिष्य मि. देसाई यांना त्यांनीं १०।१५ मिनिटात अटकेच्या पूर्वीचा लोकास सांगावयाचा निरोप सांगितला, आणि लगेच ते अधिकाऱ्यांच्या अटकेत गेले. म. गांधी यांच्या सत्याग्रहाच्या व्रताला अनुसरूनच जी कृति त्यांच्या हातून या वेळीं व्हावयास पाहिजे होती ती कृति परमेश्वरकृपेनें त्यांच्या हातून घडून आली. 'बोले तैसा चाले' असेच त्यांनीं केलें. मि. देसाई यांच्यामार्फत त्यांनीं पाठवलेला निरोप लोकांनीं अवश्य वाचावा आणि त्याचीं पारायणें करून देशभक्तीचे पहिले धडे शिकावे, अशी सर्वांना या निरोपासंबधानें आमची शिफारस आहे. म. गांधी आनंदानें अटकेत गेले खरे, पण त्यांना अटक करण्याच्या

## तामसी कृत्यामुळें

गेला आठवडा फार धामधुमीचा गेला. गुरुवारीं रात्रीं अटकेची बातमी दिल्लीस पोचली आणि शुक्रवारीं सकाळीं व संध्याकाळीं सर्व हिंदुस्थानभर लोकांच्या तोंडीं तोच विषय होऊन बसला. म. गांधी यांना अटक का करण्यात आली याची चर्चा प्रत्येकजण आपल्या मनाशीं व इतराशीं करूं लागला, पण कोणासच दिल्ली व पंजाब येथील अधिकाऱ्यांच्या या तामसी कृत्याचा उलगडा करता येईना. खुद्द मुंबईच्या टाइम्सनेंहि दोन चार दिवस शांतपणें विचार करून या कृत्याचा उलगडा करता येण्यासारखा नाहीं,

तेव्हां सरकारनें आपल्याजवळील माहिती लोकापुढें मांडावी अशी सरकारास विनंति करून या तामसी कृत्यांतील अधाराबद्दल आपली कबुली पर्यायानें दिली आहे. मुंबईच्या टाइम्सला जें कृत्य अधाराचें वाटत आहे तेंच कृत्य हिंदुस्थानातील सर्व लोकाना काळ्या कुट्ट जुलमाचें वाटल्यास आश्चर्य तें कोणतें ? आणि या तामसी कृत्याचे ससर्गदोषामुळें म. गाधी यांनीं उत्पन्न केलेल्या लोकाच्या प्रेमळ वृत्तीनें पाघरूण टाकून अत्याचारांच्या धावटळीस जर सुरवात झाली तर त्यात सत्याग्रही चळवळीकडे दोष तरी कोणता ? म. गाधी याना अटक झाली ही बातमी ऐकण्याबरोबर मुंबई, अहमदाबाद, दिल्ली, लाहोर, अमृतसर वगैरे ठिकाणीं पुनः हरताळास सुरवात होऊन उद्विग्न व त्रस्त झालेल्या लोकाच्या झुंडीच्या झुंडी शुक्रवार, शनिवार दोन दिवस रस्तोरस्तीं फिरू लागल्या. असल्या झुंडीमध्यें शांत वृत्ति कोठून दिसणार ? काय चाललें आहे याचें त्यास भान नाहीं; म. गाधी याना पकडलें असून आपण अंधकारानें वेष्टिले गेलों आहों एवढीच काय ती जाणीव शिल्लक, आणि सत्याग्रहासारखी निरुपद्रवी व सात्विक चळवळ करण्याच्या कामातहि विलक्षण विघ्ने आहेत असा अनुभव येऊन सात्विक नाहीं तर नाहीं पण तामसी तरी मार्ग करण्याकडे निराश झालेल्या मनानें सहाजिकपणें घेतलेली उलट धाव; या सर्व गोष्टींना मिलाफ होऊन अमृतसर, लाहोर, अहमदाबाद व मुंबई येथील खवळलेल्या लोकाच्या हातून अत्यंत शोचनीय व निंद्य अशीं अत्याचाराचीं कृत्यें घडून आलीं. अमृतसर येथें नॅशनल बँक व चार्टर बँक या दोन बँका जाळून उध्वस्त करण्यात आल्या. त्या धुमाकुळींत बँकेचे अधिकारी असलेल्या चार युरोपियनाना लाठीखालीं मारण्याचें अत्यंत निंद्य पाप लोकाच्या हातून घडलें. अमृतसरच्या स्टेशनच्या काहीं भागाला आग लावून देण्यात आली; व तेथेंहि एका युरोपियनाला प्राणास मुकावें लागलें. लोकानीं अमृतसरच्या तारायंत्राच्या

तारा तोडल्या आणि अमृतसर व लाहोर यामधील आगगाडीचा संबंध बंद पाडण्याचा प्रयत्न रूळ वगैरे उपटून करण्यात आला. अमृतसर इतक्या बेफाम रीतीनें संतप्त होऊन निंद्य अत्याचाराचें माहेरघर बनण्यास म. गांधी यांच्या अटकेची बातमी अंशतः कारणभूत झाली असेल यांत संशय नाहीं. पण म. गांधी यांना पंजाबांत जाण्याची अटक करण्याचा हुकूम त्यावेळीं केला त्याचवेळीं अमृतसरचे व सर्व पंजाबचे सन्माननीय व प्रख्यात पुढारी बॅ. किश्लू व डॉ. सत्यापाल यानाहि एकाएकीं उचलून पंजाब सरकारनें अटकेंत ठेविलें आणि या अटकेमुळें पंजाबी लोकांच्या क्रोधाग्नीनें पेट घेतला! इतर प्रांतांतील लोकांना जितके स्वातंत्र्य मिळालें आहे तितकें स्वातंत्र्य आपणास मिळत नाहीं असे दिल्ली व पंजाब येथील प्रजाजनांना आज कित्येक दिवस वाटत आहे. दिल्लीच्या कॉंग्रेसच्या वेळीं या दोन प्रांतांतील लोकांचीं गाऱ्हाणीं सर्व हिंदुस्थानच्या वेशीवर टाकण्यांत आलीं, आणि सर मायकेल ओडवायरसारख्या अरेरावी अधिकाऱ्याची काळी छाया जोंपर्यंत या दोन प्रांतांवर पसरलेली राहणार तोंपर्यंत तेथील हिंदुमुसलमानांच्या मनाची कुचंबणूक नित्य वाढतच जाणार असें दिल्लीच्या कॉंग्रेसच्या वेळींच सर्वांच्या निदर्शनास आलें. या कुचंबणुकीचीं गाऱ्हाणीं निरनिराळ्या सभांतून, अर्जांतून व कायदे कौन्सिलांतील भाषणांतून अधिकाऱ्यांच्यापुढें आज कित्येक महिने एकसारखीं मांडण्यांत आलीं आहेत. त्यांत कोणताहि गुप्तपणाचा मार्ग नाहीं, लपंडाव कोणी केलेला नाहीं; सरळ मार्ग कोणीं सोडला नाहीं. असें असतांहि या कुचंबणुकींतून पंजाबी मन बाहेर काढण्याचा कोणताच उद्योग अधिकाऱ्यांनीं केला नाहीं, उलट दिल्लीच्या कॉंग्रेसनंतर रौलेट बिलाचा

## कांटेरी पिंजरा

तयार करून पंजाब्यांच्या त्रस्त मनास त्या पिंजऱ्यात कोंबून, अत्यंत

अल्पस्वल्प हालचालहि पंजाबातील हिंदु–मुसलमानाना रक्तबंबाळ करणारी होईल, असला औषधोपचार पंजाबच्या कुचबणुकीवर योजण्यात आला! पजाबच्या कुचबणुकीचें व रौलेट बिलाच्या दाबाचे पूर्ण स्वरूप वाचकानीं यावेळीं आपल्या डोळ्यापुढें ठेविलें पाहिजे. एरवीं गेल्या आठवड्यातील धामधुमीचें सगतवार आकलन त्यास करता यावयाचें नाहीं. सर मायकेल ओडवायर याच्या अरेरावी मताचा दाब पजाबातील हिंदु–मुसलमानावर जाचक रीतीनें जर पडला नसता आणि रौलेट बिलानीं सर मायकेल ओडवायर याच्या कारकीर्दीनंतरहि काहीं वर्षें या जाचातून सुटण्याची आपणास आशा नाहीं अशी विषण्ण स्थिति पजाबातील हिंदु–मुसलमानात जर उत्पन्न झाली नसती, तर गेल्या आठवड्यातील निंद्य अत्याचार पजाबात दृष्टीसच पडले नसते. महात्मा गाधी याना अटक करून पजाबातील त्रस्त स्थितीवर दुरून काडी ओढून टाकण्यात आली, आणि अमृतसरच्या पुढाऱ्याना उचलून नेण्याच्या मशालीनें तर पजाबास जाणून बुजून पेटविलें. अमृतसरास पाच युरोपियनाचा निर्दयपणाने खून होत असताना लाहोरासहि बाजारात हरताळ पडून बऱ्याच उग्र स्वरूपाचे दगे झाले. अमृतसर व लाहोर या दोनहि ठिकाणीं लोकाच्या झुंडींवर पोलिसाकडून व लष्कराकडून गोळ्या घालण्यात येऊन काहीं लोक मेले व जखमी झाले. लाहोर येथील बगल्यातून असलेल्या युरोपियनाच्या बायकामुलाना थोडा वेळ सरकारी वाड्यात बंदोबस्ताच्या जागीं ठेवण्यात आलें; आणि लाहोरच्या रस्त्यातून मशीनगन्स व मोटारी किल्ले याची लष्करी मिरवणूक निघून लष्करी विमानानेंहि रात्रीं व दिवसा लाहोरची टेहळणी केली. पजाबप्रमाणें अहमदाबाद व मुंबई येथेंहि गेल्या शुक्रवारीं व शनिवारीं दगे झाले. अहमदाबादेस एक खासगी पिठाची गिरणी व दोन सरकारी इमारती जाळण्यात आल्या. तारायंत्राच्या तारा तोडल्यामुळें आणि अहमदाबाद व मुंबई याच्या-

मध्यें आनंद स्टेशनजवळ आगगाडीचे रूळ काढून टाकल्यामुळें अहमदाबादेस मुंबईहून पाठवण्यात आलेल्या सैन्याची कुमक वेळेवर पोंचली नाहीं. रविवारपासून अहमदाबादेस शांतता झाली आहे. अहमदाबादच्या सविस्तर बातम्या अद्याप प्रसिद्ध झालेल्या नाहीत. पण त्या अत्यंत शोकजनक आहेत असे म्हणतात. मुंबईस शुक्रवारीं संध्याकाळी हरताळास सुरवात होऊन शनिवारीं सकाळीं हिंदु-मुसलमानांचीं सर्व दुकानें बंद झालीं. शनिवारीं दोनप्रहरीं पायधुणीच्या नाक्याजवळ ट्राम्वे बंद करण्याचा उपद्व्याप सुरू झाल्यामुळें पोलिसांच्या व लोकांच्या झटापटी दोन तीन वेळा झाल्या. मि. जमनादास द्वारकादास वगैरे सत्याग्रही पुढाऱ्यांनीं स्वतःच्या हातांनीं ट्राम्वेच्या रुळावरील दगड उचलून टाकून शांतता राखण्याचा आटोकाट प्रयत्न केला. मुंबईचे गव्हर्नर सर जॉर्ज लॉईड यांनीं गोळीबार करावयाचा नाहीं आणि लोकांशीं सौम्यपणानेंच वागावयाचे असे सक्तीचे हुकूम पोलिसांना दिल्यामुळे आणि पोलिसचे अधिकारी व मॅजिस्ट्रेट यांनीहि लोकांचीं मनें न दुखविण्याचा उद्योग मनापासून केल्यामुळें किरकोळ मारामारीहून अधिक भयंकर स्वरूप मुंबईच्या दंग्यांना प्राप्त झालें नाहीं. पायधुणीच्या बाजूला अशा किरकोळ मारामाऱ्या होत असतांना शनिवारीं एक वाजण्याचें सुमारास मुंबईस

## म. गांधी आले

आणि लगेच सर्व शहरभर फिरून अनुयायांच्या साहाय्यानें मुंबईच्या लोकांचीं मनें त्यांनीं शांत केलीं. म. गांधी यांना गुरुवारीं सायंकाळीं दिल्लीजवळ अटक करण्यांत आल्यानंतर मुंबईस परत येणाऱ्या एका गाडींत फर्स्टक्लासमध्यें अधिकाऱ्यांच्या नजरेखालीं मुंबईस आणण्यांत आले आणि मुंबईस आल्यावर मुंबई इलाख्याचे बाहेर जाण्यास मात्र आपणास मनाई आहे, असा

मुंबई सरकारचा हुकूम त्याना कळवून मुबईस मोकळे सोडण्यांत आलें. मुंबईस आल्यावर मुबईतील मारामाऱ्याची बातमी त्यांना कळली; अमृतसर, लाहोर, अहमदाबाद येथील अत्याचाराची काहाणी त्याच्या कानीं आली. आपलीं सत्याग्रहाची सात्विक चळवळ सभोंवारच्या अधःकारात दबून जात आहे असे पाहून त्यानीं गेल्या शनिवारीं संध्याकाळी चौपाटीचे वाळवटावर मुबईतील हिंदुमुसलमानाची सभा बोलावली. या सभेला सर्व मुबई शहर लोटलें होते असे म्हणण्यास हरकत नाहीं. दीड दोन लाखाच्या या सभेचे चार पाच विभाग करून प्रत्येक ठिकाणीं म. गाधी यांचा सदेश तेवढा वाचून दाखविण्यात आला आणि सभेचें काम सपविण्यात आलें. अटकेंतून सुटून परत आल्यावर अत्याचाराची हकीकत कानीं येऊन म. गाधी यानीं समुद्रकिनारी सर्वांना असे स्पष्ट सागितलें कीं, मारामारी, अत्याचार, रक्तपात, खून वगैरे सर्व निंद्य प्रकार सत्याग्रहाच्या चळवळीला वावडे असून सत्याग्रहाची चळवळ त्यामुळे मरणारी आहे. सर्व वावडया गोष्टी टाळण्याचा निश्चय जर लोकानीं केला नाही आणि सत्याग्रहाची चळवळ बंद पाडण्याचा प्रसंग जर त्यामुळे आपणावर आला तर आपण अन्नपाणी वर्ज करून लोकाचा दुराग्रह नाहींसा करण्याच्या कामाला आपल्या शरीराचा बळी देण्यास कमी करणार नाहीं, असे म. गाधी यानीं मुंबईच्या लोकाना निक्षून सागितलें. सत्याच्या आसनावर स्थिरपणानें आरूढ होऊन असल्या वावटळीच्या वेळींहि अधिकाऱ्याकडे प्रेमळ दृष्टीनें पाहण्यास जो महात्मा चुकत नाहीं त्या महात्म्याला अटक करण्यात अधिकाऱ्यानीं तामसीपणा तर दाखवलाच पण मुत्सद्दीपणालाहि रजा दिल्यासारखे केले. असल्या गैरमुत्सद्दीपणामुळे गेल्या आठवडयात चोहोंकडे धामधूम उत्पन्न झाली. अमृतसर, लाहोर व अहमदाबाद येथील अत्याचाराचा पूर्ण निषेध म. गाधी याच्याप्रमाणे केल्यावाचून

आमच्यानें यावेळीं राहवत नाहीं; आणि आम्हास खात्री आहे कीं, या निंद्य कृत्याचा निषेध सर्व हिंदुस्थानात यावेळीं झाल्याशिवाय राहणार नाहीं. ही अत्याचाराची लाट शमून सत्याग्रहाची सात्विक चळवळ व्यवस्थित रीतीनें व मंगलदायक पद्धतीनें पुढें चालविण्यास म. गांधी एकटेच समर्थ आहेत. तेव्हां रौलेटच्या कायद्याविरुद्ध सर्व हिंदुस्थानानें सांप्रत केलेल्या हाकाटीस गेल्या आठवड्याच्या धामधुमीनंतर म. गांधी आपल्या सत्याग्रहाच्या चळवळीच्या उदाहरणानें कोणतें शुद्ध स्वरूप देतात हें नीट ध्यानीं घेऊन, यथाशक्ति व यथामति त्यांच्या पावलावर पावलें टाकून जाण्यास हिंदुस्थान यावेळीं कचरणार नाहीं अशी आम्हास आशा आहे.

---

# * सत्याग्रहाला सुळीं कां चढवितां?

म. गांधी यांच्या उपदेशाप्रमाणें मुंबईच्या सत्याग्रही सभेनें सत्याग्रहाची चळवळ कांहीं काळ तहकूब ठेवावी असा ठराव पास केला असून सत्याग्रही लोकांनीं कायदे मोडण्याचें आपले मत सांप्रत बंद ठेवलें आहे. सत्याग्रहाची चळवळ कांहीं काळ कां बंद ठेवली पाहिजे यासंबंधाची चर्चा करतांना म. गांधी यांनीं सत्याग्रहाबरोबरच मारामाऱ्या व खून यांचा सुळसुळाट गुजराथ व पंजाब येथे माजून राहिल्याबद्दल दुःख प्रदर्शित केलें आहे. म. गांधी यांच्याप्रमाणें सर्व हिंदुस्थानास वरील वाईट प्रकाराबद्दल अंतःकरणपूर्वक दुःख होत असून म. गांधी यांच्या उपदेशाप्रमाणें शांतता व व्यवस्था चोहोंकडे पुनः स्थापित करण्याकरिता सरकारास शक्य त्या रीतीनें मदत करावी अशीच सर्व लोकांची इच्छा आहे. रौलेटच्या कायद्याविरुद्ध चळवळ करणारांना लुटालूट, खून, मारामाऱ्या व जाळपोळ यापैकीं कांहींहि नको आहे. सनदशीर मार्गानें चळवळ करून रौलेटचा दुष्ट कायदा नष्ट करण्याचा त्यांचा इरादा आहे; तेव्हां सत्याग्रही सभेचे सभासद असोत, सर्व प्रकारचे लोक अत्याचारांना आळा घालण्याकरितां सरकारास आपापल्या परी मदत करण्यास तयार असून म. गांधी यांनीं सत्याग्रहाची चळवळ कांहीं काळपर्यंत सदर हेतूनेंच तहकूब केलेली आहे. म. गांधी यांनीं ही चळवळ ज्यावेळीं सुरू केली त्यावेळीं जाळपोळीच्या तत्त्वाशेजारीं इतक्या जवळ आपण उभे आहों हें त्यांच्या ध्यानीं आलें नाहीं. ही अटकळ चुकल्यामुळे सांप्रत सत्याग्रहाची चळवळ तहकूब करावी लागली असून जाळपोळीच्या मार्गांतून जाळपोळ विरहीत असतांनाच आपणांस कशीं पाउलें टाकतां येतील याचा पूर्णपणें विचार करण्याकरितां म. गांधी यांच्या चळवळीचीं तत्त्वें यावेळीं कोठून आलीं,

* केसरी, ता. २२ एप्रिल १९१९

यासबंधाची चर्चा हिंदुस्थानात आज चोहोंकडे सुरू आहे. हिंदुस्थान सरकारचा यासंबधाचा एक लाबलचक ठराव प्रसिद्ध झाला असून सिमला येथील अधिकाऱ्याच्या मतांचें घोरणहि प्रसिद्ध झाले आहे. बगालच्या गव्हर्नर-साहेबानीं मारवाडी व्यापाऱ्यांना बोलावून बगालसरकारचें मत प्रसिद्ध केलें आहे. शाततेने व सनदशीर मार्गाने रौलेटच्या कायद्याविरुद्ध लागेल तितकी चळवळ करण्यास मुबई सरकारची आडकाठी नाहीं पण शाततेचा भग होऊं लागल्यास आपलें उग्र स्वरूप प्रकट करून शातता राखण्याकरिता पोलिसच्या व लष्करच्या शक्तीचा पूर्ण उपयोग करून घेण्यास सरकार चुकणार नाहीं हें उघड आहे. म. गाधी यानीं सत्याग्रहाची चळवळ सुरू करून कायदे मोडण्याचें तत्त्व लोकाना शिकवल्यामुळें अनर्थ गुदरला असे अधिकाऱ्याच्या तर्फेचें म्हणणें आहे. पजाबच्या स्थितीची माहिती म. गाधी यांना नाहीं. पण अहमदाबाद व खेडा जिल्हा येथील उद्वेगजनक प्रकाराबद्दल त्याचें असे म्हणणें आहे कीं, त्याना करण्यात आलेल्या अटकेमुळेंच

## बेताल वातावरण

उत्पन्न होऊन लोकाच्या हातून उद्वेगजनक गोष्टी घडल्या. अहमदाबादच्या लोकाचीं मनें म. गाधी याच्या अटकेमुळेंच प्रक्षुब्ध झाली. खेडा जिल्ह्यात गेल्या दुष्काळाच्या वेळीं सत्याग्रहाच्या चळवळीनेच तेथील शेतकऱ्याना म. गाधी यानीं स्वावलबनाचा यशस्वी मार्ग दाखविला होता. अहमदाबाद येथील गिरण्यातील मजुराच्या सपाचे वेळीं म. गाधी व अनसूयाबाई यानीं मजुराना मदत करून उपवासाच्या मार्गानेच गिरणीच्या मालकाना जागे केले होते. अहमदाबाद व खेडा जिल्हा याचा व म. गांधी याचा अत्यंत जिव्हाळ्याचा सबध असल्यानें तेथील लोक बेताल झाले तर या बेतालपणाची जबाबदारी म. गाधींच्या अटकेशिवाय इतर ठिकाणीं शोधीत बसण्याची जरूरी तरी काय आहे? म. गाधी

यांना अटक केली असतां अहमदाबाद व खेडा जिल्ह्यातील लोक प्रक्षुब्ध व्हावेत, प्रक्षुब्ध झालेले लोक बेताल व्हावेत, आणि बेताल झालेल्याच्या वृत्तीची मजल प्रसंग विशेषीं जाळपोळीपर्यंत जावी ही सर्व अनर्थपरंपरा म. गांधी यांच्या अटकेतून उत्पन्न होणारी आहे. या ठिकाणीं उलट पक्षाचें असें म्हणणें आहे कीं, आगगाड्यांच्या स्टेशनांचा विध्वंस करणें, आगगाडीचे रूळ उखडून टाकणें, तारायंत्राच्या तारा तोडणें, पोस्ट ऑफिस, बँका व सरकारी कचेऱ्या जाळणें या गोष्टी लाहोर, अमृतसर, गुजराणवाला वगैरे पंजाबातील चार पांच ठिकाणांप्रमाणेंच अहमदाबादेस कशा झाल्या ? प्रक्षुब्ध झालेलीं मनें वाटेल ते भयंकर कृत्य करण्यास तयार होतात, बुद्धिच्या ताब्यांत त्यावेळीं शरीर नसतें. अर्थात् अशा लोकांनीं केलेलीं जाळपोळीचीं कृत्यें बुद्धिहीन माथेफिरूच्या सारखीं व्हावयास पाहिजेत, त्यांच्यांत सुसबद्धता दिसतां कामा नये, पण पेटलेल्या पंजाबांत व अहमदाबादेंत तसा वेडगळपणा दिसत नाहीं. सरकारला नडवणारी तेवढींच जाळपोळीचीं कृत्यें करण्यांत आलीं व करण्यांत येत आहेत. ज्या पोलिस चौकीला लागून खासगी घरें होतीं त्या पोलिस चौकी आतील सरकारी सामान तेवढें रस्त्यावर आणून जाळलें पण चौकीला आग लावून देण्यात आली नाहीं. इतर ठिकाणच्या पोलिस चौक्या व सरकारी कचेऱ्या जाळण्यांत आल्या. हिंदुस्थानसारख्या अफाट व विस्तीर्ण प्रदेशावर मूठभर इंग्रजानीं लष्करी सामर्थ्यामुळें सत्ता चालवावयाची असल्यास एका ठिकाणाहून लांबच्या दूरच्या ठिकाणास जावयाचे रस्ते स्वतःच्या पूर्ण हुकमतींत ठेवणें जरूर आहे. पोस्टाच्या कामांत अडथळा आला, तारायंत्राचें काम बिघडलें, आगगाडी थांबून राहिली, आणि सरकारी कचेऱ्यातील चिटयाचपाटया नाहींशा झाल्या तर सरकारच्या लष्करी शक्तीला अर्धांग वायु झाल्यासारखा होतो. सरकारचें अर्धें मरण आगगाड्या, तारायंत्रें, पोस्ट ऑफिसें व चिटयाचपाटया यामध्यें आहे. या दोन मर्मस्थानापैकीं पहिली

चलनाची शक्ति अहमदाबादेस व पंजाबात अत्यंत निष्ठुरपणें दुखविली गेली. या मर्मस्थानाकडेच प्रक्षुब्ध झालेल्या लोकांचें लक्ष कसे गेलें ? तारा तोडण्याची युक्ति त्याना कोणी सुचविली ? आगगाड्यांचे रूळ उखडल्यानें अर्धांगवायु होतो, हे लोकाच्या ध्यानीं कोणी आणून दिलें ? पोस्टाना, बँकाना व सरकारी कचेऱ्याना एक डबाभर रॉकेल घेऊन लावलेली आग सरकारी शक्तीच्या मर्मस्थानापर्यंत पोचते ही अक्कल अहमदाबादच्या व पंजाबच्या लोकाना कोणी शिकविली ? पंजाब व अहमदाबाद येथील कृत्यांमध्ये एक प्रकारचें साम्य का दिसून यावें ? या गोष्टीचा उलगडा मुंबईच्या टाईम्सच्या मतानें असा आहे की, हिंदुस्थानात

## बोल्शेव्हिकांचा प्लेग

पाठविण्यांत आला असून रशियातील बोल्शेव्हिकानी ३५१४० लाख रुपयें या कामीं खर्च केले असल्यामुळें अहमदाबाद व पंजाब येथे हा रोग दृष्टीस पडूं लागला आहे. म. गांधी यानीं सत्याग्रहाची चळवळ सुरू केली नसती तरी देखील दुसरी एखादी संधि साधून हा रोग हिंदुस्थानात प्रकट झाला असता. ईजिप्तमधील गेल्या पंधरवड्याचे दंगे आणि हिंदुस्थानातील दंगे यांच्यामध्ये बरेंच साम्य असल्यामुळें रशियातील बोल्शेव्हिकाच्या रोगाचा प्रतिकार करण्याच्या कामी सर्व हिंदुस्थान सरकारास मदत करील यात संशय नाहीं. हिंदुस्थानच्या पवित्र भूमीत बोल्शेव्हिकाची मतें रुजणे शक्य नाही. ज्या देशात धर्मश्रद्धा नष्ट झालेली असतें, आणि ऐहिक सुखाची पराकाष्ठा हेच संसाराचें मुख्य ध्येय होऊन बसलेलें असते तेथे धनाच्या व ऐषआरामाच्या एकीकरणामुळें निर्धन व श्रीमंत यांच्यामधील भेद तीक्ष्ण होत जाऊन बोल्शेव्हिकाचा रोग समाजाला जडतो. हिंदुस्थानची धार्मिक श्रद्धा जोपर्यंत कायम आहे तोंपर्यंत धनिकाच्या राहणींतला साधे-पणा नष्ट व्हावयाचा नाही आणि गोरगरिबाना धर्मस्थातून मदत मिळून

धर्मकृत्यांस स्वतःला वाहून घेऊन पोळलेल्या हृदयांना शांत करून घेण्याचा मार्ग मोकळा राहणार आहे. युरोपांत धर्मश्रद्धा नाहींशी झाल्याचा परिणाम बोल्शेव्हिकांच्या प्लेगानें दृष्टीस पडूं लागला आहे. बोल्शेव्हिकांचा रोग हें नास्तिक स्थितीचें एक अत्यंत कडू फळ होय. नास्तिक स्थितीला हें फळ यावयाचेंच. हिंदुस्थानांत ही नास्तिक स्थिति नसल्यामुळें हा रोग येथें घर करून बसेल अशी भीति नको. बोल्शेव्हिकांचीं तत्त्वें जरी यथारूढ झाली नाहींत तरी सरकारी सत्तेस अडवण्याचे व उलथून पाडण्याचे त्यांचे मार्ग येथील लोकांस शिकवण्यास ते कमी करणार नाहींत असें कांहींचें म्हणणें असून, या बोल्शेव्हिकांच्या विरुद्ध सरकारनें तीव्र उपाय योजले पाहिजेत असें मुंबईच्या टाईम्सचें मत आहे. रशियांतील बोल्शेव्हिकांच्या विरुद्ध सरकार जे उपाय योजील त्या उपायांस येथील प्रजाजनांची पूर्ण संमति मिळेल यांत संशय नाहीं. पण आतां यापुढें रशियांतील बोल्शेव्हिकांचा प्रसार हिंदुस्थानास होण्यासंबंधानें योजण्यांत यावयाचे उपाय, चोर घरांतून चोरी करून निघाल्यानंतर दाराला कडी घालून घेण्यासारखाच होणार आहे. हालचालींच्या मार्गांना अडथळा करण्याच्या उद्देशानें ज्यांचें कान फुंकून टाकणें इष्ट आहे असें रशियांतील बोल्शेव्हिकांना वाटलें त्यांचें कान त्यांनीं आज फुंकून टाकल्यासारखेच आहेत, व आतां नवीन शिकवणूकच शिल्लक राहिलेली नाही. गुरूचें शिकवणें संपलें व शिष्याचा अभ्यासहि संपला. यापुढें या शाळा बंद करण्याचा हुकूम फोल होणार आहे. प्रत्येक लहान मोठ्या शहरांत लोकांचीं मनें प्रक्षुब्ध होऊन दंग्याधोप्याचा समय जवळ आला असतांना हरएक प्रकारच्या दंग्याचें पर्यवसान स्टेशनें, तारायंत्रें, पोस्ट ऑफिसें व सरकारी कचेऱ्या यांची जाळपोळ करण्यांत व्हावें म्हणून खटपट करणारे मूठभर तरी लोक दृष्टीस पडणार आणि वरील निंद्य अनर्थांच्या गोष्टी इतक्या साध्या आहेत कीं, एखाद दुसऱ्यानें त्याक्षणीं

सुचविलें नाहीं तरी क्रोधाधीन स्थितींतहि दंगेखोराच्या व्यवसायांत यापुढें त्या आल्यावाचून राहणार नाहींत. सरकारी हालचालींचें मर्मस्थान अशा रीतीनें वारंवार दुखविलें गेल्यास लोकांचेंहि अपरिमित नुकसान होणार आहे. नुकसान टाळण्याकरिता सरकारास अशा वेळीं मदत करणे हें सर्वांना इष्टच आहे. दगेधोपे सुरू झाल्यानंतर पूर्वी सरकारचें कृत्य कसलेहि असलें तरी शातता राखण्याच्या कामीं सरकारास मदत करणें हे लोकाच्या फायद्याचेंच आहे. ही स्थिति ओळखूनच म. गाधी यानीं सत्याग्रहाची चळवळ साप्रत तहकूब ठेवली आहे. सत्याग्रहाची चळवळच खोटी आणि त्या चळवळी-पासून बोल्शेव्हिकाचा रोग तेवढा व्हावयाचा अशीं या वेळी काहींनीं विधानें केलीं आहेत. आपल्या शहाणपणाचा फाजील टेंभा मिरवण्याची ज्याना चटक लागली आहे त्यानीं असे करावे यात नवल नाही. बोल्शेव्हिकाचा रोग प्रेमळ धर्मश्रद्धेने व सत्याग्रहानेच नेहमी मर्यादेच्या आत रहात असतो; तपस्वीच लोक त्या विषास आपल्या कठाच्या अटकेत ठेऊ शकतात. या तपस्व्यांना तुम्हीं समाजातून काढून टाका म्हणजे बोल्शेव्हिकाचा रोग स्वतःच्या आशेतून बाहेर पडलाच असे समजा. धूर्त व ढोंगी बोल्शेव्हिक, सत्याग्रहाचीं भगवीं वस्त्रे पाघरून दगेधोपे करू लागले तर ज्या रौलेट-ॲक्टानें या ढोंग्याच्या नाचाकरिता अगण उत्पन्न करून दिले त्या रौलेट ॲक्टालाच प्रथम रजा देणे इष्ट नाहीं काय? म. गाधी याच्या सत्याग्रहाच्या चळवळीवर उगीच बोटे मोडून काय उपयोग? हा रौलेट ॲक्ट चागला आहे असें कोणीहि विचारी मनुष्य म्हणत नाहीं. मग आता त्या ॲक्टाची देशी भाषा-तून भाषातरें करून आणि खेडोपाडीं वाटून काय उपयोग होणार आहे? सरकारनें खुशाल हा उपाय योजावा; आमची ना नाहीं. सर्व मामलेदारानी, फौजदारानीं, पाटील कुलकर्ण्यांनीं देशी भाषातून या कायद्याच्या व त्यावरील खुलाशाच्या एकादशण्या सरकारी चावडींत गावच्या सर्व लोकांना अभि-

श्रवणाला बोलावून अवश्य कराव्यात; त्याबद्दल आमची हरकत नाहीं. आमची पक्की खात्री आहे कीं, खेड्यापाड्यातील लोकहि हा कायदा जसा-जसा अधिक वाचूं लागतील तसतसे त्याचें हिडिस स्वरूप लोकाच्या दृष्टीस अधिकच पडूं लागेल. चोहोंकडे अशा प्रकारचे दगेधोपे चालले असतांनाहि मुबई शहरातील बॅरिस्टराच्या व वकिलांच्या समाजाने या कायद्याचीं चर्चा करून या कायद्यातून दुर्गंधीशिवाय काहीं बाहेर पडूं शकत नाहीं असे ठरविलें आहे. मुबईचे प्रमुख बॅरिस्टर व वकील एके ठिकाणीं जमून अशी चर्चा करीत असताना, या कायद्याचें समर्थन करणारा एकहि प्राणी त्या सभेस गेला नाही ही ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. मग देशी भाषातून त्या कायद्याच्या चागुलपणाचें प्रदर्शन कसें करावयाचें ? इग्रजी भाषेंतून जाणणारापुढें आणि त्यातल्या त्यात वकिलाच्या पुढे जर कोणालाहि या कायद्यातील चागुलपणा दाखविता येत नाहीं तर नुसत्या भाषातरानें काय व्हावयाचें आहे ? विहिरींत नाहीं तर पोहऱ्यात कोठून येणार ? मुंबईंतील काहीं अँग्लो-इंडियन छापखान्याच्या देशी भागाना वर्ण्या मिळविण्याची ही एक युक्ति दिसते, या पलिकडे त्यात काहीं तथ्य दिसत नाहीं. या ढोंगी लोकाच्या घरीं वर्णीच्या रूपाने मुबई सरकारच्या तिजोरींतील हजारो रुपये जावयाचेच असले आणि तेवढयानें जर सरकारचें मन शात होत असलें तर त्यास अडथळा तरी का करावा ? पण साप्रतच्या स्थितीचा विचार करताना असल्या क्षुल्लक ढोगाना फाजील महत्त्व देणें हें कोणाला केव्हाहि इष्ट नाहीं. मुबईस व दिल्लीस जे मोठमोठें अधिकारी मोठमोठे पगार देऊन ठेवण्यांत आलेले आहेत ते अंधार दिसून बोल्शेव्हिकाचें भूत म्हणून टाईम्सनें किंकाळी फोटण्याबरोबर

## रामरक्षेचा पाठ

म्हणणाऱ्या भटजींना दक्षणा देण्याकरिता नेमलेले नाहींत. मुत्सद्यांचे हे

काम नव्हे; गव्हर्नर जनरल व गव्हर्नर हे राजे आहेत व मुत्सद्दी आहेत. राजे या नात्यानें पोलिसची शक्ति, प्रेस ॲक्टची शक्ति, १८१८ च्या कायद्यानें लोकाना उचलून कैदेत टाकण्याची शक्ति आणि लष्करची शक्ति या सर्व शक्तींचा उपयोग शातता राखण्याकरितां त्यानीं केला पाहिजे. हिंदुस्थान सरकारनें अमृतसर, लाहोर, गुजराणवाला वगैरे पंजाबातील चार, पाच जिल्ह्यात लष्करी कायदा सुरू केला आहे. सभाबंदीचाहि कायदा लागू केला आहे, अमृतसर येथील आणखी कित्येक पुढाऱ्याना उचलून कैदेंत टाकलें आहे, लाला रामभुज दत्त चौधरी, लाला हरकिसनलाल वगैरे पुढारी आज कैदेंत आहेत, लाहोरची बादशाही मशीद सोल्जराच्या हातांत आहे; कित्येक मुसलमान पुढाऱ्याना गिरफदार करण्यांत आलें. ट्रायब्यून व पंजाबी ही पजाबचीं मुख्य पत्रें तूर्त बद पडली असून ट्रायब्यूनचे संपादकास अटकेंत ठेवण्यात आलें आहे; सरकारी भात्यातील सर्व प्रकारचे नवे जुने बाण आज पंजाबावर सोडण्यात आलेले आहेत, अमृतसर व लाहोर येथे बंडच सुरू आहे असे सरकारतर्फें जाहीर करण्यांत आलें असून पंजाबचे हें बंड शांत होत चालल्याचेहि आता प्रसिद्ध झालें आहे, दंग्याधोप्याच्या व बंडाच्या वेळीं हरएक प्रकारचा बाण योजून कशी बशी शातता पुन्हा एकदा स्थापणें हें राजाचे काम आहे. राजे या नात्यानें करावयाच्या कृत्या-बद्दल चर्चा करण्याची वेळ आजची नव्हे. पण राजे या नात्याने अंगात घालावयाच्या चिलखताच्या आत मुत्सद्दीपणाच्या नालायकीची घाण जर कोणी झाकूं लागला तर त्याच्या त्या कृत्यास मान तुकवणें म्हणजें इंग्रज बादशहाचें घरीं अपराधी होणें होय. रौलेट ॲक्ट पास करण्यात मुत्सद्दी-पणाचा जो अभाव दाखविण्यात आला तो सर मायकेल ओडवायर याच्या-सारख्या अदूरदर्शी व दुराग्रही कोठावळ्याची छाप सिमल्यावर अधिक बसली म्हणून होय. मुंबई सरकारचें राजकीय वातावरण गेलीं चार पाच

वर्षें जर पंजाबात दिसलें असतें तर रौलेट ॲक्ट पासच झाला नसता-आणि दडपशाहीचा रोगहि सिमल्यास जडला नसता. सर मायकेल ओडवायर याच्या जागी लॉर्ड विलिंग्डन किंवा सर जॉर्ज लॉईड हे जर पंजाबचे गव्हर्नर असते तर रौलेट ॲक्ट पास होऊन महात्मा गांधींच्या सत्याग्रहाच्या चळवळीनंतर दिल्ली, अमृतसर, लाहोर येथे बटाच्या आरोळ्या ऐकूंच आल्या नसत्या, महात्मा गांधी यांना खुशाल दिल्लीस व पंजाबांत जाण्याची परवानगी मिळाली असती, लोकांनी एक दोन दिवस उपास केले असते, व पुनः सत्याग्रहाचे ठराविक कायदे मोडण्यापलिकडे कोठेंहि कांहीं झालें नसते. पण अति शहाण्याचा बैल रिकामा ह्या नात्यानें, सर मायकेल याच्या अति शहाणपणामुळे अहमदाबाद, दिल्ली, अमृतसर, लाहोर येथील सरकारी बैलांच्या पाठीवरील गोण्या लुटून गेल्या, आणि रिकाम्या बैलांना प्रजेच्या पोटांत शिंगे खुपसण्याचे लष्करी काम करावे लागले. आज कित्येक महिने बोल्शेव्हिकांच्या कथा सर्वांच्या कानीं, कपाळीं पडत असतांना, दुष्काळ, इन्फ्लुएन्झा वगैरे आपत्तींनी लोक त्रस्त झाले आहेत हें माहीत असतांना, तुर्कस्थानच्या विचित्र स्थितीमुळे मुसलमानांची मनोवृत्ती अस्थिर होण्यासारखी आहे, याचे पूर्ण ज्ञान असतांना, लढाईच्या अखेरीस तहाच्या परिषदेमध्ये होत असलेल्या स्वसमतीच्या तत्त्वाच्या खलानें हिंदुस्थानच्या राजकीय आकांक्षा सतेज होणे अपरिहार्य आहे असे स्वतः बोलून दाखवीत असतांनाहि ज्यांना रौलेट ॲक्ट कायदा पास झाला असता लोकांचीं मनें प्रक्षुब्ध होणार नाहीत असें वाटले ते सर मायकेल ओडवायरसारखे हिंदुस्थान सरकारचे सल्लागार, मुत्सद्दी या नात्यानें आज नालायक ठरले आहेत. गेल्या पंधरा दिवसाच्या धुमाकुळीनें त्यांच्या मस्तकावर नालायकीचा शिक्का ढळढळीत मारलेला आहे, हा पुसला जाणें शक्य नाही. सांप्रतचे दंगेधोपे नाहींसे करण्यास सरकारनें योजलेल्या उपायाच्या आड कोणीहि

येऊं इच्छित नाहीं, पण हे उपाय योजतांना वरील नालायकी धवून पुसून टाकण्याच्या हेतूनें जर सनदशील व सत्वशीर चळवळींचा छळ करण्यात आला तर पहिल्या नालायकींत दुसऱ्या नालायकीची भर पडून एकीकडचें पाप जाळतांना दुसरें पाप पोसल्यासारखें होईल. तेव्हां यावेळीं राजे या नात्यानें शांतता राखण्याकरितां पोलिसची व लष्करची सत्ता योग्य काळ-पर्यंत सरकारनें उपयोगांत आणणें जरी अयोग्य होणार नाहीं तरी पण प्रेस ॲक्ट, सभाबंदीचे ॲक्ट, १८१८ चा कायदा असलीं नवीं जुनीं भुतें लष्करच्या मदतीस बोलावणे अयोग्यच होय. अशा स्थितींत अधिकाऱ्यांनीं सत्याग्रहाचे चळवळीवर दोषाचें खापर न फोडतां जर रौलेट ॲक्टाची चूक दुरुस्त केली, आणि दडपशाहीला उत्तेजन दिलें नाहीं, तर शांतता राखण्यास लष्कराला बोलावण्याची जरुरीच राहणार नाहीं.

---

# * अकाळ विकाळ शिक्षा

पंजाबांतील लाहोरचे सन्मामनीय पुढारी लाला हिरकिसनलाल, पं. राज-भुजदत्त चौधरी आणि लाला धुनीचंद यांना गेल्या आठवड्यांत जन्मठेप काळेपाणी व सर्व मालमत्तेची जप्ती अशा शिक्षा ठोठावण्यांत आल्या. अमृतसरचे डॉ. किश्लू व डॉ. सत्यपाल यांना जन्मठेप काळेपाणी मिळून महमद बशीर याना फाशीची शिक्षा झाली. वरील शिक्षा सांगताना पंजाबां-तील मार्शल लॉ कोर्टानें जें अकाळ विकाळ स्वरूप धारण केलें त्यामुळें सर्व हिंदुस्थानात पुन्हा गडबड सुरू झाली असून त्या शिक्षाची अंमल-बजावणी लाटसाहेबानीं करू नये अशा आशयाच्या तारा हिंदुस्थानांतील सर्व भागातून लाटसाहेबांकडे गेल्या आहेत. पजाबातील मार्शल लॉ कोर्टानें आतापर्यंत शेकडों लोकास अटक व शिक्षा दिल्या असून ७०।८० लोकांस फाशीच्याहि शिक्षा दिल्या आहेत. या शिक्षांतील कडकपणा कमी करण्या-विषयींहि हिंदुस्थानातून ठिकठिकाणाहून तारा गेल्या असून स्टेटसेक्रेटरी-साहेबाच्या हुकमानें दोन इसमाच्या फाशीच्या शिक्षा तहकूब करण्यांत आल्या आहेत. बाबू कालिनाथ राय याचीहि दोन वर्षाची सक्तमजुरीची शिक्षा लाटसाहेबाच्या हुकमानें तीन महिन्यावर आणण्यांत आली आहे. पंजाबांतील सर्व प्रकारचा विचार करण्याकरिता हिंदुस्थान सरकारच्या संमतीनें स्टेट सेक्रेटरीसाहेब लवकरच एक कमिशन नेमणार आहेत. हें कमिशन नेम-ण्यांत येणार ही बातमी प्रसिद्ध झाल्यानतर पंजाबातील शिक्षा—सत्राचें स्वरूप पूर्वीइतकें उग्र राहणार नाहीं अशी आशा वाटूं लागली होती. पण लाहोर व अमृतसर येथील कटाच्या खटल्यात सन्माननीय पुढाऱ्याना ज्या भयंकर शिक्षा देण्यात आल्या आहेत त्याजकडे लक्ष दिलें असतांना राजकीय चळवळ

---

* केसरी, ता. १५ जुलै १९१९

करणाराना शिक्षांचा बागुलबोवा दाखवून पुढाऱ्याना सोसाव्या लागणाऱ्या हालअपेष्टाच्या अक्राळ विक्राळ स्वरूपाचे प्रदर्शन सर्व लोकापुढे एकसारखे करून राजकीय चळवळ जमिनदोस्त करण्याचे कट माजी ले. गव्हर्नर याच्या कृपाछत्राखाली मार्शल लॉच्या वेळी पजाबात बराच माजून राहिला होता असे म्हणणे भाग पडते. लाहोर व अमृतसर येथील कटाच्या खटल्यात सरकारतर्फेचा मुख्य पुरावा काय तो रौलेट ॲक्टासबधानें निरनिराळ्या वेळीं वरील पुढाऱ्यानी केलेली भाषणे होत. कायदे कौन्सिलात रौलेट बिल पास होऊ नये व बिल पास झाल्यावर सदर कायद्यास बादशाही संमति मिळूं नये म्हणून सर्व हिंदुस्थानभर जी चळवळ झाली ती चळवळ पंजाबनेंहि इतराप्रमाणे केली. लाहोर व अमृतसर येथे कित्येक सभा झाल्या, या सभा बोलावण्याच्या आमत्रणपत्रिका व तेथे झालेली भाषणे व ठराव हाच काय तो सरकारी मुख्य पुरावा, याशिवाय अमृतसरचे डॉ. किश्लू याच्याजवळ असलेले व सत्याग्रहाची शपथ घेतलेले मि. हसराज याना माफीचा साक्षीदार म्हणून पुढे आणून सत्याग्रहाची शपथ म्हणजे नुसते बाहेरचे पाघरूण होते आणि दगेधोपे करणे हाच मुख्य हेतु होता अशी जी मुक्ताफळे त्याच्या तोडून बाहेर निघाली; त्याजवरहि कोर्टाने बराच जोर दिलेला आहे. तथापि वरील सन्माननीय पुढाऱ्याना ज्या शिक्षा सागण्यात आल्या, त्या दग्याधोप्यात ते सामील होते म्हणून नव्हे तर रौलेट ॲक्ट याच्या विरुद्ध सर्व हिंदुस्थानभर चळवळ चालली असतांना इतर ठिकाणाप्रमाणे त्यानीहि भाषणे केलीं म्हणून ! पजाबात दगेधोपे होण्याच्या पूर्वी यानीं रौलेट ॲक्टचें निमित्त करून भाषणे केलीं आणि या भाषणानीं लोक चिडून जाऊन दगेधोपे करतील अशी त्यानी अटकळ बाधलेली होती, हा काय तो सरकारी पुराव्यातील मतितार्थ आहे. मनातले गुप्त हेतू बाहेर आणण्याकरिता माफीचा साक्षीदार हसराज यास पुढे आणले आहे. माफीच्या

साक्षीदारावर अशा वेळीं विश्वास केव्हाहि ठेवणें योग्य नाहीं. बरें, आपण कल्पना करू की, मनात काहीं गुपित हेतु ठेवून लाला हरकिसनलाल वगैरे लाहोरच्या पुढाऱ्यानी भाषणें केलीं; ती भाषणे तरी कोणत्या स्वरूपाचीं होतीं. या कटाच्या खटल्याचे आरोपीतर्फेचें बॅ हसन इमाम यानी कोर्टापुढे पुरावा म्हणून हजर करण्यात आलेल्या भाषणाची व वरिष्ठ कायदे-कौन्सिलातील भाषणाची तुलना करून असे सिद्ध केले की,

## मवाळांचेंच प्रतिबिंब

लाहोरच्या पुढाऱ्याच्या भाषणात पूर्णपणें पडलेलें आहे. कायदे-कोन्सिलात ना. शास्त्री व ना. सुरेंद्रनाथ बानर्जी यानी जशा प्रकारचीं भाषणे केलीं तशाच प्रकारची भाषणें लाहोर, अमृतसर येथील पुढाऱ्याचीं आहेत, असे बॅ. हसन इमाम यानी सिद्ध केले. हा कटाचा खटला लाहोर व अमृतसर येथील पुढाऱ्यावर नसून ना. शास्त्री व ना. सुरेंद्रनाथ बानर्जी वगैरे वरिष्ठ कौन्सिलातील मवाळावरच हा खटला आहे असे समजूनच चालले पाहिजे, असा बॅ. हसन इमाम याचा मुख्य मुद्दा होता. नेमस्ताची भाषणे कायदे-कौन्सिलात चालली असताना त्या भाषणावर राजद्रोहाचे कटाचा किंवा बडाचा लहानसाहि शिंतोडा सरकारतर्फे उडविण्यात आला नाहीं, कटाच्या व बडाच्या दृष्टीनें ती भाषणें सोवळीच समजली गेलीं, कोणाच्या डोक्यातच आले नाहीं की, या भाषणानीं कट उद्भवतील व बडे होतील. सदर भाषणाविरुद्ध अशा प्रकारचा ब्रहि निघाला नाही. पण कायदे-कौन्सिलाबाहेर लाहोर येथे मवाळ पक्षाच्याच एका पुढाऱ्याच्या तोंडून तसलींच भाषणें बाहेर पडल्याबरोबर राजद्रोह, कट, फंदफितुरी वगैरे ओडवायरी-भुतावळ त्या भाषणाच्या सभोवती जमून सन्माननीय पुढाऱ्याना कोर्टात खेचण्यात येऊन जन्मठेप काळ्या पाण्याच्या शिक्षा ठोठावण्यात आल्या. आणि लाला हरकिसनलाल याची लाखो रुपयाची इस्टेट

सरकारजमा करण्यात आली. बॅ. हसन इमाम यानीं आपल्या आरोपींनीं केलेल्या भाषणाचीं तरफदारी फार चागल्या रीतीनें केली. कायदे कौन्सि· लातील मवाळाच्या भाषणाहूनहि तीं भाषणें अधिक सौम्य आहेत असें त्यानीं सिद्ध करून दाखविलें. भाषणाचा सौम्यपणा कोर्टानें नाकबून केलेला नाहीं पण भेद काढलेला आहे कीं, कायदे–कौन्सिलातील भाषणें लाटसाहेबाच्या पुढें झालीं आणि लाहोर व अमृतसर येथील रहिवाशी कायदे–कौन्सिलच्या सभासदाप्रमाणें विवेकी, शात चित्ताचे व जबाबदारी ओळखणारे नसल्यामुळें लाला हरकिसनलाल वगैरेंचीं भाषणें फदफतुरीची मानलीं पाहिजेत अशी कोर्टाची विचारसरणी पडून आरोपींना अकाल विकाळ शिक्षा देण्यात आल्या. पजाबातील मार्शल–लॉ–कोर्टाची वरील विचारसरणी बालिशतेची, मूर्ख-पणाची व मूर्तिमत क्रूरपणासहि खालीं मान घालावयास लावणारी आहे यात सशय नाहीं. कायदे–कौन्सिलातील लाटसाहेबापुढें केलेलीं भाषणें लाटसाहेबाना व इतराना बडखोर बनवूं शकत नाहींत, हा कोटिक्रम आमच्या लक्षात आहे. पण रौलेट बिलाच्या वेळीं मवाळानीं केलेलीं कायदे–कौन्सिलातील भाषणें बाहेरच्या जगास आग लावणारीं बिलकूल नव्हतीं असा जो मुद्दा बॅ. हसन इमाम यानीं कोर्टापुढें माडला त्याजकडे कोर्टानें पूर्णपणे दुर्लक्ष केलेलें आहे. रौलेट ॲक्टचा निषेध करणाऱ्या पक्षाला युक्तिवादात हटविण्याकरिता सरकारी पक्ष कायदे–कौन्सि-लात टपून बसलेला होता, पण बड–फितूरीला उत्तेजक भाषणें मवाळानीं केलीं असा दुरून दुरून सशयहि सरकारी पक्षाकडून दाखविण्यात आला नाहीं. पण पजाबातील वातावरणात मुळातच काहीं नाहीं अशा बडफितुरीचा कट निर्माण करण्यात आला आहे. बरे झाले, यावेळीं ना. शास्त्री व ना. सुरेंद्रनाथ बानर्जी विलायतेंत आहेत, नाहींतर लाला गोवर्धनदास याच्या-प्रमाणें त्याना मद्रासेतून किंवा बगाल्यातून पजाबात खेचून नेण्यात आलें

असते आणि या दोघानाहि पंजाबच्या वातावरणात फाशींची शिक्षा झाली असती. कायदे–कौंसिलातील रौलेट ॲक्टाच्या वेळच्या लोकाच्या पुढाऱ्याच्या भाषणामुळें पजाबातील ओडवायरी वातावरण सतापानें चिडलें असून प्रख्यात पुढाऱ्याचा बळी घेतल्याशिवाय मी शात होणार नाहीं, असें या वातावरणानें खटल्यातील निकालाच्या वाणीनें जाहीर केले आहे. कट-वाल्याच्या यादींत म. गांधींचेंहि नाव दृष्टीस पडतें. तिकडे विलायतेंत स्टेट सेक्रेटरी साहेब म. गांधींना साधू पुरुष समजतात आणि हिंदुस्थात ओडवायरी वातावरण याच साधु पुरुषाच्या कपाळावर बड–फितुरी करणारा कटवाला म्हणून छाप मारते. लाहोर व अमृतसर येथील खटल्याच्या निकालाकडे हिंदी राजकारणातील लोकानीं कोणत्या दृष्टीनें पहावयाचे याचेंहि धोरण पजाबातील ॲंग्लो–इडियनाच्यातर्फे निकालाबरोबरच प्रसिद्ध झालें आहे. सरकारी पक्षानें आपलें बगलबच्चे म्हणून जे मवाळ खाकेंत मारलें आहेत ते

## मवाळच लबलबीत

आहेत असे या निकालानीं ठाम सिद्ध झालें आहे. हें मवाळ इतकें लब-लबीत कसें झालें? राष्ट्रीय पक्षाची छाप त्यांच्यावर कायदे कौन्सिलाच्या वेळी उमटविण्याइतके भिजलेल्या शाडूचे त्याना कोणी केले? नेमस्त पक्ष आम्ही खाकेंत मारला आणि राष्ट्रीय पक्षानें त्याना आमच्यावरच उलट भोंकावयास लावले हा चमत्कार कसा घडून आला? सिव्हिल ॲंड मिलटरी गॅझीटसारखे पंजाबातील पत्रकार वरील शंकासंबधानें स्वतःच्या मनाचे समाधान असे करून घेत आहेत की, मवाळाच्या अगात जोम नसल्यामुळें राष्ट्रीय पक्षाला स्वतःच्या अंगातील कणखरपणाच्या जोरावर त्यास स्वतःकडे ओढून घेता आले. राष्ट्रीय पक्ष काय करीत आहे? सरकारी अधिकाऱ्यानीहि कणखरच झालें पाहिजे. लोखडी सोटा आपल्या हातात आहे

असे प्रजेच्या अनुभवास आणून दिलें पाहिजे, आणि नेमस्त पक्षाची बुद्धि जर राष्ट्रीय पक्षाशी संलग्न होऊं लागली तर लाला हरकिसनलाल यांच्यासारख्या नेमस्तालाहि प्राणांतिक चोप देऊन राष्ट्रीय पक्षाकडे कोणाहि नेमस्ताची बुद्धि वळणार नाही, अशी दहशत उत्पन्न केली पाहिजे. अशी ह्या खटल्यातील निकालाचे आधारावर सरकारास विनंति करण्यांत आली आहे. पंजाबांतील अकाळ विकाळ शिक्षांवर अशी टीका आहे कीं, सरकारी अधिकारी स्वतःच्या हातांतील राजसत्ता राष्ट्रीय पक्षाच्या हातांत बिलकूल देणार नाहीत, इतकेंच नव्हे तर स्वतःच्या मुठींत सर्व सत्ता दाबून ठेवणार आहेत, असे जर नेमस्तांच्या प्रत्ययास आणून देतील तर राष्ट्रीयांच्या चळवळींत कोणीहि नेमस्त रममाण झालेला दिसणार नाहीं. या असल्या आशयाच्या टीकेंत जी तत्वें पुढें मांडण्यांत आलीं आहेत त्याजकडे पाहिले म्हणजे पंजाबांतील अकाळ विकाळ शिक्षांतील हेतु तेव्हांच ध्यानांत येतो. रौलेट बिलापासून नेमस्त व राष्ट्रीय पक्ष यांच्या विचारसरणींत जी एकी दृष्टीस पडत आहे ती एकी बुद्धिमत्तेच्या जोरावर नाहींशीं करणें सरकारी पक्षाला अशक्य झाले आहे. आणि या एकीच्या विरुद्ध ओडवायरी—मंडळ तर मनापासून जळफळत राहिले आहे. सर्व प्रांतांना व सर्व लोकांना जी एकी सुखाची वाटली व ज्या एकीपासून राष्ट्रकार्य कांहींना कांहीं तरी स्वराज्याच्या पार्लमेंटरी बिलाच्या रूपानेंच निष्पन्न होईल अशी आशा उत्पन्न झाली, त्या एकीवरच निष्ठुरतेनें व मदांधतेनें तीव्र बाण सोडून राष्ट्रीय पक्षाला नाही तर नेमस्त पक्षाला स्वतःचें भक्ष म्हणून खाऊन टाकून, दुसऱ्याला भयभीत करून आपल्या सभोंवती घिरट्या घालीत फिरावयास लावण्याच्या अक्कल-शून्य दडुकेशाहीचा हा उद्योग आहे. लाला हरकिसनलाल यांची लाखो रुपयाची इस्टेट जरी जप्त झाली, ना. शास्त्री व ना. सुरेंद्रबाबू यांजवर लबलबीतपणाचे आरोप कितीहि करण्यांत आले तरी हल्लीचा नेमस्त पक्ष

राष्ट्रीय पक्षापासून स्वराज्यसबंधाच्या एकदर चळवळीत अगदीं अलग होणे शक्य नाहीं. मोर्ले–मिंटो याच्या वेळेहून हल्लीची वेळ अगदी निराळी आहे. राष्ट्र जागे झालेलें आहे व राष्ट्रकार्याकरिता राष्ट्रातील निरनिराळ्या बुद्धींचा मिलाफ घडवून आणण्यांतच राष्ट्र सुख मानीत आहे. सर्व राष्ट्राची वृत्ती अशा प्रकारची असल्यामुळे व्यक्तिशः पुढाऱ्याच्या हाती भांडण करण्याचें थोडे उरले आहे. भांडण करू म्हटले तरी होणार नाहीं. अशा रीतीनें सर्व राष्ट्र राष्ट्रकार्याकरिता एकीचे सुख वृद्धिंगत करीत असताना पंजाबातील दडुकेशाहीनें या एकीची बेकी करण्याचा जर प्रयत्न केला तर तो कधीहि सिद्धीस जाणार नाहीं. पंजाबांतील अकाळ विकाळ शिक्षामुळे नेमस्तहि रागावतील, राष्ट्रीयाचाहि संताप दुणावून जाईल, आणि रौलेट बिलाच्या वेळची एकी या शिक्षानी अधिक दृढ होईल. या शिक्षेतील रानटी क्रूरपणाची जी सत्ता कृपणपणानें मुठींत ठेवाची असें नोकरशाहींतील ओडवायरी पक्षास वाटत आहे, त्या सत्तेच्या प्रतिष्ठितपणासच उलट डळमळीत स्वरूप प्राप्त झाल्यावाचून राहणार नाहीं. कारण पंजाबातील हें दोन निकाल जेव्हा हिंदुस्थानाबाहेर इंग्रजी साम्राज्यात व दोस्त सरकाराच्या प्रदेशांत वाचले जातील तेव्हा तेथील सर्व उदार मतवादी सज्जन ओडवायरी कंपूला ‘ मा निषाद प्रतिष्टा त्वमगमः शाश्वतीः समाः ’ या वाल्मिकीच्या वाणीप्रमाणेच शाप देण्यास चुकणार नाहीत.

---

# * लुटपुटीचें बंड व माफीचें बिल

पंजाबांत लष्करी कायदा चालू असताना सरकारी अधिकाऱ्यानीं जीं अनन्वित कृत्यें केली व ज्या कृत्याबद्दल कायद्याचे कोर्टात फिर्यादी झाल्या असताना अधिकाऱ्याचा बचाव होणे शक्य नाहीं, त्या कृत्याबद्दल सर्व अधिकाऱ्याना माफी देण्याचें सहा कलमी बिल हिंदुस्थान सरकारनें वरिष्ठ कायदेकौन्सिलपुढें गेल्या आठवड्यात आणले. गुरुवार व शुक्रवार दोन दिवस या बिलासंबंधानें सिमल्यास कडाक्याचा वादविवाद झाला, आणि पंजाबातील दुष्कृत्याची चौकशी करण्याकरिता नेमलेल्या कमिशनची चौकशी होऊन रिपोर्ट प्रसिद्ध होईपर्यंत या बिलाचा विचार लांबणीवर टाकण्यात यावा अशी ना. ऱ्हादा याची उपसूचना शुक्रवारी सायंकाळीं नापास झाली. आज रोजी या बिलासंबधानें मते घेऊन बिलास कायद्याचे स्वरूप येईल असा अंदाज आहे. गुरुवार व शुक्रवार हे दोन दिवस कायदे कौन्सिलमध्यें झालेला वादविवाद म्हणजे पंजाबच्या एकंदर स्थितीसंबधाचा वादविवाद होय. बिलातील कलमासंबधानें वादविवाद झाला. पण तो गौण स्वरूपाचा होता. पं. मदनमोहन मालवीय एकंदर स्थितीसंबधानें पाऊण तासच बोलले. सरकारतर्फेंच्या झालेल्या भाषणातहि असाच फरक दिसून आला. पंजाबप्रकरणाची चौकशी करण्याकरितां नेमलेल्या कमिटीसंबंधाचा ठराव व माफीचें बिल या दोन बाबींसंबधानें कायदे-कौन्सिलात जो वादविवाद झाला त्यात स्टेटसेक्रेटरींनीं या कमिटींत एक हिंदी व एक युरोपियन असे आणखी दोन सभासद दाखल करण्यास सांगितलें आहे. आणि शिक्षा झालेल्या

* केसरी ता. २३ सप्टेंबर १९१९

इसमाच्या खटल्याची फेर तपासणी करण्याकरता एक हिंदी व एक युरोपियन अशा दोन जज्जाची नेमणूक करण्याचें ठरविलें आहे असे कळलें. असो. कौन्सिलात झालेल्या चर्चेकडे लक्ष दिलें असता पजाब प्रकरणाच्या बुडाशीं असलेली

## बंड व दहशत

याची जोडी प्राधान्येंकरून नजरेस पडते. सरकारला अशा माफीच्या बिलाची जरूरी काय होती ? आज पजाबात अधिकाऱ्यावर एकसारख्या फिर्यादी लागणार होत्या आणि त्यातून त्या अधिकाऱ्याची सुटका झाली नसती तर सरकारी नोकर नाखुष झाले असते, असाहि प्रसग ओढवलेला नव्हता. तसा प्रसग प्रत्यक्ष ओढवला असता तर सरकारनें आपल्या अधिकाऱ्याच्या बचाव करण्याकरिता असले माफीचें बिल घाईने पुढें आणले असतें तर गोष्ट निराळी होती. क्राफर्ड–कमिशनातील मामलेदाराना माफी देण्याचा कायदा जसा सरकारनें मागाहून पास करून घेतला त्याप्रमाणें हें माफीचें बिलहि पजाबच्या कमिशनच्या रिपोर्टानतर पास करून घेण्यास कोणतीच हरकत नव्हती. सरकारजवळ सरकारी नामदाराच्या मताचा भक्कम भारा होताच; मग हें बिल आगाऊच आणण्याची इतकी घाई का ? कमिशनचा रिपोर्ट होण्याच्या पूर्वीच असलें बिल आणलें पाहिजे असला पूर्वीच्या वहिवाटीचा कोठेच निर्बंध नाहीं. वरील प्रकारचा स्पष्ट अभिप्राय सर नारायण चदावरकर व बॅ. दास यानीं प्रसिद्ध केला आहे. कमिशनच्या रिपोर्टानतर माफीचें बिल आणलें तरी चालतें. अगोदरच आणलें पाहिजे हा मुद्दा सिद्ध करण्यास वरिष्ठ कायदे कौन्सिलातील कायदेकानूचे सरकारी नामदार सर लौंडिस यानीं कोणतेंहि प्रमाण पुढें माडलें नाहीं. मग इतकी घाई का ? राजाच्या खुनाच्या तेराव्याच्या पोळ्या आणि राणीशीं पाट लावण्याबद्दलच्या पोळया एकाच दिवशीं झोडण्याच्या कामात अत्यंत

तिरस्कारार्ह घाई दाखविल्याबद्दल हॅम्लेटला जशा प्रकारची चीड आली होती, तसल्या मासल्याची चीड हिंदुस्थानांत चोहोंकडे उत्पन्न करण्याइतकी घाई या माफीच्या बिलासंबंधानें दाखविण्याचें प्रयोजन काय ? या घाईनें हिंदुस्थान सरकारनें साधले तें काय ? हिंदुस्थानांत पजाब-प्रकरण जसे उद्भवले त्याप्रमाणे ईजिप्तांतहि त्याच सुमारास दंगेधोपे झाले, आणि जपानच्या ताब्यांत असलेल्या कोरिया प्रांतांतहि असल्याच दंग्याची साथ उद्भवली होती. पण कोरियात बंड सुरू झाले असे कोणी जाहीर केले नाहीं. ईजिप्तमध्ये राष्ट्रीय पक्षाचे पुढारी तहाच्या परिषदेस हजर राहण्याची परवानगी मागत असतांना त्यांना ती परवानगी मिळाली नाही, ही तक्रार इग्लंडच्या नजरेस आणण्याकरितां ईजिप्तमध्यें दंगे झाले व लष्कराकडूनच दंगे मोडण्यांत आले विवक्षित कार्य, विवक्षित तक्रार व दंग्याचें ठराविक स्वरूप असा तेथें मेळ घातला. कोरियातील लोकांनीहि आपणांत स्वसमतीचे तत्त्व लावलें पाहिजे म्हणून हट्ट धरला व या हट्टातूनच कोरियांतील दंग्याधोप्याचा उगम झाला जपानी अधिकाऱ्यांनी हे दंगेधोपे शांत केले आणि जगाच्या सांप्रतच्या राहटीकडे लक्ष देऊन कोरियन लोकांना जपानी लोकांइतके हरएक प्रकारचे हक्क आस्ते आस्ते देण्यांत येतील असा बादशाही जाहीरनामा लवकर प्रसिद्ध केला. कोरियातील दंग्याधोप्यामुळे हा बादशाही जाहीरनामा लवकर बाहेर पडला. हा जाहीरनामा प्रसिद्ध करतांना जपानच्या मुख्य मंत्र्यानीं कोरियांतील दंगेधोपे शांत करण्यांत गुंतलेल्या अधिकाऱ्याच्या दुष्कृत्यांवर पांघरूण घालण्याचे नाकारले. इतकेच नव्हे तर असल्या दुष्कृत्याचीं जीं ठळक उदाहरणे पुढे आलीं होती, त्याची चौकशी होऊन अधिकाऱ्यांना त्या त्या खात्यामार्फत योग्य शिक्षाहि करण्यात आल्या आहेत, असेहि जपानांत जाहीर करण्यांत आलें. कोरियांत स्वराज्याच्या हक्काकरिता दंगेधोपे झालें. हिंदुस्थानाप्रमाणें कोरियास स्वराज्य आस्ते–आस्ते मिळण्याचें

आश्वासन मिळालें आणि अधिकाऱ्याच्या दुष्कृत्याबद्दल अधिकाऱ्यावर ठपकाहि ठेवण्यात आला. कोरियात जसे झालें तसेच हिंदुस्थानात का झालें नाहीं? वरील गोष्टीबरोबरच कोरियात दुसरी एक गोष्ट घडून आली ती हिंदुस्थानात न आल्यामुळें हिंदुस्थानात हे माफीचें बिल निघ्रपणाच्या घाईघाईनें पुढें करण्यात येत आहे. कोरियन लोकाना जपानी लोकाच्या बरोबरीनें हक्क मिळता कामा नये असे जपानी नोकरशाहीचें कोरियातल्या वादाच्यावेळी म्हणणें होतें. हें म्हणणे कोरियाच्या गव्हर्नरजनरल साहेबानी उचलून धरले होतें, आणि या म्हणण्याचे समर्थन करून कोरियन लोकास दहशत बसवण्याकरिता सदर लाटसाहेबाचे ओडवायर साहेबासारखे एक हस्तक दग्याधोप्याच्या वेळी कोरियन लोकाना झोडपून काढण्यात प्रमुख होते. हा

## कोरियन ओडवायर

व त्याला उचलून धरणारे कोरियन लाटसाहेब या दोघानाहि जपानी मत्रिमडळाने कोरियातील आपली नोकरी सोडून जाण्यास परवानगी दिली आणि नवीन लाटसाहेब आणि नवीन सेक्रेटरी नेमून कोरियातील स्वराज्याच्या काळास सुरुवात केली. जिंकलेल्या लोकाना वागविण्यात जपानच्या मंत्रिमडळाने जे शहाणपणाचें व औदार्याचें धोरण स्वीकारले तेंच धोरण तितक्याच ठामपणानें जर इग्रजी मत्रिमडळानें या प्रसगी स्वीकारलें असतें आणि सर ओडवायर याच्याबरोबरच इग्लडास सहगमन करण्याची परवानगी जर सिमल्याच्या लाटसाहेबानाहि मॉटेग्यू साहेबानीं दिली असती तर कोरियन प्रकरणाशीं तुलना करताना पजाबप्रकरण खात्रीनें इतके हिडिस दिसलें नसतें. औदर्याच्या तत्त्वात जपानपेक्षा इग्लड मागें आहे अशातला भाग मुळींच नाहीं. स्वराज्याचीं तत्त्वें व स्वसमतीचीं तत्त्वें इग्लडनेंच अलिकडे

विशेष पुढे आणली व जपाननें नुसतें अनुकरण केलें. पण कोरियातील नोकरशाही जपानच्या मुठीत असल्यासारखी आहे आणि हिंदुस्थानातील नोकरशाही बेलगामी आहे. 'अरेरावीपणाचे पाठीराखे' असे दूषण देऊन अमेरिका आपल्या महत्त्वाकांक्षेच्या आड येईल ही भीति जपानला आज जितकी आहे तितकीच इंग्लंडलाहि आहे. शांटंग प्रांतासंबधानें, चीनच्या गुप्त तहासंबंधानें व मांगोलियातील चंचुप्रवेशासंबधानें जपानला अमेरिकेंत नावे ठेवण्यात येतात, पण इंग्लंडलाहि कोठें नावे ठेवण्यात येत नाहीत ? आयर्लंड, ईजिप्त, हिंदुस्थान, इराण येथील इंग्लंडची अरेरावी-पणाची कृत्ये पुढे मांडून अमेरिकेच्या सीनेट सभेतील पुढारी जर्मन तहास संमति देऊं नका आणि इंग्लंडचें प्रस्थ माजवूं नका, असा उपदेश अमे-रिकेस आज करीत आहेत. जगातील शिष्टमंडळात आपलें हसें होईल ही भीति जपान व इंग्लंड या दोघांनाहि आज सारखीच आहे. या भीतीमुळें म्हणा किंवा मूळच्या औदार्यामुळे म्हणा, किंवा जिंकलेले लोकच महायुद्धानें वरच्या पायरीवर नेऊन ठेवले म्हणून म्हणा, दोघांनीहि जिंकलेल्या प्रजाजनांना स्वराज्य देऊं केलें. स्वराज्यदानाची क्रिया दोही ठिकाणीं एकाच नमुन्याची होत असतांना कोरियातील लाटसाहेब परत स्वदेशास गेले आणि दंग्याच्या वेळी प्रजाजनांवर नाहक जुलूम करणाऱ्या जपानी अधिकाऱ्यांना तिकडे कडक शिक्षा झाल्या. आणि इकडे हिंदुस्थानात मात्र मॉंटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टाचे पाय मागें ओढूं पाहणारे लाटसाहेब सिमल्याच्या कायदे कौन्सिलात आपल्या सर्व हस्तकांना माफीची खैरात वाटण्याचें बिल मोठ्या डौलानें पास करून घेत आहेत. या बिलाला पं. मदनमोहन मालवीय व ना. चांदा यांनीं गेले गुरुवारीं व शुक्रवारीं आपल्याकडूनच शक्य तितका विरोध केला. पंडितजीचें पहिल्या चार तासांचें भाषण

## ' मुलें कुठार: '

अशा धर्तीचें सणसणीत झाले. पंडितजीनी विचारलेल्या ९२ प्रश्नांपैकी ७५ प्रश्नांना लाटसाहेबांनी कायदे-कौन्सिलांत मज्जाव केला होता. पण पंडितजीनी या माफीच्या बिलाची आज जरुरी कशी नाही हे सिद्ध करताना पंजाबांत बंड झाले नव्हते तर उगीच बंडाची ओरड करून पंजाबी लोकांना दहशत बसण्याकरिता ओडवायरी सांप्रदायानें नाहक झोडपून काढले, अशी आपली फिर्याद स्वच्छ भाषेत कौन्सिलपुढे मांडली. लोकांची सत्याग्रहाची चळवळ दंग्याधोप्याशिवाय शांतपणे पंजाबांत चालली होती. अमृतसर येथें डॉ. किश्चलू व डॉ. सत्यपाल यांना जर अटकेंत ठेवण्यांत आले नसते आणि या बाबीत अमृतसरच्या कमिशनरसाहेबांकडे दाद मागण्याकरितां जाणाऱ्या लोकसमूहावर जर रेल्वेच्या पुलाजवळ गोळ्या घालण्यांत आल्या नसत्या तर पंजाबांतील आठ युरोपियनांचे खून, स्टेशनांची नासधूस व इतर दंगेधोपे मुळींच झाले नसते, असा पंडितजीचा मुख्य मुद्दा आहे. लाहोर येथेंहि आगळिक प्रथम अधिकाऱ्यांकडून झाली. पंजाबांत आगगाड्यांच्या व बँकांच्या मालमत्तेची बरीच जाळपोळ झाली व आठ युरोपियन नाहक मारले गेले, याबद्दल सर्व हिंदुस्थानाबरोबर पंडितजीनाहि अत्यंत वाईट वाटत आहे. पण हे दंगेधोपे रौलेट ॲक्टाच्या चळवळीनें उत्पन्न झाले नाहीत, सत्याग्रहाच्या चळवळीनें उत्पन्न झाले नाहीत, किंवा इंग्रजी राज्य हिंदुस्थानांतून काढून टाकावें असल्या प्रेरणेनेंहि उत्पन्न झाले नाहीत. पंडितजीची मुख्य फिर्याद अशी आहे कीं, बंड करण्याची इच्छा पंजाबी लोकांत रौलेट-ॲक्टाच्या किंवा सत्याग्रहाच्या चळवळीच्या वेळीं मुळींच नव्हती शांततेच्या सनदशीर मार्गांनेंच रौलेट ॲक्टाची व सत्याग्रहाची चळवळ चाललेली होती. या चळवळीचें शांततेचें स्वरूप लोकांनी मोडलें नाही, तर ओडवायरी सांप्रदायाच्या नोकरशाहीनें मोडलें. चळवळीचें शांततेचें स्वरूप नाहीसें करून

चळवळीला दंग्याधोप्याचें स्वरूप देण्यांत लोकाना काहींच फायदा नव्हता. इंग्रजाच्या विरुद्ध बंड करण्याची जेथें मुळातच इच्छाहि नाहीं व जरुरीहि नाहीं आणि बंड करण्यापासून हरएक प्रकारचें नुकसान आहे, अशी जेथें जाणीव आहे तेथें बंडाचें बीज असणार तरी कसें? बंडें शब्दानी, व्याख्यानानी, कागदानी व लेखणीनी होत नसतात, हे न समजण्याइतके पंजाबचे लोक खात्रीनें मूर्ख नाहींत. महायुद्धात इंग्रजाचा पूर्ण विजय झाल्यानंतर अफगाणिस्थानातील बोल्शेव्हिकांच्या नादी लागणारा प्राणी पंजाबातील हिंदूंत काय, मुसलमानात काय किंवा शिखात काय सांपडणे कठीण होते. रौलेट कमिशनने वर्णन केलेल्या मूठभर हिंदी बंडखोरांचे कागदी सरकार अफगाणिस्तानातील एखाद्या खेड्यात कसेंबसे पोट भरत राहून अफगाणलढाईच्या वेळीं सरहद्दीवरील थाल प्रदेशात आगगाड्या व तारायंत्रे तोडण्यास प्रोत्साहन देणारा जाहीरनामा लिहून काढावयास पुढे आले नसेल असे नाहीं, पण तेवढ्या जाहीरनाम्यावरून किंवा पेशावर येथील अफगाणी पोस्टमास्तराच्या पत्रावरून पंजाबी लोकांची बंडखोर वृत्ति शाबीत होऊं शकत नाहीं. असलीं पत्रे व हे असले जाहीरनामे चार चटोर पोरांच्या खेळातहि जन्मास येतात. पंजाबसारख्या प्रांताची बंडखोर वृत्ति असल्या चटोरपणाच्या खेळानीं सिद्ध होऊ शकत नाहीं. अफगाणी पत्रव्यवहारांतील पडलेलें वरील प्रकारचे कागदपत्र दाखवून पंजाब प्रकरणाच्या भयंकर स्वरूपाबद्दल अनुकूल मत बेझंट बाई व ना. शास्त्री यांच्या तोंडून त्यावेळीं वदवण्यात आले होते आणि 'उंदीर मांजरास साक्षी' या न्यायानें वरील दोन उंदरानी पंजाबच्या बोकोबाना जरी अनुमोदन दिलें होते तरी त्याच अनुमोदनाचा उपयोग परवा सिमल्यास करण्यात आला तसा करण्यांत येईल, असे आम्हास वाटलें नव्हते. पंडितजींना अडविण्याकरिता पंजाबचें सेक्रेटरी मि. थॉमसन, दिल्लीचे दंग्याचे वेळचे कमिशनर

मि. हॅले, सर व्हिन्सेट वगैरे सरकारी अधिकाऱ्यांनी जीं भाषणे केलीं त्या भाषणांत ना. शास्त्री व बेझंट बाई यांना पंडितजींच्या तोंडावर फेकण्यांत आलें. पंजाबांत बंड झालें असे कां म्हणतां? पंजाबी बंडखोर नसतांना बंडाची प्रवृत्ती पंजाब्याच्या गळ्यांत कां बांधतां? सत्याग्रहासारखी सोज्वळ चळवळ सुरू असतांना तिला बंडाचें स्वरूप कां देतां? पंडितजीच्या या मुख्य मुद्यावर उत्तर देण्यांत मि. थॉमसन व मि. हॅले यांनी मुख्यतः असे सांगितलें की, सत्याग्रहाच्या मागे दुसऱ्या भयंकर चळवळी उभ्या होत्या असे ना. शास्त्री व बेझंटबाई यांचेहि म्हणणें होते. हा उलट पक्षाचा पहिला साक्षीपुरावा झाला. आठ युरोपियन मारले गेले, बँकांच्या व अगगाड्यांच्या मालमत्तेची कित्येक लाखांची खराबी झाली, हा दुसरा पुरावा बंडखोर वृत्ती शाबीत करण्यास पुढे मांडण्यांत आला. थॉमसनसाहेब व हॅलेसाहेब या जोडीने पंडितजींवर यथेच्छ तोंडसुख घेऊन पंडितजींची माहिती अपूर्ण, भलत्याच दृष्टीची व गैरसमज करण्याकरितां पुढे मांडलेली आहे, असा उलट हल्ला पंडितजींवर चढविला. पण लोक शांतपणे रौलेट ॲक्टाच्या विरुद्ध सत्याग्रहाची चळवळ करीत होते, त्याच्यावर जर गोळ्या घालण्यांत आल्या नसत्या तर पंजाबांत वरील प्रकारचे दंगेधोपे झाले नसते हा पंडितजींचा मुख्य मुद्दा कोणीच खोडून काढला नाही. अमक्या अधिकाऱ्याला अशी भीति वाटली, पंजाब सरकारने सिमल्यास अशा अशा तारा पाठविल्या म्हणून बंड पुकारण्यांत आलें आणि लष्करी कायद्याच्या अमलास सुरवात करण्यांत आली अशा प्रकारची काय ती कायदे-कौन्सिलपुढे सरकारी बाजू मांडण्यांत आली. सर दिनशा वाच्छा यांनी ही सरकारी बाजू ऐकून माफीच्या बिलास उचलून धरण्याचें वचन दिले आणि सिमल्याहून चोहोंकडे गुरुवार, शुक्रवारच्या वादविवादाच्या तारांनीं असें कळविण्यांत आले की, वरिष्ट कायदे कौन्सिलांत मि. हॅले, मि. थॉमसन, मि. क्रॅप व सर जॉर्ज लौंडिस यांनीं पंडितजींना

## चपराकीवर चपराकी

लगावून जेरीस आणलें आणि अखेरीस लोकपक्षाला अशा रीतीने खच्ची केल्यावर सर दिनशा वाच्छा याची संमति माफीच्या बिलाला मिळवून ना. चांदा याची उपसूचना नापास झाली. आज रोजी हें बिल पास होताना सरकारतर्फें आपला हात सर दीनशा वर करतील यांत संशय नाहीं, तथापि पं. मदनमोहन मालवीय व ना. चांदा यानीं जी विचारचसरणी कायदे–कौन्सिलपुढे मांडली, ती विचारसरणी सरळ युक्तिप्रयुक्तीने कायदे–कौन्सिलांत खोडून काढण्यांत आली नाहीं असेंच सर्व विचारी लोक म्हणतील. पंडीतजीना खाशी चपराक बसली अशा प्रकारची हलक्या दर्जाची भाषा परवां कायदे–कौन्सिलांत लाटसाहेबापासून थॉमससाहेबापर्यंत सर्व सरकारी वक्त्याच्या मुखी खेळत होती. बिचारे पंडितजी असल्या असभ्य मारामारीपुढे काय करणार ? अपमानकारक शब्द शांतपणे गिळून गप्प बसण्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता, पंडितजींना चपराकी मारल्या, पंडितजीना खच्ची केलें, असल्या असल्या प्रकारचें असभ्य शब्द अधिकाऱ्यानी वापरले आहेत यावरूनच विचारगांभीर्याचा भरीवपणा त्यांच्या बाजूला नव्हता हे सिद्ध होत आहे. पंजाबांत बंडाची प्रवृत्ति नव्हती, सत्याग्रहाची चळवळ लोक शांततेने करीत असतांना लोकांस चांगली दहशत बसवली पाहिजे आणि स्वराज्याच्या चळवळीपासून लोकांना जबरदस्तीने परावृत्त केलें पाहिजे असे म्हणणाऱ्या ओडवायरी सांप्रदायानें बंडाचा छाप दंग्याधोप्याच्या समयीं पंजाबावर मारतां यावा म्हणून लोकांना डवचलें व दंग्याधोप्यास सुरवात झाली, असल्या फिर्यादी अर्जास कायदे–कौन्सिलांत सरकारतर्फेंचें उत्तर नाहीं बरें, दंगेधोपे झाल्यावर पुढील लष्करी कायद्याची कृत्यें तरी शांतता राखण्यापुरतीच कोठे होती ? पंडितजींच्या फिर्यादीतील मुख्य मुद्दा असा आहे कीं, शांतता राखण्याकरितां म्हणून जी कृत्यें करण्यांत आली ती कृत्यें दहशत बसवून लोकांतील राजकीय

जीवनास मातींत मिसळून टाकण्याच्या इराद्यानें केलेलीं होतीं. अमृतसरची विनपरवानगीची सभा मोडण्याकरितां, पंडितजी म्हणतात, इंग्रजी लष्करानें विनाकारण पांचशेंपासून हजार लोकांचे बळी घेतले. मि थॉमसन म्हणतात २९१ लोकच मारलें गेले. पांचशेंचा आंकडा खरा, कां हजाराचा आंकडा खरा, कां दोनशें एक्याण्णवाचा आंकडा खरा, हा वाद एका बाजूस ठेवून २९१ लोकच मारलें गेले असे आपण घटकाभर समजूं या. पण सभा स्थानांतून लोकांना घरी जावयास सांगण्याकरितां निशस्त्र प्रजेपैकीं २९१ लोक ठार मारणे ही शांतता राखण्याची पद्धत कोठली? ही इंग्रजी पद्धति कां प्रशियन पद्धति? सायलेशियांतील पोलिश लोकांनीं संप केला या गोष्टीचा फायदा घेऊन शेंकडो पोलंडचे लोक जर्मनीनें सायलेशियांत ठार करून जर्मन लोकसंख्या अधिक ठरवण्याचा उद्योग केला तसलाच पंजाबांतील मार्शल लॉचा दहशतीचा प्रकार नाहीं काय? मार्शल लॉ खालीं झालेल्या हजिऱ्या व मार्शल लॉ खालील विन वारंटी पकडापकडी याचा जो कल्लोळ पंजाबांत माजून राहिला होता त्या अदाधुंदीचें समर्थन दहशत बसवण्याच्या इराद्यानें होणार आहे, शांतता राखण्याच्या हेतूने होणारे नाहीं, या दहशतीची लांबलचक कहाणी पंडितजीनीं कायदे–कौन्सिलला सांगितली. पण पंजाबांतील बंडखोरांना असेंच वागवून त्यांची तशीच खोड मोडली पाहिजे होती अशा चपराकी पंडितजींना उलट मारण्यांत आल्या. मुळांत बंड दृष्टीस न पडतां लहानशा दंग्याधोप्यांचा फायदा घेऊन दहशत बसवण्याचा संप्रदाय मात्र दृष्टीस पडतो, बंड झालेंच होतें असें सपाटून सरकारतर्फे कायदे–कौन्सिलांत प्रतिपादन करण्यांत आलें. बंड जर खरोखरच झालें होतें आणि पंडितजींच्या फिर्यादींत जर खरोखर अर्थ नाहीं तर कमिशननें तसा निकाल दिल्यावर मग माफीचा कायदा पास करण्यास कोणती हरकत होती? मुख्य हरकत कांहींच नाहीं. मग घाई कां? सरकारी

अधिकारी जरी आज कायदे-कौन्सिलांत तोन्यातोन्याने बंड होतें असे म्हणत आहेत, तरी पंडितजींच्या फिर्यादीच्या अनुरोधाने कमिशनपुढे साक्षीपुराव्यानिशी लोकपक्षाचें म्हणणे साधार प्रसिद्ध झाल्यावर, पंजाबांत बंड नव्हतें असेच सर्व जग म्हणेल ही गोष्ट सिमल्याच्या मनाला खात असली पाहिजे. लष्करी कायदा व माफीचा कायदा याची जोडी बंडाच्या मागून येत असते. बंडाचें स्वरूप नाही पण मोठा दगाधोपा आहे, अशा प्रसंगी लष्करी कायदा चुकीनें पुकारला जाण्याचा संभव असतो, पण तो फारच थोडा वेळ टिकणारा असतो लष्करी कायदा कित्येक आठवडे टिकला आणि माफीचा कायदा त्याच्या मागून आला म्हणजे मुळांत एखाद्या चळवळीशीं धरून असलेला नुसता दगाधोपा दृष्टीस पडावा लागतो. पण पंजाबांतील बंडच लुटुपुटीचें असल्यामुळे या बंडाचे अस्तित्व कमिशनपुढे साक्षीपुराव्यानें शाबीत होईपर्यंत माफीचा कायदा पास करून घेण्याचें लांबणीवर टाकण्यास हिंदुस्थान सरकार राजी न झाल्यास त्यांत नवल तें कोणतें ?



# * राष्ट्रीय सभा व बादशाही जाहीरनामा

नाना प्रकारचीं विघ्नें येता येता गेल्या शनिवारीं अमृतसर येथें राष्ट्रीय सभेच्या कामास सुरवात झाली. गेल्यावर्षी दिल्लीस अमृतसरनें अमंत्रण दिलें. त्यावेळीं गेले बारा महिनें इतक्या महत्वाचे जातील असे कोणासहि वाटलें नाही पण दिल्लीस जमलेलें प्रतिनिधी दिल्ली सोडून आपापल्या प्रांतात जातात न जातात तोंच सरकारनें रौलेट बिलाचा ससेमिरा त्याच्यामागें लावला, आणि सर्व हिंदुस्थानात एकच गडबड उडून गेली. माटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टाच्या पाठीमागें पिछेहाट करण्याच्या सरकारचा हेतू असून राजकीय चळवळीची मुस्कटदाबी करण्याच्या हेतूनें हें बिल पुढे आणलेलें आहे, असे सर्वांच्या ध्यानी आल्याबरोबर महायुद्धानें उत्पन्न केलेल्या सर्व आशा निष्फळ होणार असे सर्वांना वाटूं लागले. रौलेट बिलाचा रौलेट कायदा पास झाला आणि निराशा झालेल्या लोकाना सत्याग्रहाशिवाय निराळा मार्गच शिल्लक राहिला नाही. सत्याग्रहाच्या चळवळीला हाणून पाडण्याचा प्रयत्न झाल्यामुळें अमृतसर येथें भयंकर कत्तल होऊन अमृतसरची

## खुनी बाग

प्रसिद्धीस आली. या खुनी बागेतील कत्तलीनंतर गेले चार सहा महिनें लष्करी कायद्याची चर्चा एकसारखी सुरू झाली, आणि विलायतेंत जॉइंट कमिटीचें काम सुरू झालें. खुनी बागेशेजारीं राष्ट्रीय सभा भरू देतील कीं नाहीं, याविषयीं सर्व राष्ट्रभक्ताना एकसारखी चिंता लागली होती. पण पंजाबनें धिटाईने, चिकाटीनें व जिवंतपणानें हें काम तडीस नेण्याचा निश्चय केल्यामुळें हरएक प्रकारची काळजी दूर होऊन पूर्वीच्या सर्व राष्ट्रीय सभांना मागें

---

* केसरी, ता. ३० डिसेंबर १९१९

टाकणाऱ्या उत्साहानें व कळकळीने अमृतसरच्या राष्ट्रीय सभेच्या कामास सुरवात झाली, याबद्दल सर्व राष्ट्रभक्ताना आनंद वाटल्यावाचून राहणार नाहीं. सत्याग्रहाच्या वेळी आणि लष्करी कायद्याच्या यातना सोसण्याच्या वेळीं पंजाबने खरा राष्ट्रीय जिवंतपणा दाखवला असल्यामुळे पंजाबच्या नवीन राष्ट्रीय जीवनास अनुसरून पजाबने राष्ट्रीय सभेची तयारी केली यात सशय नाही. अमृतसरची खुनी बाग हे एक तीर्थस्थान होऊन बसलें आहे. आणि अशा क्षेत्रस्थानी सात आठ हजाराहून अधिक प्रतिनिधी जमावें यात काही आश्चर्य नाहीं. शुक्रवारी राष्ट्रीय सभा न भरल्याने आणि रविवारी सब्जेक्ट्स कमिटीशिवाय इतराना फुरसद असल्यामुळें खुनी बागेचें दर्शन घेऊन सर्व प्रतिनिधीनीं आपणास पुनीत करून घेतलें. ऑ. इ. कॉ. कमिटीच्या बैठकीत ही खुनी बाग मालकापासून विकत घेतली असून तेथें पजाब प्रकरणाचें स्मारक उभारण्याची तयारी कॉ. कमिटीनें केली आहे, आणि जरूर त्या फडापैकीं ७/८ रक्कमहि जमली आहे, असे जेव्हा पं. मदनमोहन मालवीय यानी जाहीर केलें, तेव्हा सर्वास आपली तीर्थयात्रा सफळ झाली असेच वाटले. पजाब, अमृतसर व खुनी बाग यांनी हिंदुस्थानचें वातावरण अशा रीतीने गेले कित्येक महिने दणदणून सोडलेले असल्यामुळे स्वागत कमिटीचें अध्यक्ष स्वामी श्रद्धानंद आणि राष्ट्रीय सभेचें अध्यक्ष पं. मोतीलाल नेहरू याच्या भाषणात पजाबच्या प्रश्नाना साहजिकपणें विशेष महत्त्व देण्यात आलें आहे. रौलेट ॲक्ट, सत्याग्रहाची चळवळ, सर मायकेल ओडवायर याची कारकीर्द, पजाबातील लष्करी धिंगाणा, आणि हंटर कमिटी यांच्यासंबधानें ज्याला साधार, व्यवस्थेशीर व मुद्देसूद हकीकत वाचावयाची असेल त्यानीं पं. मोतीलाल नेहरू यांचें सविस्तर भाषण अवश्य वाचावे, अशी आमची शिफारस आहे. पं. मोतीलाल नेहरू हे तीक्ष्ण बुद्धीचें बॅरिस्टर असून यानीं आपल्या बुद्धीमत्तेचा, वजनाचा व

देशभक्तीचा पूर्ण फायदा गेले कित्येक महिने पंजाबला दिला आहे. पंजाब प्रकरणाबद्दल त्याच्या मनात डवचत असलेले शल्य व पजाबचें कल्याण व्हावे ह्मणून त्याना वाटत असलेली कळकळ त्याच्या भाषणात पदोपदी दृष्टीस पडत आहे. स्वामी श्रद्धानद याचे भाषण सत्याग्रह चळवळींतील त्याच्या पुढाकारास आणि त्याच्या सन्यासीपणास साजेसेच झालें यात सशय नाही. पजाबने हालअपेष्टा सोसून जी राष्ट्रसेवा कित्येक महिने केली त्या सेवेच्या जोरावर नवीन जिवतपणा हिंदुस्थानात उत्पन्न करण्याचें श्रेय पजाबास मिळालें आहे. या दृष्टीने विचार केला असता अमृतसरच्या जालियनवाला बागेस खुनी बाग असे नाव न देता नवजीवनास आरभ करणाऱ्या अमृताचे सिंचन करणारी ती बाग आहे, असे मानून 'अमरबाग' असेच नाव त्या जागेस देणे उचित होय. राष्ट्रीय सभेच्या वेळी तर बादशाही जाहीरनाम्याने पजाबचे पुढारी बधमुक्त झाल्यामुळें

## दुःखांतून सुख

बाहेर निघाल्यासारखे झाले. माटेग्युच्या स्वराज्याचे बिल पार्लमेंट सभेनें पास करून बादशहाची समति मिळून बादशाही जाहीरनामा राष्ट्रीय सभेच्या आधीं दोन दिवस प्रसिद्ध झाल्यामुळे अमृतसरची खुनी बाग नुसत्या दुःखसवेदनाकरिताच नसून सुखस्मरणासाठीहि आहे, अशीं राष्ट्रीय सभा भरावयाच्या आदल्या दिवशीं चिन्हे दिसूं लागली. ता. २४ डिसेबर रोजीं प्रसिद्ध झालेला बादशाही जाहीरनामा सतप्त झालेल्या हिंदुस्थानच्या हृदयात शातता उत्पन्न करणारा असल्यामुळे हिंदुस्थाननें गेले बारा महिने सोसलेल्या दुःखाचें पर्यवसान अशतः तरी सुखात करण्याचें सामर्थ्य त्या जाहीरनाम्यात आहे यात सशय नाहीं. सदर समग्र जाहीरनामा व त्यासबधाचें लोकमत आज दुसरीकडे दिले आहे. ते वाचकानी अवश्य वाचावें व जाहीरनाम्याचें मनन करून लो. टिळक याच्या मताप्रमाणें कृतज्ञतेच्या बुद्धीने जाहीरनाम्याबद्दल

आभार प्रदर्शित करावे अशी आमची मनःपूर्वक इच्छा आहे. बादशहा पंचम जॉर्ज याचा हा जाहीरनामा पूर्वीच्या बादशाही जाहीरनाम्याहून अगदीं निराळा आहे. बादशाही जाहीरनाम्यानें राजकीय कैद्याना माफी मिळाली आणि त्याप्रमाणें पंजाबचें कैदेत पडलेले पुढारी कैदेतून सुटून अमृतसरच्या राष्ट्रीय सभेच्या मंडपातील १५।१६ हजार इष्टमित्राना आनंदानें भेटलें हें खरें आहे. या माफीमुळें पंजाब–प्रकरणातील वितुष्ट बरेंच नाहीसे होईल यांत संशय नाहीं. सरकारी अधिकाऱ्याना माफी देण्याचा कायदा ज्यावेळी पास झाला त्याचवेळीं राजकीय कैद्यानाहि माफी मिळावयास पाहिजे होती. या माफीबद्दल त्यावेळी विलायतेस लो. टिळक यानी फार आग्रह धरला पण आज जे केले तें त्यावेळीं करण्याची बुद्धि मांटेग्यूसाहेबाना झाली नाही. थोडया उशीरानें का होईना पण तशी बुद्धि झाली ही संतोषाची गोष्ट होय. सर्वांना माफी देताना सार्वजनिक सुरक्षितपणास ज्याच्या सुटकेमुळे अडथळा येईल अशाना हिंदुस्थानसरकारनें वगळल्यास हरकत नाही असे एक गालबोट या माफीस लावण्यात आले आहे. अफगाणिस्तानच्या सरहद्दीच्या पलीकडे बोल्शेव्हिकाच्या छायेखाली जाऊन बसलेल्या मूठभर हिंदी लोकाना वगळून सावरकरापासून अलीबंधूपर्यंत सर्व राजकीय कैद्याना या माफीचा पूर्ण फायदा हिंदुस्थान सरकार यावेळीं मिळू देईल अशी आम्हास आशा आहे. दया ही पारमार्थिक धर्माचेंच तेवढे मूळ नसून ऐहिक व्यवहाराला दयेमुळेच पवित्रपणा येत असतो. खऱ्या खोटयाचा कायद्याच्या दृष्टीचा न्याय निराळा आणि वस्तुस्थितीचा न्याय निराळा. खरे व खोटे याच्या-मधील हा विवेक पुष्कळ प्रसंगीं मानवी बुद्धीच्या अटोक्याच्या बाहेरचा असल्यामुळे सर्वांच्या हातून एकसारख्या चुका होतच असतात या चुक्याचे परिमार्जनहि चुक्या समजल्यावर कित्येक वेळां होणे शक्यच नसतें. असली अपरिहार्य पापें धुवून टाकण्याची शक्ति एकटया दयेच्या अंगी आहे. अमृत-

सरख्या खुनी बागेसबधाने पजाबचे लष्करी अधिकारी आणि हिंदुस्थान सरकार याच्या हातून काय थोडें पाप झालें आहे ! इग्रजी पार्लमेंटनें कितीहि चौकशी करण्याचें जरी मनात आणलें तरी या पापाचा सर्व डाग पार्लमेंट सभेस धुता येणे शक्य नाहीं. खुनी बागेत मारले गेलेल्याना कोण जिवत करू शकणार ! अशा प्रसगी दयेचाच उपाय हा रामबाण इलाज होय. खुद्द बादशहानी मेहेरबानीनें हा इलाज जाहीर केला असल्यामुळे हिंदुस्थान सरकारने या बाबतींत कजूषपणा अल्पहि दाखवूं नये अशी आमची आग्रहाची सूचना आहे. मॉटेग्यूसाहेबाच्या स्वराज्याच्या कायद्यास प्रारभ करताना अधिकारी व प्रजाजन याच्यामधील वितुष्ट नष्ट करण्याकरिता दिलेल्या या माफीबद्दल हिदुस्थानात चोहोकडे बादशहाच्या नावाचा जयजयकार होईलच, पण त्याहूनहि जाहीरनाम्यात नमूद केलेल्या जबाबदार राज्यपद्धतीच्या पूर्णत्वाचा उल्लेखाबद्दल सर्व राजकीय चळवळ करणाराना

## जाहीरनाम्याची विशेष किंमत

वाटल्यावाचून राहणार नाही. माटेग्यूसाहेबाचा स्वराज्याचा कायदा हा जबाबदार राज्यपद्धतीचा नुसता प्रारभ आहे. या प्रारभापुढील मार्ग या बादशाही जाहीरनाम्यानें सर्व राष्ट्रभक्ताना सुलभ होणार आहे. १८५८ सालचा राणीचा जाहीरनामा लोकशाहीच्या दृष्टीनें काहींच नाहीं. १८५७ सालापूर्वी इग्रजानीं धार्मिक स्वातत्र्याचें धोरण स्वीकारलें होतें. पण त्या धोरणास ठामपणा व निश्चितपणा आला नव्हता. प्रजाजनाना पटेल असें अभिवचनहि प्रजेपाशी नव्हतें. धार्मिक बाबींतील इग्रजी राज्याच्या तटस्थ वृत्तीच्या धोरणास ह्या जाहीरनाम्याने निश्चयीपणा आला आणि लोकाचाहि तेवढया बाबीत विश्वास बसला. मोर्ले-मिंटो सुधारणाच्या वेळचा एडवर्ड बादशहाचा जाहीरनामा त्या वेळच्या सुधारणाप्रमाणेच निष्फळ व पोकळ होता. मोर्ले-मिंटोच्या कायद्याविरुद्ध राष्ट्रीय पक्षानें हाकाटी करून लोकशाहीच्या

तत्वाबद्दल जी एकसारखी झीज सोसली व चळवळ कायम ठेवली, त्या चळवळींतील १९०८ सालच्या प्रमुख मागण्या आज जवळजवळ एक तपाने मांटेग्युसाहेबाच्या कायद्यात गोंवल्या गेल्या आहेत. पण गेल्या बारा वर्षांत या मागण्याचा साहजिकपणे विकास झाला असून महायुद्धानें तर या विकासाला मुक्रर स्वरूप प्राप्त झालें आहे. या मागण्याचा उदय, वाढ विकास आणि युद्धकालीन पूर्णावस्था या सर्वांचा सहानुभूतीपूर्वक उल्लेख बादशाही जाहीरनाम्यात केलेला असून हिंदुस्थानात जबाबदार राज्यपद्धति पूर्णत्वास गेलीच पाहिजे असे इंग्रजी राज्यकारभाराचें धोरण असल्याविषयी बादशहानीं जाहीर केले आहे. आमच्या पुढच्या राजकीय चळवळीला या अभिवचनाचा फार मोठा उपयोग आहे. राष्ट्रसंघात 'राष्ट्र' या नात्यानें हिंदुस्थानचा समावेश झाल्यामुळें राष्ट्रसंघांतील सर्व राष्ट्रांपुढे आमच्या सुख-दुःखाची कहाणी मांडून त्यांची सहानुभूति मिळवण्याचा हक्क जसा आम्हास मिळाला आहे आणि त्यामुळे हिंदुस्थानातील व इंग्लंडातील आमच्या राजकीय चळवळीवर जसे एक नवीन अपील–कोर्ट उत्पन्न झालें आहे, त्याप्रमाणें मुत्सद्याच्या अभिवचनाचें आता यापुढें आधार दाखवीत न बसता शेवटच्या अपील कोर्टाचें म्हणजे खुद्द बादशाही जाहीरनाम्याचे आधार आम्हास प्रतिबंध करणाऱ्यापुढे टाकता येण्यासारखे आहेत. अशा दृष्टीनें विचार केला असतां बादशाही जाहीरनाम्यात ग्रथित झालेल्या मोठ्या तत्त्वाचें महत्त्व सर्वांच्या ध्यानात आल्यावाचून राहणार नाहीं. इंग्रजी साम्राज्य म्हणजे निरनिराळ्या स्वतंत्र राष्ट्रांचा संघ होय, असे इंग्रजी मुत्सद्दी गेलीं दोन तीन वर्षें म्हणत आले आहेत. कानडातून इंग्लडास परत आल्यावर गिल्ड हॉलमध्यें युवराजानीं केलेल्या भाषणात वरील विचार विशेष विशद करण्यात आलें आहेत. स्वतंत्र राष्ट्रांत इंग्रजी साम्राज्याच्या या संघात राष्ट्र या नात्याचा हिंदुस्थानचा उल्लेख युवराजानीं केला आहे. बादशाही

जाहीरनामा या पायरीच्या पलीकडे गेला असून हिंदुस्थानचें हें राष्ट्र साम्राज्य-संघातील इतर राष्ट्रांप्रमाणें राजकीय स्वातंत्र्याच्या पूर्ण विकासाचा लवकरच उपभोग घेवो अशा प्रकारच्या सहानुभूतीची भावना जाहीरनाम्याच्या आरंभापासून शेवटच्या प्रार्थनेपर्यंतच्या सर्व भागांत एकसारखी दिसत आहे. या जाहीरनाम्याबद्दल व माफीबद्दल बादशहाचे कृतज्ञतापूर्वक आभार मानून युवराजाचें स्वागत करण्याबद्दलचा ठराव सब्जेक्टस् कमिटीमध्ये रविवारीं पाच सहा तास मोठा वादविवाद होऊन पास झाला आहे. मद्रासच्‍या कांहीं प्रतिनिधि असल्या आभारप्रदर्शनाविरुद्ध असल्यामुळे आणि बेझंटबाई आभार मानतांना विशेष पुढें गेल्यामुळें या दोन पक्षांत खटका उडून रविवारच्या सब्जेक्टस् कमिटीचें काम बराच वेळ लांबलें. लो. टिळक यानीं या आभाराचे व स्वागताचे ठरावास अनुकूलता दाखविली आणि अखेरीस स्वागत कमिटीचा मसुदा पास झाला. बादशाही जाहीरनाम्याप्रमाणें माँटेग्यू-साहेबांचें आभार मानण्याविषयींहि खटका उडण्याचा संभव आहे. पण स्वामी श्रद्धानंद व पंडित मोतीलाल नेहरू यांच्या भाषणाकडे पाहिलें असता त्याहि प्रश्नाचा निकाल पहिल्या ठरावाप्रमाणेंच लागेल असे म्हणणें भाग आहे. आभाराचे हें ठराव झाल्यावर राष्ट्राच्या पुढील मागण्या मुक्रर ठरविणें, तदनुसार हिंदुस्थानात व परदेशी करावयाच्या चळवळीची खर्चाची व्यवस्था लावणें, आणि पंजाबावर जुलूम करणारांना शासन होऊन पंजाबच्या दुःखाचें परिमार्जन करणाऱ्या पुढील मार्गाचें आक्रमण करणें यासंबंधाचें राष्ट्रीय सभेचे ठराव आजच्या व उद्याच्या बैठकींत राष्ट्रीय सभेपुढे येतील असा अंदाज आहे.

---

# * टिळक-पर्स-फंड

टिळक-पर्स-फंडाचे खजीनदार रा. नेनें व रा. मराठे यानीं आजचें अकात फंडाच्या रकमेचे शेवटचे आकडे प्रसिद्ध केले असून चिरोलचा खटला लो. टिळक याच्या विरुद्ध झाल्यादिवसापासून आजपर्यंत लोकानीं तीन लाख पांच हजारावर लोकमान्याना द्रव्यदृष्टया मदत करून त्या खटल्याच्या त्रासातून मुक्त केलें आहे, असे सदर हिशेबावरून दिसून येईल. चिरोलच्या खटल्यासबधानें लोकमान्याना मदत करण्याकरिता विनतिपत्रक प्रसिद्ध करण्यात आले त्यावेळी तीन लाख रुपयाची जरुरी आहे असे विनतीपत्रात म्हटलें होतें. विरुद्ध बाजूचा खर्च किती द्यावयाचा यासबधाचा कोर्टाचा निकाल अद्याप झालेला नाही. कदाचित् आणखी महिना दीड महिनाहि हा निकाल होण्यास लागेल असा अदाज आहे. या खर्चासबधानें सॉलिसिटरच्या-मार्फत चाललेल्या वाटाघाटीवरून अडीच लाखाहून अधिक फंडाची जरुरी नाही, असे जेव्हा रा. न. चिं. केळकर याना विलायतेस समजून आले, त्या वेळेला लोकमान्याचा सल्ला घेऊन अडीच लाखाचे सुमारास फड बद करावा, असे पुण्यास त्यानी कळविले व त्याप्रमाणें फड जमविण्याचे काम बंद करण्यात आले. आतापर्यंत पर्स फंडाची एकदर जमा २७७९१५ रु. झाली असून वाढदिवसानिमित्त २५८२८ रु. रा. नेने याजकडे जमा झालेले आहेत. वाढदिवसानिमित्त रुपये गोळा करणाऱ्या कमिटीकडून लोकमान्याचे उत्तर प्रत्येक वर्गणीदारास पोंचून पहिल्या चित्राचा व उत्तराचा खर्च वजा जाता जमेतून शिल्लक किती राहील हे कळण्यास अद्याप बराच अवकाश लागणार आहे. लो. टिळक विलायतेहून येथें परत आल्यावर जमाखर्चाच्या हिशेबासकट शिल्लक रकम त्याच्या हवालीं करण्याचा समारंभ

* केसरी, ता. १८ नोव्हेंबर १९१९

करण्यांत येईल. फंड गोळा होऊं लागल्यापासून लो. टिळक योजकरितां खजिनदारानीं सदर रकम आपल्या ताब्यात लो. टिळक याना तसे कळवून ठेवलेली आहे व लो टिळक यानीं विलायतेहून जसजशा रकमा मागितल्या त्याप्रमाणे सदर रकमा फंडातून देण्यात आल्या आहेत. या फंडाच्या प्रत्येक दिवसाची रकम खजिनदाराकडे कसकशी जमा होत गेली आणि ती रकम लगेच बँकेत टाकून एक दिवसाच्याहि व्याजाचें नुकसान रा. नेने यानीं कसे होऊ दिले नाही ही गोष्ट फंडाच्या हिशेबाच्या वह्या पाहिल्या असतां प्रत्येकाच्या लक्षात तत्काळ येण्यासारखी आहे. फंड जमविणारे स्वयंसेवक व फंडाची विनंतिपत्रें काढणारे लो. टिळकाचे इष्टमित्र या सर्वांना सदर वह्या दाखविण्यात आल्या असून सरकारी सी. आय. डी. खात्याच्या अधिकाऱ्यानाहि पर्स फंडाच्या हिशेबाची पद्धत दाखवण्यास रा. नेने यानीं आळस केला नाहीं. पर्स फंड गोळा होत असताना ज्या पद्धतीनें हे हिशेब ठेवण्यात आले त्या पद्धतीकडे पाहता रा. नेने याना रोज भरपूर काम हिशेबाच्या पायीं करावे लागले असले पाहिजे यात संशय नाहीं. सार्वजनिक कामातील फंडाच्या

## हिशेबाचा चोखपणा

ठेवण्याच्या कामीं गेली दहापंधरा वर्षे महाराष्ट्रात जर कोणी विशेष हट्ट दाखविला असेल आणि त्या हट्टाच्या पायीं स्वतःस दिडकीच्याहि फायद्याची अपेक्षा न करता प्रतिपक्षाच्या शिव्याचा भडिमार होत असताहि स्वतःच्या शरीरास जर कोणी सामान्य कारकुनाप्रमाणें राबविलें असेल तर ते रा. अण्णासाहेब नेने यानीं होय. पैसा-फंड, टिळक-पर्स-फंड व होमरूल लीग-फंड या फंडाचे ते खजिनदार असून हिशेबातील चोखपणा ठेवण्यात त्यांचा हातखंडा आहे. पैसा-फंडाचे पैसे असोत किंवा होमरूल लीगचे पैसे असोत, या दोनहि संस्थातील पैसे खर्च करण्याचा अधिकार ज्या

कमिटयाना आहे त्या कमिटयाच्या मजुरीशिवाय नुसत्या सेक्रेटरींना रा. मेने एक पैहि खर्च करूं देत नाहींत. या दोनहि सस्थाचें आजपर्यंत झालेले सर्व खर्च एक्झिक्युटिव्ह कमिटयाना अधिकार किती यासबधाची घाटाघाट त्या त्या सस्थाच्या जनरल सभातून होऊन सदर नियम त्या त्या संस्थाच्या वार्षिक रिपोर्टातून प्रसिद्ध करण्यात आलेले आहेत. लो. टिळक, बॅ. बॅप्टिस्टा, श्री. खापर्डे, रा केळकर, रा. गोखले, प्रचारक, व इतर मडळी याच्यासबधानें डेप्युटेशनच्या कामावर विलायतेस असताना किंवा हिंदुस्थानात स्वराज्याच्या चळवळीसबधानें फिरत नसताना झालेलें सर्व खर्च एक्झिक्युटिव्ह कमिटयानीं रीतसर मंजूर केलेले आहेत, आणि या खर्चाची मंजुरी त्या त्या गृहस्थाच्या विनतीवरून करण्यात आलेली नसून एक्झिक्युटिव्ह कमिटीनें प्रत्येक प्रश्न सामान्यतः त्या त्या व्यक्तीच्या गैरहजेरींत आपल्यापुढे घेऊन मजुरीचें ठराव पास केलेले आहेत. पैसा–फड, होमरूल लीग–फड व टिळक–पर्स–फड या तीनहि फडासबधानें मजुरीचा व हिशेबाचा सोवळेपणा इतक्या कडक रीतीनें पाळण्यात आला आहे कीं या तीनहि फंडाकरिता काम करणाऱ्या मडळीस व सदर सस्थातील इतर कमिटयांस आपल्या इतका कर्मठपणा याबाबतीत इतर सस्थांत क्वचितच दृष्टीस पडतो अशी प्रौढी मारण्यास बिलकुल हरकत नाही. टिळक–पर्स–फड तीन लाखांजवळ जाऊ नये अशी चिरोल–पक्षाच्या अभिमान्याची इच्छा असणे साहजिक आहे. लाख सव्वा लाखापर्यंत हा फड जाईतों या इच्छेला वाचा फुटली नव्हती. पण या खटल्याच्या त्रासातून द्रव्यदृष्टया तरी लो. टिळक मुक्त होणार अशीं चिन्हे दिसूं लागल्याबरोबर एकाच्या कानाला चावा घेऊन दुसऱ्यास मारून टाकणाऱ्या सर्पाहूनहि अतिजहाल विषाचें फुत्कारें सोंगाड्या अनुयायाच्या मुखातून निघूं लागले! पण या फूत्काराचें विष फंडास न बाधता फड मूळच्या सकल्पाप्रमाणें सिद्ध झाला आहे. लो. टिळक याचा खटला

विलायतेस बुडविण्यात आला; पण त्या खटल्यातील

## निकालास उत्तर

हिंदुस्थाननें तीन लाख रुपये गोळा करून दिले, असे येथील काहीं अँग्लो–इंडियन पत्रानी उद्गार काढले आहेत. या उद्गारावरून साप्रतच्या राजकीय चळवळींत या फडाची आवश्यकता किती होती हें कोणाच्याहि लक्षात येण्यासारखे आहे. लो. टिळक यानीं ज्यावेळी हा खटला विलायतेस भाडण्याचा सकल्प केला, त्यावेळीं स्वतःच्या पैशावरच हा खटला चालवावयाचा असे त्यानी ठरविलें होते, आणि तेव्हापासून त्यानी आपल्या पैशाची व्यवस्थाहि तशीच चालविली होती. ताईमहाराजाचा खटला प्रिव्ही कौन्सिलात जर लो टिळक याच्या बाजूचा झाला नसता आणि त्या खटल्यापायीं गुंतलेले केसरीचे रुपये जर मोकळे झाले नसते तर हा खटला सुरू करण्याची जबाबदारी लोकमान्यानीं आपल्या शिरावर घेतली नसती. एका मोठया झुंजेंत यश आल्यामुळें शिल्लक राहिलेली सामुग्री सग्रहीं ठेवण्याची सवय लोकमान्याना बिलकुल नाहीं. एका बाजूचें सैन्य घरीं बोलावण्यास हरकत नाहीं अशीं चिन्हे दिसतात न दिसतात तोच दुसरी मोहीम सुरू झालेली असते आणि कित्येक वेळा सामुग्रीला परस्परच दुसऱ्या तोंडावर हजर राहणें भाग पडते. १८९७ व १९०८ सालचे केसरीवरील खटले, ताईमहाराजाचा खटला व चिरोलचा खटला ही लढण्याची तीनहि तोंडे एकाच भाडणातून उत्पन्न झाली असून एकमेकानीं एकमेकास आतांपर्यंत निरनिराळ्या प्रकारानी सावरून धरलें आहे. चिरोलचा खटला खर्चाच्या मानानें घरदार गहाण टाकलें असता आपल्या आटोक्याच्या आत आहे, असें लोकमान्याना वाटल्यावरून त्यानी या खटल्यास सुरवात केली. खटला विरुद्ध गेला असता अडीच तीन लाखापर्यंत खर्च होणार अशी जर अटकळ प्रथमपासून विलायतच्या सॉलिसिटर्सनी व वकिलानीं

दिलेल्या सल्ल्याअन्वयें बाधता आली असती तर या खटल्याचा पायाच रचला गेला नसता. विलायतेंस व हिंदुस्थानास जेथून म्हणून सल्ला घ्यावयास पाहिजे होता तेथून सल्ला घेण्यात आला आणि केसरीनें दिलेली शिदोरी शिंकाळीस चढण्याची जरुरी नाहीं असे प्रथमपासूनच लोकमान्यांचे मत असल्यामुळे खटल्यास सुरवात झाली. टिळक–पर्स–फंडाच्या विनतिपत्रात लो. टिळकानीं आपली सर्व इस्टेट गहाण टाकून हा खटला चालविला असें जे विधान करण्यात आलें आहे ते विधान शिदोरी उद्याकरिता शिंकाळीला न ठेवण्याचा लोकमान्याचा बाणा सदर प्रसगी त्याच्या अनुयायाच्या व इष्टमित्राच्या नजरेस आणणे योग्य वाटल्यावरून करण्यात आलें. लो. टिळक यानीं चालवलेल्या सस्था वरील मताला धरूनच चालविण्यात येत असून त्या संस्थेतील प्रमुखाना देण्यात येणारे पगारहि वरील मत ध्यानात ठेवूनच लो. टिळक मजूर करीत असतात. शिदोरी कोणास नको आहे? आणि पोटापाण्याच्या शिदोरीशिवाय काम तरी कसे होणार? अत्यत विरक्त वृत्तीनें सार्वजनिक कामास वाहून घेणाऱ्या महतासहि समर्थानी म्हटल्या-प्रमाणें मधुकरीच्या फडक्याच्या आतील भाताची अपेक्षा असते. सग्रहाची इच्छा मनात बलवत्तर ठेवून त्या इच्छेच्या प्रेरणेने वरील नोकरी करीत आहे, का सस्थेतील कामकाजावरील आदरामुळे काम करीत असून सभोंवारच्या स्थितीच्या मानानें कामाची ताकद राहण्यास जरूर तो पगार देण्यात येत आहे; या गोष्टीचा नीट विचार करूनच लो. टिळक यानीं चालवलेल्या किंवा त्याच्या पूर्वी किंवा आज सबध असलेल्या सार्वजनिक सस्था उभारल्या गेल्या आहेत. सग्रही बुद्धीला देण्यात आलेलें गौणत्व, कार्यतत्परता आणि ते तें काम पार पाडून नेण्याची लायकी या तीन सद्गुणाचा योग्य रीतीनें मिलाफ होत गेल्यानेंच होमरूल लीगसारख्या संस्था उत्पन्न झाल्या व नावारूपास चढल्या. आपल्या आजच्या व पुढील पाच दहा

घर्षोंच्या सामुग्रीवर चिरोळचा खटला चालवूं असें सर्व माहिती गोळा करून लोकमान्यानीं ठरविलें खरे, पण अनुभवातीं पूर्वीचें अंदाज खोटे ठरले. विलायतेतील खटल्याच्या खर्चाचा अनुभव लोकमान्याना यापूर्वी नव्हता असें नाहीं; पण अधिकारीवर्ग या खटल्यात इतक्या तत्परतेनें मन घालील व आखाड्यात स्वतः दंड थोपटून उभा राहिल्याप्रमाणें राहील असा अंदाज बांधता आला नाही. केसरीवरील दोनहि खटल्यात ही

## सरकारी कुस्ती

आहे असे लोकमान्याना पूर्णपणे वाटत होते आणि जयापजयाची दुःखे भोगण्याची तपश्चर्या आपण केली पाहिजे या भावानेच ते आखाड्यात उभे होते. ताईमहाराजाच्या खटल्यात अर्धवट राजकीय व अर्धवट खाजगी स्वरूपाचे हें भांडण आहे असा त्याना अनुभव आला. हिंदुस्थानातील वादात सरकारी अंग पूर्णपणे व्यक्त झाले; पण विलायतेस ताईमहाराजाचा खटला जाताच खासगी खटल्याप्रमाणें न्याय मिळण्यास हरकत आली नाहीं; या अनुभवाला अनुसरूनच चिरोलच्या खटल्यातहि खासगी खटल्याप्रमाणें न्याय मिळेल असे सर्वांना वाटले व खटल्याची उभारणी करण्यात आली. मुंबईस साक्षीपुरावा चालू असताना सरकारी अधिकाऱ्यांचें दंड खाड्यात खणखण वाजत आहेत असे लक्षात आले खरे, पण विलायतेंस असलीं दंडुकेशाही चालणार नाहीं अशी आशा बाळगूनच अंगीकृत कार्य पुढे चालवावें लागले. चिरोलच्या खटल्याचा निकाल विरुद्ध झाला त्यावेळीं खर्चाचा बोजा आपला आपण सोसला पाहिजे अशी लोकमान्याची समजूत होती व तशा दृष्टीनेच त्यानीं निकालानंतर विलायतेहून पत्रे पुण्यास लिहिलीं. टिळक–पर्स–फंड येथे जो सुरू करण्यात आला तो लो. टिळक यांच्या सूचनेवरून बिलकुल नव्हे. खासगी कुस्तीला सरकारी कुस्तीचें स्वरूप येऊन हा खटला बुडवण्यात आला अशी लोकमान्यांच्या अनुयायांची

व इष्टमित्राची समजूत झाल्यामुळें या खटल्यातील हरएक प्रकारच्या खर्चाकरता फंड गोळा करणें हें राजकीय चळवळींतील आपलें पवित्र कर्तव्य आहे असे वाटल्यावरूनच फंडास सुरुवात झाली. फंड सार्वजनिकरीत्या गोळा करून केसरींत पोंच देऊन रा. नेने याच्या हिशेबी पद्धतीनें तो गोळा करावा याविषयीं एकदोन आठवडे चालकात बरीच भवती न भवती झाली. संकट समयीं द्रव्यदृष्टया लोकमान्याना मदत करण्याच्या इच्छे-पुरताच या फंडातील उद्देश असता तर सदर वादविवादाच्या वेळीं खासगी पद्धतीनें फंड गोळा करा म्हणणाऱ्याची सरशी झाली असती. पण सरकारनें दंड थोपटल्याबरोबर लोकहि दंड थोपटण्यास कमी करीत नाहींत आणि आव्हानाला प्रतिआव्हान देण्यास तयार असतात, हें सिद्ध करून दाखवि-ण्याचा दुसरा उद्देश सदर फंडाच्या बुडाशीं असल्यामुळें फंडास मदत करणाराची संख्या जेवढी अधिक मोठी असेल तेवढी पाहिजे असे ठरलें व त्यामुळें साप्रतचें स्वरूप फंडास देण्यात आलें. आमच्यातील काहीं लोकाच्या ध्यानीं हा मुद्दा आला नाहीं आणि सदर लोकाना समजणारेहि नाहीं. पण प्रतिपक्षी असलेल्या अँग्लो-इंडियन पत्रकाराना हें महत्व समजलेले आहे. टिळक-पर्स-फंड व वाढदिवसाचा फंड या दोहोंनी मिळून जमा झालेली रकम तीन लाखावर गेली असल्यामुळे बंगाल, मद्रास व सिंध याच्या साहाय्यानें नागपूर, वऱ्हाड व मुंबई इलाखा यानीं चिरोलच्या खटल्यातील निकालास चोख प्रत्युत्तर दिलें आहे असे छातीठोक म्हणण्याची आज वेळ आली आहे. राष्ट्रीय पक्षानें परदेशी सनदशीर रीतीनें चालविलेल्या राजकीय चळवळीच्या मार्गात पहिला मोठा खड्डा म्हणून चिरोल-खटल्याचा निकाल आडवा पडला. हा खड्डा भरून काढल्याशिवाय परदेशच्या आमच्या राष्ट्रीय चळवळीचे पाऊल पुढे पडणे शक्यच नव्हते; हे ओळखूनच टिळक-पर्स-फंडास सुरवात झाली. परदेशच्या राजकीय चळवळीस या

फंडाची जरूरी आहे हें ध्यानीं आणूनच लो. टिळक यानीं फंडास, फंड सुरू झाल्यावर बरेंच दिवसांनीं आपली समति दिली, आणि परराष्ट्रीय सनदशीर राजकीय चळवळीच्या आखाड्यात राष्ट्रीय पक्ष उतरला असताना पहिल्या सलामीसरशी मातींत पुरला न जाता पुनः वर उठून उलट पक्षास टांग मारण्यास या फंडानें तो तयार होणार हें पाहूनच या फंडाची नालस्ती प्रतिपक्षानें नाना प्रकारच्या तोंडातून करविली. वरील सर्व अडथळ्यातून फंड आज पार पडला असून चिरोल–खटल्यात अधिकाऱ्यानीं 'अरे' म्हटल्याबरोबर लोकानींहि उलट 'कारे' म्हणण्यास कमी केलें नाहीं, हें या फंडानें आज सिद्ध केले आहे. टिळक–पर्स–फंडाकडे वरील दृष्टीनें पाहिलें असता ज्यानीं फंडास सढळ हातानें रकमा दिल्या त्या सर्व लहान मोठया वर्गणीदाराचे, फंड गोळा करणाऱ्या स्वयसेवकाचे व फंडाची चोख व्यवस्था ठेवणाऱ्या खजीनदाराचे मनःपूर्वक आभार मानल्याशिवाय कोणीहि राहणार नाहीं, अशी आमच्या मनाची खात्री आहे.

---

# * स्वराज्य व शिष्टमंडळ

लो. टिळक, रा. केळकर, डॉ. वेलकर वगैरे कॉंग्रेसतर्फेच्या व होमरूल लीगच्या तर्फेनें विलायतेस लोकांच्यापुढे व पार्लमेंटरी कमिटीपुढें आमच्या स्वराज्याची बाजू मांडण्याकरता गेलेले पुण्या–मुंबईचे प्रतिनिधि गेल्या गुरुवारीं तिसरे प्रहरी ईजिप्त बोटीनें मुंबईस दाखल झाले, त्यावेळीं मुंबई शहरानें बंदरावर त्याचें अपूर्व स्वागत केले व रात्रौ मुंबईस शांतारामाचे चाळींत प्रचंड सभा करून त्याचा सन्मान करण्यात आला. सोमवारीं सकाळीं लो. टिळक व रा. केळकर पुण्यास पोंचले त्यावेळी पुण्यानेंहि आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्याचे उत्तम स्वागत केले. पुण्या–मुंबईच्या स्वागताची हकीकत आजचे अंकात दुसरीकडे दिलीच आहे. आपण विलायतेस जाऊन स्वराज्याचें कोणतें गाठोडे आणलें ते दाखवा असा प्रश्न बंदरावर पाय ठेवताच सर्वांनीं लोकमान्यांना मोठया उत्सुकतेनें विचारला, आणि लोकमान्य हिंदुस्थानांत येऊन पोंचण्यापूर्वीच दोन तीन दिवस हिंदुस्थानाकडे रवाना करण्यात आलेलें स्वराज्याचें गाठोडें लोकमान्यानीं शांतारामाच्या चाळींत सर्वांना सोडून दाखविलें स्वराज्याचें बिल प्रसिद्ध होण्यास व शिष्टमंडळीं हिंदुस्थानास येऊन पोंचण्यास एकच गाठ पडल्यामुळे शिष्टमंडळाच्या कामगिरीकडे बहुजन समाजाचें लक्ष आपोआप वेधलें गेले, आणि मुंबईस शांतारामाच्या चाळींतील विस्तृत पटांगणांत काय किंवा डॉ. वेलकर यांच्या लहानशा दिवाणखान्यात काय, एल्फिन्स्टन स्टेशनाजवळील कामकऱ्यांच्या दहावीस हजार लोकांच्या टोलेजंग सभेत काय, किंवा सरदारगृहाच्या गच्चीवरील संभाषणांत काय, लोकमान्यानीं विलायतेतील कामासंबधानें व आपल्या धोरणासंबधानें जें जें सांगितलें तें तें सर्व श्रोत्यांच्या मनाला

* केसरी, ता. २ डिसेंबर १९१९

उत्तम रीतीनें पटूनहि गेले. होमरूल लीगचें काय किंवा कॉंग्रेसचें काय, शिष्टमडळ विलायतेस गेलें होतें, तें कॉंग्रेसच्या मागण्या तेथील लोकापुढें माडण्याकरिता विलायतेस गेलें होतें. खुद्द विलायतेस निरनिराळया मताचा आणि पक्षांचा जरी गलबला असला तरी पार्लमेंट सभेचें ठरावांना विलायतेंत लोकमत म्हणून जशी मोठी किंमत आहे, त्याप्रमाणें हिंदुस्थानांतहि कॉंग्रेसच्या ठरावाना सर्व हिंदुस्थानचें लोकमत म्हणून मोठी किंमत आहे. विलायतच्या पार्लमेंटच्या हुकुमानें हिंदुस्थानास पूर्ण स्वराज्य मिळून पुढील आठ दहा वर्षांत हिंदुस्थानचें पार्लमेंट केव्हा निर्माण व्हावयाचे असेल तें होवो, पण आज तर राष्ट्रीय सभा म्हणजेच

## आमचें पार्लमेंट

होय यात संशय नाही. हिंदुस्थानाला या आमच्या पार्लमेंटबद्दल पूर्ण अभिमान वाटत असून कॉंग्रेसच्या ठरावाना पार्लमेंटच्या ठरावाइतका मान आज हिंदुस्थान देत आहे. कॉंग्रेसची ही इभ्रत विलायतच्या लोकाना मान्य करावयास लावणें हें आमच्या शिष्टमडळाचे मुख्य काम होतें. हें काम शिष्टमडळानें उत्तम प्रकारे बजावले आहे, असे गेल्या एक वर्षाच्या विलायतेंतील आमच्या चळवळीच्या हकिकतीवरून सहज ध्यानांत येईल. स्वयनिर्णयाचें तत्त्व हिंदुस्थानास लावून घेण्याची कामगिरी शिष्टमडळास कॉंग्रेसनें सागितली होती; आणि स्वराज्यासबधाचे ठराव स्वराज्याच्या बिलात गोंवलें जाण्याचा उद्योग विलायतेत प्रामुख्यानें करण्याविषयीहि शिष्टमडळास कॉंग्रेसची आज्ञा होती. विलायतच्या मुत्सद्यांनीं स्वयनिर्णयाचें तत्व पूर्वीच कबूल केलें होतें. तहाच्या परिषदेच्या वेळीं प्रे. विल्सन याच्या नजरेस कॉंग्रेसचे ठराव आणून स्वयनिर्णयाचें तत्त्व हिंदुस्थानांतहिं योग्य काळीं लावण्यांत येईल असे आश्वासन लो. टिळक यांनीं प्रे. विल्सन यांजकडून मिळविलें. राष्टसंघात हिंदुस्थानास प्रथमपासूनच बसण्याचा अधिकार

मिळाल्यामुळें स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला अनुसरून राज्यकर्त्यांच्या निकालावरहि अंतस्थ स्वराज्यासंबधानें राष्ट्रसंघाकडे अपील करण्याचा हक्क हिंदुस्थानातील लोकास आहे, असेहि आश्वासन अमेरिकेतील प्रमुख मुत्सद्याकडून लाला लजपतरायाच्या चळवळीमुळें हिंदुस्थानास मिळालें आहे. तसेच आश्वासन मुख्य मंत्री लॉईड जॉर्ज यांजकडून मिळवण्याची खटपट आमच्या शिष्ट मंडळानें विलायतेस सुरू केली असून त्या उद्योगास यश आल्यावाचून राहणार नाहीं, असा विश्वास शिष्टमंडळास वाटत आहे. स्वयंनिर्णयाचें तत्त्व व स्वराज्य यासंबधाने इंग्लंडात शिष्टमंडळाने जी चळवळ केली त्या चळवळीमुळें पार्लमेंट सभेतील मजूर पक्षाचे पुढारी मि. आर्थर हेंडरसन, मि. स्पूर व मि. वेजवूड यानीं राष्ट्रीय सभेच्या मागण्या पूर्णपणें उचलून धरल्या असून मजूर पक्षाच्या टोलेजंग सभातून हिंदुस्थानास स्वराज्य दिलेंच पाहिजे, व स्वयंनिर्णयाचें तत्त्व हिंदुस्थानास लावलेंच पाहिजे अशा आशयाचे ठराव पास झाले आहेत. मजूर पक्षाच्या पुढाऱ्यानीं हिंदुस्थानच्या प्रश्नात इतकें मन घातलें याचें कारण त्या पक्षाच्या दुःखाचे व आमच्या

## दुःखाचें मूळ एकच

आहे, हें होय. इंग्लंडातील भांडवलवाल्याच्या पक्षाच्या लोभामुळें आणि द्रव्यतृष्णेबरोबरच फोंफावणाऱ्या राज्यतृष्णेच्या वाढीमुळे इंग्लंडातील बिन भांडवलवाले आज दुःखें भोगीत आहेत. इंग्लंडातील भांडवलवाल्याची द्रव्यतृष्णा व राज्यतृष्णा जर आज स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला अनुसरून मर्यादित झाली तर हिंदुस्थानच्या स्वराज्याच्या मार्गातील मुख्य अडचण नाहींशीं झाल्यासारखीच होईल, यात संशय नाहीं. दोघाच्याहि दुःखाचें कारण एकच असल्यामुळें दोघाचा स्नेह जुळावा यांत नवल नाहीं. मजूर पक्षाशीं हिंदुस्थानच्या राष्ट्रीय सभेच्या प्रतिनिधींचें इतके जुळू नये तर जुळावें तरी कोणाशीं ? भांडवलवाला पक्ष हा आमच्या मार्गातील मोठी

अडचण! त्या पक्षाशीं जुळलें म्हणजे पूर्ण स्वराज्य हातीं आलेंच. पण तें कार्य विलायतेंतील मजूर पक्षाशीं मिलाफ पावूनच सिद्ध होणारें आसल्यामुळें आमच्या शिष्टमडळाने मजूर पक्षाच्या मार्फत विलायतेस चळवळ केली हे यथायोग्यच्च झालें. मजूर पक्ष विलायतेस आज पार्लमेंटच्या बाहेर अधिकारावर चढला आहे. आणि पार्लमेंट सभेत पुढील आठ दहा वर्षात अधिकारारूढ तोच पक्ष होईल, अशीं आज चिन्हें दिसत आहेत. मजूर पक्षाचे पुढारी मि. हेंडरसन यानीं लो. टिळक याच्यामार्फत हिंदुस्थानास आज लेखी निरोप कळविला आहे कीं; माटेग्युसाहेबाच्या बिलाने चतकोर अर्धा चतकोर जेवढें स्वराज्य पदरात पडेल तेवढे आज पदरात घ्या आणि पुढे चळवळ चालवा, म्हणजे मजूर पक्ष अधिकारारूढ होण्याबरोबरच तुमच्या पदरांत स्वराज्याचें बाकी राहिलेलें सर्व चतकोर टाकल्यावाचून राहणार नाहीं; व आपल्या निरनिराळ्या सभातून मजूर पक्षाने वरील प्रकारचें अभिवचनहि दिलें आहे. पालमेंट सभेत देण्यात आलेल्या मेजवानीच्या वेळीहि मजूर पक्षानें सदर अभिवचनाचा उल्लेख केलेला आहे. इतकेच नव्हें तर माटेग्युसाहेबाचें दुरुस्त झालेलें स्वराज्याचें बिल प्रसिद्ध झाल्यावरहि ‘ देत आहेत ते आज नाकारू नका, आह्मी पुढे याहून अधिक देऊ ’ असे आश्वासन मि. हेंडरसन वगैरे मजूर पक्षाच्या पुढाऱ्यानीं दोनचार दिवसापूर्वी पुनः दिले आहे. मजूर पक्षाचा व आमच्या शिष्टमडळाचा संबध मिसेस बेझट याच्यामुळें विशेष आयास न पडता जडला ही गोष्ट खरी आहे. पण तसा तो सबंध जडल्यानतर बॅ. बॅप्टिस्टा, लो. टिळक, रा. केळकर वगैरेनीं राष्ट्रीय सभेकरितां जी चळवळ विलायतेस केली त्यामुळे राष्ट्रीय सभेचें मत म्हणजें हिंदुस्थानचें लोकमत होय, अशी खात्री मजूर पक्षाचीच नव्हे तर पार्लमेंटच्या सभासदाचीहि आज झाली आहे. इतर सभासदातहि राष्ट्रीय सभेची ही इभ्रत आमच्या शिष्टमडळानें राखली, आणि मजूर पक्षाला धरून

चालविलेल्या चळवळीमुळे ती राखली गेली असे म्हणण्यास दुसराहि पुरावा आहे. माटेग्युसाहेबाचें दुरुस्त केलेले बिल ता. २७ नव्हंबर रोजीं पार्लमेंट सभेपुढे मजुरीकरता यावयाचें होतें. पण सिडेनहॅम-कपूरच्या उपद्व्यापामुळे ता. ३ डिसेंबर पर्यंत पार्लमेंटची चर्चा लांबणीवर टाकण्यात आली. लांबणीवर टाकण्यासंबंधाचा हा प्रश्न पार्लमेंट सभेंत सर एडवर्ड कार्सन, कर्नल येट वगैरेंनीं पुढे आणला असताना पार्लमेंट सभेचे सूत्रचालक मंत्री मि. बोनर लॉ यानीं असे सांगितले कीं, नाताळच्या सुटींत भरणारी

## हिंदुस्थानची जंगी सभा

ता. २६ डिसेंबर रोजी भरण्यापूर्वी हिंदुस्थानचे हे स्वराज्याचे बिल पास करून घेणें सरकारास इष्ट वाटत आहे, आणि म्हणून सरकार सांप्रत घाई करीत आहे. राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाला मंत्रिमंडळाकडून इतके महत्व यापूर्वी कधींहि मिळालें नाहीं. राष्ट्रीय सभेचे मत काय पडेल या दृष्टीनेंच माटेग्युसाहेबानीं आपल्या दुरुस्त केलेल्या बिलाची रचना केलेली आहे. आणि राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या तारखांना अनुलक्षूनच या बिलाच्या मंजुरीच्या तारखा आज ठरवण्यात येत आहेत. बिल लवकर पास केले पाहिजे किंबा कसे या वादासंबंधानें सिडेनहॅमी कपूला आयर्लंडच्या होमरूलचे कट्टे द्वेष्टे सर एडवर्ड कार्सन याचें पाठबळ मिळालें आहे. लंडन टाइम्स, डेली न्युज आदिकरून विलायतेंतील मुख्य पत्रे डिसेंबरातच बिल पास करून घेतलें नाही तर नसते अनर्थ ओढवतील असे प्रतिपादन करीत असून माजी मुख्य मंत्री मि. ॲस्क्विथ याचा लिबरल पक्षहि याच मताचा आहे. भांडवलवाल्या पक्षाचा अस्सल अर्क म्हणजे कार्सनसाहेब होत. या सर्वात खालीं बसलेल्या अर्काच्या गाळात रुतलेल्या सिडेनहॅमी कंपूस एका बाजूस ठेवलें तर भांडवलवाल्या पक्षातीलहि उदारमतवादी सभासदांना राष्ट्रीय सभेस इतका मान द्यावयास कोणी लावले? सांप्रतच्या युरोप खंडातील काळाचा महिमाच असा

आहे कीं, बिन भाडवलवाल्या लोकाना व त्याबरोबरच जिंकलेल्या लोकानाहि संतुष्ट ठेवण्याकरिता भाडवलवाल्यानीं आपली राज्यतृष्णा आणि द्रव्यतृष्णा जर मर्यादित करून घेतली नाहीं तर राज्य व द्रव्य दोन्हींहि भाडवलवाल्याना पचायची नाहींत. हिंदुस्थानास आज माटेग्युसाहेब स्वराज्याचा हप्ता म्हणून जे हक्क देत आहेत ते हक्क त्याच्या उदार मताचें फळ म्हणून ते देत असोत वा नसोत; पण एवढी गोष्ट खरी आहे कीं, हल्लीच्या काळात असलेले स्वराज्याचें हक्क स्वतःच्या देशातील बिन भाडवलवाल्याना आणि साम्राज्यातील इतर देशाना दिल्याशिवाय साम्राज्याची पोटदुखी बद पडावयाची नाहीं. भाडवलवाले व बिनभाडवलवाले याच्यामधील झगडयामुळे युरोपात गेल्या दोन तीनशे वर्षांतहि न झालेली भयकर क्राति घडून आलेली आहे. रशियातील बोल्शेव्हिकाच्या या क्रातिमुळे आणि युरोपखंडात वाढत चाललेल्या सोशियालिस्टिक मताच्या प्रस्थामुळे इंग्रजी साम्राज्यासहि पोटदुखीचे दुखणें आज जडले आहे. पोटदुखीच्या या दुखण्यामुळे अन्न न पचून हातापायास कमकुवतपणा येत चालला आहे. पोटदुखीच्या या दुखण्याच्या वेळीं सर्व साम्राज्यास उपयोगी पडणारे

## पाचक औषध

म्हणून स्वराज्याच्या तत्त्वाचा खल आज इग्लडात चालला आहे. भाडवलवाल्यानी व साम्राज्यवाद्यानीं आजपर्यंत फार कुपथ्य केलें आहे. इजिप्त, इराण व टर्की असले वातूळ व वावडे पदार्थ खाण्याची भर या कुपथ्यात नुकतीच पडली आहे व पडतहि आहे. अशा रोगग्रस्त स्थितींत व्याधिहारक औषध म्हणून हिंदुस्थानच्या स्वराज्याचें बिल पार्लमेंटपुढें आलें आहे. हिंदुस्थानास जें पौष्टिक तेंच इंग्लंडास पाचक होणार, अशी आज स्थिति आहे, युरोपखडाच्या साप्रतच्या रोगाकडे लक्ष देऊन राष्ट्रीय सभेनें हिंदुस्थानास पौष्टिक म्हणून प्रातिक पूर्ण स्वराज्य आणि वरिष्ठ सरकारात

भागी मागितली. इंग्लंडनें हिंदुस्थानात पाठवलेला नोकरशाहीचा रोग हें पाचक औषध घेताना वाकडे तोंड करील म्हणून रोग्याला विचारून त्याच्या तंत्रानें औषध देण्याचा मांटेग्यूसाहेबानें उपक्रम केला. हिंदुस्थानातील नोकरशाहीला किंवा विलायतेंतील त्याच्या साम्प्रदायाना विचारून औषधोपचार करणें ही पद्धतच मुळीं चुकीची. हिंदुस्थानांतील नोकरशाहीचा सल्ला घेऊन मग काय तें ठरवावयाचें हीच पद्धत मोडून टाकून उदात्त तत्त्वाना अनुसरून जी चिकित्सा होईल त्या चिकित्सेप्रमाणें वागण्याचा काळ आला आहे. या काळानें ज्या आशा व आकांक्षा हिंदुस्थानात उत्पन्न केल्या त्या आशेला व आकांक्षेला धरून मांटेग्यू–चेम्सफर्ड रिपोर्ट न झाल्यामुळें दिल्लीच्या राष्ट्रीय सभेची निराशा झाली, आणि त्याच आशा हल्लींच्याहि दुरुस्त बिलात सफल न झाल्यामुळें ना. पटेल, ना. खापर्डे वगैरे शिष्टमंडळींनाहि आपली निराशाच व्यक्त करावी लागत आहे. यथाकाल उद्भवलेल्या आशा सफल न झाल्यास कोणाची निराशा झाल्यावांचून राहील ? अशी निराशा झाली असताहि मांटेग्यूसाहेबाच्या नव्या बिलानें दिलेला तुकडा खाऊन टाकून त्या अल्पस्वल्प बलाचा उपयोग हल्लींहूनहि दुप्पट जोरानें सगळी भाकरी मिळवण्याकडे केला पाहिजे असें लो. टिळक यांचें म्हणणें आहे. निराशा झाली म्हणून खट्टू होऊन बसण्याचें कारण नाहीं. कारण कालाचा ओघ रोजच्या रोज अधिकाधिक अनुकूल होत चालला आहे. कालाच्या उदरांतून नवीन नवीन आशा निर्माण होऊ लागल्या आहेत. या आशावर भिस्त ठेवून उत्तेजनार्थ मांटेग्यूच्या बिलाचें सेवन करून नेटानें चळवळ चालवल्यास पाच दहा वर्षांत यश आल्यावांचून राहणार नाहीं, असा अनुभव शिष्ट मंडळास विलायतेस आला आहे. कार्सनसाहेबाना आयर्लंडच्या होमरूलचें बिल हाणून पाडता आलें, पण हिंदुस्थानच्या स्वराज्याचें लगडेंहि बिल जागच्या जागीं डाबून ठेवता यावयाचें नाहीं. कारण

इंग्लडांतील बिन भाडवलवाला लोकसमूह हिंदी स्वराज्यासंबंधानें आज इतका जागृत झालेला आहे कीं, स्वराज्याचें हे चतकोर हक्क नाकारणाऱ्या भाडवलवाल्याची निर्दय म्हणून छी–थूः करण्यास विलायतेंतील बिन भाडवल-वाला पक्ष आज बिलकुल कमी करणार नाहीं. या छी–थूः ला पार्लमेंट सभेंतील भाडवलवाला पक्ष आज भीत आहे आणि कार्सनसाहेब विरुद्ध गेलें तरी या भीतीच्या जोरावरच डिसेंबरात बिल पास करून घेऊच घेऊ असें बोनर लॉ म्हणत आहेत. सिडेनहॅमी कपूला कार्सन साहेब जरी मिळाले असले तरी या छी–थूः च्या भीतीपुढें त्याचें काहींहि चालणार नाहीं. हें ओळखूनच स्टेटस्मन, इंग्लिशमन वगैरे अँग्लो–इंडियन पत्रें सिडेनहॅम साहेबाची काम करण्याची दिशाच चुकली असा दोष त्याना देत आहेत. लो. टिळक यानीं योग्य दिशेनें काम केलें आणि भलत्याच दिशेकडे सिडेनहॅम वाहत गेलें! बिन भाडवलवाल्याच्या मध्यें काम करून लो. टिळक व राष्ट्रीय सभेचें शिष्टमंडळ यानीं इंग्लडात जें लोकमत आज उत्पन्न केलें आहे त्याची दहशत पार्लमेंट सभेलाहि वाटत असल्यामुळें कार्सनसाहेब निस्तेज होत आहेत. लो. टिळक याचें उदाहरण पुढें ठेवून सिडेनहॅमी कपूनें योग्य दिशेनें लोकमत बनवण्याची जरूरी आहे, अशा आशयाचें उद्गार स्टेटसमन व इंग्लिशमन याच्यासारख्या अँग्लो–इंडियन पत्राच्या तोंडून आज निघावेत याहून चागलें सर्टिफिकीट शिष्टमंडळीच्या कामगिरीला दुसरें कोणतें मिळणार!



# * जुन्नरची झटापट

बेळगावचे प्रसिद्ध पुढारी रा. गंगाधरराव देशपांडे याच्या अध्यक्षतेखालीं जुन्नर येथें गेले बुधवारीं व गुरुवारीं भरलेली पुण्याची जिल्हा परिषद यशस्वी रीतीनें पार पडली, ह्या बद्दल जुन्नरकरांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतो. अध्यक्ष रा. देशपांडे यांजबरोबर लो टिळक पुण्याहून जुन्नरास जात असतांना वाटेंत खेड, मंजर पेठ, नारायणगाव वगैरे ठिकाणी त्याचें थाटाचे स्वागत झालें. जुन्नरास तर त्याच्या मिरवणुकीकरतां सर्व गांव वेशीजवळ लोटला होता आणि सर्व पेठा तोरणानीं व कमानींनी श्रृंगारलेल्या होत्या. अध्यक्ष व लोकमान्य जुन्नराहून परत येताना घोडेगाव येथे लोकमान्यास तेथील रहिवाशाकडून रौप्यकरडकातून मानपत्र समर्पण करण्यात आले. मंचर येथेहि लो. टिळकाचें भाषण झालें. आणि मंचरच्या मुसलमानानीं त्याचे मनःपूर्वक स्वागत केलें. खुद्द जुन्नरच्या मुसलमानांनींहि आपल्या पेठेंत लोकमान्यांना व इतर प्रतिनिधीना बोलावून हिंदु-मुसलमानाची एकी झाल्या-बद्दल आनद व्यक्त केला, आणि गोवध बद करण्याच्या ठरावास आपली समति दिली. मंचरचे मुसलमानानीहि तशीच समति दिली. आणि मशिदी-पुढें वाद्यें वाजविण्याचा प्रश्न आपापसात मिटला जाईल अशी जी आशा व्यक्त केली तीस टिळकानीं पाठिंबा दिला. वरील प्रसगाशिवाय जुन्नरास सार्वजनिक समारंभाच्या स्वरूपाचें दोन तीन प्रसग घडून आले. जुन्नर म्युनिसिपालिटीनें एकमतानें लो. टिळक याना मानपत्र देण्याचें ठरविलें होतें. तें मानपत्र देण्याचा समारभ बुधवारीं रात्रीं झाला. त्यावेळी लोकमान्याचे भाषण ऐकण्यास हजारों लोक जमले होते. शिवाय शाळेच्या ज्या पटागणात

---

* केसरी, ता. ९ मार्च १९२०

जिल्हा परिषदेचा मंडप घातलेला होता, त्यात लो. टिळक ह्याचे रावबहादुर वैद्य यांच्या अध्यक्षतेखाली जे भाषण झालें त्यास दोन तीन हजाराहून अधिक लोक हजर होते. दुसरें दिवशीं सायंकाळीं त्याच जागीं लो. टिळक यांचें अध्यक्षतेखालीं रा. खाडिलकर, प्रो. परांजपे, रावबहादुर वैद्य व रा. दादासाहेब करंदीकर यांचीं भाषणे झालीं. याहि समारंभास आदल्या दिवसाइतकी गर्दी होती. मिरवणुकी, सार्वजनिक व्याख्यानें व पानसुपाऱ्या हे सर्व समारंभ सर्वांस सारखे खुले होते. आणि सर्व वेळीं शेतकऱ्यांचीच विशेष गर्दी होत होती. लोकमत कोणत्या बाजूचें आहे, हें अजमाविण्यास असल्या समारंभाचा चांगला उपयोग होतो. लो. टिळक व राष्ट्रीय पक्ष यांची नालस्ती करून जुन्नरची जिल्हा सभा उधळून देण्याकरितां जेधे झेंड्याखालीं जुन्नरासहि येथील फर्ग्युसन कॉलेजचा व नेमस्तांचा कंपू गेला होता. पण जुन्नरच्या समारंभात जेध्यांचा कंपू वेड्यांचा ठरला आणि

## दर्यामें खसखस

अशी त्यांची स्थिति झाली. त्यांनीं जुन्नरास झटापट करून जुन्नरच्या सभेचा बेरंग करण्याची शिकस्त आपल्याकडून शक्य तितकी केली, पण कांहींच साधलें नाही. तेव्हां जिल्हासभेची तिकिटें न काढलेल्या प्रत्येकास आपल्या सभोंवती गोळा करून राष्ट्रीय पक्षास मनसोक्त शिव्याशाप देण्याची आपली हौस पुण्याहून गेलेल्या तीस चाळीस मवाळांनीं भागवून घेतली. वडाखालील किंवा वडावरील या कावळ्यांच्या कलकलाटांनीं जिल्हासभेच्या कामांत यत्किंचित्‌हि व्यत्यय आला नाहीं; किंवा जिल्हापरिषदेच्या महत्त्वास थोडाहि कमीपणा आला नाहीं. आपले प्रयत्न व्यर्थ जात आहेत असे पाहिल्यावर ज्ञानप्रकाशात ध्वनित केल्याप्रमाणें त्या 'बाहेर' बसलेल्यांच्या सभेस कोल्हापुरी तमाशाचें स्वरूप आलें असल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं.

प्रो. कानिटकर, ना. कामत किंवा चिंचवड संस्थानचे सरकारी ट्रस्टी लक्ष्मण रघुनाथ गोखले वकील ब्राम्हणाना लाखोली वाहणाऱ्या कोल्हापुरी तमाशात सामील व्हावे आणि शिमग्याचा सण प्रत्यक्ष हातातोंडानीं साजरा करणाराचे म्होरके होऊन टिळकांच्या नांवाचा ज्ञानप्रकाशात म्हटल्याप्रमाणें उद्धार केल्याबद्दल त्यांना धन्यता वाटावी हें त्याच्या पराभवानें चिडलेल्या मनःस्थितीचें द्योतक होय. अशा रीतीनें चिडून ग्राम्यपणात शिरण्यांत फर्ग्युसन कॉलेजचे प्रोफेसराना किंवा मुंबई कायदे कौन्सिलच्या नामदाराना कोणतेंहि भूषण नाहीं, हें त्यानीं ध्यानीं ठेवावे नेमस्ताचें जुन्नरास काहीं चाललें नाहीं, ही गोष्ट खरी आहे. त्यामुळे चिडून जाऊन नेमस्तानीं जुन्नरास शिमग्याचा सण किंवा धुळवडीचा सण कसा साजरा केला ह्यासंबधाची जी ग्राम्य वर्णनें त्याच्या पत्रातून प्रसिद्ध झालीं आहेत त्याजकडेहि आम्हास लक्ष देण्याचें कारण नाहीं. जुन्नरची जिल्हासभा बेरंग करण्याचा

## नेमस्तांचा कावा

सभेच्या पूर्वी थोडे दिवस उघडकीस आला. जुन्नरच्या स्वागत कमिटीनें ठरविलेले सभेचे दिवस आपणास सोयीचे नाहींत असा त्यानीं प्रथम गिल्ला आरंभिला. आपणाप्रमाणें नारायणगावच्या लोकानाहि हे दिवस मान्य नाहींत आणि नारायणगावच्या लोकानीं सार्वजनिक सभा भरवून तसा ठरावहि पास केला, असे ज्ञानप्रकाशनेंहि प्रसिद्ध केलें! पण नारायणगावचे रां. धुमाजी पाटील यानीं आपल्या सहीचें पत्र जुन्नरकराना पाठवून नारायणगावास असली जाहीर सभा भरली नाहीं, असला ठराव पास झाला नाहीं, व सभेचें दिवसहि नारायणगावास अमान्य नाहींत, असे स्वच्छ कळविलें. सभेच्या तारखा पुढें ढकला, वेळ मागें पुढें घ्या, असें झालें तर तसें करा व तसें झालें तर असें करा, अशी एकसारखी कुरकुर करून सभेच्या

कामांत व्यत्यय आणावयाचा आणि धादलींत सभा उधळून द्यावयाची, एवढा ज्याचा हेतु त्यानीं खोट्या सभाची व ताराची हकीकत आपल्या वर्तमानपत्रातून प्रसिद्ध करूं नये तर करावें तरी काय? सभेच्या वेळेंत ढवळाढवळ करता येत नाहीं असे पाहिल्यावर शेतकऱ्याच्या प्रतिनिधींना सभेत फुकट घेण्याच्या नावाखालीं आपलें गुंड सभेंत घसडून सभेचा बेरग करण्याचा उद्योग नेमस्तानीं आरभिला. स्वतःच्या दुष्ट कृत्यावर सैतानास बायबलाच्या वचनाचें पाघरूण घालावेसे जसे वाटतें तसेच मवाळानींहि ह्या प्रसगीं केलें. मुंबईच्या स्पेशल कॉंग्रेसपासून मवाळानीं आपली स्वतत्र परिषद काढली व कॉंग्रेसमधून अग काढून घेतलें. प्रामाणिकपणाच्या दृष्टीनें विचार करावयाचा असल्यास पुण्याच्या मवाळानींहि कॉंग्रेसच्या कारभारात ढवळाढवळ करणें अप्रशस्त होय, पण कॉंग्रेसच्या ठरावाच्या पाघरुणाखालीं कॉंग्रेस पक्षाची जिल्हा परिषद उधळून देतां आली तर कमी का करावें? ह्या सैतानी विचारानें मवाळाना घेरल्यामुळे ते त्या उद्योगास लागले. दिल्लीच्या कॉंग्रेसमध्यें जसे शेतकऱ्याचे प्रतिनिधीं फुकट घेण्यात आले होते; त्याप्रमाणें जुन्नरच्या जिल्हा सभेंसहि फुकट घेण्यात यावे, असा त्यानीं बूट काढला. जुन्नरच्या आसपासच्या शेतकऱ्याना त्यानीं कळविलें कीं, सभागृहात बेलाशक शिरून पुढच्या जागा पटकावण्याचा अधिकार तुम्हास आहे; तेव्हा तुम्ही बेलाशक आत घुसा आणि कोणाचें काहीं ऐकू नका. असा उपदेश करण्यास कमी झालें नाहीं; पण उपदेश करणाराइतके जुन्नरचे शेतकरी वेडे नसल्यामुळें हा उपदेश मात्र कोणास पटला नाहीं. मारामारी करणारे गुंड अशा रीतीनें तयार झाले आहेत, तुम्ही सेनापती होण्यास धावून या असें पुण्यास कळविण्यात आल्यावरून पुण्याचे पचवीस तीस म्होरके जुन्नरास गेले, पण सैनिकाच्या ऐवजीं कोल्हापुरी तमासगीरच

त्याच्या दृष्टीस पडल्यामुळें तमाशात स्वतःच सोंगें घेण्यावरच सेनानायक होण्याची हाव त्याना भागवून घ्यावी लागली. जुन्नरास येण्याबरोबर ना. कामत यानी जिल्हा सभेचे बुधवार सकाळचें काम सागत असताना रा. देशपाडे याना लेखी कळवले कीं, शेतकऱ्याना मोफत घेण्याचा प्रश्न जिल्हा सभेनें आता हातीं घ्यावा. जिल्हा सभेपुढें लगेच प्रश्न न माडता सब्जेक्ट कमिटीपुढें सदर प्रश्न माडण्याचें अध्यक्षानीं ठरविल्यामुळे नेमस्तापैकी दहा इसमाना प्रतिनिधींची फी भरावी लागली. नेमस्ताची कुरकुर राहू नये म्हणून दहाचे दहा नेमस्त सब्जेक्ट कमिटींत घेण्यात आले होते. ८०।९० इसमाच्या सब्जेक्ट कमिटींत नेमस्ताना कोणीहि पाठिराख्या मिळाला नाहीं, ही ध्यानात ठेवण्यासारखी गोष्ट होय. जुन्नरच्या जिल्हासभेची हकीकत आज दुसरीकडे दिली आहे. तिजकडे पहाता पाच सहाशे प्रतिनिधींत निम्म्याहून अधिक शेतकरी होते, हे वाचकाच्या ध्यानीं येईल. शेतकऱ्याचा एवढा मोठा भरणा सभेंत व सब्जेक्ट कमिटींत हजर असताना नेमस्तांना त्यांत कोणीहि अनुयायी मिळूं नये याचा अर्थ काय? नेमस्ताचा कावा समजण्याइतकी व्यवहारदक्षता आमच्या शेतकरी वर्गात आहे, हें त्यावरून सिद्ध होत नाहीं काय? दिल्लीच्या कॉंग्रेसने शेतकऱ्याना फुकट घेण्याचा जो ठराव केला आहे तो पाहिजे तितक्याना व पाहिजे त्याना आत घुसण्यासाठीं नाहीं. प्रातिक कॉंग्रेस कमिटीने निवडल्यास आणि गरिबीमुळे फुकट घ्यावें अशी शिफारस केल्यास एक हजार पावेतों 'किसान' प्रतिनिधींना फी माफ करण्यांत यावी, असे कॉंग्रेसचे म्हणणें आहे. जिल्हा परिषदेची फी थोडी, आणि जिल्हा सभेस निम्याहून अधिक प्रतिनिधी शेतकरी वर्गाचे येतात ही स्थिती ध्यानात घेऊन पन्नासापेक्षा अधिक प्रतिनिधी फुकट घेण्याचें सब्जेक्ट कमिटीनें सहाजिक नाकारले. या पन्नासाना निवडण्याचा

व शिफारस करण्याचा हक्क तालुका कॉंग्रेस कमिट्याकडे आला; आणि प्रत्येक तालुका कॉंग्रेस कमिट्यानीं योग्य अशा पाच पाच शेतकऱ्याची शिफारस करावी असें ठरलें. कॉंग्रेसच्या ठरावाना अनुसरून ना. कामत याच्या सूचनेचा अशा रीतीनें संग्रह करण्यात आल्यामुळे कोणाहि कॉंग्रेस-भक्तास वाईट वाटण्यास बिलकुल कारण राहिलें नव्हतें. पण गुंड सभागृहांत घुसवून सभेंत व्यत्यय आणण्याच्या इराद्यानें जुन्नरास गेलेल्याचें समाधान त्यामुळे कसे होणार ! आपल्या हातचा हाहि बाण फुकट जातो असे पाहून पुण्याच्या मवाळाना राग आला, आणि नंतर सब्जेक्ट कमिटीशिवाय जिल्हासभेच्या बैठकींत त्यानीं पाऊलहि ठेवलें नाही. माटेग्यूच्या कायद्या-संबधानें राष्ट्रीय सभेच्या ठरावातील असमाधानकारक व निराशाजनक वगैरे शब्द काढून टाकून ना. सिंहाचेहि आभार मानावे, मुलींचें सक्तीचें शिक्षण झाले नाहीं तर मुलानाहि शिक्षण देऊ नये वगैरे वादाचें प्रश्न सब्जेक्ट कमिटीत मवाळानी आणले होते, पण त्याच्या कोणत्याहि प्रश्नाचीं डाळ शिजली नाहीं. जुन्नरच्या जिल्हा परिषदेनें

## राष्ट्रीय सभेचा कार्यक्रम

पसंत केला. आणि जिह्यातील प्रश्नाचा विचारहि राष्ट्रीय सभेच्या धोरणाला अनुसरूनच केला. माटेग्यूसाहेबाचा कायदा पास झाल्यापासून राष्ट्रीय सभेचा पक्ष आणि मवाळाचा पक्ष असे दोन पक्ष चोहोंकडे झाले आहेत. नव्या कायद्याप्रमाणें मुंबईच्या व वरिष्ठ सरकारच्या कायदे—कौन्सिल-राची निवडणूक येत्या सप्टेंबर—आक्टोबर महिन्यात व्हावयाची असल्यामुळे राष्ट्रीय सभेस असलेली लोकमताची अनुकूलता बरी वाईट होईल त्या तऱ्हेनें कमी करण्याचा उद्योग मवाळाकडून सांप्रत होत आहे. जुन्नराच्या चेष्टाहि ह्या उद्योगानीलच एक भाग होत. एखाद्या वडाखाली थोडयाश्या कावळयाचा

शिमगा करून लो. टिळकांच्या नावाचा उद्धार केल्यानें राष्ट्रीय सभेची छाप कमी होईल असें ह्या मवाळांना वाटलें एवढीच त्यांत शोचनीय गोष्ट होय. पण एका दृष्टीनें नेमस्तांच्या पुढाऱ्यांना हे ग्राम्य प्रकार टाळतां येण्यासारखे नाहींत. सप्टेंबर—ऑक्टोबरमधील निवडणुकीकरतां उभे रहाण्यास मवाळांचें हातापायांत स्वतःचें बळ नाहीं, तेव्हां त्यांना कोल्हापुरी तमाशगिरांची मदत घेणें भाग आहे; या तमासगिरांनीं स्वतःप्रमाणें त्यांना रंगविल्यास त्याबद्दल मवाळांनीं कुरकुर करून कसें चालेल. ज्यांच्या जोरावर उभे रहावयाचें त्यांचा रंग आपल्या चेहऱ्यावर उमटून घेतलाच पाहिजे. असली ग्राम्य सोंगें आणण्यांत जनलज्जेची जरी मवाळांना फिकीर नसली तरी अधिकारी काय म्हणतील याची काळजी मवाळांनीं नको कां बाळगावयाला? पण मवाळांना तीहि धास्ती राहिलेली नाहीं. अमृतसरच्या राष्ट्रीय सभेची लोकमतावरील छाप कमी करण्याचा उद्योग नोकरशाहीच्या कांहीं अधिकाऱ्यांनीं चालविला असून मॉटेग्यूसाहेबांच्या बहाल केलेल्या देणगीवर पूर्णपणें खूष न होणें म्हणजे उपद्व्यापीपणा करणें होय. आणि राष्ट्रीय सभेच्या असल्या उपद्व्यापी लोकांना निवडणुकींत निवडून देऊं नका अशा आशयाचें सरकारी छापखान्यांत इंग्रजी भाषेंत छापलेलें सरकारी चिटोरे जिल्हापरिषदेंत वाटण्यांत आलें. ग्राम्य नाच नाचण्यांत मवाळांना नाचवतो कोण याचा खुलासा या चिटोऱ्यानें केला. 'बोलविता धनि वेगळाचि' हें या चिटोऱ्यावरून ध्यानांत आलें. लोकांनीं संतुष्ट रहाण्यास आतां हरकत नाहीं आणि राष्ट्रीय सभा उपद्व्यापी आहे हें सिद्ध करण्यास मनूसाहेबांच्या ११० वर्षांपूर्वींच्या उद्गाराबरोबरच कोल्हापुरांत मस्कत वर्षें राहिलेल्या एका बाईची साक्ष या पत्रकांत दिलेली आहे. सप्टेंबर—ऑक्टोबरच्या निवडणुकी होऊन जाईपर्यंत असली आणखीन

कित्येक चिटोरी सरकारी डाकसळींतून बाहेर पडतील आणि ह्या पत्रकांचा उपयोग झाला असा बोध, शिमगा नसतांहि, मवाळ पक्ष पुढील पांच सहा महिनें भारीत सुटेल मात्र कशाय नाहीं. मवाळ, कोल्हापुरी ब्राह्मणेतर व सरकारी पत्रकें या तिघांचा संगम जुन्नरास होऊन राष्ट्रीय पक्षास चीत करण्याकरतां जुन्नरास मोठी झटापट झाली. ह्या झटापटींत राष्ट्रीय सभेचा पक्ष विजयी झाला, आणि निवडणुकीच्या विजयाचा प्रारंभ श्री शिवछत्रपतींच्या जन्मस्थानींच झाला, हा राष्ट्रीय पक्षास निवडणुकीसंबंधानें शकुनच होय. राष्ट्रीय सभेची मातब्बरी कमी करण्याचा यत्न मवाळांकडून व सरकारी पत्रकांकडून करण्यात येईल तर त्यासंबंधानें निवडणुकीच्या वेळीं जपा, असा सर्वांना उपदेश लो. टिळक व अध्यक्ष रा. गंगाधरराव देशपांडे ह्यांनी केला; आणि निरनिराळ्या सभांस जमलेल्या शेतकऱ्यांनाहि तो पूर्णपणें पटला. राष्ट्रीय सभेचा कार्यक्रम शेतकरी वर्गास पटण्यासारखा आहे किंवा कसें हें जुन्नरास ठरावयाचें होतें. सदर प्रश्नाचा निकाल राष्ट्रीय पक्षास उत्तेजन देणारा झाला ही संतोषाची गोष्ट होय. माँटेग्यू–साहेबांनीं जेवढें दिलें आहे तेवढेंहि आमच्या पदरात न टाकण्यास नोकरशाही धडपड करील हें समजण्याइतका आमचा लोकसमूह चतुर आहे. बादशाही जाहीरनाम्यातील बादशाही आज्ञेप्रमाणें नोकरशाहीस वागावयास लावल्याशिवाय स्वराज्याचें पूर्ण हक्क कधींहि लौकर मिळावयाचें नाहींत, हें समजण्याइतकी व्यवहारदक्षता सामान्य लोकांत खात्रीनें आहे. नावाच्या ग्रामपंचायती निर्माण करून खेड्यातील घरावर कर बसविण्याची संधी साधण्यापेक्षां ग्रामपंचायतींना घरपट्टी बसवण्याचा व आरोग्य राखण्याच्या हक्काबरोबरच गांवच्या जंगलाचें, गुरुचराईचें, पीक पाण्याची पहाणी करून आणेवारी ठरविण्याचें आणि दिवाणी, फौजदारी लहान सहान खटले

चालविण्याचें हक्क असल्याशिवाय खेडयापाडयातील पंचाना महत्व यावयाचें नाहीं, हे न समजण्याइतका भोळा शेतकरी महाराष्ट्रांत क्वचितच सापडेल, लोकाना दारू नको आहे, आणि करांचाहि बोजा अधिक वाढवून घेण्याची लोकाची इच्छा नाही. अशा स्थितीत सरकारी खात्यांत काटकसर करवून ते पैसे लोककल्याणाकडे खर्च करणारा पक्ष सोडून देऊन नोकरशाहीला 'जो हुकूम' करणारा व शेतकऱ्याकर नवे कर लादणारा मवाळ सामान्य जनसमूहाला कसा पसंत होईल. लोककल्याणाचे व नव्या कराचें प्रश्न जर समाधानकारक रीतीनें सोडवावयाचे असले तर हिंदुस्थान सरकारचें बजेट व जकातीचे खाते लोकाचें हातीं पाहिजे, असे म्हणणाऱ्या पक्षाची सरशी जर या निवडणुकीत झाली नाहीं तर हक्काच्याहि दृष्टीनें लोकाची फसवणूक होऊन शक्तिबाहेर नवें कर बसल्यानें पैशाच्याहि दृष्टीनें लोकाची नागावणूक होईल, अशी जुन्नरच्या जिल्हापरिषदेची शिकवणूक आहे.

---

# * लोकमान्यांची शिकवणूक



लोकमान्याच्या चरित्राकडें गेल्या आठवड्यांत सर्व हिंदुस्थानचें लक्ष वेधलें गेले होते आणि ठिकठिकाणच्या पुढाऱ्यानी लोकमान्याच्या शिकवणी-संबधानें आपापलीं मतें सभांतून व वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध केलीं आहेत. यापैकी काही मते आजचे अकात दुसरीकडे दिली आहेत. चाळीस वर्षांपूर्वीचा हिंदुस्थान व आजचा हिंदुस्थान याच्यांत मोठे अंतर पडलें असून राष्ट्रीय ज्योत उत्पन्न करण्याचा व तिला जोमात आणण्याचा मान सर्व पुढाऱ्यानीं मिळून लोकमान्याना आज दिला आहे. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर याच्या अंतःकरणात जी स्वदेशाभिमानाची, राष्ट्रीयत्वाची व आत्मविश्वासाची ज्योत जळत होती तीच ज्योत लोकमान्य टिळक याच्याहि अंतःकरणात अगदी लहानपणापासून जळत होती. चाळीस वर्षांपूर्वी सरकारी नोकरी करून फावल्या वेळात राज्यकर्त्यांनी घालून दिलेल्या किस्त्याला अनुसरून देशहिताकडे लक्ष पुरविण्याचा प्रघात होता. ही रूढी कै. चिपळूण-कर याजबरोबर लो. टिळक यानीं पार झुगारून दिली. दरमहा तीस रुपयावर संसार चालवून त्यानी डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या शाळाची स्थापना त्यावेळी केली. आपले राष्ट्र एका काळीं मोठे होते, ते तसेच पुनः मोठे झाल्यावांचून रहाणार नाहीं, आणि तसे घडवून आणण्यास लागणारें गुणहि आज आमच्या अंगी आहेत, हा मंत्र कै. चिपळूणकर यानी आपल्या सर्व लेखात एकसारखा जपला आहे, हाच मत्र लो. टिळक यानीं आपल्या चाळीस वर्षाच्या सार्वजनिक आयुष्यांत एकसारखा लोकाच्या पुढे ठेवला, अनुभवानें खरा करून दाखविला आणि सर्व लोकाच्या दृष्टीस पडेल एवढे

* केसरी, ता. १० आगष्ट १९२०

प्रत्यक्ष फळहि लोकांपुढें मांडून ते स्वर्गवासी झाले. कै. चिपळूणकर यांच्याबरोबर नवीन हिंदुस्थान निर्माण करण्याचें जें पुण्यकर्म त्यांनीं आरंभिलें तें स्वतःच्याच आयुष्यांत चाळीस वर्षांत त्यांनीं शेवटास नेलें. जुनी रूढी मोडली व नवी अंमलात आली, देशकार्य करण्याची जुनी पद्धत नामशेष झाली, नवी जोरावली, ही नवी पद्धत जोरावत जाऊन तिचीं फळेंहि दूर अंतरावर कां होईनात प्रत्यक्ष दिसूं लागलीं. फळें दिसूं लागतांच लोकमान्यांचें आयुष्य संपलें, त्यांचा उपभोग घ्यावयाला ते राहिले नाहींत, किंबहुना त्याकरिता त्यांचें आयुष्य नव्हतेंच. जीं बीजें त्यांनीं चाळीस वर्षांपूर्वीं हिंदुस्थान या भूमींत पेरलीं त्या बीजांचीं रोपें जोमानें वाढीस लागण्यापुरतेंच त्यांच्या आयुष्याचें कार्य विधात्यानें आखलें होतें. परमेश्वरानें त्यांजवर सोंपविलेलें काम त्यांनीं किती उत्तम रीतीनें पार पाडलें हें ज्यांना पहावयाचें असेल त्यांनीं लोकमान्यासंबंधानें, सर्व हिंदुस्थानच्या सर्व पुढाऱ्यांनीं काढलेले उद्गार अवश्य वाचावे. आज पृथ्वीतलावरील भाग्यवान म्हणून समजल्या जाणाऱ्या राष्ट्रांच्या वैभवाइतकें मोठें वैभव हिंदुस्थानाला एक वेळ होतें आणि त्या वैभवाला आजचा हतभागी हिंदुस्थान पुनः गांठल्यावांचून राहणार नाहीं, अशी नुसती भावना असून काय उपयोग ? त्या भावनेप्रमाणें प्रत्यक्ष गोष्टी घडून येण्यास हिंदुस्थानांत जर शक्ति उत्पन्न झाली नाहीं तर ही भावना निरर्थकच होय ! एकट्यादुकट्याच्या किंवा शें-पन्नास लोकांच्या मनांत ही भावना उत्पन्न झाल्यानें शक्ति प्रादुर्भूत होत नसते. कुदळीच्या घेऱ्याला आणि परदेशाच्या [illegible] जिच्या जोमानें आळा बसेल एवढी मोठी शक्ति उत्पन्न झाली पाहिजे. ही शक्ति उत्पन्न करण्याकरितां नाना प्रकारचे उद्योग करण्यास चाळीस वर्षांपूर्वीं त्यांनीं आरंभ केला, गेलीं चाळीस वर्षें अशाच प्रकारच्या उद्योगांत त्यांनीं घालविलीं व जे आजहि त्या उद्योगांत आयुष्य घालवीत आहेत, त्या सर्वांचे

पुढारी लो. टिळक हे होते. निद्रित देशास जागें करणें, आणि योग्य दिशे-कडे त्याचें तोंड फिरवून जरूर तीं शिधासामग्री त्याजबरोबर देऊन त्याला मार्गी आक्रमण करावयास शिकविणें ही कामगिरी अत्यंत दुर्घट आहे. लोक जागेच होत नाहींत, जागे झालें तरी डोळे उघडीत नाहींत, डोळे उघडले तरी नीट पहात नाहींत, पाहिलें तरी हातपाय हालवीत नाहींत, उभे रहात नाहींत; या सर्व क्रिया करण्यास लहान मुलास अत्यंत ममताळूपणानें, एक-निष्ठेनें आणि पुढील थोरपणाच्या विश्वासानें आई ज्याप्रमाणें शिकविते त्याप्रमाणेंच पुढाऱ्यांनीं देशाला वाढीस लावावें लागतें. आपले पूर्वज मोठे होते आणि चिमुकलें अर्भकहि त्याच मोठेपणास चढणार आहे, अशी दृढ-निष्ठा जशी वीरमातेच्या अंगीं असते, तशीच दृढनिष्ठा लोकमान्यांच्या अंगीं होती. आयुष्यभर त्यांनीं जें पाळलें तें या सत्याचें व्रत पाळलें! आपल्यांतलाच पुढारी सतीचें व्रत स्वतांत भिनलेल्या वीरमातेसारखा असावा लागतो. लोकमान्य टिळक तसेच होते. नव्या नव्या जोमाचा हिंदुस्थान त्यांनीं जन्मास घातला आणि तो तारुण्याच्या कल्याणप्रद अवस्थेच्या जवळ आणून पोंचविला, असे जे त्यांच्याबद्दल उद्गार काढण्यांत आले आहेत ते अक्षरशः खरे आहेत. मातेचा स्वार्थत्याग त्यांच्या अंगीं पूर्णपणें भिनलेला होता. ह्या स्वार्थत्यागाचा प्रवाह सर्व आयुष्यभर रोजच्याहि नित्यक्रमांत एकसारखा वाहत होता. आपलें शरीर जितकें देशकार्यार्थ झिजवितां येईल तितकें झिजविलें पाहिजे, आणि लहानथोर, खाजगी किंवा सार्वजनिक, हरएक प्रसंगीं तीच वृत्ति कायम ठेवली पाहिजे, एरवीं स्वार्थत्यागाचें बळ सर्व देशाकडून गिरविलें जावयाचें नाहीं, असें त्यांचें ठाम मत होतें आणि त्याप्रमाणे ते वागतहि होते

निरंतर एकसारख्या वाहणाऱ्या या स्वार्थत्यागाच्या प्रवाहाला वीरवृत्तीची योग्य प्रसंगीं जोड देण्यास लोकमान्य कधींहि चुकले नाहींत. सरकारी नोकरी

करून फावल्या वेळात देशकार्य करण्याची रूढी हिंदुस्थानच्या मनांतून खाडकन उतरून टाकण्याकरिता अत्यंत साधेपणानें आणि मूठभर वस्तूवरच उपजीविका करण्याचें तापसाचें व्रत त्यांनी ऐन तरुणपणी वीरवृत्तीनें स्वीकारलें. असल्या वीरवृत्तीमुळेच स्वार्थत्यागी होण्याच्या धड्याकडे हिंदुस्थानचें लक्ष आपोआप लागलें. सरकारशीं झगडत असतांना अंगात संचार झाल्या-सारखे ते उसळत असत; आणि सरकारच्या शक्तीमुळे त्यांना कारा-गृहवासाचे तीन प्रसंग आले असताहि पुनः त्या त्या प्रसंगास कवटाळण्यास ते प्रेमानें धावत जात असत. यातलें इंगित झालें तरी त्यांच्या रक्तात भिनलेली महाराष्ट्राची वीरवृत्तीच होय! स्वतःच्या लोकाकडे बघण्याची त्यांची दृष्टि आईची होती. आणि राज्यकर्त्यांकडे पहाण्याची त्यांची नजर वीराची होती. तीन लेखामुळे ते तीनदा तुरुंगात गेले, सदर तीनहि प्रसंगाचे लेख त्यांच्या हातचे नव्हते. आपल्या हातचे हे लेख नव्हते याबद्दल तक्रा-रीचा एकहि शब्द त्यांनी कधी उच्चारलेला नाहीं. हुकूम होताच शूर शिपायानें ज्याप्रमाणें लढाईच्या गर्दीत शिरावे आणि आपले सर्वस्व स्वदे-शास अर्पण करण्यास तयार व्हावें, त्याप्रमाणे दुसऱ्याचें लेख असताहि परमेश्वरी कार्य तडीस नेण्यास ही चांगलीं संधि आपणास मिळाली आहे असें समजून लोकमान्यांनीं जाणूनबूजून तुरुंगाचा रस्ता पत्करिला. रोजच्या नित्यक्रमात, नेहमींच्या चळवळीत आणि राष्ट्रीयत्वाच्या वाढीला जरूर असणाऱ्या निरनिराळ्या संस्थात आईप्रमाणे 'कुसुमाहुन मृदु' असणारे लोकमान्यांचें अंतःकरण सरकारशीं झगडतांना 'वज्रादपि कठोराणि' असल्या वर्णनाला शोभण्याइतके वीरवृत्तीनें नटून जात असे. स्वदेशावर प्रेम आणि निरंतरच्या स्वार्थत्यागाच्या प्रेरणेनें अडथळ्यांशीं झगडणारी वीरवृत्ति हे दोन गुण सर्व देशास खडबडून जागे करण्यास आणि बहुतेकांचीं अंतःकरणें

देशकार्याकडे वेधून घेण्यास पुरेसे झाले.

लोकमान्याच्या अगच्या या दोन मोठ्या सद्भावना होत. गजाननाचा व श्रीशिवाजी महाराजाचा महोत्सव व इतर राष्ट्रीय महोत्सव या सर्वांची सेवा ते सद्भावानें करीत असत. वरील दोन सद्भावना सर्व चळवळीच्या प्रसंगी त्याना पूर्णपणें चळवळींत पडण्यास लावीत असत. या दोन सद्भावनामुळेच खासगी संबधात त्याचें चरित्र अत्यत निष्कलक झालें. सार्वत्रिक बाबीत लोकमान्याचा द्वेष अत्यत तीव्रपणे करणारानाहि त्याचें खासगी वर्तन पराकाष्ठेच्या निर्मलतेचे होतें अशीच कबुली द्यावी लागेल. खाजगी वर्तनास आणि सार्वजनिक चारित्र्यास असा नाही तसा डाग लावता आला तर लावावा म्हणून ताईमहाराजाच्या खटल्याचें शुक्लकाष्ट बारापधरा वर्षे त्याच्यामागे एकसारखे लावण्यात आलें होतें. मडालेच्या तुरुगातील सहा वर्षांच्या शिक्षेहूनहि ताईमहाराजाच्या खटल्याचा ताप त्याना अधिक झाला. वीर पुरुष झाला तरी तो नेहमींच धनुष्यावर दोरी चढवून बसलेला नसतो. पण ताईमहाराजाच्या खटल्यात त्याना एकसारखे रणागणावर शत्रूचे घाव सोशीत उभे रहावें लागलें. १८९७ सालचा खटला आणि १९०८ सालचा खटला याच्यात जर ताईमहाराजाच्या आणि त्यातूनच निघणाऱ्या चिरोलसाहेबाच्या खटल्याच्या यातनाची भर घातली तर चाळीस वर्षांच्या सार्वजनिक स्वरूपाच्या आयुष्यात शत्रूच्या बाणानी स्वतः जर्जर होत असताना बाण लाव व सोड, अशी लढाई लढण्यात वीस वर्षें बळवतरावजीनीं घालविलीं असें म्हणणें भाग येतें. चाळीस वर्षांच्या हिशेबात रात्री वजा केल्या, तर प्रत्यक्ष सूर्यालाहि वीस वर्षांहून अधिक काम पडत नाही. असला स्वार्थत्यागी लढवय्या सर्व हिंदुस्थानास जागृत करण्यास पुढे आला, हें हिंदुस्थानचें परम भाग्य होय!

हिंदुस्थानच्या अभ्युदयाकरिता गेल्या चाळीस वर्षांत सूर्यासारखी त्यांनीं मेहनत केली आहे, एवढेंच नव्हे तर "या निशा सर्वभूतानां तस्या जागर्ति संयमी" या न्यायानें निरनिराळ्या लढायामधला विसाव्याचा काळहि त्यानीं देशकार्याकडेच खर्च केला. चाळीस वर्षांत वीस वर्षें लौकिक सूर्य निजतो; तो निजण्याची वेळहि लोकमान्यानीं जागून काढली. रणभूमीपासून जबरदस्तीने सरकारनें त्याना नेऊन मंडालेंत सहा वर्षें कोंडून ठेवलें; तेथेंहि त्यांच्या अंतःकरणानें व बुद्धीनें विसावा घेतला नाहीं. गीतारहस्यासारखा अलौकिक ग्रंथ असल्या रात्रींच्या समयीं रात्रींचा दिवस करून त्यांनीं लिहून काढला. झगडण्याच्या उद्योगाला विसावा म्हणजे तत्त्वज्ञानाचें मनन होय, असें ते नेहमीं म्हणत असत. वेद, वेदांगें, इतिहास व पुराणें यांचा अभ्यास, अंगीकृत कार्यांत ध्यावयास लावणारा विसावा म्हणून ते करीत असत. निम्मा काळ त्याचा झगडण्यात गेला आणि निम्मा काळ ज्ञानाच्या चिंतनांत गेला. त्याना आळस माहीतच नव्हता. लहान मुलें खेळण्यांत जशीं गर्क असतात, तसे ते लढाई चालू असली म्हणजे एकसारखे उद्योगात गर्क असत; आणि मध्यें मध्ये सृष्टिनियमाप्रमाणें लढाई थाबली म्हणजे तत्त्वचिंतनात ते काळ घालवीत. त्याचें लढणें त्या त्या वेळेपुरतें आणि त्यापुढच्या वेळेस योग्य तें वळण देण्यापुरतें होतें. असलें लढणें राष्ट्राच्या इतिहासांतील निरनिराळे दुवे होत ! हे दुवे मागच्या परपरेला चिकटलेले असतात आणि पुढच्याहि परंपरेला प्रसवीत असतात. पण प्रत्येक दुवा, प्रत्येक लढाई, त्या त्या काळापुरतीच मुख्यत्वे असते. दुव्यांना मागच्या परंपरेशीं संलग्न होण्याचें जें सामर्थ्य येतें तें तत्त्वविचाराच्या चिंतनानें; या दुव्यांना पुढील अभ्युदय उत्पन्न करता येतो तो परमेश्वरी स्वरूपाच्या मननानें ! लो. टिळक यांचें चरित्र भूतकाळाला व्यापून पुढील इतिहासावर पसरलेलें दिसत आहे. ह्याचें कारण तत्त्वज्ञानाचा निदिध्यास लढत असतांनाहि करीत राहण्याइतकी

परमेश्वरी भक्ति त्यांच्या अंतःकरणांत अखंड वसत होती हेंच होय ! गीतारहस्य हें पुस्तक त्या भक्तीचें फळ होय ! हिंदुस्थानच्या अभ्युदयाचीं गोड फळें उपभोगण्याचा काळ आल्यावर त्यांच्या चरित्रातील लढाया आजच्याइतक्या प्राधान्येंकरून लोकांच्या नजरेपुढें उभ्या रहाणार नाहींत !! कालाच्या ओघानें त्या लढाया विसरून जाण्याचेहि दिवस हिंदुस्थानास येतील; पण तशा त्या वेळीं देखील 'गीतारहस्य' कोणीहि विसरूं शकणार नाहीं! पिढ्यान्‌पिढ्यांना वळण देणाऱ्या लढायात लोकमान्यांच्या राजकीय झगड्याची गणना होईल, पण चारचारशें, पाचपाचशें वर्षें ज्या तत्त्वज्ञानाची शिदोरी सर्व राष्ट्राला पुरते, तसलें कर्मयोगाचें तत्त्वज्ञान लोकमान्यांनीं गीता-रहस्यात लोकांच्या पुढें मांडलें आहे. राष्ट्रीय जीवनाला, राष्ट्रीय सद्भावाला, राष्ट्रीय स्वार्थत्यागाला आणि राष्ट्रीय वीरवृत्तीला सर्व काळीं व सर्व स्थळीं पाठिराखें होणारें तत्त्वज्ञान नव्या हिंदुस्थानास पाहिजे होतें. स्वतः तसा अनुभव घेऊन आपल्या चरित्राची शिकवणूक लोकमान्यांनीं गीतारहस्यात लिहून ठेवली आहे. गीतारहस्यातील शिकवणुकीला उदाहरणादाखल त्यांचें चरित्र आहे. आधी केलें मग सांगितलें, असा त्या दोहोंचा परस्परनिकट संबंध असल्यानें त्यांचें चरित्र व शिकवणूक यात बिलकूल अंतर नाहीं.



# * स्वतः संबंधानें.

लोकमान्य टिळक पब्लिशिंग कंपनीचें हें रोजचें दैनिक पत्र आज वाचकांची प्रथम भेट घेत आहे. कै. बाळ गंगाधर टिळक यांना गुरुस्थानीं मानणाऱ्या मंडळींना मुंबईस टिळक पक्षाचें रोजचें वर्तमानपत्र असावें अशी उत्कट इच्छा झाल्यामुळें लोकमान्य टिळक पब्लिशिंग कंपनी स्थापण्यात आली आणि आपल्या पुढाऱ्याचें नित्यस्मरण घडावें म्हणून या दैनिकास 'लोकमान्य' हें नाव ठेवण्यात आलें. स्वराज्य हें ध्येय पुढें ठेवून कै. बाळ गंगाधर टिळक यानीं आपल्या सर्व चळवळी चालविल्या होत्या. त्याच्या राजकीय चळवळीचा आत्मा स्वराज्य होता. राजकीय चळवळ चालवीत असताना त्याच्या प्रत्येक शब्दात व प्रत्येक पावलात स्वराज्य दृष्टीस पडत होतें. राजकीय चळवळीशिवाय ऐतिहासिक, औद्योगिक, सामाजिक व धार्मिक ज्या ज्या बाबींत त्यांनीं मन घातलें त्या त्या बाबींकडे त्यानीं स्वराज्याच्याच दृष्टीनें पाहिलें. पचांग संशोधनाचें काम असो, महाभारताचा काळ ठरविण्याचें काम असो, किंवा वेदातील ऋचाचा अर्थ लावण्याचें काम असो, सर्व ल्हान थोर नद्याचे ओघ अखेर स्वराज्याच्या सागराला कसे जाऊन मिळतील याविषयींची काळजी ते रात्रदिवस वहात असत. संसारातील हरएक प्रकारच्या उद्योगाना व पराक्रमाना उचलून धरणारें तत्वज्ञान राष्ट्रामध्ये प्रचलित असल्याशिवाय स्वराज्याच्या उच्च पदवीला कोणतेंहि राष्ट्र चढूं शकत नाहीं. भारतभूमीच्या स्वराज्याची उभारणी व जोपासना नीट व्हावी म्हणून गीतारहस्यासारखे तत्वज्ञानाचें पुस्तक लोकमान्यांनीं लिहिलें. वाङ्मयाची सेवा असो, किंवा तात्विक सिद्धांत

* लोकमान्य, ता. ९ माहे एप्रिल १९२१

स्थापण्याचा उद्योग असो, स्वराज्याच्या अचल ताऱ्याकडे पाहून लोकमान्य टिळक नेहमीं आपल्या बुद्धीला चलन देत असत. जेथें स्वराज्याचा संबंध येत नसे तेथें त्याची बुद्धि बिलकुल हालचाल करीत नसे. स्वराज्याशिवाय इतर सर्व बाबींसंबंधानें असहकारिता स्वीकारावयाची असा त्यांच्या बुद्धीचा स्वाभाविक बाणा होता. स्वराज्यासंबंधाच्या कामात अडथळे आले म्हणजे त्याना अधिक स्फुरण चढत असे, आणि ते अडथळे दूर करताना नाना प्रकारचे जे क्लेश त्याना सोसावे लागत ते क्लेश सुखविलासाप्रमाणें ते मोठ्या हौसेनें सोशीत, अशी त्याच्या बुद्धीची ठेवण होती. बुद्धीच्या असल्या रचनेलाच अनन्यभक्ती असे म्हणतात. स्वराज्याविषयीची अनन्य भक्ति आमच्यासारख्या त्यांच्या शिष्यांच्या अंगी जितकी असावयाला पाहिजे तितकी नाहीं हें आम्ही ओळखून आहों. तथापि लोकमान्यांचें नित्यस्मरण घडावे म्हणून जें नाव आम्ही धारण केलें आहे तें नाव आमच्यातील न्यून भरून काढण्यास समर्थ आहे, असा आमचा पूर्ण भरवसा आहे. प्रत्यक्ष सहवासानें जें घडून आले नाहीं तें नामसंकीर्तनानें घडून येऊ शकतें असा जो भक्तिमार्गाचा सिद्धांत आहे, त्याच सिद्धांतावर भार टाकून कै. बाळ गंगाधर टिळक याच्या स्वराज्याचे उद्योगास हातभार लावण्यास आम्ही प्रवृत्त झालों आहों.

कै. बाळ गंगाधर टिळक यांचें जें स्वभावसिद्ध आचरण होतें त्याच आचरणाचा उपदेश सांप्रतच्या स्वराज्याच्या चळवळीच्या वेळीं महात्मा गांधी आबालवृद्धाना करीत आहेत. महात्मा गांधी याच्या असहकारितेच्या चळवळीचा उगम लार्ड चेम्सफर्ड याच्या कारकीर्दीतील सैतानी कृत्यापासून झाला आहे. सदर सैतानी कृत्याचा डंका सर्व जगभर जोरजोरानें महात्मा गांधी यांनीं वाजविल्यामुळें लॉर्ड चेम्सफर्ड याना काळें तोंड करून हिंदुस्थानचा किनारा सोडावा लागला. हिंदुस्थानच्या लोकाप्रमाणें इंग्लंडच्याहि लोकाना लॉर्ड चेम्सफर्ड याची कारकीर्द एकदाची संपली म्हणून हायसें वाटलें

असेल यांत शंका नाहीं. मावळत्या लाटसाहेबांचे गुणानुवाद हिंदुस्थानांतील अँग्लो-इंडियन पत्रांनीं नीटसे गाईले नाहीत, आणि जे थोडे गाइले ते कचरत बेसूर आवाजानें खालीं मान घालून गाइलै. इंग्लंडच्याहि पत्रांनीं कशीबशी संभावना मावळत्या लाटसाहेबांची केली. या लाटसाहेबाचे अस्तास जाण्याचें दिवस जसजसे जवळ येत चालले तसतशी अधिक काळजी नवीन लाटसाहेब नेमण्यासबंधानें विलायतच्या मंत्रिमंडळाला पडली. महात्मा गांधी ज्यांच्या कारकीर्दीला सैतानी कारकीर्द म्हणूं शकणार नाहींत, असलाच नवा लाटसाहेब हिंदुस्थानकडे पाठविला पाहिजे असें महात्मा गांधी यांच्या असहकारितेच्या चळवळीनें विलायतेच्या मंत्रिमंडळाला पूर्णपणें पटविलें, लॉर्ड चेम्सफर्ड यांची परंपरा कशी तरी तोडली पाहिजे या एका बुद्धीनें निरनिराळ्या मुत्सद्यांची योजना मंत्रिमंडळानें मनातल्या मनात करून पाहिली. बऱ्याच मुत्सद्यांची परीक्षा जाहली, पण ते सर्व लॉर्ड चेम्सफर्ड यांच्या संप्रदायांचे-उघड किंवा प्रच्छन्न, जवळचे किंवा उद्यांचे-नातेवाईकच दिसून आले. हिंदुस्थानच्या लाटसाहेबांच्या जागीं लॉर्ड चेम्सफर्ड यांचे कूळ दृष्टीस पडताच कामा नये या हट्टानें नवीन मनुष्य शोधून काढावा लागल्यामुळें लॉर्ड रीडिंग यांची नेमणूक होण्यास उशीर लागला. लॉर्ड चेम्सफर्ड यांच्या परंपरेला निपुत्रिक बनवून हिंदुस्थानांतून त्यांना बाहेर मंत्रिमंडळानें काढलें आहे, असा लॉर्ड रेडिंग यांच्या नेमणुकीचा खरा अर्थ आहे. निपुत्रिकाचा सांप्रदाय नरकात जात असतो या म्हणीप्रमाणें महात्मा गांधी यांच्या चळवळीनें अकालीं जरी लॉर्ड चेम्सफर्ड यांना समुद्रात ढकलिलें नाहीं तरी, त्यांचे पुरे दिवस भरल्यावर समुद्राऐवजीं नरकांत ढकललें असें म्हणणें भाग येतें. लॉर्ड चेम्सफर्ड यांची परंपरा विच्छिन्न करणारा नवा लाटसाहेब हिंदुस्थानच्या गादीवर बसण्याचे सुमारासच 'लोकमान्य' पत्र आपल्या जीवनक्रमास आरंभ करीत असल्यामुळें, लॉर्ड चेम्सफर्ड यांच्या कारकीर्दीच्या शेवटच्या दोन तीन महिन्यांत जातां जातांना ज्या लाथा स्वराज्य-

वाद्यावर त्यांनीं झाडल्या त्या लाथांचा सुकाळ आपल्या जन्माचे प्रारंभीं 'लोकमान्यां' चे दृष्टीस पडणार नाहीं हें सुचिन्ह होय. लॉर्ड रीडिंग हे कायद्यात सांगितलेला तेवढाच न्याय हिंदुस्थानात पाहणार नसून, मनुष्याच्या अन्त:करणाला शुद्ध जाहल्यावर जो न्याय पटतो तो न्याय पाहाणार आहेत. एकाच्या अन्तःकरणाला एक न्याय खरा वाटतो, दुसऱ्याच्या अन्तःकरणाला दुसरा न्याय खरा वाटतो! अशा वेळीं आपली बुद्धि कोणत्याहि प्रकारच्या लोभानें झाकली जाऊ नये म्हणून परिश्रमपूर्वक खबरदारी घ्यावी लागते. एवढ्यानेंच भागत नाहीं, तर दुसरा ज्या लोभानें व्याकुळ जाहला असेल त्या लोभातील रस स्वतः चाखून पाहून त्या लोभाच्या परिस्थितींत स्वतः मन नेऊन नंतर न्याय देण्यास प्रवृत्त झालें पाहिजे. ज्याला न्याय द्यावयाचा असेल त्याच्याविषयीं मनात प्रेम पाहिजे. प्रेमाशिवाय करुणस्थिति किंवा कनवाळूपणा उत्पन्न होऊं शकत नाहीं. मन कनवाळू नसताना दिलेला न्याय निष्ठुर स्वरूपाचा होत असल्यामुळें परमेश्वराच्या घरीं त्यास संमति मिळत नाहीं. लॉर्ड रेडिंग कितीहि न्यायप्रिय असले तरी हिंदुस्थानास ते आजपर्यंत पूर्ण अनोळखी असेच आहेत; आणि प्रेमळपणाचा न्याय त्यांच्या हातून मिळण्यास त्याचें जें संघटण हिंदुस्थानाशीं व्हावयास पाहिजे होतें तें झालेलें नाहीं. लॉर्ड रेडिंग याच्यामध्यें हा एक मोठा दोष आहे आणि या दोषाचा पूर्ण फायदा घेता यावा म्हणून दडपशाहीची लाट नोकरशाहीनें सुरू केली आहे. पंजाबात दडपशाही, सयुक्तप्रातात सभाबंदी, बिहारात पकडापकडी आणि मध्यप्रातात डॉ. चोळकर व दे. भ. वामनराव जोशी याजवर खटले, अशा प्रकारच्या स्वरूपात नोकरशाही हिंदुस्थानची ओळख लॉर्ड रेडिंग यांना करून देत आहे. 'येथें या लोकानीं मारामाऱ्या केल्या, तेथें गुत्त्यातला माल फोडला, या ठिकाणीं असले शब्द वापरले, त्या ठिकाणीं तसले लोक गोळा केले, पाहा कसें आहे गांधींच्या स्वराज्याच्या चळवळीचें हिडिस स्वरूप' असें म्हणत नोकरशाही हिंदुस्थानांतील चळवळ्यांचीं चित्रें लॉर्ड

रेडिंग यांच्यापुढे माडणार आहे. एकीकडे स्वतः १४४ अ व १२४ अ, हीं दोन शस्त्रें हातात घेऊन नोकरशाही स्वराज्यावर हल्ला चढविणार आहे आणि त्याच वेळीं नव्या लाटसाहेबाने स्वतःची पाठ थोपटावी म्हणून स्वराज्याची चळवळ मारामारीच्या थरावर आली आहे अशा तऱ्हेच्या उलटया बोंबा मारण्यात येणार आहेत. लॉर्ड रेडिंग याना पूर्वीची ओळख नाहीं, आणि बऱ्याच सहवासानें जी प्रेमदृष्टि उत्पन्न होऊ शकते तो सहवासहि नाहीं. उलट हिंदुस्थानाकडून स्वतःच्या उत्पन्नापैकी निम्म्याहून अधिक रक्कम म्हणजे दरसाल पन्नास साठ कोट रुपये लष्करी कामाकडे खर्च करविण्याची जबाबदारी डोक्यावर घेऊन ते आले आहेत. ही जबाबदारी म्हणजे एक प्रकारचा लोभ होय. हा लोभ ज्याला सुटला नाहीं त्याच्या हातून कनवाळूपणाच्या न्यायदृष्टीनें हिंदुस्थानचे हित होणार नाहीं. कोणाहि व्हाइसरॉयावर ही जबाबदारी राहणारच. पन्नास साठ कोट रुपये दरसाल गरीब हिंदुस्थानाकडून लष्करी खात्याकडे खर्च करावयास लावण्याची जबाबदारी म्हणजे एकप्रकारचें पापाचें गाठोडेंच होय. हा पापाचा घडा फोडण्यास नोकरशाही तयार नाहीं. मवाळाचा पक्षहि हे पापाचे घडे ज्या गुत्त्यात ठेवलेले आहेत, त्या गुत्त्यातील दारू यथेच्छ पिऊन स्वतःस धन्य मानण्यास तयार जाहला आहे. हे गुत्त्यातील घडे फोडले जातात कीं काय अशी काळजी रात्रदिवस मक्तेदाराना वाटत आहे, आणि हाच लष्करी खर्चाच्या पापाचा घडा शाबूद ठेवण्याची जबाबदारी लाट-साहेबावर असल्यामुळे दडपशाहीची लाट लॉर्ड रेडिंग याच्या कारकीर्दीत खात्रीने मागे फिरेल, असे म्हणता येत नाहीं. तथापि सर्व हिंदुस्थानची समक्ष ओळख करून घेतल्याशिवाय लॉर्ड रेडिंग आपलें धोरण मुक्रर ठरविणार नसल्यामुळे दोन तीन महिने दडपशाहीस विशेष हालचाल करता येणार नाहीं हे उघड आहे. दडपशाहीने महात्मा गाधी याच्या चळवळीवर केलेली ही मोहीम काहीं काल थबकून राहणार असल्यामुळें महात्मा गाधी

हेहि द्रव्यबळ, मनुष्यबळ व बुद्धिबळ आपल्या बाजूनें अधिक गोळा करण्यांत स्वराज्याच्या चळवळीचे पुढील दोन तीन महिने घालविणार आहेत. बेझवाडा येथें भरलेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें 'टिळक स्वराज्य फंडास' एक कोट रुपये गोळा करण्याचा, राष्ट्रीय सभेच्या तत्त्वांना मान्यता देणाऱ्यांची संख्या एक कोटीपर्यंत वाढविण्याचा आणि स्वदेशीच्या व्रताची अखंड जागृति ठेवण्याकरिता सतत फिरत राहणाऱ्या वीस लाख सुताच्या चक्राचा फैलाव करण्याचा ठराव, एक आठवड्यापूर्वी पास केला. त्या ठरावाच्या अम्मल बजावणीस, सत्याग्रहाच्या सांप्रतच्या आठवड्यांत मुंबई शहरांत गेल्या बुधवारपासून सुरवात झाली असून, या पर्वणीच्या मध्यकालाचे पूर्णावस्थेचे वेळीं पाडव्याचे मुहूर्तावर आम्ही आमच्या वाचकांस लोकमान्य टिळकांचा स्वराज्याचा मंत्र सांगत आहो. द्रव्यबळ व मनुष्यबळ गोळा करून स्वदेशीच्या व्रताची वारंवार आठवण करून देणे हे तर आमचें जन्मसिद्ध काम आहेच. पण लार्ड रीडिंग हे नोकरशाहीच्या जाळ्यांत सांपडून कनवाळूपणानें न्याय देण्याच्या आपल्या व्रतापासून जर भ्रष्ट झाले तर दोन चार महिन्यांनीं ऑल इंडिया कॉंग्रेस कमेटीच्या ठरावाला अनुसरून दडपशाहीच्या मोहिमेस अधिक नेटाने व दृढनिश्चयाने तोंड देणे स्वराज्यवाद्यांना भाग पडणार आहे. द्रव्यबळ, मनुष्यबळ व बुद्धिबळ एक गठ्ठा करण्याचें काम असो किंवा नोकरशाहीशीं झगडण्याचें काम असो, गुरुस्थानीं असलेल्या लोकमान्य टिळकांचें चरित्र डोळ्यापुढे ठेवून, लोकांचा संसार नेटका व्हावा म्हणून त्यांनीं सोसलेल्या कारागृहवासासारख्या तपश्चर्येनें उद्दीप्त होणारी राष्ट्रभक्ति नीट जागीं ठेवून, आणि त्यांच्या परिपक्व उपदेशातील समबुद्धीला आमचें पाऊल वांकडे न पडण्याबद्दल नमन करून, त्यांनीं दाखविलेला स्वराज्याचा मार्ग त्यांच्या सांप्रदायास शोभेल अशा रीतीने चोखाळण्यास त्यांच्याच नांवाचें हे दैनिक पत्र कधींहि कमी करणार नाहीं.

---

# * खुद्द टिळकांचेच उद्गार

टिळक जिवत असते तर त्यानी महात्मा गाधीं याच्या असहकारितेच्या चळवळीस सर्वतोपरीं उचलून धरलें नसतें, असें म्हणणारा एक पक्ष आहे, व या पक्षाची मदार एका गोष्टीवर मुख्यपणे अवलंबून आहे. ती गोष्ट म्हणजे नव्या कायदेकौन्सिलात राष्ट्रीय पक्षाचे पुढारी निवडून जाण्याकरिता टिळकानीं मरणापूर्वी दोन तीन महिने चालविलेली तयारी ही होय. ज्याअर्थी टिळकानी अशी तयारी केली होती त्याअर्थी टिळकाच्या राष्ट्रीय पक्षानें, कलकत्त्याच्या कॉंग्रेसच्या ठरावानंतरहि आपण कॉंग्रेसमधील अल्पसख्याक पक्ष असें समजून, कॉंग्रेस न सोडता, कायदेकौन्सिलच्या जागाकरिता उमेदवार म्हणून चिकाटीनें व दृढ निश्चयानें पुढें जावयास पाहिजे होतें; तसें ज्याअर्थी या पक्षानें केलें नाहीं त्याअर्थी टिळकाच्या अनुयायात टिळकाचा दृढ निश्चय, टिळकाची धडाडी व टिळकाचें कर्तृत्व नाहीं असे सिद्ध होतें, आणि नालायकानीं भरलेला टिळकाच्या अनुयायाचा पक्ष कमकुवत ठरून लोकाच्या विश्वासास् अपात्र होतो. पूर्वपक्ष हा असा झाला. आमच्या मतें हा दोषारोप खोटा आहे; केवळ मत्सरबुद्धीनें केलेला आहे; आणि टिळकाच्या अनुयायानीं महात्मा गाधी यांना मदत न करून राष्ट्रीय कार्यास बिब्वा घालावा असला नीचपणाचा हेतु या दोषारोपाच्या बुडाशीं आहे. टिळकानीं निवडणुकीच्या वेळच्या मोठ्या उद्योगाची उभारणी मृत्यूपूर्वी दोन तीन महिने एकसारखी चालविली होती, यात संशय नाहीं. जुन्नर येथे भरलेल्या पुण्याच्या जिल्हा सभेच्या वेळीं आणि सोलापूरच्या प्रातिक सभेच्या वेळीं

---

* लोकमान्य, २३ जलै १९२२

मवाळपक्षानें निर्लज्जपणानें जो बखेडा केला तो बखेडा टिळकांच्या सदर उद्योगामुळें चिडून जाऊनच केला, हें महाराष्ट्रांत सर्वांना माहीतच आहे. टिळकांनीं राष्ट्रीय पक्षाचें वर्चस्व नव्या कायदेकौन्सिलांत मताधिक्यानें व्हावें याबद्दल जारीनें तयारी चालविली होती, हें खरें आहे. पण तेवढ्यावरून कलकत्त्याच्या कॉंग्रेसच्या ठरावानंतर टिळक स्वतः कायदेकौन्सिलच्या निवडणुकीच्या खटपटींतच निमग्न राहिले असते, असे जे अनुमान काढण्यात येतें तें मात्र खोटें आहे. टिळकांच्या खुद्द तयारींत, त्यांच्या विचारसरणींत आणि पूर्वचरित्रांत असलें अनुमान काढण्यास आधार नाहीं. तर्कशास्त्राच्या दृष्टीनें ही गोष्ट शाबीत करण्यापूर्वी खुद्द टिळकांच्या उद्गाराचा असे म्हणणारास कितपत आधार आहे, हें पाहिलें पाहिजे. असहकारितेच्या चळवळीसंबंधानें बनारसच्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या वेळीं बोलताना व इतर प्रसंगीं अभिप्राय देताना, माझें सर्व आयुष्य असहकारितेच्या तत्त्वानें व्यापलेलें आहे, अशा तऱ्हेचे स्पष्ट उद्गार टिळकांनीं काढलेले आहेत. महात्मा गांधी टिळकांच्या मृत्यूपूर्वी पंधरा दिवस टिळकांशीं बोलत असताना टिळकांनीं स्वच्छपणानें व मोकळ्या मनानें महात्माजींना सुचविलें होतें कीं, तुमच्या चळवळीचीं तत्त्वे मला पूर्णपणें मान्य असून या चळवळीनें हिंदुस्थानचें खरेंखुरें कल्याण होईल हेंहि मला कबूल आहे. पण लोकांकडून या तत्त्वाचें आचरण होणें अवघड असल्यामुळें आपण जर तसें करूं शकलां तरच यशाचे वाटेकरी व्हाल. असहकारितेची तपश्चर्या अल्पावकाशांत लोकांच्या हातून पार पडेल किंवा नाहीं याविषयीं टिळकांच्या मनांत संदेह होता, हें वरील उद्गारावरून स्पष्ट होतें. पण संदेह होता एवढ्यामुळें त्यांनीं लोकांना असहकारितेचीं तत्त्वे उचलण्यास सांगितलें नसतें, असें मुळींच म्हणतां येत नाहीं. अपेश येईल म्हणून खबरदारी घेणें व सतत उद्योग करणें हा भाग निराळा, आणि अपेशाचा संभव आहे म्हणून उद्योगाची दिशा फिरविणें हा भाग

निराळा. यश किंवा अपयश याविषयीं आसक्ति न ठेवतां आज नाहीं उद्यां, एक वर्षात नाहीं दोन वर्षात, एका पिढीत नाहीं दोन चार पिढयात यश येईलच येईल, अशा दृढ भावनेनें व श्रद्धेनें करीत असलेल्या उद्योगाच्या मनोवृत्तीस चिकाटी असे म्हणतात, आणि टिळक तर असल्या चिकाटीचे मूर्तिमत पुतळाच होते. तेव्हा महात्मा गांधींच्या असहकारितेच्या चळवळीत पूर्ण स्वराज्याच्या प्राप्तीसाठीं जितक्या देशभक्तानीं मनोभावानें पडावयास पाहिजे, तितक्या देशभक्ताची संख्या वर्ष दोन वर्षाच्या अवधीत भरणार नाहीं या शंकेमुळे टिळकांनीं माघार घेतली असती, असे मुळींच संभवत नाहीं असे म्हणणें म्हणजे टिळक टिळक नव्हते, अशा तऱ्हेची टिळकाची निंदाच करणें होय. वर्तन, उद्गार व त्यापासून निघणारीं अनुमानें या बाबी एका बाजूस ठेविल्या तरी शेवटच्या २।४ आठवडयातील टिळकाचें वर्तन व उद्गार हे विशेष महत्त्वाचे आहेत. महात्मा गांधी याजपाशीं मृत्यूपूर्वी, दोन आठवडेच आधी, टिळकानीं काढलेले उद्गार वर दिलेच आहेत. याच सुमारास कलकत्त्याच्या जादा राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थान आपण स्वीकाराल का, अशा प्रकारचा प्रश्न खासगी पत्रानें बंगालचे बॅ. दास यानीं टिळकाना केला होता. दोन्ही बाजूनीं २।४ दिवस बरीच चर्चा होऊन टिळकानीं अखेरीस कलकत्त्याच्या जादा कॉंग्रेसचें अध्यक्षपद आपणास नको, असें बंगाल्यास कळविलें होतें. हा निकाल बंगाल्यात कळविल्यानंतर पुणें सोडून मुंबईस यावयाच्या शेवटल्या दिवशीं सकाळीं प्रस्तुत लेखकाची व टिळकाची गाठ तास दोन तास पडली होती. त्यावेळीं झालेली चर्चा दोघाच्या आयुष्यातील शेवटचीच चर्चा होय, असे कोणासहि वाटलें नव्हते. "मी आज मुंबईस जात आहें आणि तुम्हास सांगलीस जावयाचें आहे, तेव्हा घटकाभर काहीं गोष्टींचा खल करू या," असे म्हणून टिळकानीं या भाषणास सुरवात केली होती. कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थान न

स्वीकारण्यांत आपण कोणचें राजकीय धोरण नजरेपुढें ठेविले आहे, हें त्यांनीं त्या प्रसगीं विशद करून सागितलें. " महात्मा गाधी याचीं असहकारितेचीं तत्त्वे कोणाहि विचारी पुरुषास अमान्य होण्यासारखीं नाहींत. तथापि निर-निराळ्या व्यवसायाच्या आणि दर्जाच्या लोकात ती निरनिराळ्या प्रमाणात अमलात येण्याचा संभव असल्यामुळे या प्रमाणाच्या भेदाला अनुसरून कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेत २।४ तट दृष्टीस पडल्यावाचून राहणार नाहींत; आणि कदाचित् या तटामुळे कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेचे २।३ तुकडे होण्याचा सभव आहे. हे तुकडे होऊ नयेत म्हणून त्यावेळी मोठया जोराची खटपट करावी लागेल आणि निरनिराळ्या पक्षाना राष्ट्रीयसभेच्या ४।५ वर्षे संघटित झालेल्या राजकीय शक्तींत कमीपणा आणूं नका, असे आग्रहपूर्वक सागून राष्ट्रीय सभेची शक्ति या नात्याची जूट कायम ठेवण्याचा उद्योग मला करावा लागेल. निरनिराळ्या तटाची ही तोंडमिळवणी तडजोडीनें व मोकळेपणानें मला करतां यावी म्हणून मीं अध्यक्षपद स्वीकारलें नाहीं. मवाळ निघून गेल्यानतर राष्ट्रीय सभेत पुन्हा दुसरा भग होण्याची ही वेळ असल्या-मुळे राष्ट्रीय सभेची शक्ति कमी न होऊं देण्याचें काम अध्यक्षाच्या माना-हून मला अधिक महत्त्वाचें वाटत आहे. राष्ट्रीय सभेंत मतभेद असले तरी राष्ट्रीय सभेच्या हल्लींच्या अनुयायानीं एकोप्यानें वागूनच नोकरशाहीशीं झुंजलें पाहिजे. एरवीं स्वराज्याचें पाऊल पुढे पडणार नाहीं. मी कलक-त्याच्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारीत नाही याचें कारण हा असला एकोपा राखण्यास माझा उपयोग अधिक होईल, असेच मला वाटत आहे. कोणत्याहि एका मताचा अभिमान मी या वेळी धरता कामा नये; आणि राष्ट्रीय सभेचे सर्व अनुयायी एका मार्गानें वागतील, अशी खबरदारी घेणें या प्रसगीं मला अधिक कल्याणप्रद वाटत आहे." अध्यक्षस्थान नको म्हणण्याच्या वेळचे टिळकाचे वरील विचार ज्याना ज्याना माहीत आहेत

त्यांना त्यांना कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेनंतर राष्ट्रीयपक्षानें कायदेकौन्सिलांत जाण्याचें नाकारलें तें टिळकांच्या तोंडच्या खुद्द आज्ञेमुळेंच नाकारलें, याविषयीं बिलकुल संशय नाहीं. कलकत्त्याच्या कॉंग्रेसनंतर महात्मा गांधी यांची चळवळ फार जोरावर येईल आणि या चळवळींत आपणास महात्मा गांधीप्रमाणें जोरानें पडावें लागेल, हें टिळकांना पूर्णपणें मान्य होतें. सदर संभाषणाच्या वेळीं त्यांनीं तसें बोलून दाखविलें होतें. अशा रीतीनें चळवळ एक दोन महिन्यातच जोरावर आल्यावर महात्मा गांधी व टिळक या दोघांनाहि नोकरशाही अटकेंत ठेवील, असा खुद्द टिळकांचा अंदाज होता; आणि या अंदाजाच्या दृष्टीनें स्वत:च्या वर्तनासंबंधानें विचार त्यांनीं प्रस्तुत लेखकापुढें त्यावेळीं मांडले होते. अशा रीतीनें नोकरशाहीच्या अटकेंत पडण्यापेक्षां विलायतेस वर्ष सहा महिने जाऊन रहाणें बरें, असें मला वाटत असल्यामुळें मुंबईस गेल्यावर तशा व्यवस्थेला अंशतः मी सुरवात करणार आहें असें टिळकांनीं बोलून दाखविलें. युरोप खंडांत किंवा विलायतेस राहण्यापेक्षां येथें अटकेंत पडला म्हणून काय बिघडलें, अशी शंका विचारली असतां टिळक म्हणाले कीं, " अटकेंत शरीराचे हाल होतील किंवा एकांतवासानें त्रास होईल म्हणून मी अटक टाळूं पहातों,असें नाहीं. कारण अटकेंत ठेवण्यांत शारीरिक दुःखें सोसावयास लावण्याचा नोकरशाहीचा हेतूच नाहीं. या हेतूनें अटक करण्यांत येईल असें मला वाटत नाहीं. महात्मा गांधी यांच्या इच्छेप्रमाणें जर खिलाफतीची व असहकारितेची चळवळ चांगली जोरावर आली तर पूर्ण स्वराज्याच्या हक्कासंबंधानें लोकांशीं बोलणें लावणें नोकरशाहीला भाग पडेल, आणि अशा बोलण्याच्या वेळीं कॉंग्रेसनें तडजोडीला यावें म्हणून, अटकेंत ठेवलेल्या पुढाऱ्यांना सोडून देण्याच्या मधाचें बोट जसें नेहमीं पुढें करण्यांत येतें तसें मधाचें बोट तयार करण्याकरितां आम्हास अटकेंत ठेवण्यांत येईल, असें मला वाटतें. आणि मग या मधाच्या

बोटाला भुलून पूर्ण स्वराज्याची मागणी न करतां अर्धवट तडजोडीला पुढाऱ्यांवरील प्रेमामुळें अनुयायी तयार होतील अशी मला भीति वाटत आहे. काहीं कमकुवत लोक तर असल्या बोलण्याचालण्याच्या वेळीं अगदीं थोडक्यावरच खूष होतील, आणि पुढाऱ्याना सोडविण्याकरितां आम्हीं असें केलें असा बहाणा करून आपल्या बुद्धीचा दुर्बलपणा झाकूं लागतील. तसें होऊं नये अशी माझी उत्कट इच्छा आहे. दुर्बलपणानें बिलकुल कमी माप घेतां कामा नये. पुरें माप पदरात न पडण्यास माझी अटक कदाचित् कारणीभूत होण्याचा संभव मला दिसत असल्यामुळे ती मी टाळूं पहात आहें."
तशा प्रसगीं हिंदुस्थानात अटकेंतच आपण असल्यावर आपणाशीच तडजोडीचीं बोलणें चालणें करण्यास नोकरशाहीला ठीक पडणार नाहीं काय, असा प्रश्न विचारला असता टिळकानीं स्वच्छ सागितलें कीं, "माझ्याशीं सलोख्याचें बोलणें नोकरशाही कधींहि बोलणार नाहीं. माझें पूर्वचरित्र असेंच आहे कीं, असलें बोलणें नोकरशाही माझ्याशीं कधीं काळीं बोलेल असें कोणीहि मनात आणूं नये. ज्याच्या मनात असे येईल त्याला मनुष्यस्वभाव समजत नाहीं असें मी म्हणेन. असल्या कामास माझा हा देह पूर्वचरित्रामुळें आतां निरुपयोगीं झाला आहे. किंबहुना मी सल्लामसलतींत आहे असें पाहून हट्टाहट्टानें नोकरशाही प्रसंग आला असताहि असल्या बोलण्या चालण्यापासून पराङ्मुख होईल. तेव्हा तें काम आपल्या नशींबी असणें शक्य नाहीं असें समजूनच, अटकेतून सोडविण्याच्या मोहास अनुयायी बळी पडूं नयेत म्हणून, महात्मा गाधी याची चळवळ जोरावर आल्यावर मला हिंदुस्थान सोडून बाहेर जाणें भाग आहे. ही चळवळ जोरावर येईल आणि नोकरशाहीला स्वराज्याचें बोलणें लोकाशीं बोलण्यास भाग पाडील, असें मला स्पष्ट दिसत आहे. तसला तो प्रसग समीप आल्यानंतर सलोख्याच्या वाटाघाटीचे वेळीं हिंदुस्थानास माझा उपयोग काहींहि नाहीं, हें मी ओळखून

आहे. येथे काम नाहीं तर येथें रहा तरी कशाला? उलट अटकेत पडून अपुरें माप हिंदुस्थानच्या पदरात पडण्यास पर्यायानें मी कारणीभूत होण्याची मला भीति वाटत आहे. म्हणून काहीं महिन्यानीं हिंदुस्थानातून बाहेर जाण्याच्या विचारात मी आहे." तास दोन तास चाललेल्या संभाषणातील वरील महत्त्वाचे मुद्दे आज आम्हीं वाचकापुढे माडले आहेत. टिळक जिवत असते तर कसे वागले असते, यासबधाचें खुद्द टिळकाचे मनोगत वरील उद्गारात असल्यामुळे त्याचा विचार आमचे वाचक शातपणें करून महात्मा गाधी याना पूर्ण मदत करतील, व हल्लींच्या चळवळीत टिळकाना दिसलेल्या स्वराज्याचें पूर्ण माप हिंदुस्थानच्या पदरात टाकतील, अशी आम्हास आशा आहे.



# * टिळक आणि मुसलमान

पूर्वीचा जुना श्रीगणपति-महोत्सव पुण्यात व महाराष्ट्रात चोहोंकडे मोठ्या प्रमाणावर करण्यास सुरवात झाल्यावर टिळकाच्याकडे त्या उत्सवाचें नेतृत्व साहजिकपणें आले. त्यामुळे टिळकावर त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांनीं असा आरोप ठेवला कीं, टिळक हे मुसलमानाचे द्वेष्टे असून मुसलमानाच्या विषयींचा द्वेष समाजात नेहमीं जागृत ठेवण्यासाठी टिळकानीं हा हिंदूंचा महोत्सव सुरू केला. हा आरोप मूर्खपणाचा आहे, असे मुसलमानाच्या ध्यानांत लवकरच आले, आणि तेव्हापासून टिळकाचा व मुसलमानी पुढाऱ्याचा स्नेह जुळत चालला. वरील आरोप मुसलमानाच्या पुढाऱ्याकडून करण्यात आलेला नव्हता, हिंदी स्वराज्याच्या आड येणाऱ्या नोकरशाहीच्या काही ॲंग्लो-इंडियन पत्रानी हा आरोप केलेला होता. समतिबिलाच्या कायद्याच्या वेळी टिळकानीं हिंदु समाजाचा पक्ष उचलला होता, आणि पुढे श्रीगणपतिमहोत्सव सुरू झाल्यावर त्या उत्सवासंबधानें जे ज्ञानसत्र सुरू झाले, त्या ज्ञानसत्रात पुढारीपणा घेऊन टिळकानी नेहमीं भारतीय धर्माची उच्च तत्वे समाजापुढे मांडण्यास केव्हाहि आळस केला नाही. सुशिक्षित वर्गाचें लक्ष प्राचीन तत्त्वज्ञानाकडे आणि हिंदुधर्माच्या श्रेष्ठत्वाकडे वळण्यास श्रीगणपतिमहोत्सव टिळकाच्या नेतृत्वाखालीं पुष्कळ अशानें कारणीभूत झाला. टिळकाच्या या उद्योगाची फलश्रुति गीतारहस्यासारखा ग्रंथ त्याच्याकडून निर्माण होण्यात झाली. यासंबधाचा सविस्तर विचार चालू मालेतील पुढील एका लेखात आम्ही करणार असल्यामुळे आज टिळकावर मुसलमानाचे द्वेष्टे या नात्यानें आलेल्या आरोपाबद्दलच विचार कर्तव्य आहे. हा आरोप ॲंग्लो-इंडियन समाजाकडून करण्यात आला.

---

* लोकमान्य, २१ जुलै १९२१

मुसलमानांना पुढे करून त्याच्या आड उभें राहून टिळकाना गोळी घालण्याचा हा प्रयत्न झाला. पण पुढे मुसलमान सावध झाल्यामुळें तीहि युक्ति फसली, आणि पाश्चिमात्य सुधारणेचे द्वेष्टे म्हणून टिळकाना नावें ठेवण्यांत आलीं. महात्मा गांधी याना आज असेच दूषण लावण्यात येत आहे. राष्ट्रोद्धार ज्याला करावयाचा असेल त्यानें राष्ट्राची पूर्वपरंपरा कायम ठेवून, नव्या-जुन्याचा योग्य मेळ घालून, जीर्णोद्धाराची भव्य इमारत उभारली पाहिजे. नोकरशाहीच्या मनात शेंदोनशे वर्षांनंतर स्वतंत्र झालेल्या हिंदुस्थानचें भव्य राष्ट्र दृष्टीस पडावे असे आहे, नाहीं असे नाहीं. पाश्चिमात्य संस्कृतीच्या नव्या पायावर नव्या मालमसाल्यानें, परदेशी जिनसानी, परदेशी कारागिरांनीं, आणि परदेशी रक्त लग्नसंबधानें हिंदुस्थानच्या रक्तात पूर्णपणें मिसळलें जाऊन नंतर हा हिंदुस्थानच्या नवीन वैभवाचा डोलारा जगाच्या दृष्टीस पडावा, अशी नोकरशाहीची महत्वाकांक्षा आहे. ही महत्वाकांक्षा सफल होऊं नये म्हणून टिळकाच्या आत्म्याला एकसारखी तळमळ लागून राहिली होती. महात्मा गांधी याच्या आत्म्याला हीच तळमळ आज लागून राहिली आहे. महात्मा गांधी हे पाश्चिमात्य सुधारणेचे द्वेष्टे आहेत, असा आरोप ॲंग्लो-इंडियन पत्रें महात्माजींवर करीत आहेत. याचें कारण असें आहे कीं, महात्माजींना ज्या आर्थिक व औद्योगिक पायावर युरोपियन समाजाची रचना झालेली आहे तो पायाच बिलकुल पसंत नसून नव्यातलें चांगलें तेवढे घेऊन जुन्या पायावरच नवीन स्वराज्याची इमारत उभारणें अत्यंत जरुरीचें वाटत आहे. दोघांचीहि विचारसरणी पुष्कळ अंशीं एकच आहे. भारतीय तत्त्वज्ञानाचा सांगोपांग विचार व खल टिळकानीं केलेला होता, आणि त्यामुळें विद्वत्तापूर्ण दृष्टीनें साधक बाधक प्रमाणें पुढे मांडून पूर्वीच्याच उच्च तत्त्वाचें उद्घाटन नवीन धर्तीनें ते करीत असत. दक्षिण आफ्रिकेत असताना मजूर व भांडवलवाले यांच्यामधील भांडणात

महात्माजींना पडावें लागलें आणि त्या कर्माला अनुसरून 'बुद्धिःकर्मानु-सारिणी' या न्यायाने असहकारितेच्या तत्त्वाकडे आणि टॉलस्टॉयच्या तत्त्वज्ञानाकडे त्याचें लक्ष साहजिकपणें वेधलें. महात्माजींच्या सांप्रतच्या असहकारितेच्या विचारसरणीचा उगम दक्षिण आफ्रिकेंत त्यानीं केलेल्या चळवळींतून झालेला आहे. स्वधर्माविषयींच्या अभिमानानें प्रेरित होऊन जुन्या नव्या तत्त्वज्ञानाचें आणि हिंदुधर्माच्या प्रमुख धर्मग्रंथाचें जें कित्येक वर्षें परिशीलन टिळकानीं केलें त्या सततच्या अभ्यासातूनच टिळकाच्या संप्रदायाचा उगम झालेला आहे. दोन्ही नद्याचा उगम भिन्न भिन्न ठिकाणीं झालेला असला तरी आज सगम होऊन प्रवाहास दुप्पट शोभा व दुप्पट जोर प्राप्त झालेला आहे. युरोपियन समाजाचा पायाच चुकीचा आहे, हें रशियात टॉलस्टॉयनें फार मार्मिक रीतीनें व चित्ताकर्षक भाषेनें जनतेस शिकविलें. टॉलस्टॉयचीं तत्त्वें आज युरोपखडांत नुसतीं पुस्तकात राहिलेलीं नसून रशियातील राज्यक्रातीमुळें युरोपखडाच्या रोजच्या आचरणात निरनिराळया देशात कमी जास्ती प्रमाणानें उतरलेलीं आहेत. पूर्वेकडून उजेड येऊन युरोपखंडाचा उद्धार होईल, असें स्वप्न टॉलस्टायना नेहमीं पडत असे. म. गाधी यानीं आपलें तत्त्वज्ञान टॉलस्टॉयपासून घेण्यास सुरवात केली आणि हिंदी परपरेला धरून त्यानीं आपलें असहकारितेचें शास्त्र बनविलें. टॉलस्टॉय याना पडलेल्या स्वप्नाचा खरा अर्थ असा आहे कीं, पूर्वेकडील प्राचीन राष्ट्राच्या व तत्त्वज्ञानाच्या धर्मग्रथातून टॉलस्टॉयच्या मताना पुष्टि मिळेल, आणि नतरच युरोपखंड खऱ्या कल्याणाच्या मार्गाला लागेल. या स्वप्नातील एक अश तरी टिळक व गाधी या दोन नद्याच्या मिलाफानें आज खरा झालेला दिसत आहे. टिळकाचे मार्ग निराळे व गाधींचे मार्ग निराळे; कारण दोनहि प्रवाह निरनिराळया ठिकाणीं उगम पावून निरनिराळया भूमींतून वहात आलेले

आहेत. निरनिराळ्या भूमींतून वहात आले तरी आज संगम झालेला आहे. गंगायमुनाच्या संगमाच्या ठिकाणीं काहीं पावलें गंगेचे पाणी निराळे व यमुनेचें पाणी निराळे असें दृष्टीस पडतें, पण पुढे हा पृथक्‌पणा दृष्टीस पडेनासा होतो. आज पूर्वीच्या वैभवाच्या अभिमानासबधानें महात्माजी इतके टिळकरूप झाले आहेत की, टिळकाना दिलेल्या शिव्या आज जशाच्या-तशा महात्माजींना मुंबईचा ‘टाइम्स’ देत आहे. प्राचीन संस्कृतीचे अभिमानी आणि युरोपियन संस्कृतीचे द्वेष्टे, अशी नावें ठेवून टिळकावर जसा भडिमार करण्यात आला होता, तसाच भडिमार साप्रत महात्माजींवर करण्यात येत आहे. टिळकाच्या कारकीर्दीत मुसलमानाचें कल्याण इग्रनाच्या हातून अधिक होणारें असल्यामुळें मुसलमानानीं हिंदूचें व आपलें एक ध्येय ठेवूं नये, असें मुसलमानाना ॲग्लो-इडियनाकडून सांगण्यांत येत असे. प्रारभीं या मुरळीला मुसलमान बळी पडले, पण टिळकाचें सोज्वळ चरित्र १९०६-७ सालच्या स्वदेशी चळवळीपासून जसजसें मुसलमानाच्या अवलोकनात अधिक येऊं लागलें, तशी टिळकाविषयीची मुसलमानाची बुद्धि पालटत चालली; आणि मडालेच्या तुरुगातून सुटून आल्यावर टिळकाच्या विषयीं मुसलमानाच्या मनात पूर्ण पूज्यभाव उत्पन्न झाला. हिंदू व मुसलमान या दोघानीं मिळून एकोप्याने हिंदुस्थानात राहून हिंदुस्थानचे स्वराज्य कमावले पाहिजे आणि हिंदुस्थानला पूर्वीच्या वैभवाच्या शिखरावर नेऊन बसविलें पाहिजे, अशा तऱ्हेचा टिळकाचा उपदेश १९१४ सालापासून मुसलमानाच्या समाजाला पटूं लागला. आणि लखनौच्या कॉंग्रेसच्या वेळी मुस्लिम लीग व कॉंग्रेस याचा पूर्ण मिलाफ करून सोडण्यास टिळकांचेच उद्योग कारणीभूत झाले. लखनौ येथें टिळकानीं हिंदु-मुसलमानाची पूर्ण एकी करून दिली आणि त्यानतर मुसलमानाच्या पुढाऱ्याचा विश्वास टिळ-कांच्यावर पूर्णपणें बसला. आज महात्मा गांधी याजवर टीका करतांना जसे

टीकाकार म्हणतात कीं, महात्माजींना अलीबंधू खाऊन टाकीत आहेत आणि अलीबंधूंना महात्माजी खाऊन टाकीत आहेत, तशाच प्रकारची टीका टिळकांवरहि लखनौच्या काँग्रेसनतर करण्यात आलेली होती. टिळक मुसलमानाना फसवीत आहेत, अशा तऱ्हेची ती टीका होती. दोघांमध्यें कलागती लावून स्वतःचा फायदा करून घेण्याची अँग्लो-इंडियन पत्रकाराची ही नेहमीचीच रीत आहे. पण या काव्याला कोणी आज बळी पडत नाहीं. मुसलमानानीं स्वतःच्या धर्माची मर्यादा न सोडता हिंदूंशीं शेजारधर्मानें वागावें, हिंदूंनीहि स्वतःचा धर्म कायम राखून मुसलमानाच्या शेजारीं गुण्यागोविंदानें राहावे, आणि दोघानीं मिळून राष्ट्रप्रेमानें प्रेरित होऊन हिंदी स्वराज्याची सेवा करावी, या टिळकानी आखून दिलेल्या मार्गानेंच आज अलीबंधू व महात्मा गांधी जात आहेत. महात्मा गांधी यांच्या मताकरिता अलीबंधूंनीं कुराणाची आज्ञा मोडण्यास राजी व्हावे, अशी महात्माजींची बिलकूल इच्छा नाही. प्रत्येकाचा प्राचीनधर्म स्वराज्याहूनहि त्याला अधिकच प्रिय असला पाहिजे, हे तत्त्व अलीबंधु व महात्माजी या दोघानाहि सारखेंच प्रिय झालेलें असल्यामुळें लखनौ येथे टिळकानी केलेली हिंदु मुसलमानाची एकी सुविचाराच्या गाठीनी दृढ झाली आहे. हें दृढीकरण टिळकानीं स्वतःच्याच आयुष्यात पाहिले, हे त्याचे महद्भाग्य होय. या दृढीकरणामुळेच खिलाफत कमिटयानीं सुरू केलेला असहकारितेचा कार्यक्रम कलकत्त्याच्या काँग्रेसनें स्वीकृत केला, आणि नागपूरच्या राष्ट्रीय सभेत त्या कार्यक्रमास उज्ज्वल स्वरूप देण्यात आलें. खिलाफतीच्या चळवळीमागून जाऊन मुसलमानाना दुजोरा देण्यास टिळकानी साप्रतच्या प्रसगीं नाकारलें असतें, असें म्हणणारे लोक केवळ दुष्ट बुद्धीनें तसे म्हणत आहेत, हें वरील विवेचनावरून वाचकाच्या ध्यानी येईल. या वेळीं हिंदूंनी आणि मुसलमानानीं दोघानीं मिळून मिळवावयाच्या सपूर्ण स्वराज्याच्या साप्रतच्या उद्योगास आमचे वाचक स्वार्थत्यागपूर्वक मदत करतील अशी आम्हांस आशा आहे.

# * टिळक आणि खिलाफत



खिलाफतीचा प्रश्न मुसलमानांच्या इच्छेप्रमाणें सुटावा, असें हिंदुस्थानांतील प्रमुख अधिकाऱ्यांचेंहि मत आहे. गेले लाटसाहेब लॉर्ड चेम्सफर्ड यानीं, सेव्हरीसच्या तहाचीं कलमें हिंदुस्थानास कळवितांना टर्कीचा प्रश्न मुसलमानांच्या इच्छेप्रमाणें सुटत नाही, याबद्दल दुःखाश्रु गाळले होते. हल्लींचे लाटसाहेब लॉर्ड रीडिंग यांचेंहि अंतःकरण टर्कीच्या प्रश्नासंबंधानें दुःखी कष्टी आहे. हिंदुस्थानांतील ॲंग्लो-इंडियन मुत्सद्दी असो किंवा मवाळ पक्षाचा मुत्सद्दी असो, टर्कीसंबंधानें सहानुभूति दाखविण्यास बिलकूल चुकत नाहीं. दुःखाश्रु गाळल्यानंतर आणि सहानुभूति दाखविल्यानंतर या मुत्सद्दीवर्गाचा महात्मा गांधी यांना असा सवाल आहे कीं, टर्कीचें नशीब हिंदुस्थानाच्या हातांत नसतां आणि इंग्रजी मुत्सद्यांच्याहि हातांत नसतां खिलाफतीच्या प्रश्नाशीं हिंदी राजकारणाचें एक तऱ्हेचें लग्न लावून तुम्हीं कां बसलां आहां ? जी गोष्ट अपरिहार्य आहे त्या अपरिहार्य बाबींचें लोढणें कोणत्याहि राजकीय धोरणाच्या गळ्यांत बांधणें म्हणजे व्यवहारदक्षतेला सोडून वागणें होय. जी गोष्ट टळत नाहीं त्या गोष्टीवर पूर्ण भिस्त ठेवून राजकारणाचे डाव खेळणारा मुत्सद्दी चतुर कसा म्हणावा ? अपरिहार्य अर्थासंबंधानें शोक करीत बसणें वाजवी नाहीं, असें खुद्द भगवतांनीं भगवद्गीतेंत सांगितलें आहे. तेव्हां खिलाफतीसंबंधानें सहानुभूति दाखविण्याच्या दृष्टीनेंहि हिंदी राजकारणाशीं खिलाफतीचा संबंध इतक्या दृढपणानें जोडणें चांगलें नाहीं. खिलाफतीची व गांधींची मैत्री हिंदूंच्या व मुसलमानांच्या कल्याणास अपायकारक असून टिळक जर आज जिवंत असते तर व्यवहार-

* लोकमान्य, ता. २२ जुलई १९२१

दक्षतेमुळें त्यांनीं असली मैत्री तोडून टाकण्याबद्दल चिकाटीनें व निश्चयानें प्रयत्न करण्यास बिलकूल कमी केलें नसतें. टिळक असते तर खिलाफतीचा प्रश्न त्यांच्या वजनामुळें व कर्तृत्वामुळें एव्हाना मागें पडून हिंदी राजकारण आजच्याप्रमाणें गढूळ न दिसता स्वच्छ झालें असतें. टिळक असते तर खिलाफतीचें काय झालें असते, या प्रश्नासंबधींचा पूर्वपक्ष येथवर झाला. अशा तऱ्हेचा पूर्वपक्ष करून टिळकांच्या अनुयायांनीं खिलाफतीच्या चळवळीतून आपलें अंग काढून घ्यावें असा उपदेश अनुयायांना हा पूर्वपक्ष करीत असतां त्या पूर्वपक्षास आमचें असें उत्तर आहे की, टिळक जर आज असते तर खिलाफतीचा व महात्मा गांधींचा संबंध आजच्याहूनहि अधिक दृढच झाला असता. कारण, टिळक हिंदु मुसलमानांतील सहानुभूतीच्याच दृष्टीनें या प्रश्नाकडे पहात नव्हते. मुसलमानांचें जें दुःख तेंच हिंदूंचें दुःख एवढया एका तत्वावरच त्यांची भिस्त नव्हती. मुसलमानावर आलेल्या प्रसंगामुळें त्यांचें हृदय अत्यंत विव्हळ झालेलें होतें; शोकामुळें व स्नेहामुळें ते मुसलमानांच्या खांद्याला खांदा लावून झुंजण्यास तयार होते, इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानाबाहेरील मुसलमानी प्रदेशाच्या नशिबाशीं हिंदुस्थानाचेंहि नशीब जखडलें गेलें असून मुसलमानी प्रदेशाचें दुर्दैव तेंच हिंदुस्थानचें दुर्दैवहि ठरल्यावाचून राहणार नाहीं, अशी बालंबाल खात्री त्यांच्या सूक्ष्म बुद्धीची झालेली होती. टर्की निःसत्व होऊन मुसलमानी प्रदेश जर हिंदुस्थानाप्रमाणेंच युरोपियन राष्ट्रांना चरण्याचीं कुरणे होऊन बसले तर हिंदुस्थानचें स्वराज्य अधिक अधिकच लांबणीवर पडल्यावाचून कधींहि राहणार नाहीं असें त्यांना वाटत होतें. मनुष्याच्या प्रयत्नावर यश अवलंबून असतें, हें जितकें खरें आहे तितकेंच प्रयत्नाबरोबर दैवहि अनकूल असावें लागतें हे म्हणणें खरे आहे. महायुद्धानें उत्पन्न केलेल्या हिंदुस्थानाबाहेरच्या जगाच्या परिस्थितीमुळें

हिंदुस्थानात अल्प प्रमाणात स्वराज्यास प्रारंभ झाला आहे. हे अल्पप्रमाणाचें स्वराज्य हिंदुस्थाननें स्वतःच्या मेहनतीनें मिळविलें या म्हणण्यात जितका तथ्यांश आहे, तितकाच तथ्यांश बाहेरच्या परिस्थितीमुळें किंवा अनुकूल दैवामुळे ते मिळालें, असे म्हणण्यातहि आहे. हिंदुस्थानलगतच्या मुसल्मानी प्रदेशाचा हितसंबंध हिंदुस्थानास इंग्लंडच्या हितसंबंधाहूनहि हिंदुस्थानांतील नोकरशाहीशीं झगडताना अधिक महत्वाचा आहे. इंग्रजी साम्राज्य हिंदुस्थानावर होण्यापूर्वी इस्तंबूलकडे पाहून हिंदुस्थानातील सर्व प्रकारचे मुत्सद्दी आपापल्या तऱ्हेचें राजकीय ध्येय ठरवीत असत. पानिपतच्या मोहिमेत सदाशिवराव भाऊनी दिल्ली काबीज केल्यानंतर तह करणार नाही, असे सांगितलें आणि इस्तंबूल पाहिल्याशिवाय मागे फिरणार नाहीं, अशी प्रतिज्ञा केली. वरील प्रकारचे वर्णन पानिपतच्या पोवाड्यात शाहीरांनी त्या वेळच्या राजकीय ध्येयाकडे लक्ष ठेवून केलेले आहे. आज जसे लंडन तसे त्या वेळीं हिंदुस्थानास इस्तंबूल होते. इंग्रजी साम्राज्याचा व हिंदुस्थानचा जितका निकट संबंध आज आहे तितकाच निकट संबंध टर्कीचा व हिंदुस्थानचा आहे. एकाचें दैव दुसऱ्याच्या दैवाशी मिसळून गेलेले आहे. तें एकमेकापासून सोडवून अलग करणे भूगोलाच्या रचनेमुळे अगदीं अशक्य आहे. लंडनचें दैव व हिंदुस्थानचे दैव ही एकमेकापासून अलग करता येतील आणि कदाचित् काहीं शतकानीं इतक्या दूरवरच्या लहानशा बेटानें हिंदुस्थानासारख्या पूर्वेकडील राष्ट्रास आपल्या हितसंबंधाच्या रज्जूंनीं इतके कसे ग्रासून टाकलें याबद्दल इतिहासकार आश्चर्य प्रदर्शितहि करतील, पण तुर्कस्थान, इराण, अफगाणिस्थान, बुखारा, समरकंद वगैरे मुसलमानी राष्ट्रें सृष्टीनें हिंदुस्थानचे शेजारी म्हणून उत्पन्न केलेली आहेत. या शेजाऱ्याचा व हिंदुस्थानचा हितसंबंध बिलकूल नाही, अशा प्रकारची भावना सृष्टीच्या रचनेविरुद्ध हिंदुस्थानातील हिंदूंमध्ये व मुसलमानामध्यें कृत्रिम उपायांनीं

आज युरोपियन राष्ट्रांनीं कशी उत्पन्न केली आहे व त्यांत त्यांना कसें यश मिळविता आलें आहे, याबद्दल टिळकांना राहून राहून आश्चर्य वाटत असे. हिंदूलोकांच्या मनांतील ही भावना काढून टाकणें त्याना सोपें वाटत असे. आणि ती भावना हिंदूंपुरती तरी नष्ट करण्याचा प्रयत्न फार यशस्वी रितीनें त्यांनीं आपल्या स्वराज्याच्या मोहिमेंत केला, हें सर्वांना माहीतच आहे. स्वराज्याच्या मोहिमेत लखनौच्या कॉंग्रेसच्या पूर्वी आणि लखनौच्या कॉंग्रेसनं-तरहि हिंदी स्वराज्याच्या ध्येयाकडे सर्व हिंदी मुसलमानाचें लक्ष पूर्णपणें खेंचून घेणे फार अवघड आहे, असे त्याना वाटत होतें. कॉंग्रेसच्या चळवळी-पासून मुसलमानाना अलग ठेवण्याचा इंग्रजी मुत्सद्यानीं लखनौच्या कॉंग्रेस-च्यापूर्वी तीस चाळीस वर्षे जो आटोकाट प्रयत्न केला तो प्रयत्न एक दोन वर्षांच्या अवधींत समूळ नष्ट कसा करता येईल, याविषयीं टिळकाना एकसारखी विवचना लागून राहिली होती. खिलाफतीच्या प्रश्नासंबधानें मुसलमान जर जागे झाले तर वरील प्रश्न आपोआप सुटेल आणि हिंदी स्वराज्यावर मुसलमानाच्या हिंदुस्थानाबाहेरील प्रदेशाचें आजचें व भावी कल्याण कसें अवलंबून आहे हें मुसलमानाच्या मनाला बरोबर पटेल, असें टिळकाना वाटत होतें. खिलाफतीचा प्रश्न आणि स्वराज्याचा प्रश्न याची सांगड हिंदू मुत्सद्यानीं घालणें, हिंदी स्वराज्याचें स्पष्ट स्वरूप हिंदुस्थानांतील सात कोट मुसलमानांच्या हृदयावर उमटविण्याकरितां, अत्यत जरुरीचें आहे, इतकेंच नव्हे तर त्यामुळें हिंदूंचें आज कितीहि नुकसान झालें तरी तें नुक-सान मुसलमानांच्या जागृतीपासून होणाऱ्या फायद्याने सहज भरून निघणारें आहे, असें टिळकांचें ठाम मत होतें. बनारसची ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी झाल्यानतर महात्मा गाधी याच्या नेतृत्वाखाली अलाहाबादेस खिलाफतच्या परिषदेनें असहकारितेच्या चळवळीस सुरवात केली. त्यावेळीं टिळक बनारसहून अलाहाबादेस गेले नाहींत. पण अलीबंधूंना खिलाफतच्या

चळवळीकरिता मुसलमानाचा समाज जे जे उपाय योजण्यास तयार होईल त्या त्या उपायास मी पूर्ण पाठिंबा देईन आणि मुसलमानीं पुढाऱ्यांच्या सर्व संकटाचा भागीदार मी होईन, असें आश्वासन टिळकानीं दिलेलें होतें. महात्मा गांधी यांच्याप्रमाणें खिलाफतीच्या चळवळीचा पुढारीपणा स्वीकारण्याचें टिळकांनीं त्यावेळीं नाकारलें ही गोष्ट खरी आहे. पण तसे करण्याचा हेतुहि त्यांनी मुसलमानाच्या पुढाऱ्यापुढे स्पष्टपणें मांडला होता. महात्मा गांधी यांच्या शेजारीं खिलाफतीच्या प्रश्नाचे पुढारी म्हणून जर टिळक उभे राहिले असते तर मुसलमानावर तेव्हांपासूनच नोकरशाहीची अधिक वक्रदृष्टि झाली असती. लोकांना चवताळून सोडून प्रतिस्पर्ध्यावर तुटून पडावयास उद्दीप्त करणारा हा वीर पुरुष आहे आणि असला पुरुष कोणत्या वेळीं कोणतें साहस करण्यास प्रवृत्त होईल याचा नेम नाहीं, अशी टिळकाविषयीची गैरसमजूत टिळक मरेपर्यंत नोकरशाहीच्या मनांत कायम ठाणें देऊन बसलेली होती. नोकरशाही आपल्याकडे कोणत्या दृष्टीनें पहाते हें टिळक पूर्णपणें ओळखून होते. तेव्हां खिलाफतीच्या चळवळींत महात्मा गांधी यांच्याबरोबर जर नेतृत्वाची भागी आपण उचलली तर आपल्या सान्निध्या-मुळें शांततेच्या असहकारितेच्या चळवळीवर निष्कारण फाजील संकटें ओढवतील, अशी टिळकांना भीति वाटत होती. या चळवळींत महाराष्ट्राला पुढारीपणाचा मान मिळण्यापेक्षां महाराष्ट्र या चळवळीचा नुसता खंबीर अनुयायी झाल्यानें पुढारी होण्यापेक्षाहि मुसलमानांचें व हिंदुस्थानचें अधिक कल्याण होईल, असे टिळकानी साधकबाधक प्रमाणाचा शांतपणें विचार करून ठरविलें होतें. सव्हरीसच्या तहाची कलमें ज्याअर्थी तशीं टिकता कामा नयेत आणि तीं कलमें बदलून टर्की पुन्हा लष्करी दृष्टया जिवंत व धट्टाकट्टा झाला पाहिजे; एरवीं एशियाखंडाचें हित होणार नाही, असा त्याचा ठाम सिद्धांत होता. हा तह टिकणार नाहीं असें जे वारंवार म्हणत

असत, पण टर्कीच्या, मुसलमानांच्या व हिंदुस्थानच्या दुर्दैवानें जरी तो तह तसाच टिकला तरी देखील अपरिहार्य अर्थ म्हणून शोक करण्याचें सोडून दिल्यावरहि सर्व मुसलमानी प्रदेश व हिंदुस्थान याच्या निकटसंबंधाची जागृति हिंदूंमधील व मुसलमानांमधील कायम राखणें हें हिंदी मुत्सद्यांचें मुख्य कर्तव्यापैकीं एक कर्तव्य होय, असे ते मानीत असत. आणि खिला-फतच्या चळवळीकडे या दृष्टीनें पहावयास टिळक कधींहि विसरत नसत. सात कोटी मुसलमानात व सर्व हिंदूंत वरील भावनेची ज्योत जर कायम ठेवता आली तर त्या ज्योतीपासून कामधेनूप्रमाणें हिंदुस्थानास पाहिजे तितकें कल्याण करून घेता येईल, आणि नोकरशाहीच्या तोंडाकडे दीना-प्रमाणें पहात बसण्याची जरूरीहि राहणार नाहीं. खिलाफत आणि स्वराज्य याची सांगड घातल्यापासून होणारा हा फायदा, दहा दहा वर्षांच्या हप्त्यानें एक एक पोकळ पायरी पुढें ठेवणाऱ्या मॉंटेग्यू चेम्सफर्ड याच्या योजनेहून, टिळकांना कितीतरी पटीनें अधिक हितावह वाटत होता. ग्रीसमधील राज्य-क्रांतीनें, फ्रान्स व इंग्लंड याच्या दृष्टींतील भेदानें, आणि केमालपाशा याच्या अगाच्या विलक्षण कर्तृत्वानें सेव्हरीसच्या तहांत फेरबदल होण्याच्या सांप्रतच्या प्रसंगीं टिळकानी खिलाफतचा प्रश्न एका बाजूस ठेवला असता, हें बिलकुल संभवनीय नाहीं. युरोपखंडातील कारस्थानांमुळें टर्कीची दाद आज परमेश्वरा-च्या घरीं लागली नाहीं तरी देखील हिंदुस्थानातील व हिंदुस्थानच्या बाहे-रील सर्व मुसलमानांना आशियाखंडाच्या 'राजकीय धोरणासंबंधानें' आणि शेजाऱ्या पाजाऱ्याच्या कर्तव्यासंबंधानें जागृत करणारी खिलाफतीची चळवळ हिंदूंनीं शिरसावंद्यच मानिली पाहिजे, असे म्हणणारा दूरदर्शी मुत्सद्दी आज जर असता तर टर्कीचें दुर्दैव संपून उदयाचें किरण दिसूं लागण्याच्या आजच्या वेळीं खिलाफतीशीं फारकत करून मोकळा झाला असता, असें म्हणणें वेडगळपणाचें नाहीं काय ?

---

# * टिळक आणि कौन्सिलांतील टक्कर



टिळक जर जिवत असते तर कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेनंतरहि नव्या कायदेकौन्सिलांच्या निवडणुकींत भाग घेण्यास त्यांनीं आपल्या अनुयायांस सांगितलें असतें, अशा तऱ्हेचें मत मवाळपक्षानें व अँग्लो-इंडियन पत्रकारांनीं प्रसिद्ध केलें आहे. असें मत प्रसिद्ध करण्यास टिळकांनीं चालवलेली निवडणुकीची तयारी हें एक कारण होऊन बसलें आहे. अमृतसर येथील कॉंग्रेसमध्यें प्रतियोगी सहकारितेचें जें तत्त्व टिळकांनीं प्रतिपादन केलें त्या तत्त्वालाहि पूर्वपक्ष आपलें मत स्थापित करण्याकरिता पुढें आणीत आहे. नवीन कायदे कौन्सिलाच्या योजनेनें जो लहानसा भाकरीचा तुकडा खिशांत टाकण्यात आला आहे तो खाऊन टाका आणि पुरी भाकर मागा, अशा तऱ्हेचा उपदेश विलायतेहून येण्याबरोबर टिळकांनीं केला होता, त्याहि उपदेशाची या प्रसगीं आठवण देण्यात येत आहे. शिवाय खुद्द अमृतसरच्या राष्ट्रीय सभेनें नवीन योजनेला अपुरी, असमाधानकारक व निराशाजनक, अशीं दूषणें दिलीं असलीं तरी नव्या कायदे कौन्सिलाचा उपयोग करून घेण्यास हरकत नाहीं, असाच ठराव पास केलेला आहे. या सर्व गोष्टी पुढें मांडून पूर्वपक्ष असें म्हणत आहे कीं, कायदेकौन्सिलवर बहिष्कार घालण्यात आपल्या गुरूच्याविरुद्ध टिळकांच्या अनुयायांनीं वर्तन केलें आहे. अमृतसरच्या राष्ट्रीय सभेच्या ठरावावर या वादाच्या वेळीं विशेष भर देणें योग्य नाहीं, असे आमचें म्हणणे आहे. अमृतसर येथील कॉंग्रेस व कलकत्त्याची जादा कॉंग्रेस यांच्यामधल्या वेळात पंजाब प्रकरण व खिलाफत प्रकरण या दोनहि चळवळींना अगदीं निराळें स्वरूप प्राप्त झालें होतें. लॉर्डांच्या सभेंत व

* लोकमान्य, २३ जुलै १९२१

कामन्स सभेंत हिंदी लोकमताला बेमुर्वतपणानें धिःकारण्यांत आल्यावर प्रतियोगी सहकारितेला कोठें वाव शिल्लक राहतो, हेंच आम्हास समजत नाहीं. दुसऱ्यानें जर स्नेहबुद्धीनें आपणास जवळ केलें तर दुसऱ्यानाहि आपण स्नेहबुद्धीनें जवळ केलें पाहिजे, असे 'जशास तसें' या न्यायानें सिद्ध होतें. पण दुसऱ्यानें जर धिःकारलें तर आपणहि धिःकारलेंच पाहिजे, असाच जबाब 'जशास तसे' हा न्याय देतो. तेव्हा प्रतियोगी सहकारितेवर विसंबून राहून प्रतिपक्षानें उभारलेली इमारत कलकत्त्याच्या वेळीं ढासळूनच गेली होती, असे म्हणावे लागते. अमृतसरच्या राष्ट्रीय सभेच्या ठरावाला मान देणें जरूर आहे, हे कारणहि लेचेंपेचेंच होय. अमृतसरच्या राष्ट्रीय सभेला जर मान पाहिजे तर कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेला मान का नको? नागपूरच्या राष्ट्रीय सभेच्या ठरावाना का मान नको? नव्या कायदेकौन्सिलचा उपयोग करून घ्या, असे अमृतसर येथें टिळकानीं सांगितलें त्यावेळीं टिळकाच्याहि पुढे महात्मा गांधी होते. नव्या योजनेला अमृतसरच्या राष्ट्रीय सभेनें जीं दूषणें दिलीं आहेत तीं दूषणें नसतीं तर बरें झालें असतें, असे म्हणणारात महात्मा गांधींची त्या वेळीं गणना होती. असें असताहि खिलाफतच्या प्रश्नाला व पंजाब प्रकरणाला जें नवें स्वरूप प्राप्त झालें त्या स्वरूपामुळें जर महात्मा गांधी याचीं मतें बदललीं गेलीं तर टिळकाचींहि मते बदललीं गेलीं नसतीं, असे का म्हणावे? नव्या योजनेचे कैवारी महात्मा गांधीइतके टिळक केव्हाहि नव्हते. नव्या योजनेचा महात्माजींना विशेष मोह पडला होता. त्याना जर राष्ट्रकार्याकडे लक्ष देऊन आपला मोह आवरता आला, तर ज्यानी नव्या योजनेला निराशाजनक असे म्हटलें ते टिळक कायदे कौन्सिलला मिठी मारूनच बसले असते असें कसें म्हणावें? प्रतियोगी सहकारिता व अमृतसरच्या कॉंग्रेसचे ठराव या दोन मुद्याची विल्हेवाट अशा रीतीनें लागल्यावर, कायदे कौन्सिलातील निवडणुकीकरितां

टिळकांनीं चालविलेल्या तयारीकडे आपण वळूं या. टिळकांनीं जी तयारी चालविली होती ती तयारी दिल्लीच्या व प्रांताप्रांताच्या कौन्सिलांत आपल्या पक्षाचें मताधिक्य स्थापित करण्याकरितां होती. हें मताधिक्य प्रस्थापित व्हावें म्हणून अमृतसरच्या ठरावाला विरोध करणाऱ्या जिन्नाटबाई व इतर मवाळ पुढारी यांना निवडून देऊं नका, असें सर्वांना टिळक त्या वेळीं सांगत असत. खिलाफतीचा प्रश्न किंवा अमृतसरचा प्रश्न सोडविण्याचे दोन मार्ग टिळकाना दिसत होते. एक मार्ग महात्मा गांधी यांनी सांप्रत स्वीकारलेला मार्ग होय. दुसरा मार्ग नव्या कायदेकौन्सिलांत आपल्या पक्षाचें मताधिक्य करून तेथें नोकरशाहीला नडवून कायदेकौन्सिलांतील टक्करीचा उठाव घेऊन नंतर लोकांमध्यें पुन्हा चळवळ करण्यास तयार होणें हा मार्ग होय. बनारसच्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या वेळीं या दुसऱ्या मार्गाचें समर्थन टिळक करीत होते. टिळक जर जिवंत असते तर कलकत्त्याच्या कॉंग्रेसवर त्यांनीं आपल्या दुसऱ्या मार्गाचाच कार्यक्रम लादला असता आणि हिंदी राजकारणाला आजच्याहून निराळें वळण लागलें असतें, असे काहींचें म्हणणे आहे. तडजोडीने वागून आपल्या कार्यक्रमापैकीं बराचसा भाग इतर पुढाऱ्यांच्या गळ्यांत बांधण्याचा हट्ट टिळकांनीं कलकत्त्याच्या कॉंग्रेसच्या वेळीं धरला असता किंवा कसें, हाच मुख्य प्रश्न आहे. या प्रश्नास आमचें असें उत्तर आहे कीं, खिलाफतच्या प्रश्नाचें महत्त्व जाणून आणि खिलाफतच्या पुढाऱ्यांच्या मनोविकारांना योग्य मान देऊन टिळकांनीं आपला कार्यक्रम त्यांच्या नेहमींच्या धडाडीनें कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेपुढे मांडला नसता. याचीं कारणें टिळकांच्या कार्यक्रमांतच दृष्टीस पडणारीं आहेत. टिळकांच्या कार्यक्रमाचे तीन भाग आहेत. 'पहिला भाग कायदेकौन्सिलांत मताधिक्य' मिळविणें हा होय. दुसरा भाग या मताधिक्याच्या जोरावर खिलाफत व अमृतसर या प्रकरणासंबंधानें

नोकरशाहीशीं टक्कर (deadlocks) देणें हा होय; आणि तिसरा भाग या टक्करीच्या जोरावर लोकाना हलवून सोडून लोकाची शक्ति वाढविणें हा होय. साप्रतचा महात्मा गाधी याचा कार्यक्रम आणि टिळकाचा बनारसच्या ऑल इडिया कॉग्रेस कमिटीच्या वेळचा कार्यक्रम, याच्यामध्यें अखेरीस लोकाची शक्ति वाढविणे हा भाग सारखाच आहे. खिलाफतचा कार्यक्रम आजच लोकाची शक्ति वाढविण्याच्या स्वावलबनाच्या मार्गाला लागा, असा कलकत्याच्या कॉग्रेसच्या वेळीं होता व अजूनहि तो जशाचा तसाच आहे. टिळकाच्या कार्यक्रमात कायदेकौन्सिलात मताधिक्य करणें व टक्कर (deadlocks) देणें हे प्रारभींचे दोन वळसे बनारसच्या वेळीं अधिक होते. टिळकाना कायदेकौन्सिलात मताधिक्य पाहिजे होतें तें टक्कर देण्याकरिता पाहिजे होतें. कायदेकौन्सिलात जाऊन टक्कर देऊन खिलाफतच्या व पंजाबच्या प्रकरणांत नोकरशाहीशीं आपण दोन हात करू, असें टिळक म्हणत होते. या टक्करीमुळें नोकरशाही आपलीं मतें सोडणार नाहीं, हेहि ते ओळखून होते. असल्या टक्करीचा उपयोग लोकात नवी जागृति उत्पन्न करण्यास नेहमीं चागला होत असतो हें टिळक जाणून असल्यामुळें टक्करीनंतर लोकसमाज स्वावलबनाच्या मार्गाला लावण्यास सोयीचें पडेल, असा टिळकाचा अंदाज होता. टिळक टक्करीकरिता कायदे-कौन्सिलांत जाणार होते, ह्याबद्दल वाद नाहीं, टिळकाची तयारी त्या दृष्टीनें चालली होती. नोकरशाहीनें व मवाळानीं देखील उलट तयारी या टक्करीच्या (deadlocks) दृष्टीनें चालविली होती. त्यावेळीं टिळकावर ॲग्लो-इंडियन पत्रानी नानाप्रकारच्या शिव्याच्या भडिमामार केला होता, आणि टक्कर देण्याच्या या तयारीला मवाळानीं हाणून पाडलें पाहिजे, अशी इशारत मवाळ पक्षास देण्यात आली होती. खुद्द मवाळ पक्षानेहि हे टक्करीचें (deadlocks) तत्त्व नव्या कायदेकौन्सिलाच्या आत्म्यास विघातक असल्यामुळे लोकानीं या

टकरीच्या दृष्टीनें आपलें प्रतिनिधी निवडून देऊं नयेत, असाच गहजब टिळकांवर त्यावेळीं केला होता. यावरून असें सिद्ध होतें कीं, मताधिक्य, टक्कर, व नंतर पुन्हा लोकांत चळवळ असा तीन भागाचा टिळकांचा कार्यक्रम बनारसच्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या वेळीं होता. बनारसच्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनंतर खिलफतीचा असहकारितेचा कार्यक्रम पुढें आला, आणि नंतर कांही दिवसांनीं कायदे-कौन्सिलावर बहिष्कार घालण्याची चळवळ महात्मा गांधी व खिलाफतीचे पुढारी यांनी हातीं धरली. खिलाफतीनें कायदेकौन्सिलावर बहिष्कार घालण्याचा निश्चय केल्यानंतर कलकत्त्याच्या कॉंग्रेसच्या वेळीं आपला बनारसचाच कार्यक्रम टिळकांनीं कायम ठेवला असता काय, याचा वाचकांनीच विचार करावा. मुसलमानांनी कायदेकौन्सिलवर बहिष्कार घातल्यानंतर कायदे-कौन्सिलांत मताधिक्य मिळविणें हा भागच आपोआप नाहींसा होतो. खिलाफतचे पुढारी व कॉंग्रेसला येऊन मिळालेले मुसलमान यांच्या मदतीशिवाय टिळकांच्या अनुयायांना कायदेकौन्सिलांत मताधिक्य मिळणें केव्हांहि शक्य नाही. व्यवहारदक्ष टिळक यांच्या ही गोष्ट लक्षांत आली नसती, असें म्हणणारांनीं टिळकांना व्यवहारदक्ष तरी कां म्हणावें हें आम्हांस समजत नाही. कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेच्या वेळीं राष्ट्रीयपक्षाच्या खाजगी सभा झाल्या होत्या; आणि त्या वेळच्या चर्चेंत बॅ. दास वगैरे पुढाऱ्यांना जर कायदेकौन्सिलांतील टकरीचा मार्ग पसंत पडला नाहीं तर कायदे-कौन्सिलच्या निवडणुकीच्या वेळीं राष्ट्रीय पक्षानें उभे राहणें चुकीचें होईल, असेंच ठरविलें होतें. कायदे-कौन्सिलांत मुसलमानांना जवळ जवळ एक तृतीयांश मतें आहेत. खिलाफतच्या पुढाऱ्यांनीं निवडणुकींतून अंग काढलें म्हणून या एक तृतीयांश जागा हल्लींच्याप्रमाणें नोकरशाहीचे बगलबच्चे अडविणार हें कलकत्त्यास बॅ. दास वगैरे पुढाऱ्यांना स्पष्टपणें दिसून चुकलें होतें.

मुसलमानांच्या एक तृतीयांश जागा बगळल्यानंतर बाकीच्या दोन तृतीयांशात सरकारच्या वर्णीदाराकरिता राखून ठेवलेल्या काहीं जागा आहेत. इतक्या जागा अडल्या गेल्यावर टिळक असते तरी राष्ट्रीय पक्षास मताधिक्य मिळणें शक्यच नव्हतें. जर मताधिक्य नाहीं तर टक्कर ( dead'ock ) नाहीं, आणि टक्कर नाहीं तर पुढें लोकजागृतीहि नाहीं. खिलाफतीच्या मदतीशिवाय टिळकाचा कार्यक्रम पार पडण्यासारखा बिलकूल नव्हता, हें वरील विवेचनावरून वाचकाच्या ध्यानीं येईल. लोकजागृती करून लोकाची शक्ति वाढल्याशिवाय गत्यंतर नाहीं, हें स्वावलंबनाचें तत्त्व महात्मा गांधी यांच्याप्रमाणें टिळकानाहि मान्य होतें पण कायदे-कौन्सिलातील टक्करीच्या नव्या प्रकारामुळें जुन्या कार्यास नवीनपणा येऊन लोकाना सामर्थ्यवान करण्याचे काम अधिक सुलभ झालें असतें एवढेंच कायतें टिळकाना बनारसच्या कमिटीच्या वेळीं वाटत होतें. चळवळ नेहमींच्या चाकोरींतून न चालविता कायदेकौन्सिलातील टक्करीच्या नव्या चाकोरीतून जर चालविली तर नवीन स्फूर्ति उत्पन्न होऊ शकते, हें मुसलमानाच्या पुढाऱ्याना मान्य नव्हते, असे बिलकूल नाहीं. नव्या चाकोरीचा फायदा जुन्याच चळवळींनीं का घेऊ नये, या प्रश्नातील जोर अल्लीबंधू पूर्णपणे ओळखतात. पण खिलाफतीचा प्रश्न झाला तरी शें दोनशें वर्षांनीं केव्हातरी येणाऱ्या योगापैकीं एक योग होय. कायदेकौन्सिलांतील टक्करीची तयारी करण्याची संधि दर तीन तीन वर्षांनी येणारी आहे. तीन तीन वर्षांनी येणारा पर्वकाळ आणि तीनशें तीनशे वर्षांनीं येणारा पर्वकाळ, यामध्ये पूजा प्रथम कोणाची केली पाहिजे आणि विशेष महत्त्व कोणाला दिले पाहिजे, हें टिळकानीं कलकत्त्यास ओळखले नसते, असे म्हणणें म्हणजे टिळकाच्या बुद्धिमत्तेबद्दल अत्यंत वाईट मत प्रदर्शित करणें होय. कायदे-कौन्सिलातील टक्करींचा कार्यक्रम पुढे मांडून सात कोट मुसलमान हिंदी

स्वराज्याच्या ध्येयाकडे अधिक वळले असते. का खिलाफतीच्या प्रश्नामुळें स्वावलंबनाचा आजच मार्ग पुढें मांडून हिंदी स्वराज्याचें महत्त्व सात कोट मुसलमानांना अधिक पटविता आलें असतें, असा प्रश्न पुढें येताच खिलाफतवाले जर कायदे–कौन्सिलात नाहींत तर आपणहि कायदे–कौन्सिलांत नाहीं, असेच टिळकांनीं स्पष्ट उत्तर दिलें असते. मुसलमानाची एकी व खिलाफतीचा प्रश्न याजकडे टिळक कोणत्या दृष्टीनें पाहात होते हें गेल्या अंकात आम्हीं वाचकापुढें मांडलेंच आहे. कायदे–कौन्सिलात जावयाचें नाहीं असा खिलाफतवाल्यानीं दृढ निश्चय केल्यावर टिळकाच्या खिलाफती-संबंधाच्या त्या दृष्टीनें, खिलाफतवाल्यानाच उचलून धरण्यास टिळकाच्या अनुयायाना कलकत्याच्या कॉंग्रेसच्या वेळीं सांगितलें नसतें काय ?



# * टिळक आणि स्वावलंबन



कौन्सिलमध्यें मताधिक्य मिळवावयाचें तें टक्कर-देण्याकरितां, आणि टक्कर द्यावयाची ती लोकामध्यें पुन्हा जागृति उत्पन्न करावयास सांपडावी म्हणून ! या टिळकांच्या कार्यक्रमातील तत्त्वांचा विचार अधिक खुलासेवार करणें जरूर आहे. कौन्सिलात टक्कर मताधिक्य हातीं असल्याशिवाय देता येत नाहीं. नुसता विरोध करणें निराळें आणि टक्कर देणें निराळें ! विरोध करण्यापासून उपयोग होत नाही असे आमचें म्हणणें नाहीं. पं मदन मोहन मालवीय यानीं जुन्या कौन्सिलात अमृतसर प्रकरणासंबंधानें फार योग्य रीतीनें नोकरशाहीला विरोध केला. नोकरशाहीनें कौन्सिलमध्ये त्यांना तुच्छतेनें झिडकारलें; पण नोकरशाहीवर अगदींच परिणाम झाला नाहीं, असे नाहीं. कौन्सिलाबाहेर सामान्य जनतेवर पंडितजींच्या विरोधाचा फारच चागला परिणाम झाला, आणि महात्मा गांधी यांच्या सांप्रतच्या चळवळीला पंडितजींच्या विरोधामुळें एक तऱ्हेची आगाऊ पुष्टि त्या वेळीं मिळाली. पण असल्या विरोधानें टक्करीचें पुण्य मिळत नाहीं टक्करीमध्यें नोकरशाहीच्या डोक्यावर आपल्या पक्षाचें डोके हापटून नोकरशाहीला आणि नोकरशाहीच्या कायदेकौन्सिलच्या यंत्राला जागच्याजागीं डाबून निश्चल उभें करता येतें. नोकरशाहीचें यंत्र हालत नाहीं व नोकरशाही हालत नाहीं, अशी नोकरशाहीची कायदेकौन्सिलात होणारी जी अडवणूक त्या अडवणुकीला टक्कर असें म्हणतात. प्रजेच्या कायदेकौन्सिलांतील शक्तीनें नोकरशाहीचे हात धरून नोकरशाहीला एखाद्या निर्जीव पदार्थाप्रमाणें स्तब्ध उभी केली असतां नोकरशाही कौन्सिलच्याहि वरची आपली सत्ता उपयोगांत आणून तें कायदेकौन्सिल मोडून तरी टाकते किंवा कायदेकौन्सिलांच्या ठरावांना

---

* लोकमान्य, २४ जुलई १९२१

घाब्यावर बसवून घरच्या सत्तेच्या जोरावर कौन्सिलच्या मार्फत चालावयाचा राज्यकारभार स्वतःच चालवूं लागते, अशा थरावर कौन्सिलातील टक्कर गेल्यानतर ही टक्कर पाहात राहणाऱ्या प्रेक्षकाना म्हणजे खुद्द राष्ट्राला कुस्तींत पडावें लागतें. नोकरशाही जशी कौन्सिलच्या वरची आपली सत्ता उपयोगात आणते त्याप्रमाणे टक्कर पाहणारे लोकहि कुस्तींत स्वतः पडूं लागले म्हणजे स्वतःच्या अगची नैसर्गिक शक्ति उपयोगात आणूं लागतात. आपल्या बाजूच्या पहिलवानाला न्याय मिळत नाही आणि कुस्तीच्या आखाडयाबाहेरचें बल उपयोगांत आणून आपल्या बाजूच्या पहिलवानावर ताण करण्यात येत आहे, असे जेव्हा प्रेक्षक स्वतःच्या डोळ्यानी पाहतात तेव्हा कुस्तीच्या आखाडयांत स्वतः उतरून स्वतःच्या पक्षाच्या बाजूनें स्वतःचें बल खर्च करण्याची प्रवृत्ति प्रेक्षकामध्ये आपोआप उत्पन्न होते. प्रेक्षकांपुढें जर कुस्ती चाललेली नसेल आणि टक्करीचा प्रत्यक्ष देखावा जर प्रेक्षकाच्या नजरेस येणारा नसेल, तर स्वतःचें बल खर्च करण्याची प्रवृत्ति उत्पन्न होत नाहीं. टक्करीच्या प्रत्यक्ष दर्शनामुळे मनुष्याच्या अगचें आत्मबल आपोआप उचबळूं लागतें. जागृति करावी लागत नाही, जागृति होते! जागृति करण्याचें काम टक्कर स्वतः करीत असते. कौन्सिलामधील अडवणुकीनें किंवा टक्करीनें लोकात जागृति झाल्यावर लोक स्वतःच्या बाजूच्या पहिलवानाच्या मदतीकरिता आखाडयात आपोआप उतरूं लागतात. अशा रीतीनें आपोआप लोक आखाडयात उतरू लागल्यानतर झुजेंत आपली बाजू कमकुवत आहे, असे लोकाच्या ध्यानीं येऊ लागते, आणि त्यावेळी पुढाऱ्याच्या कामास पुन्हा सुरवात होते. लोकाची आत्मशक्ति जागी झाली खरी, पण ती प्रतिपक्षावर ताण करण्यास कशी समर्थ होईल याचा विचार पुढाऱ्याना करावा लागतो. या कृतीलाच स्वावलंबनाची चळवळ असे म्हणतात. महात्मा गाधी याची असहकारितेची चळवळ, किंवा मद्यपान प्रतिबधाची चळवळ या सर्व

चळवळी स्वावलंबनाच्या सदराखालीं येतात. खिलाफतीमुळें सात कोट मुसलमान आयते जागृत झाले असताना, आणि पंजाब प्रकरणामुळे सर्व हिंदी राष्ट्र आमच्या बाजूच्या पहिलवानाच्या तर्फेनें स्वतः आखाड्यात उतरण्यास तयार झाले असताना कायदेकौन्सिलातील टक्करीचे वळसे घेण्यात व्यर्थ वेळ का घालवा असा प्रश्न कोण विचारणार नाही? टक्करीनें जे कार्य व्हावयाचें ते कार्य खिलाफतीनें व पंजाब प्रकरणाने केल्यानंतर स्वावलंबनाच्या मार्गाला सुरुवात करण्याची वेळ येत नाही काय? खिलाफतीमुळे हे कार्य मुसलमानांत झालें आहे की नाही, हे ठरविण्याचा बोजा अल्लीबंधूंवर होता, आणि जागृतीचें कार्य झाले आहे, असा निकाल कलकत्त्यास अल्लीबंधूंनीं दिल्यावर इतर पुढाऱ्यांना पुन्हा टक्करीचा मार्ग केव्हाहि स्वीकारता आला नसता. लोक आखाड्यात उतरण्यास उत्सुक झाल्यानंतर त्याचें आत्मबल ज्यायोगानें बाहेर अधिक खेचलें जाईल, लोकांची शक्ति ज्या योगानें अधिक व्यवस्थित स्वरूपाची होईल, आणि लोकांची तपश्चर्या ज्या योगानें अधिक कार्यक्षम होईल, आणि लोकांच्या आत्मतेजानें आज नाही उद्या लवकरच अखेर विजय मिळविण्याचें सामर्थ्य प्राप्त होईल, असाच कार्यक्रम अशा प्रसंगीं पुढाऱ्यांनी आखला पाहिजे. लोकांनीं स्वतःच्याच हातांनी स्वतःचीच शक्ति उत्पन्न करून ती स्वतःच्याच हातीं कृपणाप्रमाणें ठेवल्याशिवाय अखेर यश मिळवून देणारें बल केव्हाहि वृद्धिंगत होत नाहीं. आपल्या हातानीं दुसऱ्याच्या शक्तीला मदत करून ती वाढलेली शक्ति पेटीत कोंडून ठेवणे, असला मार्ग स्वावलंबनाच्या विरुद्ध असतो हे सांगणें नकोच. दुसऱ्याच्या किंवा प्रतिपक्षाच्या मदतीशिवाय केवळ स्वतःवर अवलंबून राहून स्वतःचें कर्म रोजच्या रोज स्वतः करून त्यापासून मिळणारें फलहि किंवा बलहि स्वतःच्या हातांत ठेवता येईल आणि स्वतःच्या इच्छेप्रमाणें पाहिजे तेव्हा त्याचा उपयोग करून घेता येईल, असल्या

तालमीला तपश्चर्येला किंवा, चळवळीला स्वावलंबन असें म्हणतात. स्वावलंबन म्हणजे स्वतःची, स्वतःच्या बलावर प्रत्यक्ष केलेली कृति होय. नोकरशाहीपुढें आपलें चालत नाहीं, तर आपली आपण, आपल्या पुरती, आपल्या शक्तीच्या जोरावर, आपल्या स्वतःच्याच आधारात चालायाची चाल चालली पाहिजे. ती चालता चालता नोकरशाहीची मदत कमी होऊन नोकरशाही रोडावत चालली म्हणजे आणि रोजच्या तालमीमुळें आपलें स्वतःचें चालणें 'धीरोद्धता नमयतीव गतिर्धरित्रीम्' अशा तऱ्हेचें जोरकस झालें म्हणजे स्वावलंबनामुळें नोकरशाहीवर मात करण्याची वेळ आपोआप प्राप्त होते. असल्या तालमीला व तपश्चर्येला सांप्रतच्या राजकीय वादात स्वतःपुरती प्रत्यक्ष कृति ( Direct Action ) असेंहि नाव आहे. महात्मा गांधींचें ध्येय बहुतेक सर्व विचारी मवाळांना मान्य आहे. ध्येयासंबंधानें तंटा नाहीं, मार्गासंबंधानें तंटा आहे. महात्मा गांधींच्या 'डायरेक्ट ॲक्शन'चा किंवा स्वावलंबनाच्या प्रत्यक्ष कृतीचा मार्ग मवाळांना पसंत नाहीं. स्वावलंबनाची किंवा 'डायरेक्ट ॲक्शन'ची तालीम मवाळांना नकोशी वाटते. दुसऱ्याच्या आखाड्यात दुसरा सांगेल तेवढी आणि दुसऱ्याच्या हातात शेंडी राहील अशा तऱ्हेची 'इन्‌डायरेक्ट ॲक्शन'ची ऊर्फ परावलंबनाची तालीम हिंदुस्थाननें आणखी कांहीं पिढ्या केल्याशिवाय स्वतःचा आखाडा स्थापून स्वतःच्या स्वावलंबनाची किंवा 'डायरेक्ट ॲक्शन'ची तालीम हिंदुस्थानास झेपणार नाहीं, असें मवाळ पक्षाचें म्हणणें आहे. 'डायरेक्ट ॲक्शन' किंवा 'इन्‌डायरेक्ट ॲक्शन' म्हणजे स्वावलंबन किंवा परावलंबन यांच्या संबंधाच्या वादात टिळक जिवंत असते तर कोणत्या बाजूचे झाले असते, या प्रश्नाचें उत्तर टिळकांचें चाळीस वर्षांचें चरित्र सर्वांच्या कानीं कपाळीं ओरडून सर्वांना देत आहे. टिळकांची बुद्धीची रचना स्वयंभू स्वावलंबनाची! स्वतःच्या बुद्धींतच स्वतः

गढून जाऊन स्वतःच्या कब्जांतलें जग स्वतः निर्माण करून तेथे निष्कंटक सत्ता चालविण्याची हौस टिळकाच्या बुद्धीला जन्मसिद्ध होती. ही असली हौस असल्यामुळेच अध्ययन व अध्यापन असल्या कर्मांतच सर्व जन्म घालवावा, असे त्यांना कॉलेजात शिकत असताना व पुढें 'न्यू इंग्लिश स्कूल' काढल्यावरहि स्वभावतः वाटत होतें. या त्यांच्या मूळच्या स्वभावाला सभोंवारच्या स्थितीनें जे वेळोवेळीं अडथळे केले त्या अडथळ्याशीं झुंजता झुंजता टिळक आपल्या आयुष्याच्या अखेरच्या कालांत जन्मसिद्ध स्वराज्याकडे वळले. पण या अडथळ्याशीं झुंजण्याचें काम त्यांनीं ३०-४० वर्षें कसें केलें? अडथळ्याला टक्कर द्यावयाची, टक्करींत कमकुवतपणा अनुभवास येण्याबरोबर स्वावलंबनाची तपश्चर्या करून पहिल्या अडथळ्याच्या छातीवर पाय देऊन दुसऱ्या अडथळ्याच्या सन्मुख टक्करीकरितां पुन्हा उभें राहावयाचें, असा एकसारखा चाळीस वर्षें टिळकाच्या चरित्राचा प्रवाह अखेरपर्यंत वहात होता. स्वावलंबन हा तर त्यांचा मुख्य मंत्र होता. दुसऱ्याच्या हातात शेंडी राहील असली चळवळ टक्करींच्या केवळ देखाव्यापुरती ते करीत असत. त्यांच्या प्रत्येक श्वासात स्वावलंबन भरलेलें होतें. त्यांच्या शरीराची, मनाची, बुद्धीची व आत्म्याची ठेवणच स्वावलंबनाची होती. अमक्या तमक्या ठिकाणी व अमक्या तमक्यापुढें आपलें चालत नाही, असे टिळकांना समजल्याबरोबर दुसऱ्या क्षणापासून स्वतःच्या कृतीवरच भिस्त ठेवण्यास लहानसहान बाबींतहि टिळक एकदम प्रारंभ करीत असत. आपल्या सोबत्याशी आपले जमत नाहीं, असे एकदा मनास पटल्याबरोबर त्या सोबत्याचें पुन्हा तोंडहि न पाहता स्वतःच्या पुरत्या स्वतःच्या तपश्चर्येस हालअपेष्टा सोसूनहि टिळकांनीं एकदा नाहीं दोनदा, कित्येक वेळा प्रारंभ केला आहे. खाजगी किंवा लहान सहान गोष्टींत असल्या मनोवृत्तीस स्वाभिमान असे म्हणत असतात, आणि सार्वजनिक

कामात याच वृत्तीस असहकारितेची चळवळ हे नांव प्राप्त होतें. स्वाभिमानानें स्वावलंबनाची तपश्चर्या करणारे टिळक जर नव्हते तर होते तरी काय? टिळकाचा खाजगी किंवा सार्वजनिक, कोणताहि उद्योग स्वाभिमानाच्या व स्वावलंबनाच्या तपश्चर्येच्या पायावर उभारलेला नव्हता, असें त्यांच्या चरित्रात बिलकूल सापडावयाचें नाही. 'डायरेक्ट ॲक्शन'चा उपजत चहाता जर गेल्या शेपन्नास वर्षात हिंदुस्थानात कोणी जन्मास आला असेल तर तो एकटा टिळकच होय. महात्मा गांधी विचार करतां करता 'डायरेक्ट ॲक्शन'च्या मार्गावर पोचलेले आहेत. टिळक जन्मापासून उपजतच 'डायरेक्ट ॲक्शन'चे कैवारी आहेत. प्रतिस्पर्ध्यांच्या तोंडाकडे पाहून त्यांच्या मेहरबानीनें जगण्याचा कटाळा टिळकाच्या इतका आजच्या कोणत्याहि पुढाऱ्यात सापडावयाचा नाही. या त्यांच्या उपजत गुणामुळे गोखले, मेथा वगैरे मंडळींशी आपोआपच त्यांचे पटत नसे. जे काहीं थोडे पटे, तें विचार करकरून पटवून घ्यावे लागे. मनाचा व बुद्धीचा कल असे न पटण्याकडे अधिक होता. असला 'डायरेक्ट ॲक्शन'चा किंवा स्वावलंबनाचा मूर्तिमंत पुतळा महात्मा गांधी यांच्या सांप्रतच्या 'डायरेक्ट ॲक्शन'च्या चळवळींत उपजत प्रेमानें, उल्हासानें आणि अंगात वारे संचारण्याच्या वेळच्या धडाडीनें पडला नसता, असे कोण व कसे म्हणू शकेल?

———

# * टिळक आणि तडजोड

महात्मा गांधी यांजवर मुंबईच्या 'टाइम्स'नें असा आरोप केला आहे कीं, महात्माजी केव्हां आणि कशी टोपी फिरवतील याचा नेम नसल्यामुळें त्याच्या अनुयायांचा संघ चांगला मजबूत होईल असे म्हणता येत नाहीं. मुंबईतील पारशी गुत्तेवाल्याच्या नुकसानीकडे लक्ष देऊन महात्माजींनीं मुंबई शहरापुरतेंच पिकेटिंग बंद ठेवले, ही गोष्ट वरील विधानास पोषक म्हणून पुढें करण्यात आलेली आहे. असहकारितेच्या चळवळीचे हे मुख्य प्रवर्तक, पं. मदनमोहन मालवीय यांनी आग्रह केला म्हणून सिमल्यास लाटसाहेबाच्या दर्शनास जातात, खिलाफतच्या शिष्टांना सरकारी आमंत्रण स्वीकारून विलायतेस जाण्याचा सल्ला देतात, आणि गार्डन पार्टीला असहकारितावाद्यांनीं हजर राहणें गैरशिस्त असताहि तसल्या मेजवानीला जा म्हणून आपल्या अनुयायांना सुचवितात, तेव्हां धरसोडीचें वर्तन करणाऱ्या या असल्या पुढाऱ्याच्या शब्दाला काहीं वेळानें मान राहणार नाहीं, असा मुंबईच्या 'टाइम्स' चा कयास आहे. सत्याग्रहाची चळवळ महात्माजींनीं सुरू केली आणि लगेच हिमालयाएवढी चूक झाली असे कबूल करून अहमदाबादच्या दंग्यानंतर ती त्यांनीं बंद केली. त्या वेळीं देखील हा धरसोडीचा आरोप महात्माजींवर करण्यांत आला होता. तसला धरसोडीचा आरोप झाल्यानंतरहि सांप्रतच्या असहकारितेच्या चळवळीच्या वेळीं सर्व हिंदुस्थान महात्माजींच्या मागें लागलेलें आहे, याचें इंगित काय? महात्माजी सिमल्यास गेले म्हणून त्यांचें वर्चस्व कमी झालें नाहीं, याचें कारण काय? महात्माजींनीं आज मुंबईपुरतें पिकेटिंग बंद ठेवले तरी उद्यां दुप्पट जोरानें पिकेटिंगची वावटळ सुरू होईल, अशी भीति गुत्तेवाल्यांना वाटत आहे, हें

* लोकमान्य, २५ जुलै १९२१

असे कसे होते? महात्माजी अशा प्रकारें धरसोडीनें वागतात तरी देखील अनुयायी एकनिष्ठेनें त्यांच्या मागून जातात, हा चमत्कार कसा उलगडावयाचा? या अशा गोष्टी कशा घडून येतात, याचें कोडें जर समजून घ्यावयाचें असेल तर टिळकांच्या चरित्राकडे पाहिलें पाहिजे. टिळक प्रतिस्पर्ध्याशीं धडाडीनें लढणारे वीर पुरुष तर खरेच, पण लढताना अविचारानें ते कधींहि वागलेले नाहींत. कोणच्या ना कोणच्या तरी ठरीव विचारसरणीला अनुसरून ते नेहमीं टक्कर देत असत. पण नुसत्या टक्करीचा किंवा लढण्याचा अभिनिवेश अंगात संचारल्यामुळें भक्कम विचाराच्या पायावरून ते ढासळून पडले असे केव्हाहि झालेले नाही. विचार आणि बुद्धि एका बाजूला ठेवून मनोविकाराचा वारा जिकडे नेईल तिकडे आपल्या चळवळीची नाव त्यानीं पाहिजे तशी भडकू दिली नाहीं. शक्तीचा उपयोग लढताना करावयाचा, धोरण ठरविताना शक्तीला साधनापेक्षा अधिक मान द्यावयाचा नाहीं; हें तत्त्व त्यांच्या बुद्धीनें कधींहि सोडलें नाही. कोणत्याहि चळवळींत ते निर्भयपणें पडत असत. वरच्या पायरीस चढलेल्या बुद्धीच्या लक्षणांपैकीं निर्भयता हें एक लक्षण आहे. मृत्यूपर्यंतचे भय आपणास अमक्या तमक्या चळवळींत येणारे आहे, हें आधी ओळखून तें भय प्रथमच आपण होऊन आपल्या मस्तकीं धारण करून नंतर टिळक चळवळींत पडत असत. चळवळींतील आपला मृत्यु आपल्या डोळ्यानीं आपण देखणें, आणि तो मृत्यु आला तरी स्वीकारला पाहिजे अशा ठाम सिद्धांताचें अचल आसन घालून बसणें, यालाच निर्भयता असे म्हणतात. ही निर्भयता टिळकांच्या अगीं जितकी होती तितकीच लालाजी किंवा महात्माजी यांच्याहि अंगी आहे. चळवळीची विचारसरणी आणि पुढाऱ्याच्या मनाची ही निर्भय स्थिति या दोघांचा उत्तम मेळ पडल्यावर अनुयायांना कधीहि वाण पडत नाही. असल्या दोन गुणांवर लुब्ध होणे हा मनुष्याचा स्वभाव उपजत आहे. जोपर्यंत पुढाऱ्याच्या मनाची

निर्भय स्थिति भंग पावलेली नाहीं. आणि त्यांच्या विचारसरणींत स्वतःच्या लोभाचा गढूळपणा दिसत नाहीं, तोंपर्यंत त्यांचीं पावलें मागें पुढे पडतात एवढयाचमुळें, अनुयायाचींहि मनें चलबिचल होत नाहींत. १८९७ सालच्या खटल्यात, १९०८ सालच्या केसरीवरील दुसऱ्या खटल्यात, ताईमहाराजाच्या किंवा शेवटीं चिरोलच्या खटल्यात, टिळक धडाडीनें लढले, कारण शातपणानें ठरविलेल्या विचारसरणीचा उद्दिष्ट हेतु अढळ रीतीनें मनापुढे ठेवून कोर्टानें दिलेली शिक्षा आगाऊच मनानें ओळखून मानसिक परिस्थितींत ती कैद आगाऊ उपभोगूनच टिळकानीं झुंजेस सुरवात केली. कोल्हापूर प्रकरणातील शिक्षेमुळें डोंगरीच्या किल्ल्यावर १०१ दिवस टिळकानीं आगरकराच्या बरोबर तुरुंगात काढले, ज्या लेखामुळें हा तुरुंगवास त्याना सोसावा लागला ते लेख टिळकाच्या हातचे नव्हते. १८९७ आणि १९०८ या दोन सालातील केसरींतील खटल्याच्या वेळी ज्या सपादकीय लेखामुळे टिळकाना जबर शिक्षा भोगाव्या लागल्या ते सपादकीय लेख प्रस्तुत लेखकाच्या हातचे होते, आणि त्या वेळीहि सपादन करण्याचा बोजा टिळकाच्या शिरावर नव्हता. सदर लेखाच्या वेळीं मुख्य सपादक या नात्यानें रा. खाडिलकरच केसरी ऑफिसात काम करीत होते. केवळ मुद्रक व प्रकाशक एवढयाच नात्यानें टिळकानी त्या शिक्षा भोगलेल्या आहेत! पण चळवळींतील विचारसरणी आपण जी आखली ती बरोबर आहे असे ध्यानीं घेऊन, शातपणानें इतर कोणासहि आपल्या दुःखाचे वाटेकरी करणें हितावह होणार नाहीं असे समजून उमजून, व इतरांना तसे समजून देऊन टिळक निर्भय स्थितींत तुरुंगाचा रस्ता धरते झाले! जामिनावर सोडविण्याची खटपट करताना रात्रीच्या वेळीं पोलिसच्या कोठडींत कै. दाजीसाहेब खरे, वकील या नात्यानें टिळकाना भेटावयास गेले असताना गाढ झोपेंत घोरत असलेले टिळक त्याच्या दृष्टीस पडले. अशा स्थितींत इतक्या लवकर तुम्हाला झोंप लागते

तरी कशी ! असा प्रश्न दाजीसाहेबांनीं साश्चर्य विचारला असतां तुम्हांला ज्या भयाची विवचना वाटते त्या भयाला विचारानें मीं मागें टाकलें असल्यामुळें माझ्या झोपेच्या आड कसलीहि विवचना येऊं शकत नाहीं, अशा आशयाच्या शब्दांनीं टिळकानीं दाजीसाहेबांचें समाधान केलें. चळवळींतील भीतीबद्दल अशी निर्भय स्थिति बुद्धीच्या जोरावर मनाची करून टाकल्यानंतर अनुयाया-संबधानें, मार्गासंबधानें, व साधनासंबधानें, सभोवारच्या लोकांच्या कुवतीकडे लक्ष देऊन, तडजोड करण्यास टिळक केव्हाहि मागें पुढें पहात नसत. पिके-टिंगच्या वेळीं मिशनऱ्यांचें, डॉ. मॅनसारख्या सरकारी अधिकाऱ्याचें व मवाळाचें टिळकाशीं चागलें पटे, कारण टिळक नेहमीं पटवूनच घेत. धोरणात निश्चयीपणा आणि स्वतःच्या कृतींत निर्भयपणा, हे दोन गुण असल्यावर इतराशीं तडजोडीनें वागून त्यांच्या अगच्या गुणाचा आपल्या कार्यास जितका उपयोग करून घेता येईल तितका उपयोग करून घेण्यास टिळक कधींहि मागेंपुढें पहात नसत. आज महात्मा गाधी झाले तरी तसेच वागत आहेत. वकिलाची बदनामी करण्यास चळवळीच्या ध्येयाकडे लक्ष देऊन महात्माजींनीं बिलकूल कमी केलेलें नाहीं. पण ज्याची बदनामी केली त्याच वकिलाच्याच धद्यातील आपल्या प्राप्तीपैकीं शेंकडा दहा, तीस, चाळीस, पाऊणशें टक्के टिळक स्वराज्य फडास द्यावे, असे म्हणण्यास महात्माजी तयार आहेतच ! दारूच्या गुत्तेवाल्यानीं आपल्या नुकसानीचे पैसे सरकारी तिजोरीतून मागून घ्यावेत, असा उपदेश महात्माजी गुत्तेवाल्याना करीत आहेत. ज्या शासनपद्धतीला ‘ सैतानी शासनपद्धति ’ असे महात्माजी म्हणतात, त्याच शासनपद्धतीच्या तिजोरींतून पैसे घेण्यास गुत्तेवाल्याना महात्माजी कसे सागतात, असा मवाळाचा प्रश्न आहे. नोकरशाही सैतान आणि दारूचा गुत्ताहि सैतानच ! तेव्हा एका सैतानाला दुसऱ्या सैतानाच्या घरीं जेवावयास जा म्हणणें यात कोणतें गैर

आहे ! दारूच्या गुत्त्याच्या सैतानाला महात्माजींनीं टिळक स्वराज्य फंडाच्या कोट सव्वाकोटी रुपयातून का जेवूं घालावें ? या दारूच्या सैतानाचें पोट रिकामे पडतें हे खरें आहे; आणि असल्या उपासमारीच्या सामान्य क्रियेबद्दल महात्म्याचें अतःकरण कळवळावें, हेंहि रास्त आहे. असल्या कळवळ्याच्या वेळीं महात्माजींनीं स्वतःच्या घरात जर या सैतानाना जेवावयास बोलाविलें असतें तर कार्यकर्ता पुढारी या नात्यानें त्याना कमीपणा आला असता. दारूच्या सैतानी खिल्लाराला दोन प्रहरच्या भुकेच्या वेळीं बड्या सैतानाचें स्वयपाकघर महात्माजीनीं दाखवून दिलें, यात कोणची चूक केली ? ना चळवळीचें धोरण चुकलें, ना महात्माजींची निर्भयता ढासळली, मग तडजोडीनें दारूचा धदा करणाराचीहि थोडीशी सोय लावण्यास कोणती हरकत ? मुख्य तत्त्वाचें स्वरूप सागोपाग ज्याच्यापुढें उभें राहिलेलें असतें आणि निर्भयता रोमरध्रात पूर्णपणे बाणलेली असते, चळवळींतील तसल्या स्थितप्रज्ञाला, स्वतःच्या पुरत्या स्वतःच्या आचरणात बिलकुल फरक पडूं न देता लोकसग्रहाकरिता लोकाशीं सहानुभूतीनें वागणें श्रेयस्कर आहे. तुसडे-पणानें विशेष फायदा नाहीं, असा श्रीमद्भगवद्गीतेला अनुसरून टिळकाच्या वर्तनाचा नियम होता. महात्मा गाधीहि आज तसेच वर्तन करीत आहेत. लखनौच्या कॉंग्रेसच्या वेळीं, कलकत्याच्या कॉंग्रेसच्या वेळीं, मुबईच्या जादा कॉंग्रेसचे वेळीं, विलायतेंत चळवळ करताना, आणि अमृतसरच्या कॉंग्रेसच्या वेळी, टिळक तडजोडीनेंच वागले आहेत, आणि बॅ. जीना सारख्यानींहि त्याजवर धरसोडीचाच आरोप केलेला आहे. लढताना किंवा टक्कर देताना टिळक अत्यत आवेशानें व धडाडीनें पुढे जात असत. या कर्मठ व कोपी ब्राह्मणाला एखादा शब्द इकडे तिकडे केलेलाहि खपावयाचा नाहीं तेव्हा याच्याशीं कोणाचें कसे पटावयाचें, असा टिळकांचा उपहास त्यांच्या प्रतिस्पर्ध्यानीं आणि काहीं काहीं प्रसगीं खुद्द अनुयायानींहि केलेला आहे. अमृतसरच्या राष्ट्रीय सभेच्या वेळीं बॅ. दास वगैरे मडळींच्या एका टोकाला

कित्येक वेळां मदत केली व कित्येक वेळा तेंच टोक तडजोडीला टिळकांनीं आणलें. विचारसरणीचें धोरण न सोडता टिळकांनीं अशा तडजोडी कित्येक केलेल्या आहेत. कांहीं प्रसंगीं तर खुद्द अनुयायीच टिळकांना अरेरावीपणाचा दोष देतील, इतक्या थरापर्यंत टिळकांनीं एकट्यानींच तडजोडी केल्या आहेत. महात्मा गांधी हा एक अरेरावी व एकतंत्री राजा बनला आहे, असाच आरोप मुंबईच्या 'टाइम्स'नें व मवाळांनीं आज महात्माजींवर केलेला आहे. टिळकांवरहि हा असाच आरोप याच शब्दांनीं करण्यात आला होता. तडजोड नेहमीं प्रसंग पाहून चटदिशीं करावी लागते. अनुयायांशीं चर्चा करीत बसण्याला फुरसतच नसते. तेव्हां जो पुढारी चळवळींत 'स्थितप्रज्ञ म्हणून गणला गेला त्या पुढाऱ्याला लोकसंग्रहाकरितां करावयाच्या तडजोडीची अखत्यारी अनुयायांनीं देणें जरूर आहे, असेंच टिळकांच्या चरित्रावरून सिद्ध होतें. महात्मा गांधी प्रतिस्पर्ध्यासंबंधानेंहि दयाशील आहेत. तेव्हां अनुयायांना पराक्रम करावयास लावण्याकरितां उत्तेजित करण्यापलीकडच्या दुःखांत ते त्यांना घालतील हें बिलकूल संभवत नाहीं. उत्तेजित करण्याच्या सीमा कोणत्या, संकट ओळखून अनुयायांना आवरून धरण्याच्या सीमा कोणत्या, आणि अनुयायांपैकीं अर्धवटांच्या उपयोग करून घेण्याचे मार्ग कोणते, हें पुढाऱ्यानें स्वतःच्या मनाशीं स्वतः ठरविलें पाहिजे टिळक असल्या तडजोडींची वाच्यता ऐन वेळेच्या अगोदर कधींहि करीत नसत. कारण ती वाच्यता झुंजेंतील दम उखडून टाकणारी असते तडजोड मनांत असली तरी तशी वेळ येऊन पोंचेपर्यंत कार्यकर्त्या पुरुषाला कृतींत निष्ठुरपणा ठेवावा लागतो. महात्मा गांधीहि या तडजोडीच्या मार्गासंबंधानें टिळकांसारखेच वागत असल्यामुळें उगीच शंका कुशंका काढून चळवळीचा जोर कमी करूं पाहणारांना मदत करणें टिळकांच्या अनुयायांना केव्हांहि श्रेयस्कर वाटणार नाहीं.

---

# * टिळक आणि राष्ट्रीय सैन्य



राष्ट्रीय सैन्य आणि देशी सैन्य या दोहोंमध्यें फरक आहे. इंग्रजसरकारच्या हिंदुस्थानातील लष्करात आज एका गोऱ्यास अडीच काळे असे प्रमाण आहे. हें सर्व काळें सैन्य देशी सैन्य होय. पण तें राष्ट्रीय सैन्य नव्हे. लष्करी नोकरीच्या अभिलाषानें, पोटापाण्याची सोय लागावी म्हणून, देशी सैन्यात भरती होत असते. नोकरी हा मुख्य हेतु असतो. आणि आपल्या अंगच्या गुणाना आणि प्रकृतीला साजेसा धंदा हा दुय्यम हेतु असतो. शीख, गुरखे, पठाण, रजपूत वगैरे लोक प्रकृतीनेंच लष्करी बाण्याचे असल्यामुळें सन्मानानें पोट भरण्याचा धंदा लष्करात मिळाला तर त्याना अधिक बरें वाटतें, आणि त्यामुळें इतर धंद्यापेक्षा ते हौसेनें लष्करी नोकरी पत्करतात. लष्करी पेशाविषयीं हौस व वीरवृत्ति युरोपियनाच्या बरोबरीची त्याच्या अंगीं असते, आणि त्यामुळें हिंदुस्थानातील इंग्रज सरकारचें काळें सैन्य युरोपच्या रणभूमीवरहि युरोपियनाच्या बरोबरीनें शौर्य गाजवूं शकतें. पण या देशी सैन्यात राष्ट्रीय भावना नसतें राष्ट्राच्या कल्याणाकरिता आपण लढत आहों, रणांगणावरील आपल्या आत्मयज्ञानें देशोद्धारास आपण मदत करीत आहों, आणि आपल्या पराक्रमामुळें आपल्या देशाच्या पूर्वीच्या, आजच्या व पुढच्या लौकिकास आपण सभाळून ठेवीत आहों, अशाप्रकारचे विचार या देशी सैन्यामध्यें नसतात. असल्या विचारांमुळें ते लष्करी नोकरींत शिरलेलेच नसतात. राष्ट्रीय सैन्यात राष्ट्रीय विचारांना प्राधान्य असतें. तनखा, मानमरातब आणि धंद्याचा नावलौकिक या सर्वांच्या वरची राष्ट्रीय सैन्याची पायरी असते. रोजच्या उपजीविकेकरिता राष्ट्रीय सैन्य लष्करी तनख्यावर अवलंबून नसतें. संसार चालविण्याचा त्याचा धंदा लष्करी

* लोकमान्य, २९ जुलै १९२१

पेशाहून निराळा असतो. या दुसऱ्या धद्यात त्यानीं एकप्रकारचा लौकिकहि मिळविलेला असतो, आणि राष्ट्रावरील सकट टाळण्याकरिता राष्ट्राची लष्करी सेवा करण्यास स्वयसेवक या नात्यानें राष्ट्रीय लष्करचे लोक पुढें आलेले असतात. लष्करी शिक्षण घेत असताना, त्याची उजळणी करीत असताना, किंवा संकटाच्या वेळी प्रत्यक्ष लष्करी सेवा करीत असताना, खड्या लष्करा प्रमाणें तनखा व शिधासामग्रीची सवलत राष्ट्रीय लष्करालाहि द्यावी लागते. पण तेवढ्यामुळें तें लष्कर नोकरवजा होत नाही. स्वयसेवकाचेंच लष्कर असल्याशिवाय त्याला राष्ट्रीय लष्कर असे नाव मिळत नाहीं. हिंदुस्थानात राष्ट्रीय लष्कर उभारलें जावें, या प्रश्नाला लॉर्ड किचनेर याच्या कारकीर्दींत वरिष्ठ कायदे–कौन्सिलात ना. गोखले यानी बरेच पुढे ढकलले. पण महायुद्ध सुरू होईतों चर्चेपलीकडचें मूर्त स्वरूप या प्रश्नाला बिलकूल प्राप्त झालें नाहीं. महायुद्ध सुरू झाल्यावर साहजिकपणे हा प्रश्न पुढे आला, आणि त्या वेळीं मुबईत शातारामाच्या चाळींत भरलेल्या जगी जाहीर सभेंत टिळकानीं या प्रश्नास उचलून धरलें. स्वयंसेवकाचें राष्ट्रीय सैन्य उत्पन्न करणें, वाढीस लावणें आणि कार्यक्षम बनविणाऱ्या गोष्टी काहीं विशिष्ट राजकीय परिस्थितीवर अवलबून असतात. ती परिस्थिति जर नसेल तर असले प्रयत्न निष्फळ झाल्यावाचून राहात नाहींत. हिंदुस्थानात इंग्रज सरकारचें गोरें व काळे मिळून नोकरवजा तीन लाख खडे सैन्य आहे. हे सैन्य म्हणजे नोकरशाहीचे मनगट होय. या मनगटाच्या शेजारी लोकानीं जर आपलें मनगट स्वयस्फूर्तीनें धरावयाचें असेल तर लोकाचा व नोकर-शाहीचा दर्जा पैशाच्या दृष्टीनें व सत्तेच्या दृष्टीनें सारखा असला पाहिजे. आज जर्मन युद्ध सुरू झाले आणि सैन्याचा तुटवडा पडेल अशी भीति पडली म्हणून राष्ट्रीय सैन्याची उभारणी तुम्ही करू लागला, पण या उभारणीची जरुरी भासली एवढ्यानेंच काम भागत नाहीं. टिळक असे म्हणत असत

कीं, आर्थिक दृष्ट्या व राजकीय दृष्टया बरोबरीची भागी लोकांना देण्यास आपण तयार आहों, असें नोकरशाहीनें मोकळ्या मनानें आश्वासन दिल्या-शिवाय म्हणजे स्वराज्य दिल्याशिवाय स्वयसेवकाचें जरूर तेवढें मोठें सैन्य हिंदुस्थानात कधींहि दृष्टीस पडणार नाहीं. महायुद्धामुळे स्वयसेवकांच्या धर्तीचें सैन्य सर्व युरोपियन राष्ट्रात उत्पन्न झालें तेव्हा तशा प्रकारचें एकादे सोंग हिंदुस्थानातहि असावे, असल्या बाह्य देखाव्याच्या प्रेरणेनें जोंपर्यंत राष्ट्रीय सैन्याची उभारणी करण्यात येत आहे, तोंपर्यंत तसल्या उभारणीच्या चळवळीस राष्ट्रीय पुढाऱ्यानी मदत करू नये, असे टिळकानीं ठरवून ठेवलें होते. श्रीशिवाजी महोत्सवात एके प्रसगी त्यानी वरील तऱ्हेचेच उद्गार काढल्यामुळे सामान्य रिक्रूटिंगला टिळकाची मते अडथळा करतात या सबबीवर विलायतेस जाण्यापूर्वी काही महिने त्याची मुस्कुटदाबी करण्यात आली होती. महायुद्धाच्या वेळी वसाहतींपेक्षाहि इग्लडाला हिंदुस्थानानें लष्करी मदत अधिक केली आणि या मदतीचे उपकार स्मरून हिंदुस्थानास स्वराज्याचे हक्क अशतः देण्यात येत आहेत, असे सागण्यात येते. पण वरील विधानाच्या खऱ्या अर्थाकडे टिळक नेहमी राष्ट्रीय पक्षाचें लक्ष वेधीत असत. मजूर व लढवय्ये या नात्यानें दहा लाखाहून अधिक लोक हिंदु-स्थानानें रणभूमीकडे पाठविले ही गोष्ट खरी आहे, पण हिंदुस्थानानें पाठविले म्हणजे काय! राष्ट्रीय भावनेनें लोक या उद्योगांत पडले, किंवा पोटापाण्यासाठी जरी पडले असले तरी राष्ट्रीय भावनेचा व पोटापाण्याचा प्रश्न एकच होऊन बसल्यामुळे राष्ट्रीय भावनेनें तसली नोकरी पवित्र होते म्हणून लोक या धंद्यात पडले, असे बिलकूल नाहीं. नोकरशाहीला असल्या सकटसमयी दहा लाखापर्यंत मजूर व लढवय्ये मिळविता आले, आणि परदेशी पाठविता आले, असा या मदतीचा अर्थ आहे. नोकरशाहीनें राजसत्तेचें जे यंत्र हिंदुस्थानात तयार केलें त्या यंत्राच्या जोरावर दहा

लाखाचें मनुष्यबळ आणि कित्येक अब्जाचें द्रव्यबल नोकरशाहीला इंग्लडच्या मदतीला पाठविता आलें. महायुद्धाचे दिवस म्हणजे नोकरशाहीच्या पद्धतीच्या परीक्षेचीच वेळ होती. सर क्लाड हिल यानी ' नाइन्टींथ सेंचरी ' मध्ये लेख लिहून नोकरशाहीला वरील पराक्रमाबद्दल योग्य शाबासकी इंग्लडात मिळत नाही, म्हणून तक्रार केली आहे. या तक्रारीकडे पाहता दहा लाखाच्या मनुष्यबलाच्या मदतीकडे नोकरशाही कोणत्या दृष्टीनें पाहते, हें कोणाच्याहि ध्यानात येईल रिक्रूटिंगसबधाने दिल्लीत लाटसाहेबानीं जो दरबार भरविला होता त्या वेळच्या खाजगी चर्चेतहि, लोकाच्या पुढाऱ्यानीं खरी मदत केली नाही तरी, नोकरशाही आपल्या हातातील यत्र फिरवून जरूर तेवढे मनुष्यबल हिंदुस्थानातून बाहेर खेचून घेण्यास समर्थ आहे, अशी नोकरशाहीच्यातर्फे काहीं पुढाऱ्याना समज देण्यात आली होती. नोकरशाहीच्या हिंदी मनुष्यबलाचें मनगट जर दहा लाखापर्यंत नोकरशाही फुगवूं शकते तर स्वराज्याचा अल्पस्वल्प तरी प्रारभ का करण्यात आला, अशी साहजिक शका या ठिकाणीं येणारी आहे. नोकरशाहीनें आपल्या नोकरींत ठेवलेलें मनुष्यबल महायुद्धाच्या वावटळींत सापडलेलें होतें. त्या वावटळींतील स्वयनिर्णयाची व स्वराज्याची तत्त्वें नोकरशाहीच्याच नोकराच्या अगाशी एकसारखी लगट करून राहिलेलीं होतीं. ही सगत नोकरशाहीला तोडता येईना, आणि नोकरशाहीच्याच अनुयायाना व नोकराना घडलेल्या या अयाचित सत्सगतीच्याबद्दल नोकरशाहीला स्वराज्याच्या अल्प स्वल्प प्रारभाला समत्ति देणे भाग पडलें. पण ही सगत तोडण्यास महायुद्धानतर नोकरशाही बिलकूल कमी करणार नाही, असा टिळकाचा अदाज होता, आणि नोकरशाहीनें सुरू केलेल्या साप्रतच्या दडपशाहीकडे पाहिलें म्हणजे टिळकाचा अदाज किती खरा होता हे चटदिशी लक्षात येते. राष्ट्रीय सैन्याच्या पक्षाकडे टिळक कोणत्या दृष्टीने पहात

असत हें वर सांगितलेंच आहे. महायुद्धाचा प्रसंग निघून गेल्यानंतर आज मुसलमानी गर्दी व बोल्शेविक यांच्या पांच दहा वर्षांत केव्हांना केव्हां तरी होणाऱ्या हिंदुस्थानावरील स्वारीचा प्रश्न पुढें आलेला आहे. वाढता लष्करी खर्च व असल्या स्वारीच्या वेळीं हिंदुस्थानाचें करावयाचें संरक्षण या दोन बाबींमुळे राष्ट्रीय सैन्य पुन्हा उभारण्याची खटपट नोकरशाही लवकरच करणार आहे. राष्ट्रीय सैन्याच्या उभारणीच्या या चळवळीच्या वेळीं लोकांनीं कसे वागावे, म्हणून प्रश्न विचारला असता टिळक महायुद्धाच्या वेळीं जसे वागले तसेच टिळकांच्या अनुयायांनींहि आज वागावे असेच उत्तर द्यावे लागते. आर्थिक दृष्टीनें व राजकीय सत्तेच्या दृष्टीनें युरोपियनांशीं बरो-बरीची भागी हिंदुस्थानास मिळाल्याशिवाय म्हणजे निदान वसाहतीच्या धर्तीचें स्वराज्य हिंदुस्थानास मिळाल्याशिवाय हिंदुस्थानाने राष्ट्रीय सैन्याच्या पंचायतींत पडूं नये, असेच उत्तर टिळक आज जर जिवंत असते तर त्यांनीं दिलें असतें यांत संशय नाहीं. स्वराज्याबरोबर स्वराज्याचें संरक्षण करण्याची जबाबदारी लोकांवर येऊन पडते, हे तत्त्व टिळकांना कबूल होतें. पण स्वराज्य मिळण्याच्या अगोदरच हें ओझें उचलावयास धांवणें म्हणजे एक प्रकारचें लांगूलचालनच होय, असे ते म्हणत असत. स्वयंसेवकांच्या लष्कराच्या मनुष्यबलाची आवश्यकताच जर नोकरशाहीला वाटत नाहीं, तर तसलें मनुष्यबल उत्पन्न करा म्हणून नोकरशाहीच्या पाठीमागे तगादा लावणें म्हणजे नोकरशाहीची भलतीं आर्जवें करण्यासारखें होय. असल्या खुशामतीनें कार्य यशस्वी न होता कार्यनाशच अधिक होतो. लोकांना स्वराज्याचे हक्क देणाऱ्या नोकरशाहींतील कांहीं उदारमतवादी पुढाऱ्यांचें असल्या खुशामतीमुळे नोकरशाहीपुढे चालेनासें होतें. आपण समर्थ आहों, आपण सशक्त आहों आणि आपणास मनुष्यबलाची किंवा द्रव्यबलाची वाण पडणार नाहीं, ही नोकरशाहीची घमेंड असल्या खुशामतीनें अधिकाधिकच

वाढत जाऊन नोकरशाहीला स्वराज्यापासून पराङ्मुख करण्याचें पातक असल्या आर्जवांना लागतें. नोकरशाही पूर्ण स्वराज्यहि देत नाहीं, आर्थिक स्वातंत्र्यहि देत नाहीं, आणि लष्करी सेवेच्या मार्फत मनुष्यबळ सतेज करण्याचा मार्गहि खुला करीत नाहीं, अशा वेळीं हापापल्यासारखें लोकांनीं स्वराज्याच्या अल्पस्वल्प तुकड्यावर संतुष्ट होऊन राष्ट्रीय सैन्याकरितां नोकरशाहीची खुशामत का करूं नये ? या प्रश्नास टिळकाचें असें उत्तर होतें कीं, पूर्ण स्वराज्य संपादन करताना स्वावलंबनाचा जसा मार्ग स्वीकारीत आहा तसाच आर्थिक बाबींतहि आणि राष्ट्रीय सैन्याच्या बाबींतहि स्वावलंबनाचाच मार्ग लोकानीं स्वीकारल्याशिवाय हिंदुस्थानचें खरें कल्याण कधींहि होणार नाहीं. संपूर्ण स्वराज्याच्या दृष्टीनें स्वावलंबनाचा मार्ग स्वीकारणें म्हणजे महात्मा गांधी यांच्या असहकारितेच्या चळवळींत पडणें होय, आर्थिक स्वातंत्र्याच्या दृष्टीनें स्वावलंबनाचा मार्ग स्वीकारणें म्हणजे स्वदेशी व बहिष्कार या चळवळींत पडणे होय, आणि राष्ट्रीय सैन्याच्या दृष्टीनें स्वावलंबनाचा मार्ग स्वीकारणे म्हणजे राजकीय चळवळ करीत असताना जाणून बुजून तुरुंगाचा रस्ता धरून नोकरशाही देईल तितकी शिक्षा भोगण्याची मनाची तयारी ठेवणें होय. या सर्व स्वावलंबनाच्या निरनिराळ्या मार्गांत कमी जास्ती प्रमाणानें आत्मक्लेश सोसावयास लावणाऱ्या वीरवृत्तीची जरुरी असते. ही वीरवृत्ति महाराष्ट्रात जागृत करण्याकरिता टिळकांचा गीतारहस्यासारखा ग्रंथ कसा उपयोगी पडणारा आहे हें वाचकाना पुढील अंकात सांगून स्वदेशी व बहिष्कार यांच्या संबंधानें महात्मा गांधी यांच्या मताशीं टिळकांचीं मतें कशी ततोतंत जुळतात हें रविवारच्या व सोमवारच्या लेखात वाचकापुढें मांडून आम्ही लेखमाला संपविणार आहों.

——

# * टिळक आणि गीतारहस्य



टिळकांच्या आयुष्यातील सर्वात मोठी कामगिरी म्हणजे त्यांनीं लिहिलेला गीतारहस्य ग्रंथ होय. शंभर शंभर दोन दोनशें वर्षांनीं राष्ट्राच्या आयुष्यात असला एखादा ग्रंथ सुदैवानें दृष्टीस पडत असतो. ज्ञानेश्वरीनंतर कित्येक शतकांनीं गीतारहस्यासारखा ग्रंथ मराठी भाषेमध्यें उत्पन्न झाला असून मराठीच्या संस्कृतीवर ज्ञानेश्वरीचे जे उपकार झाले आहेत, तितकेच किंवा त्याहून अधिक उपकार टिळकांच्या गीतारहस्याचे महाराष्ट्रावरच केवळ नव्हे तर सर्व हिंदुस्थानावर यापुढे व्हावयाचे आहेत. शें दीडशें वर्षांनीं टिळकांच्या स्वराज्याच्या उद्योगाबद्दल लोकांना आठवण करून द्यावी लागेल. राष्ट्रीय शिक्षण, स्वदेशी, गोरक्षण, शिवाजी महोत्सव, गणपति महोत्सव, पंचांग संशोधन, केसरीवरील खटले वगैरे टिळकांच्या आयुष्यातील ठळक ठळक चळवळी लोकांच्या आठवणीतून नाहींशा होण्याची वेळ आली तरी, आणि हिंदुस्थान देश संपूर्ण वैभवाच्या शिखरावर चढून आजच्या अवनतीच्या दिवसाची पुढील पिढ्यांना आठवणहि नाहींशी झाली तरी गीतारहस्याचें पाठांतर हिंदुस्थानात एकसारखें सुरू राहील. शारीरिक गोष्टी ज्याच्या त्याच्या आयुष्यानंतर आपोआप कालवश होत जातात. सर्व शरीरांना हा मृत्यु कायमचा आहे. शरीर गेल्यानंतर शरीराला धरून असणाऱ्या गोष्टी व चळवळी २।४ पिढ्यांच्या पलीकडे फारशा टिकत नाहींत. सामान्य संसारी लोक शारीरिक मृत्यूनंतर २।४ पिढ्या तरी पुत्रपौत्रांच्या स्वरूपानें, घरादारांच्या रूपानें किंवा एखाद्या देवालयाच्या किंवा सार्वजनिक इमारतीच्या उभारणीनें जगण्याची धडपड करीत असतात. असली धडपड

---

* लोकमान्य, ता. ३० जुलई १९२१

करणें हा मनुष्याच्या रक्ताचा स्वभाव आहे. या स्वभावाला अनुसरून घराण्याची व समाजाची रचना करण्यात येत असते. या लौकिक मार्गाच्या पलीकडच्या कोटींतले जे लोक असतात त्याना अलौकिक पुरुष असें म्हणतात. टिळक अलौकिक पुरुष होते हे गीतारहस्यानें सर्वांच्या निदर्शनास आणून दिलेलें आहे. बाल्वयातच वडील आजारी असताना गीतेचा पाठ त्याना करावा लागला. आजारी मनुष्याला मृत्यूच्या भयापासून सोडविणारी आणि मृत्युसमयी वाटत असलेल्या विवंचनेतून मुक्त करणारी गीता आहे, असा संस्कार टिळकांच्या मनावर बालपणीच झाला. त्यानंतर भक्तिभावानें गीतेचें पठण करण्याची पद्धत टिळकांनी एकसारखी ठेवली होती. गीता रहस्य लिहून झाल्यावर अंतःकरणास विशेष त्रास झाला असता गीतेतील श्लोक वाचण्याचा किंवा त्या श्लोकांच्या अर्थाचें मनन करीत पडण्याचा आपला परिपाठ त्यानीं सोडलेला नव्हता. कॉलेजात असताना गीतेच्या पाठामुळेच स्वार्थत्याग करून शिक्षणकार्याला स्वतःला वाहून घेण्याची प्रेरणा टिळकांच्या मनात आपोआप उद्भवली. अध्ययन व अध्यापन या दोन कार्यांस स्वतःस वाहून घेत असताना तंट्याबखेड्यात प्रमुखपणाने पडण्याची वेळ येणार नाहीं असे टिळकाना वाटत होतें. त्यांचा स्वभावहि अध्ययनात गढून राहण्याला अनुकूल असाच होता. पण अर्जुनाला स्वकीयावरहि बाण सोडावयास लावणारी गीता टिळकाना अशा रीतीनें स्वतःच्याच घरकुल्यात स्वतःस कोंडून घेतल्यासारखें स्वस्थ कशी बसूं देईल? स्वतःच्या मनाशींच झुंजण्यास कॉलेजात असतानाच गीतेनें टिळकाना बल दिलें. कॉलेजातून बाहेर पडून स्वतः निर्माण केलेल्या झोपडीत स्वतःस टिळकानीं कोंडून घेतलें असता, किंवा एकांतवासात संन्यासवृत्तीकडे ते वहात गेले असता त्या ठिकाणीहि गीतेनें स्वस्थ बसूं दिलें नाहीं स्वकीयाशीं झगडा करण्यास गीतेने न्यू

इंग्लिश स्कूल व फर्ग्युसन कॉलेज येथे असताना टिळकाना प्रवृत्त केलें. हा झगडा चालू असताना अर्जुनाच्या विषादयोगासारखाच विषाद टिळकाच्या मनामध्ये उत्पन्न झाला होता, आणि केवळ भगवद्गीतेच्या जोरावर स्वकीयाशी झगडण्यास त्यानीं सुरवात केली. न्यू इंग्लिश स्कूल किंवा फर्ग्युसन कॉलेज याच्याहूनहि अधिक महत्त्वाच्या गोष्टी महाराष्ट्रात व हिंदुस्थानात आहेत आणि त्या महत्त्वाच्या गोष्टींच्या दृष्टीनें न्यू इंग्लिश स्कूल व फर्ग्युसन कॉलेज येथील आपल्या सोबत्याशींच झगडणे जरुरीचें आहे, असे गीतेच्या पठणामुळे टिळकाच्या ध्यानी येऊन, कर्मण्येवाऽधिकारस्ते मा फलेषु कदाचन। मा कर्मफलहेतुर्भू मा ते सगोऽस्त्वकर्मणि ' या गीताशास्त्राच्या चतुःसूत्रीवर त्याचें मन कायमचेच बसले. आपत्तीशी झगडणें आणि त्या झगडण्यातील यशाचें फल स्वतःच्या शारीरिक व सांसारिक सुखाकडे खर्च न करता दुसऱ्या आपत्तीशी झगडण्याच्या तयारींत खर्च करून टाकणें, ही टिळकाच्या सार्वजनिक चरित्रातील मुख्य गुरुकिल्ली आहे. न्यू इंग्लिश स्कूल व फर्ग्युसन कॉलेज येथे मिळविलेलें यश त्यानी स्वतःच्या सासारिक सुखाकडे बिलकुल खर्च केले नाहीं. श्रीशिवाजी महोत्सव, श्रीगणपति महोत्सव, कायदे—कौन्सिलची चळवळ, आणि प्लेगाच्या वेळचा झगडा या सर्व बाबींत तें पुण्य गीताशास्त्राला अनुसरून भगवद्गीतेने त्याच्याकडून खर्च करविलें, आणि १८९७ साऽच्या खटल्याच्या वेळी सोसावयास लागणाऱ्या आपत्तीला गीतापठणानें त्याना लायक केलें. या आपत्तींतूनहि ते यशस्वी रीतीने पार पडले असताना ताईमहाराजाच्या खटल्याची आपत्ति त्याच्यामागे लागली ही खाजगी खटल्याची आपत्ति त्याच्या आयुष्याच्या अखेरच्या दिवसापर्यंत त्याच्या सभोंवती एकसारखा घिरट्या घालीत उभी होती, आणि या आपत्तींतील हायकोर्टापुढील दाव्याचा शेवटचा दुवा ज्या वेळी सपला, त्याचवेळी टिळकाच्या शरीराचें पोषण करणाऱ्या बलाचा शेवटहि झाला, असें म्हणण्यास

हरकत नाहीं. आयुष्यातील कर्तृत्वाच्या शेवटच्या वीस वर्षांत ताईमहाराजाच्या खटल्याची विवचना टिळकाच्या मागें नव्हती असें केव्हाहि झालें नाहीं. ही सर्व विवंचना सभाळून याच वीस वर्षांत टिळकानीं हिंदुस्थानला स्वराज्याचा मार्ग दाखवून दिला, आणि स्वराज्याचे मुख्य प्रवर्तक म्हणून मोठे यश सपादन केलें. अशा रीतीनें चारी बाजूनीं गराडा पडला असता चारीहि तोंडावर पकसारखे झगडत राहण्याची शक्ति भगवद्गीतेच्या पठणामुळें टिळकाच्या अगीं उत्पन्न झाली. भगवद्गीतेचे ते भक्त होते, ही गीताच मला तारील, असा त्याचा दृढ विश्वास होता, आणि या भक्तिभावाच्या जोरावरच त्यानीं आपलें आयुष्य पूर्णपणे यशस्वी करून सोडले 'न मे भक्त: प्रणश्यति' या भगवद्वचनावर त्याचा पूर्ण विश्वास असल्यामुळें हरएक प्रसगातून पार पडून जाऊ व शेवटी यशच मिळवू, असे त्याना वाटत होतें आणि अखेर तसे घडलेंहि! ताईमहाराजाच्या खटल्यासारख्या अर्धवट खाजगी आपत्तीच्या अखेरचा टिळकाच्या तर्फेचा निकाल मागाहूनच्या लहान सहान तक्रारींसकट टिळकाच्या हयातीतच झाला. सार्वजनिक कामात तर स्वराज्याच्या शिरोमणीच्या पदवीला टिळक आयुष्याच्या अखेरीस सर्व अडथळे दूर होऊन आपोआप चढले. ससारासबधाच्या किंवा खाजगी स्वरूपाच्या आपत्तींशीं झगडताना उत्तम प्रकारचें बळ भगवद्गीतेने टिळकाना दिलें आणि अखेर यशहि गीतेनेंच त्याच्या पदरात टाकले. सार्वजनिक किंवा ऐहिक अभ्युदयाच्या दृष्टीनें विचार केला असता, सपूर्ण स्वराज्याच्या वैभवाचा शास्ता या दृष्टीचा अभ्युदय कोणाच्याच नशिबीं लिहिला जाण्याचा साप्रतचा हिंदुस्थानचा काळ नसल्यामुळें, भगवद्गीतेने स्वराज्याचा आद्य प्रवर्तक या पदवीला टिळकाना नेऊन चढविलें आणि स्वराज्याचे मानसिक व बौद्धिक यश टिळकाच्या हयातींतच टिळकाच्या पदरीं गीतेनें टाकले! या दोन यशाहूनहि पारमार्थिक

दृष्टीचे अत्यत मोठे कल्याण भगवद्गीतेच्या भक्तीनें टिळकाचे केलेलें आहे. ताईमहाराजाचा खटला आणि वगभगाच्या वेळची राष्ट्रीय शिक्षण, स्वदेशी, बहिष्कार व स्वराज्य, या चतुःसूत्रीची चळवळ चालली असताना भक्तिपुरःसर ज्या भगवद्गीतेचे मनन व पठण टिळक एकसारखे करीत असत, आणि ज्या भगवद्गीतेच्या अतर्यामात भक्तीच्या जोरावर पाहिजे तसे घुसून पाहिजे तितके मानसिक व बौद्धिक बल स्वतःच्या लढयाकरिता भराभर बाहेर आणीत असत, ती भगवद्गीता आपणास तेवढी का उपयोगी पडावी आणि आपणाप्रमाणे सर्व महाराष्ट्राला किंबहुना सर्व हिंदुस्थानाला या भगवद्गीतेचा उपयोग का होऊ नये, अशा तऱ्हेचा विचार टिळकाच्या विश्वकुटुबी मनात नेहमी खेळत राहात असे. ज्ञानेश्वर एक का दोन यासबधाचा वादविवाद त्या वेळी वर्तमानपत्रातून चालला होता आणि महाराष्ट्रातील भक्तिपथाच्या पुढाऱ्याची व विशेषतः कै. भिंगारकरबुवा याची व टिळकाची भगवद्गीता व ज्ञानेश्वरी याच्यासबधाने नेहमीं सभाषणे होत असत. मनुष्याचें पारमार्थिक कल्याण करून ऐहिक अभ्युदयासबधाचे योग्य विचार व्यक्तीपुढें व समाजापुढे ठेवण्यास महाभारत व भगवद्गीता हे दोन ग्रथ अत्यत तत्पर असताना आणि खुद्द टिळकाना पावलोपावली तसा अनुभव येत असताना, या दोन्ही ग्रथाचा अभिमान बाळगणाऱ्या आजच्या हिंदुस्थानची ऐहिक अभ्युदयासबधानें दिशाभूल का व्हावी? तसेच पारमार्थिक कल्याण आणि अभ्युदय याचा जणूंकाय सबध नाहीं, अशा तटस्थवृत्तीने महाभारत व गीता यांजकडे पाहून, ससारातील किंवा सार्वजनिक कामातील झगडयाशीं तोड देताना कच खाल्ल्यासारखे होऊन डळमळीत व लेच्यापेच्या पावलानें हिंदुस्थानानें का चालावें? याबद्दलचें कोडे टिळकाच्यापुढे येऊन पडलें होतें. भक्तिमार्ग व अद्वैत सिद्धात याचा मेळ बसत नाहीं असा सर्वाचा समज असल्यामुळें

आणि अद्वैत सिद्धाताचा स्वीकार करणारानी सन्यासमार्गाचाच अवलब केला पाहिजे अशी अनेक कारणानीं समजूत झाल्यामुळें, महाभारत व भगवद्गीता हिंदुस्थानावर ज्या मनुष्यबलाचा, द्रव्यबलाचा व बुद्धिबलाचा वर्षाव करू इच्छित आहेत त्या सर्व बलाना हिंदुस्थान आज मुकलें आहे, असे टिळकाच्या ध्यानीं तेव्हाच आलें. टिळक स्वत: भगवद्गीतेचे भक्त होते आणि त्यामुळे महाराष्ट्रातील भक्तिपथाविषयीं त्याच्या मनात अत्यत प्रेम होतें. ते स्वतः एकतऱ्हेनें भक्तिपथातलेच असल्यामुळें अद्वैत सिद्धाताचा व भक्तिपंथाचा बिलकूल विरोध नाही, असे त्याच्या भक्तिपूर्ण अतःकरणाला आणि अद्वैत सिद्धातामध्यें गढून गेलेल्या सूक्ष्म बुद्धीला पूर्णपणे अनुभवास आलें. अद्वैत सिद्धाताची उभारणी ज्या विचारसरणीवर केलेली आहे ती विचारसरणी टिळकाच्या सूक्ष्म बुद्धीनें आकलन केल्यावरहि स्वकीयाशीं, आप्तइष्ठाशीं व बाहेरच्या सर्व अडथळ्यांशीं झगडण्याची स्फूर्ति व बल टिळकाना भगवद्गीतेनें दिल्यामुळें, संसारात व सार्वजनिक कामात झगडल्यानें पारमार्थिक हिताला बाध येत नाहीं, इतकेंच नव्हे तर हा प्रवृत्तीचा मार्ग अधिक श्रेयस्कर आहे, असेच भगवद्गीतेनें टिळकाच्या निदर्शनास आणून दिलें. भगवद्गीतेची ही शिकवणूक अतःकरणात पूर्ण बिंबल्यामुळे १९०८ सालच्या खटल्याच्या वेळी स्थितप्रज्ञाच्या वर्तनासारखे वर्तन त्याच्या हातून सहज घडून गेलें. असल्या मोठ्या पदवीला चढल्यावर मडालेच्या तुरुगात सहा वर्षाची शिक्षा भोगीत असताना भगवद्गीतेच्या भक्तीच्या आनदांत त्यानीं दिवस घालविण्यास सुरवात केली. भगवद्गीतेच्या सेवेत अशा रीतीनें टिळक गुग असताना 'आपणासारिखे करिती तात्काळ' या न्यायानें, किंवा तसला भक्त ह्मणजे मीच आहे 'अहमेव स:' या भगवद्वचनाला अनुसरून भगवद्गीतेनें टिळकाना गीता बनविलें आणि त्याच्या ऐहिक व पारमार्थिक कल्याणाची पराकाष्ठा करून सोडली. भगवद्गीतेच्या

भक्तीमुळे टिळक अखेरीस स्वतः भगवद्गीता झाल्यावर टिळकांनीं गीतारहस्य हा ग्रंथ लिहिला आहे. अर्जुनाचा पराक्रम उद्दीप्त करण्यास आणि अखेरचें यश अर्जुनाच्या पदरात टाकण्यास जशी गीता कारणीभूत झाली, त्याप्रमाणें स्वराज्याचे आद्यप्रवर्तक टिळक स्वतः गीता होऊन स्वराज्यवाद्याचा पराक्रम उद्दीप्त करण्यास व स्वराज्यवाद्याच्या पदरात अखेरीस यश टाकण्यास कारणीभूत व्हावयाचे निश्चित ठरलेलें असल्यामुळे गीतारहस्य हा ग्रंथ महाराष्ट्रापुढे व हिंदुस्थानापुढे अवतीर्ण झालेला आहे! हिंदुस्थानचा अभ्युदय व्यवस्थित रीतीने व्हावयाचा असल्यास आमच्या सर्व चळवळींच्या मागे अत्यंत श्रेष्ठ अशा तत्त्वज्ञानाचा जोर असला पाहिजे, असे गेलीं वीस पचवीस वर्षे परकी लोक हिंदुस्थानास सांगत आले आहेत. जगातील अत्यंत श्रेष्ठ असे तत्त्वज्ञान हिंदुस्थानाच्या मागे कायमचे उभे आहे, पण त्या तत्त्वज्ञानाच्या जोराचा व आमच्या चळवळीचा सांधा मात्र इतक्या दिवस जोडला गेला नव्हता. तो सांधा जोडण्याचे काम टिळकांनीं केलेलें असल्यामुळे आमची स्वराज्याची चळवळ परमेश्वरी कृपेच्या दृष्टीनेंहि आता अगदी निर्धास्त झाली आहे.

---



# * टिळक आणि बहिष्कार



आज ता. १ आगस्ट रोजीं विदेशी कापडावरील बहिष्काराच्या तपश्चर्येस, टिळकाचें वर्षश्राद्ध म्हणून सर्व हिंदुस्थान ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या आज्ञेनें सुरवात करीत आहे. काल सायकाळी मुबईस एल्फिन्स्टन मिलच्या जवळील मैदानात महात्मा गाधी याच्या अध्यक्षतेखालीं आणि प्रमुख राष्ट्रीय पुढाऱ्याच्या अनुज्ञेनें विदेशी कापडाची होळी करण्यात आली. अग्निनारायणाला समर्पण केलेल्या या आहुतीने राष्ट्राची औद्योगिक पापे भस्म होऊन पवित्र अतःकरणाने व पवित्र बुद्धीनें स्वदेशी व बहिष्कार या योगाचें व्रत सर्व हिंदुस्थान आज घेत आहे. टिळकाच्या पुण्यस्मरणार्थ हे व्रत घेण्यात येत असल्यामुळे टिळकाची सर्व पुण्याई आणि टिळकानी प्रसन्न करून घेतलेली भगवद्गीता या व्रताच्या मागे उभी राहून, हरएक सकटापासून व्रतस्थाचे सरक्षण करण्याकरिता श्रीकृष्णाचे सुदर्शन चक्र या व्रताच्या सभोवती फिरवीत राहील यात सशय नाही. स्वदेशी व बहिष्कार या चळवळीइतकी दुसरी कोणतीहि चळवळ टिळकाना प्रिय नव्हती. महात्मा गाधी यानी स्वराज्य फडाला टिळकाचे नाव दिले, आणि स्वतःची सर्व पुण्याई खर्च करून एक कोट रुपये टिळक स्वराज्य फडास जमवून राष्ट्रीय सभेच्या राजकीय इतिहासात टिळकाचे नाव अजरामर करून सोडले. महाराष्ट्रावर व टिळकाच्या सर्व अनुयायावर महात्माजीचे हे अगणित उपकार झाले आहेत, आणि त्याबद्दल सर्व महाराष्ट्र आज महात्माजीचे गुणानुवाद गात आहे. स्मारकाच्या दृष्टीने टिळकाच्या ऋणातून हिंदुस्थानास महात्माजीनी मुक्त केले आहे. आजपर्यंत दुसऱ्या कोणत्याहि पुढाऱ्याचे

---

* लोकमान्य, १ ऑगस्ट १९२१

एवढें मोठे सार्वजनिक स्मारक त्याच्या वर्षश्राद्धापूर्वी झालेले हिंदुस्थानच्या इतिहासात नमूद नाहीं. महात्माजीनी कोट रुपये गोळा करून टिळकाच्या नावाने एक चमत्कारच करून दाखविला हे खरे आहे. या स्मारकाहूनहि टिळकाना अधिक प्रिय असलेली अशी बहिष्काराची चळवळ जोराने सुरू करण्यास आज महात्माजी प्रवृत्त झाले असल्यामुळे, आणि २।३ महिन्याच्या अवधीतच ही चळवळ पूर्णतेस नेण्याचा त्यानी निश्चय केलेला असल्यामुळें, टिळकाच्या मागे असलेल्या महाराष्ट्रातील सर्व साधुसताच्या व थोर विभूतींच्या तपश्चर्येचें बल महात्माजीच्या चळवळींत आज स्वयस्फूर्तीनें सचार केल्यावाचून राहणार नाही. हिंदुस्थानच्या पूर्वीच्या सर्व पुण्याईची पुढील दोन तीन महिन्यात हिंदुस्थानाला अत्यत जरूर आहे स्वदेशी आणि बहिष्कार या जोडीचें व्रत दिसावयाला सोपे आहे, पण आचरणास फार कठीण आहे. सकटे या मार्गात अतिशय आहेत. बहिष्कार म्हणजे द्वेषाचे माहेरघर होय, असे सागून कित्येक हिंदी बुद्धिमताना या चळवळीपासून पराङ्मुख करण्यात येईल. प्रतिस्पर्ध्यांचा हा पहिला धागडधिंगा टाळण्याकरिता परदेशी कापडावरील बहिष्कार म्हणजे द्वेषाची प्रवृत्ति नव्हे हे प्रत्येक व्रतस्थाने या वेळीं पूर्णपणे ध्यानात ठेवलें पाहिजे. परदेशी कापड आपण जाळतो, आपण दुसऱ्यास देऊन टाकतो किंवा वापरण्याचें टाळतों, तें दुसऱ्याचा द्वेष करण्याच्या बुद्धीने बिलकुल नव्हे महात्मा गाधी याच्याप्रमाणेंच टिळकानी इग्रजाचा द्वेष कधीहि केला नाही. टिळक नेहमी साश्चर्य इग्रजी साम्राज्याकडे पहात होते, आणि एवढे मोठे साम्राज्य पृथ्वीतलावर स्थापणाराच्या अगी तसेच विशेष गुण असले पाहिजेत हें त्याना पूर्णपणें मान्य होते. फ्रान्सच्याप्रमाणे इग्लडची बादशाही दिलदार स्वरूपाची नाहीं. जर्मनीची शास्त्रीय बुद्धिमत्ताहि इग्रजाच्या अगीं नाही. क्लेश सोसण्याची रशियाची पराकाष्ठाहि इग्लडात दिसत नाहीं. या तीनहि राष्ट्राशीं तुलना करता इग्लड

एक दृष्टीनें भाग्यवान होय, असेंच म्हणावे लागते. वरील तीन राष्ट्रांत जो एक एक देदिप्यमान गुण दिसून येतो तसला देदिप्यमान गुण इंग्रजांच्या अंगीं बिलकूल नसतांहि वैभवाच्या शिखरावर मात्र हे चढलेले आहेत, असे दृष्टीस पडते. तेव्हां इंग्रज दैववान आहेत असे का म्हणूं नये? टिळक इंग्रजांच्या वैभवाकडे साश्चर्य पहात होते हे खरे, पण देदिप्यमान व एक-सारख्या झळकणाऱ्या गुणाशिवाय इतक्या वैभवास इंग्लंड कसे चढलें याचा विचार करताना टिळकांच्या ध्यानी असे आले होतें की, इंग्रजांच्या अंगाचा चिकाटीचा गुण त्यांच्या वैभवाचे मुख्य कारण होय. चिकाटीचा गुण झळकणारा नाहीं, किंवा तडाकाफडकीचाहि नाहीं. हाती आलेला फायदा पकडून बसण्याचा धीमेपणा लोकांच्या डोळ्यांना झुलवीत जरी नसला तरी एकंदरीने मनुष्यास चिकाटी अधिक कल्याणप्रद होते. इंग्रजी वैभवाची गुरुकिल्ली या चिकाटीत आहे. या चिकाटीच्या गुणाचें पूर्ण स्वरूप महा-युद्धाच्या वेळी जसजसे टिळकांच्या लक्षात येऊं लागले तसतसे हिंदुस्थानाला स्वराज्याकरिता सोसाव्या लागणाऱ्या क्लेशाची कल्पनाहि सांगोपांग त्यांच्या-पुढे उभी राहात गेली. नोकरशाही अमक्या प्रसंगी अमक्या तऱ्हेनें वागेल असा एक अंदाज टिळकांनी करावा आणि त्याच प्रसंगासंबंधानें भलताच अंदाज इतर पुढाऱ्यांनी करावा, व शेवटी टिळकांचा अंदाज खरा ठरावा असें कित्येक वेळी स्वराज्याच्या चळवळीच्या वेळीं अनुभवास आलेलं आहे. नोकरशाही चिकाटी सोडणार नाही या दृष्टीने नोकरशाहीची पावले पुढे कशीं पडतील याचा विचार टिळक नेहमी करीत असत. नोकरशाहीला थकवा येईल, नोकरशाही बादशाही दिलदारपणाने वागेल, नोकशाही स्वतःच घालून दिलेल्या सिद्धांतांच्या वळणानें वहात जाऊन अखेरीस न्याय देईल, अशा प्रकारची भावना टिळकांच्या अन्तःकरणाला कधीहि शिवली नाही. आपल्या हातात आलेला फायदा आपल्या हातातच कायमचा ठेवविणारा

चिकाटीचा गुण नोकरशाहीला जसा नाचवील तशी ती नाचेल, अशी टिळकाच्या मनाची बालबाल खात्री झाली होती, आणि या चिकाटीच्या गुणाला प्रत्युत्तर जर द्यावयाचें असेल तर हिंदुस्थानचे राष्ट्रहि चिकाटीचे झाले पाहिजे, अशी टिळकाची कायमच्या ठशाची शिकवणूक होती. स्वदेशीचें व बहिष्काराचें व्रत चिकाटीशिवाय जर पाळले गेले तर नोकरशाही बिलकूल हार जाणार नाही. नोकरशाही सतराशे ठिकाणीं हल्लींच्या कायद्याना मुरडून बगलेंत मारील, अठराशे नवीन नवीन युक्त्या उपयोगात आणील, आणि चौसष्ट कलावरतीहि पासस्टावी कला लोकापुढे नाचवून आपला फायदा आपल्या हातातच ठेवील! चिकाटी पापपुण्य पहात नाहीं, उपकार किंवा परोपकार याची जाणीव चिकाटीला नाहीं, औदार्य चिकाटीला माहीत नाहीं; सर्व जगाच्या हसण्याची पर्वा ती करीत नसते, आणि निर्लज्जपणाला खालीं मान घालावयास लावते. असल्या चिकाटीशीं स्वदेशी व बहिष्कार या जोडीला झुजावयाचें आहे. स्वार्थत्याग व आत्मक्लेश याची अखड साखळी राष्ट्रीय पक्षाच्या प्रत्येक व्यक्तीने एकसारखी निर्माण केल्याशिवाय स्वराज्याचा दरवाजा स्वदेशी व बहिष्कार या चळवळीनें उघडला जाणार नाही. स्वदेशावरील प्रेमामुळें, आणि औद्योगिक झगडयात क्रोडो लोकाची हिंदुस्थानात आज जी उपासमार होत आहे त्या उपासमारीचा विचार करून होणाऱ्या दयार्द्र अंतःकरणाने, जर प्रत्येक देशभक्त या चळवळींत पडला तरच त्याच्या हातून रोजच्या रोज सोसावयास लागणाऱ्या हालअपेष्टा सोसल्या जातील. हालअपेष्टा सोसण्याची ताकद प्रेमाच्या अगीं असते; द्वेषाच्या अगी नसते. नोकरशाहीच्या दुर्गुणाचा विचार आपण करण्याचें कारणहि नाही. दुसऱ्याच्या दुर्गुणाच्या विचाराने आपण आपले मन तरी का बाटवावे? स्वदेशावरील पवित्र प्रेमानें या चळवळीत आपण उडी टाकली पाहिजे. ही चळवळ जसजशी जोरावर येईल तसतशी दडपशाहीहि

जोरावर येईल. नामांकित पुढाऱ्याच्या बंदिवासामुळे त्याच्या सद्‌गुणाचें संकीर्तन चोहोंकडे होईल, पण लहानसहान लाखों व्यक्तींवर नोकरशाही जो वरवंटा फिरवील त्या वरवंटयाखालीं चिरडल्या जाणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचें नामसंकीर्तन कोण करणार? अंधारांतच ती व्यक्ति जन्माला आली, अंधारांतच त्या व्यक्तीनें स्वदेशावर प्रेम केलें, अंधारांतच त्या व्यक्तीनें स्वार्थत्याग केला, आणि देशाच्या अभ्युदयाची वार्ता कानीं पडण्यापूर्वीच अंधारांतच ती व्यक्ति इहलोक सोडून निघून गेली! स्वदेशी आणि बहिष्कार या चळवळींत वरील प्रकारचें जन्मवृत्त लाखो लोकांचें झाल्याशिवाय हिंदुस्थान संपूर्ण स्वराज्याच्या वैभवास चढणार नाहीं. कोठें विकसलें, कोठें सुगंध पसरविला आणि कोठें नोकरशाहीनें चुरडून टाकलें, याविषयीं ज्याचा पत्ताहि लागणार नाहीं, अशी हजारों सुमनें नोकरशाहीच्या चिकाटीला बळी द्यावी लागतील. असला आत्मयज्ञ कोणत्याहि राष्ट्राला अत्यंत कठीण जातो. पण हा अंधारांतील आत्मयज्ञ परमेश्वराच्या नजरेस पडल्यावाचून केव्हाहि रहात नाहीं. कारण अंधारांत पाहण्याची शक्ति त्याला एकटयालाच असते. उजेडांतल्या गोष्टींकडे क्षीरसागरांत डुलकी घेत पडल्यामुळे एखादे वेळेला कानाडोळा करतो, पण अंधाराच्या वेळीं परमेश्वर अत्यंत जागा असतो. परमेश्वरावर, पुढाऱ्यावर आणि अंगीकृत कार्यावर पूर्ण निष्ठा असल्याशिवाय, कोणी पाहिला नाहीं, कोणी ओळखला नाहीं, कोणी जाणिला नाहीं, किंवा कोणी उच्चारहि केला नाहीं, अशा तऱ्हेचा स्वार्थत्याग देशभक्ताच्या हातून होऊं शकत नाही. नोकरशाहीच्या चिकाटीशीं झुंजावयाचें असल्यामुळे वरील तऱ्हेच्या भक्तिभावानें केलेल्या व फलाविषयीं आसक्ति सोडलेल्या स्वार्थत्यागी चिकाटीचीच हिंदुस्थानास आज जरूर आहे. टिळकांचें चरित्र म्हणजे असल्या चिकाटीचें चरित्र होय. भगवद्गीतेनें वरील भक्तीमुळे फलाची आसक्ति सोडून निष्काम बुद्धीनें

कर्में करण्याचें कौशल्य टिळकाच्या अगीं दिसून आलें. निष्काम वृत्तीनें कोणतेहि व्रत कोणताहि मनुष्य आचरूं लागला म्हणजे अल्प तपश्चर्या हातून घडली तरी नोकरशाहीसारख्या प्रचड शक्तीच्या चिकाटीशीं टक्कर देणारी चिकाटी दुबळ्या दिसणाऱ्या हातापायातहि उत्पन्न होते. अशी साक्ष टिळकाचें चरित्र हिंदी लोकाना आज पटवीत आहे. महात्मा गाधी याचें दुबळे शरीर ही ह्या चिकाटीची प्रत्यक्ष मूर्ति आहे. टिळकाच्या चरित्रातील चिकाटी आठवा, आणि महात्मा गाधींच्या चिकाटीवर विश्वास ठेवून परदेशी कापडावर बहिष्कार घालण्याच्या शपथा, आज टिळकाच्या श्राद्धाच्या दिवशीं स्वदेशावरील प्रेमाने घ्या म्हणजे नोकरशाहीच्या चिकाटी-मुळे कितीहि हालअपेष्टा सोसाव्या लागल्या तरी आत्मक्लेशातच बुद्धीच्या प्रसन्नतेचा आनद उत्पन्न होऊन नोकरशाहीच्या चिकाटीला तुम्हीं पुरून उराल आणि स्वराज्याच्या सस्थापकाच्या यशाची भागी तुमच्या पदरात परमेश्वर टाकील.

---

# * स्वतः संबंधानें

संताची उच्छिष्टे बोलतो उत्तरें ।
काय म्या पामरें जाणावे हें ॥

तुकाराम.

वाचकाचा व रा. खाडिलकर याच्या लेखाचा आज नव्या स्वरूपात पुनः परिचय होत आहे. हा परिचय जरी नवा असला तरी १८९६ सालापासून रा. खाडिलकर याच्या लेखाचे धोरण वाचकास माहीत असल्यामुळे धोरणासबधानें नवी ओळख करून देण्याची जरुरी नाहीं. लो. बाळ गगाधर टिळक याचें शिष्यत्व स्वेच्छेनें व आनदानें स्वीकारून ज्या मताचा अगिकार रा. खाडिलकर यानीं केला, तीं मतें आज जशीच्या तशीं कायम आहेत. लो. टिळक यानीं आपल्या विचारसरणीला जे वळण लावलें, तें वळण म्हणजे सद्गुरूचा मोठा प्रसाद होय, असा रा. खाडिलकर याचा दृढ विश्वास असून, गेलीं दोन वर्षे 'लोकमान्य' पत्राचे सपादक या नात्यानें साप्रतच्या नव्या काळात त्यानीं जें धोरण स्वीकारलें होते, तेंच धोरण नव्या पत्राच्या रूपाने आजपासून वाचकापुढे माडण्यात येत आहे. म. गाधी यानी सुरू केलेली असहकारितेची चळवळ म्हणजे लो. टिळक याच्या धोरणाचें परिपक्व फळ होय, याविषयी सर्व विचारी लोकाची एकवाक्यता झालेली आहे. ज्या वृक्षाचे बीजारोपण लो. टिळक यानीं केलें, जो वृक्ष लो. टिळक याच्या हयातींतच वाढीस लागून फलोन्मुख झाला व ज्या वृक्षाचे पूर्ण स्वरूप महात्मा गाधी याच्या चळवळीमुळे जनतेच्या दृष्टीस पडलें, त्या वृक्षाच्या सावलीखालीं

---

* नवाकाळ, ता. ७ मार्च १९२३

बसून 'नवाकाळ' पत्र आपलें रोजचें काम करणार आहे. 'नवाकाळ' पत्राचें धोरणासबंधाने वाचकास इतकें सागितल्यानतर 'लोकमान्य' पत्राशीं आपला असलेला सबध रा. खाडिलकर याना का सोडावा लागला, याविषयी थोडासा खुलासा करणें जरूर आहे. दोन वर्षापूर्वी डॉ. भडकमकर यानीं लोकमान्य पत्र काढण्यासबंधाचा पुढारीपणा स्वतःकडे घेऊन जेव्हा जुळवाजुळव केली, त्यावेळी 'लोकमान्य' पत्राचे मॅनेजिंग एजटस्, रा. खाडिलकर व डायरेक्टर मडळीतील प्रमुख चालक याची एकजूट होती. कॉंग्रेसचा पक्ष व कौन्सिलचा पक्ष असे मतभेद होऊ लागल्यानतर मूळची जूट कायम राहिली नाहीं. मॅनेजिंग एजन्टमधील डॉ. भडकमकर याचा पुढारीपणा नाहींसा होऊन कौन्सिलवाल्या पक्षाचे रा मडलीक मॅनेजिंग एजन्टच्या तर्फेचें एक्स ऑफिशिओ डायरेक्टर झाले आणि खुद्द डायरेक्टराचे बोर्डात आपल्या बाजूचे मताधिक्य नाहीं, असा अनुभव रा. खाडिलकर याना आला. मॅनेजिंग एजन्टस म्हणजे रोजचे कामकाज पहाणारे एक तऱ्हेचे मालकच होत. मालक भिन्न मताचा व नोकर असलेला सपादक भिन्न मताचा, ही स्थिति रोजच्या कामकाजात अडचणीची होते, इतकेच नव्हे, तर उभयतासहि अत्यत त्रास व मानसिक क्लेश देणारी झाल्यावाचून रहात नाही. मॅनेजिंग एजन्टच्या तर्फेचा कारभार डॉ. भडकमकर याचे हातून निघून गेल्यामुळें डळमळीत झालेलें रा. खाडिलकर याचें आसन, डायरेक्टराच्या बोर्डातहि आपल्या बाजूनेच नेहमीं मताधिक्य होईल, असा अनुभव रा. खाडिलकर याना न आल्यामुळें, नेहमींच डळमळीत राहणार असें रा. खाडिलकर यांना वाटलें व त्यानी लगेच 'लोकमान्य' पत्राशीं आपला असलेला सबध सोडून दिला. अशाच प्रकारच्या परिस्थितीमुळें सपादक या नात्याच्या काळात पुण्यास रा. खाडिलकर याना पूर्वी दोन वेळा खो मिळालेला होता. तो खो

पुण्याहून मुंबईस आल्यावरहि तिसऱ्यांदा आपल्या सभोंवती घिरट्या घालीत आहे असे पाहून, असल्या खो च्या डावातील मानसिक क्लेश टाळण्याकरिता स्वतःचें स्वतंत्र आसन 'नवाकाळ' पत्राच्या रूपानें घालण्याचा निश्चय रा. खाडिलकर यानीं केला; आणि इष्टमित्राच्या मदतीमुळे 'नवाकाळ' पत्राचे द्वारें आपले विचार वाचकापुढे माडण्याची संधी रा. खाडिलकर याना मिळाली. संपादक व लेखक या नात्याने आपल्या आयुष्यातील शेवटच्या पायरीवर उभे राहून आजपासून आम्ही लो. टिळक व म. गांधी याचेच विचार आपल्या वेड्यावाकड्या पद्धतीनें बोलून दाखविणार आहोंत. ते बोल म्हणजे सद्गुरूची व संताचीं उच्छिष्टे होत, हे आमच्या वाचकास माहीत असल्यामुळें पूर्वीच्या स्वरूपातील आमचे लेख ज्याप्रमाणें महाराष्ट्रातील वाचकानीं गोड करून घेतले, तसेच 'नवाकाळा'तील लेख वाचक गोड करून घेतील, असा 'नवाकाळ' पत्रास भरवसा वाटत आहे.

---

# * मिठावरील कर नापास झाला



दिल्लीच्या असेब्लीने मिठावरील कराविरुद्ध आपलें मत दिले. मगळवारीं सायकाळी मते घेता सरकारच्या वतीचीं ४४ मतें पडलीं व विरुद्ध ५९ मते पडलीं. गेल्या वर्षी मिठावरील करास असेब्लीनें समति दिली नाहीं हे योग्य झालें, पण यदा तसे करू नये, अशी विनति सरकारतर्फे सभासदाना करण्यात आली. धान्याच्या किंमती उतरत आहेत, तेव्हा मिठावरील कर अधिक वाढला तरी लोकाना सहज सोसेल, असे सरकारतर्फें म्हणणें पडलें. धान्याच्या किंमती उतरत आहेत, तेव्हा लोकाचे पगार कमी करा, धान्याच्या किंमती उतरत आहेत तेव्हा मिठावर कर अधिक वाढवा, धान्याच्या किंमती उतरत आहेत तेव्हा लष्करी खर्च कमी करूं नका, अशा तऱ्हेची ही विचारसरणी आहे. दुष्काळात जर लोक कसाबसा आपला जीव वाचवूं शकतात, तर सुकाळातहि झाडपाला खाऊनच त्यानीं का राहू नये ? व शिल्लक राहिलेले पैसे सरकारच्या तिजोरीत का भरू नयेत ? कसेबसे जिवत राहून सरकारच्या तिजोरीची भर करणे, म्हणजेच इहलोकीचे सर्व सुख होय किंवा परलोकचा मोक्ष होय, अशी तर सरकारची कल्पना नाही ना ? अडचणीच्या वेळीं लोक अर्धपोटी राहू शकतात, किंवा वस्त्रप्रावर्णाशिवाय दिवस काढूं शकतात, म्हणून त्यानीं नेहमीच तसे राहण्यास राजी व्हावे हा न्याय कोठला ? लोकानीं आपल्या लग्नकार्याचा खर्च कमी करावा आणि सरकारच्या तिजोरीची भरती करावी, अशी विचारसरणी पूर्वी एका काळीं नोकरशाहीने प्रचलित केली होती. आज धान्याचे भाव उतरल्याबरोबर रोजच्या खर्चात होणारी बचत सामान्य लोकानी सरकारास दिली पाहिजे व गिरण्यातील मजु-

* नवाकाळ, ता. २२ मार्च १९२३

रांनीं गिरणीवाल्याना दिली पाहिजे, अशी मागणी पुढे आली आहे एक आपत्ति टळूं लागली म्हणजे दुसरे क्लेश सोसलेच पाहिजेत, असें लोकाना सागण्याचा नोकरशाहीचा कटाक्ष आहे. चुलींतून बाहेर निघाला तर वैलात पडण्यास का भितोस, म्हणून नोकरशाही लोकाना विचारीत आहे. इफ्लुएझामध्ये जिवत राहणारांनीं प्लेगला बळी पडण्यास कसूर करू नये, असा नोकरशाहीचा हा उपदेश आहे. अन्नवस्त्राशिवाय कसेबसे जिवत रहाणे एवढेच काय तें आयुष्यातील मुख्य काम आहे, अशी नोकरशाहीची समजूत झालेली दिसते! नोकरशाहीचे बडे अधिकारी मोटारीशिवाय, बगीच्याच्या बगल्याशिवाय, नोकराचाकराच्या ताडयाशिवाय, पक्वानाच्या रेलचेलीशिवाय, शिक्षणाच्या व करमणुकीच्या सोयीशिवाय-सहज जिवत राहू शकतील. तडफडून मरतील अशातला भाग मुळीच नाहीं. मग त्याना तरी एवढाले मोठे मोठे पगार कशाला पाहिजेत? धान्याच्या किंमती थोडयाशा कमी होत चालल्या आहेत, ह्यामुळे सामान्य लोकाचे दु:ख थोडेसे हलके होऊ लागले आहे, एवढेच कायतें. ससार सुखाचा करण्यास पैसे उरूं लागले आहेत आणि लोकाची राहाणी चैनीची होण्याला यापुढे सुरवात व्हावयाची आहे, अशातील भाग मुळींच नाहीं. ना. सर मालकम हेले यानी असेब्लीमध्ये असे सागितलें कीं, मिठावरील कर बसविल्याशिवाय सरकारला गत्यतरच नाहीं. म्हणून सरकार असला कर बसविण्यास उद्युक्त झालें आहे. गत्यतर नसायला काय झाले? लष्करावरील खर्च निम्म्याहून कमी करा म्हणजे आपोआप जबर कराना फाटा देण्यास सवड सापडेल. फाजील लष्करी खर्चाची हौस, आणि बायकाची दागिन्याची हौस, या दोनहि गोष्टी समाजाचें स्वास्थ्य बिघडविण्यास सारख्याच कारणीभूत होत असतात. शातता व व्यवस्था रहावी, एवढयाकरिता लष्कराची जरुरी आहे. त्याचप्रमाणे संसार सौंदर्याच्या सुखाने आच्छादलेला असावा, एवढयाकरिता दागिन्याची

व सजावटीची जरुरी आहे. पण सर्वांत आपणच वरिष्ठ आहों, असें दाखविण्याची महत्त्वाकांक्षा ज्या वेळीं सत्ताधारी पुरुषांत उत्पन्न होते, त्या वेळीं लष्करी सत्तेच्या डामडौलावर व फाजील वाढीवर अतोनात पैसा खर्च करून उधळ्या नटवीच्या पायरीला सत्ताधारी लोक पोंचतात. जरुरी आणि फाजीलपणा ह्यांतील भेद त्यांना समजेनासा होतो. म्हणतील तेथें लष्करी लोक, पाहिजे तेव्हां पाहिजे तितके, सदा उभे राहिले पाहिजेत अशी महत्त्वाकांक्षा धरण्यांत, आणि इच्छेस येईल तितक्यांदां रोज नवे नवे शालू नेसून आपल्या सौंदर्यावर इतकी श्रीमंती आपण मिळवूं शकतों म्हणून प्रदर्शन करणाऱ्या नटवीच्या चंचल लहरींत फरक तो कोणता आहे? इंग्लंडांतील न्यायमूर्ति मॅकार्डी ह्यांनीं इंग्लंडांतील बायकांच्या फाजील पोषाखाची किंमत दुकानदारांना नवऱ्यांनी देण्याची जरुरी नाहीं, असें जसें ठरविलें आहे, तसेंच दिल्लीच्या असेंब्लींतील मवाळांनीं देखील लष्करी शक्तीच्या फाजील थाटामाटाकरितां आपलें मीठ अधिक तोडून घेण्याचें नाकारलें आहे हें चांगलें झालें. इंग्लंडांतील कॅ. नॅश हे बाईलवेडे होऊन बायकोच्या पोषाखाचें पायीं लाखों रुपयांची आपली इस्टेट धुळीस मिळविण्यास तयार झाले, पण अखेर त्यांना देखील बायकांचा नाद सोडून द्यावा लागला. इंग्लंडांतील हौशी नवऱ्याच्या बाईलवेडेपणास जशी सीमा आहे, तशीच सीमा नोकरशाहीच्या नादीं लागलेल्या मवाळांच्या आळणीपणासहि आहे. नखशिखांत आळणी झाल्यावर नोकरशाहीच्या नादांत तरी सुख कोठलें रहाणार? असेंब्लीनें मिठावरील कर नापास केला आहे, पण लाटसाहेब स्वतःच्या हिंमतीवर हा कर बसवितात किंवा कसे, हें आतां पहाणें आहे.



# * वेश्येखातर मिठावर कर



बायबलात अशी गोष्ट आहे कीं, हेरॉड राजानें जॉन बॅप्टिस्टा ह्याचा जो खून केला तो खून एका वेश्येला खूष करण्याकरिता केला. आपल्या वाईट चैनीकरिता साधू पुरुषाचें डोकें उडविण्याचें जे भयंकर पातक राजा हेरॉड ह्याने केलें, त्या पातकाहून अधिक भयंकर पातक हिंदुस्थान सरकार मिठावरचा कर दुप्पट करून सांप्रत करीत आहे, असे सर मॉंटेग्यू वेब यानीं सोमवारच्या असेंब्लीच्या बैठकींत नोकरशाहीस कळविले! मिठावर कर बसविणे म्हणजे गोरगरिबांना कालांतरानें फांसावर चढविणें होय. सर वेब ह्याचें असे म्हणणे आहे कीं, मिठावर कर बसविण्यास कांही कारणच नाहीं. जेथे हिंदुस्थानच्या राष्ट्राकरिता दोन अब्ज रुपयाचें कर्ज चार पांच वर्षांत काढण्यांत आलें आहे, तेथे तीन कोटीचें अधिक कर्ज काढणें म्हणजे शेकडा एक टक्कयानें कर्ज वाढविणे होय. शेकडा एक टक्कयानें कर्ज वाढले म्हणून किंवा कमी झालें म्हणून व्याजाचे दर लंडनच्या किंवा मुंबईच्या सराफ कट्टयावर वाढतील असे मानण्यास मुळींच कारण नाही. सर मॉंटेग्यू वेब ह्यांना व्यापारी ह्या नात्यानें, रेल्वे मॅनेजर ह्या नात्याने व जहाजाचे मालक ह्या नात्यानें हिंदुस्थानातील पैशाच्या हालचालीची पूर्ण माहिती असून मिठावरील कर वाढविल्यानें हिंदुस्थान सरकारची पत बाजारांत वाढेल असे मुळींच वाटत नाही. इंचकेप कमि- टीच्या सूचनेप्रमाणे इतर खात्यांत आणखी काटकसर केली म्हणजे तीन चार कोटीची तूट सहज भरून निघणारी आहे. सांप्रतची तूट जमाखर्चांत अडचण आल्यामुळे दिसत नसून फडणविसाच्या हेक्यामुळे दिसत आहे, असे मि. वेब

* नवाकाळ, ता. २८ मार्च १९२३

याचे म्हणणे आहे. ही तूट फडणविसानीं उत्पन्न केलेली आहे, तिजोरीच्या जमाखर्चानें उत्पन्न केलेली नाही. जमाखर्चाकडे पहाण्याच्या दृष्टीला ही तूट दिसत नसून हिंदुस्थान सरकारच्या राजकीय मुत्सद्दीपणात ही तूट दृष्टीस पडत आहे. मिठावर जो कर दुप्पट करण्यात आला आहे तो जमाखर्चाची तोंडमिळवणी करता येत नाही म्हणून नव्हे, तर असला कर बसविण्याची ही संधी व्यर्थ दवडता कामा नये म्हणून हिंदुस्थान सरकारने स्वतःच्या धोरणाच्या दृष्टीनें हा कर बसविला आहे. जमाखर्च हा कर मागत नाही मग कोणाला खूष करण्याकरिता हा कर बसविला आहे? लष्करी शक्तीच्या नादी हिंदुस्थान सरकार फाजील लागले आहे. ह्या वेश्येचा खर्च मनमुराद ह्यापुढे देखील करता यावा म्हणून मिठावर दुप्पट कर करण्यात आला आहे. लष्कराचे चोचले पुरविण्याकरिता मिठावर दुप्पट कर बसविणे म्हणजे लाखों गोरगरिबांच्या संसाराच्या यातना असह्य करून त्याना आस्ते आस्ते मृत्यूच्या मुखी फेकून देणे होय. हेरॉड राजानें एका वेश्येच्या नादी लागून एका साधूचा शिरच्छेद केला, हिंदुस्थान सरकार लष्करी महत्त्वाकांक्षेच्या नादीं लागून लाखो लोकांचे खून पर्यायानें करण्यास तयार झालें आहे. मि. वेब ह्यांनी म्हटल्याप्रमाणें हेरॉड राजावर ताण करणारे हे दुष्कृत्य नव्हे काय? गेल्या सोमवारच्या असेंब्लीतील वादविवादात सर मॉटेग्यू वेब ह्यानी नोकरशाहीच्या डोळ्यात अंजन घालण्याचा प्रयत्न वरीलप्रमाणे केला. पण सर्व वाया गेला. हिंदुस्थान सरकारच्या अधिकाऱ्यावर काही एक परिणाम झाला नाहीं. शेट जम्नादास द्वारकादास ह्यांनीं सरकारास असे बजावलें कीं, मिठावर कर बसवून तुम्ही लोकापासून चार कोट रुपये हिरावून घ्याल हे खरें, पण ह्या दुष्कृत्यामुळे जो असंतोष चोहोकडे माजून राहील आणि जे दंगेधोपे चोहोंकडे उद्भवतील त्या असंतोषाच्या व दंग्याधोप्याच्या पायीं चार कोटीहून अधिक खर्च नोकर-

शाहीला करावा लागेल. शेट जम्नादास द्वारकादास ह्यानीं अशा प्रकारचा सदुपदेश नोकरशाहीला करण्याचे धाष्टर्य दाखविल्याबद्दल उलट त्याचीच थट्टा करण्यात आली! मिठावरचा कर म्हणजे राज्यक्रांतीचें पूर्व चिन्ह होय, असे शेटजींनी काही दिवसापूर्वी बोलून दाखविलें होते. पण अधिकाऱ्यानी शेटजीना कुचेष्टेने असे विचारले की, मिठावरचा कर बसवून एक महिना झाला अद्याप दगेधोपे दिसत नाहीत आणि राज्यक्रांतीची चिन्हेंहि दिसत नाहीत याचा अर्थ काय? तुमचा असंतोष कोठे आहे? तुमचे दगेधोपे कोठे आहेत? तुमची राज्यक्रान्ति कोठे आहे? सरकारचे कल्याण चिंतून सरकारास अतःकरणपूर्वक उपदेश करणाऱ्या शेटजीची टर वरीलप्रमाणे कौन्सिलात करण्यात आली! बिचारे शेटजी काय उत्तर देणार? एक वर्ष झाले तरी तुझें स्वराज्य अद्याप का दिसत नाही, म्हणून महात्माजींना हिणविण्याकरिता जसे प्रश्न चारगटपणानें विचारण्यात येतात, तसाच चारगटपणा शेट जम्नादास द्वारकादास ह्याचा असेब्लीमध्ये करण्यात आला. असला पाणउतारा करून आपल्या हलक्या मनाचें प्रदर्शन करण्यापर्यंत नोकरशाही आज नादान झाली आहे. शेठ जम्नादास द्वारकादास ह्यानी असल्या चारगटपणाला काय उत्तर द्यावे? लोक निमूटपणानें जुलूम सोसत आहेत, तेव्हा अधिकाऱ्यानी तरी शेफारून का जाऊ नये? प्रल्हादाला हिरण्यकश्यपूनें तुझा देव कोठे आहे म्हणून विचारून जसे वारवार हिणविले, तसेच आजहि असेब्लीतील तडफदार पुरुषाना हिणविण्यात येत आहे. त्यानीं आज सरकारला देव कोठून दाखवावा? म. गांधींच्या तपश्चर्येला जो देव तत्काळ पावला नाही आणि आणखी सहा वर्षांची कारागृहवासाची तपश्चर्या कर म्हणून ज्या देवाचा हुकूम झाला तो देव आज उद्या प्रकट होईल म्हणून कसे म्हणावे? देव प्रकट होण्यास जो अनुकूल काल पाहिजे, तो अनुकूल काल

कोणता आहे, हें देवासच पूर्ण ज्ञात आहे. त्यावेळी तो प्रकट होईल. तोंपर्यंत शेट जम्नादास द्वारकादास ह्यानी म. गाधींचें अनुकरण करून स्वतःची हुर्यो करून घेण्यास तयार झालें पाहिजे. असेंब्लींतील वादविवादानें नोकरशाही मिठावरील कराच्या कामीं शुद्धीवर येईल अशी आशाच करावयास नको. लष्करी सत्तेचा वाजवीहून फाजील नाद इग्लडातील व हिंदुस्थानातील मुत्सद्याना आजकाल लागला आहे. हा नाद पुरविण्यास पैसे पाहिजेत. इग्लंडात नवीन कर बसविण्याची सोय राहिली नाहीं. तेव्हा मढयावरील लोणी चाटण्यास ह्यावेळीं नोकरशाही कमी करणार नाहीं. व्यसन ते व्यसन, मागेपुढे कोण पहातो ? गरीब लोक पिळले जातील, म्हणून कोण विचार करतो ? गरिबाचा छळ झाला असता देव जागा होतो, म्हणून साधुसतानी भाराभर लिहून ठेविले आहे, पण त्या साखरेच्या गोण्याची चव नोकरशाहीला काय ? व्यसनानें नोकरशाही अध झाली आहे, आणि आपल्या वेश्येचे लाड कसे पुरवावे ह्यापलीकडे नोकरशाहीला दुसरे तिसरे काही दिसत नाही. सोमवारीं असेब्लींत ५८ मतें देऊन मिठावरील कर नापास केला. सरकारच्या वतीचीं ४७ मतें पडलीं. असेब्लीने हा कर तिसऱ्यादा नापास केला. गेल्या वर्षी एकदा आणि यदा गेल्या आठ दिवसात दोनदा. इजा, बिजा, तिजा झाले तरी सरकारचें येळकोट अद्याप कायम आहेच. असेब्लीने अशा रीतीनें कर बसविण्याचें नाकारल्यानतर लाटसाहेबाना स्वतःच्या अखत्यारींत कर बसविता येईल. पण तो कर हिंदुस्थान सरकाने बसविला नसून लाटसाहेबानी स्वतः बसविला असे समजले जाऊन बादशाहीची म्हणजे पार्लमेंटची मजुरी घ्यावी लागेल. पार्लमेंट सभेंतील वादविवाद टाळता आला तर पहावा म्हणून नोकरशाही साप्रत धडपड करीत आहे. पार्लमेंट सभेत वादविवाद झाल्यानें मजुरी मिळणार नाहीं अशी भीति हिंदुस्थान सरकारास मुळींच नाहीं. कारण इग्लडचें मत्रिमडळ, पार्लमेंटमधील कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष व लिबरल पक्ष

आणि इंग्लंडचा बहुजन समाज, ही सर्व मंडळी हिंदुस्थान सरकारच्या व्यसनात पूर्णपणें रंगलेली आहे. हे सर्व एकाच वेश्येचे दास झालेले आहेत. सर्वांना एकच नाद लागला आहे. तेव्हां कोणी कोणास हसतील, अशी भीति नाही. तथापि इंग्लंडातील मजूरपक्षापुढे म्हणजे घरातील चाकरमाणसापुढें तरी इष्टमित्रांनी मिळून हा नंगा नाच कशास नाचा, अशी थोडीशी लाजलज्जा हिंदुस्थानच्या नोकरशाहीस अद्याप वाटत आहे. हिंदुस्थानातील मवाळाची त्याना पर्वा नाही. त्याचे पुढे उघडे नागडे होऊन उलट मवाळाचीच टर करण्यास नोकरशाही तयार आहे. पण मजूर पक्ष असल्या प्रसंगी हजर नसला तर बरे असे हिंदुस्थान सरकारला वाटत असल्यामुळे मिठावरील कराची चर्चा पार्लमेंट सभेपुढे न जाण्याचा एक तोडगा हिंदुस्थान सरकारने सांप्रत योजिला आहे. कौन्सिल ऑफ स्टेट व असेंब्ली ह्या दोघांची मिळून बैठक लाटसाहेब स्वतः बोलावणार आहेत, आणि आपले हृद्गत त्याना कळविणार आहेत. असेंब्लीमध्यें दहा अकरा मतांनीं सरकारची सूचना नापास झाली. स्टेट कौन्सिलमध्ये सरकारी मताधिक्य दहा अकरा मताहून बरेच अधिक आहे. तेव्हा दोघांची मिळून जर मिश्र बैठक बोलावली, तर त्या मिश्र बैठकीत सरकारला सहज मताधिक्य मिळणार आहे. असली मिश्र बैठक बोलाविण्याचा व्हाइसरॉयांना अधिकार आहे आणि ह्या अधिकाराप्रमाणे मिश्र बैठक बोलावण्यात येणार आहे, असेहि जाहीर झाले आहे. ह्या बैठकीत मिठावरील कर जर पास झाला तर लाटसाहेबानी व्यक्तिशः आपल्या अधिकाराचा उपयोग करण्याची काहीच जरुरी नाही. लाटसाहेब व त्याचें मंत्रिमंडळ म्हणजे हिंदुस्थान सरकार या मिश्र बैठकीच्या ठरावास संमति देईल आणि मग पार्लमेंट सभेपुढे मिठावरील कर जाण्याचे कारण उरणार नाहीं. हिंदुस्थान सरकार असेंब्लीला बिलकूल भीत नाही. उलट असेंब्लीनें नोकरशाहीच्या नग्या नाचाची तारीफच

करीत राहिलें पाहिजे असे असेब्लीला दटावून सांगण्यात येत आहे. स्टेट कौन्सिल जसे दास्य पत्करते तसलाच दासीपणा असेब्लीनेंहि स्वीकारला पाहिजे, असे असेब्लीला शिकविण्याकरिता शेठ जमनादास द्वारकादास सारख्यानाहि स्टेट कौन्सिलातील दासाच्या शेजारी मिश्र बैठकीत बसविण्यात येणार आहे. शेठ जमनादास द्वारकादास ह्यांच्यासारखे तडफदार पुरुष असेब्लीच्या अब्रूचें काढण्यात येत असलेले हे धिंडवडे ह्यापुढे निमूटपणें सोसतील काय? इतर नाखूष होण्याचें बाजूला राहो, पण शेटजी जरी स्वतः नाखूष झाले आहेत, असे डायरेक्ट ॲक्शनने उर्फ प्रत्यक्ष कृतीने नोकरशाहीच्या निदर्शनास आणण्यास शेटजी ह्या वेळी तरी पुढे येतील काय?

———

# * मिठावर कर दुप्पट झालाच

लाटसाहेबानीं स्वतःच्या अखत्यारींत मिठावरचा कर दुप्पट केला आहे. मिठावरचा कर दुप्पट केल्याचे जाहीर करताना लाटसाहेबानी तसे करण्याची कारणें दिलीं आहेत. एकसारखे कर्ज वाढत गेल्यामुळे जमाखर्चाची तोड-मिळवणी करणें सरकारास भाग पडलें, आणि मिठावरील कराशिवाय दुसरा मार्गच सरकारला दिसला नाही व कायदे कौन्सिलात सुचविता आला नाहीं. व्यापार उद्योगधंद्यावर कर वाढवावा, तर अधिक रक्कम उत्पन्न होईल अशी स्थिति राहिलेली नाही. मिठावर कर इंग्रजी अमलापूर्वीपासूनचाच आहे. आणि पूर्वी देखील तो लोकप्रिय नव्हता लोकाना हा कर सोसणार नाहीं, ह्या म्हणण्यात लाटसाहेबाना तथ्यांश दिसत नाही. यंदा धान्याच्या किंमती उतरल्या असल्यामुळे असला कर सोसण्यास लायक असलेले यंदाच्या सालासारखे साल ह्यापूर्वी कधीच आले नव्हते, असे लाटसाहेबाचें म्हणणे आहे. मॉटेग्यु–चेम्सफर्ड सुधारणाना हा कर बसविल्याने धक्का पोंचतों असे म्हणण्यात अर्थ नाही, असे लाटसाहेब आपल्या जाहीरनाम्यात म्हणत आहेत. जमाखर्चात तूट पडून जर कर्ज वाढत गेलें, तर त्या योगानें शिक्षण, आरोग्य, व उद्योगधंदे ह्याचें जे भयंकर नुकसान होणार आहे, त्या नुकसानीपुढे राजकीय सत्तेच्या वादाचे प्रश्न काहीच नाहीत. मॉटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणातील हक्काना सोडून लाटसाहेब वागत नसल्यामुळे कोणत्याहि हक्काचे उल्लंघन सरकारनें केले असे म्हणता येणार नाहीं. मिठावरील कर दुप्पट वाढविण्यास सर्टिफिकिट देताना सरकारच्या वर्तनाचे समर्थन लाटसाहेबानी वरीलप्रमाणे केले आहे. ते समर्थन अगदीं पोकळ

* नवाकाळ, ता. ३१ मार्च १९२३

व टाकाऊ आहे. मिठावरील कर इंग्रजी राज्यापूर्वी होता, असे म्हणण्यात अर्थ काय? इंग्रजी राज्यापूर्वी जे कर नव्हते ते सोडून देण्यास सरकार तयार आहे काय? पेशवाईत मद्यपानाची मनाई होती, आज अबकारी खात्याच्या उत्पन्नावर उदक सोडण्यास सरकार तयार आहे काय? खाण्यापिण्याच्या वस्तू पूर्वी लोकाना जितक्या मुबलक मिळत होत्या तितक्या मुबलक आजहि मिळण्याइतके निरनिराळे कर कमी करण्यास सरकार कबूल आहे काय? मिठावरील कर लोकाना पसत नाही हे जर सरकारास मान्य आहे, तर हा कर दुप्पट करण्याची आज जरुरी काय? राजकीय चळवळ लोकाच्या असतोषामुळे वाढेल या गोष्टीची पर्वा आपण करीत नाहीं, असे लाटसाहेब पर्यायाने म्हणत आहेत. नेमस्ताच्या गालावर लाटसाहेबानी ही चागली थप्पड मारली आहे. दोन चार कोटीचे अधिक कर्ज काढले असते म्हणून काय बिघडले होते? हिंदुस्थान सरकारच्या जमाखर्चाची तोडमिळवणी होऊ शकत नाही, ह्या गोष्टीचा बोभाटा दोन चार कोटींच्या कर्जानें कितीसा झाला असता? पैसा जवळ नसला म्हणजे शिक्षण, आरोग्य व उद्योगधदे ह्याना मदत करता येत नाही आणि त्यामुळे समाजाचे अपरिमित नुकसान होते असा लोककल्याणाचा आव लाटसाहेबानीं आणला आहे, हे निव्वळ ढोग आहे. लष्करी खात्यावर रुपयातील आठ दहा आणे खर्च करून दिवाळखोर बनलेल्या सरकारनें शिक्षण व आरोग्य याच्या विषयीची कळकळ दाखविणे म्हणजे लोकाच्या डोळ्यात धूळ टाकणे होय. सर्टिफिकिट देण्याचा मला हक्क आहे आणि तो हक्क मी बजावीत असल्यामुळे मॉटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणाचेंहि उल्लघन होत नाही, ह्या लाटसाहेबाच्या म्हणण्याचा विचार नेमस्तानीं अवश्य करावा. सुधारणा भरीव नाही, पोकळ आहेत आणि सर्व सत्ता तुमच्या हाती नसून आमच्या हातीं आहे, असे लाटसाहेबानीं चक्क सागितले आहे. सुधारणाचा पोकळपणा

सरकारास कबूल करावयास आम्ही भाग पाडूं हाच कौन्सिले मोडण्याचा अर्थ होय, असे कौन्सिलवाल्या पक्षाने आजपर्यंत प्रतिपादन केले आहे. कौन्सिलवाल्या पक्षास जी कबुली पाहिजे होती, तीच कबुली मिठावरील कर दुप्पट करून सरकारने दिली आहे. कौन्सिले निर्माल्यवत् आहेत, हे सिद्ध झालें आहे. मिठावरील कराने कौन्सिलाचा निःसत्वपणा चव्हाट्यावर आला असून कौन्सिलात जीव उरलेला नाहीं, हे सरकारच्याप्रमाणे नेमस्तानीहि आता कबूल केले आहे. मिठावरील कर दुप्पट करणे म्हणजे मॉटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणाना विध्वंस करणे होय, हे तत्त्व असेंब्लीत वादविवादाच्या वेळी नेमस्तानी स्पष्टपणे बोलून दाखविलें आहे. अलाहाबादच्या लीडर पत्राने अशीच कबुली दिलेली आहे. कौन्सिले मोडण्यास सरकार तयार झालें आहे, असा लीडरचा अभिप्राय आहे. कलकत्त्याच्या बंगाली पत्राने हेच मत दिले आहे. पुण्याचा सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीचे मत त्याच्या पत्रातून अशा धर्तीने प्रसिद्ध झाले आहे की, सरकारने कायदे-कौन्सिलाचा चक्काचूर केला, असे म्हणण्यास आता हरकत नाही. बंगाली लीडर व सर्व्हंट ऑफ इंडिया ही पत्रे म्हणजे नेमस्ताच्या मताचा गड्डाच होय. आमची कौन्सिले मेलीं, सुधारणाचा चक्काचूर झाला, आमचें नाक कापले गेलें, असा टाहो फोडून हीं पत्रे सांप्रत रडत आहेत. कौन्सिलाच्या मृत्यूबद्दल अशा रीतीने नेमस्त ऊर बडवून घेत असताना कौन्सिलात अद्याप धुगधुगी उरली आहे आणि कौन्सिलाच्या शवाच्या छातीवर गुडघा रोंवून आम्ही त्याना पुरतेपणीं मारणार, असे म्हणत मेलेल्याला पुन्हा मारण्याचा हास्यास्पद खेळ खेळण्यास राष्ट्रीय सभेतील कौन्सिलवाला पक्ष मिठावरील कर दुप्पट झाल्यानतर आता पुढे कसा येईल?

---

# * राष्ट्रीय निशाणाचा झगडा

राष्ट्रीय निशाणाच्या अब्रूसाठीं नागपूरचे देशभक्त आजपासून सत्याग्रहास सुरवात करणार आहेत. जबलपूर व नागपूर येथे आतापर्यंत राष्ट्रीय निशाणाच्या मिरवणुकीचे पायी बरेच स्वयंसेवक तुरुंगात गेले आहेत. राष्ट्रीय निशाण उभारणें किंवा राष्ट्रीय निशाणाची मिरवणूक काढणे या गोष्टी राजद्रोहाच्या ठरत नाहींत. राष्ट्रीय निशाण हें स्वराज्याच्या चळवळीचें चिन्ह आहे. राष्ट्रीय निशाणाची मिरवणूक म्हणजे एक प्रकारची स्वराज्याची चळवळ होय. ह्या चळवळीमुळें एका ध्येयावर लोकाची दृष्टि एकवटली जाते. प्रत्यक्ष निशाण डोळ्यापुढें उभे असल्यामुळे चळवळ केवळ बुद्धीच्या टापूंत न रहाता चळवळीला एक तऱ्हेचा प्रत्यक्षपणा येतो. मूर्तीची उपासना आणि ध्यान ह्याच्यामध्ये जें अंतर आहे तेंच अंतर निशाणाची मिरवणूक आणि राजकीय परिस्थितीसंबधींचें व्याख्यान याच्यामध्यें आहे. राष्ट्रीय निशाणानें राजकीय चळवळ मूर्तिमंत होते. कोणतीहि चळवळ देहधारी उर्फ ऑर्गनाइझ्ड होण्यास बाह्य स्वरूपाची जरुरी असते. राष्ट्रीय गीतें, राष्ट्रीय सभागृहें, त्या त्या चळवळीस वाहिलेले सेक्रेटरी व अध्यक्ष यांचे ठिकठिकाणचे जमाव व वक्त्याची जुळणी, चळवळीच्या धोरणानें लोकमतास वळण देणारीं वर्तमानपत्रें, ध्येयाचे उपासनेला उन्नति देणाऱ्या पुढाऱ्याचीं चित्रे आणि, राष्ट्रीय निशाणासारखे सर्व चळवळीचें सार दाखविणारें एखादे प्रतीक, या सर्वांचा जेव्हां योग्य रीतीनें मेळ बसतो तेव्हा चळवळ देहधारी होऊन प्रत्यक्षपणें लोकाना दिसूं लागते. अशा दृष्टीनें विचार केला असता राष्ट्रीय निशाणासंबंधानें जबलपूर व नागपूर येथील देशभक्तांनीं राष्ट्रीय निशाणाच्या अब्रूकरितां सुरू केलेला सत्याग्रह केवढ्या मोठ्या

* नवाकाळ, ता. १ मे १९२३

योग्यतेचा आहे हें कोणच्याहि ध्यानी येईल. राष्ट्रीय निशाणाची चळवळ राजद्रोहाची नाही किंवा दगाधोप्याचीहि नाही. असे असताहि या चळवळीला जबलपूर व नागपूर येथील पोलिसने अडथळा केला, देशभक्ताना निर्दय-पणानें मार दिला, आणि कित्येकाना तुरुगात टाकले. मध्यप्राताच्या पोलिसाची ही कृति मुत्सद्दीपणास धरून बिलकूल झाली नाही. कारण स्वराज्याच्या चळवळीत अशा रीतीने चळवळीच्या उत्पत्तीचे प्रारभाचे ततु निर्दयपणें तोडून टाकण्याचे दिवस केव्हाच निघून गेले आहेत. होमरूलची चळवळ ज्यावेळीं बिझाटबाईनीं सुरू केली त्यावेळीं त्यानीं राष्ट्रीय निशाण उभारलें. राष्ट्रीय निशाणाचे हे पुष्प आपल्या मुठीत धरून चुरडून टाकण्याचा प्रयत्न त्यावेळीं नोकरशाहीने केला, पण तो सफल झाला नाही. वदेमातरम् हे गीत व वदेमातरम् हे शब्द अशाच रीतीने नाहीसे करण्याचा प्रयत्न बगालचे स्वदेशी चळवळीत करण्यात आला होता, पण तोहि सफल झाला नाही. आज वदेमातरम् जयघोष मोठा राष्ट्रीय मत्र होऊन बसला आहे. या शब्दाचा ध्वनि कानी पडण्याबरोबर स्वराज्याच्या ध्येयाची एकदम आठवण आजकाल सर्वाना होत आहे. वदेमातरम् या शब्दाचा जो उपयोग कान पवित्र करण्याकडे होतो, तोच उपयोग डोळे पवित्र करण्याकडे राष्ट्रीय निशाणाचा होतो. महात्मा गाधी याची खादीची टोपी राष्ट्रीय आचरणाचे बाहेरचें प्रमुख चिन्ह आजकाल समजले जात आहे. राष्ट्रीय निशाण ही देवता आहे, वदेमातरम् हा मत्र आहे, आणि खादी ही पूजाअर्चा आहे. तीनहि चळवळीकडे पाहिले असता वदेमातरम् व खादीची टोपी ह्याचा नायनाट करण्याचा प्रयत्न केल्यानतर राष्ट्रीय निशाणाच्या मागे आजकाल नोकरशाही लागली आहे असे दिसून येतें. राष्ट्रीय निशाणाची चळवळ कोमल अर्भकाच्या स्थितींत असतानाच त्या अर्भकाला मारून टाकून स्वराज्याचें ध्येय निर्बल करण्याचा हा प्रयत्न आहे चिमुकल्याना मारून टाकण्याकडे ओढा सर्व अरेरावी सत्तेचा नेहमींच असतो. अरेरावी सत्तेचा हा स्वभाव आहे. श्रीकृष्ण

काय किंवा खाइस्ट काय, याच्या वेळेच्या पूर्वीपासूनच अरेरावी सत्तेचा हा क्रम चालू आहे. अरेरावी सत्तेने चिमुकल्याना मारून टाकावे आणि आपलें वैभव निर्धास्त करावे, हे साहाजिक आहे. अशा कत्तलीतून जी चळवळ बाहेर पडूं शकते तीच आस्ते आस्ते सशक्त होऊन अखेरीस यशस्वी होते. सभाबदीचे कायदे किंवा सस्थाचा नाश करणारे कायदे ही सर्व अर्भकाची कत्तल करण्याकरता अरेरावी सत्तेने हातीं घेतलेली शस्त्रास्त्रे होत. युवराजाचा दौरा हिंदुस्थानात चालू असताना सभाबदीचे हत्यार नोकरशाहीनें पूर्ण जोरानें उपसले आणि आपल्या नवीन सस्थाचा जीव जाऊं नये म्हणून पचवीस हजार देशभक्त त्यावेळीं तुरुगात गेले, अरेरावी सत्ता अर्भकाना कशी मारू पहाते आणि तुरुगवास पत्करणारी नवी शक्ति स्वतः हालअपेष्टा सोसून आपल्या कोवळ्या चळवळीची नीट जोपासना कशी करते, हे युवराजाच्या दौऱ्याच्या वेळेच्या हकीकतीनें सर्वांच्या निदर्शनास आलेंच आहे. राष्ट्रीय निशाणाची चळवळ व त्यासबधाचा सत्याग्रह म्हणजे स्वराज्याच्या वाढत चाललेल्या कोंवळ्या देहाची जोपासनाच होय. तुरुगाच्या हालअपेष्टा सोसूनच किंवा हद्दपारीचे दु ख स्वतःच्या अंगावर ओढून घेऊनच या कोवळ्या अर्भकाचें सरक्षण करावे लागतें. सभाबदीचा कायदा काय किंवा निशाणाच्या मिरवणुकीला केलेला अडथळा काय, दोन्हीचें स्वरूप एकच आहे. राष्ट्रीय निशाणासबधाचा सत्याग्रह म्हणजे सभाबदीच्या कायद्याशीं झुजण्याचाच एक भाग आहे वर्ष दीड वर्षापूर्वीची चळवळ युवराजाच्या दौऱ्यामुळे उत्कट हालचालीची झाली राष्ट्रीय निशाणाच्या चळवळीत तो उत्कटपणा नाही. प्रसगामुळे आलेली उत्कट खळबळ जरी नसली तरी शातता, गभीरता, आणि निश्चयाची श्रद्धा राष्ट्रीय झेंड्याच्या झगड्यात अधिक आहे. नागपूरच्या चळवळीची योग्यता अशा तऱ्हेची असल्यामुळे सर्व हिंदुस्थानचें लक्ष नागपूरकडे आजकाल लागून राहिलें असल्यास त्यात काहीं नवल नाहीं.

# * समेट संपला



मे महिना सुरू झाल्यापासून कॉंग्रेसचा पक्ष व कौन्सिलवाला पक्ष यांच्या मधील वादविवादाचा समेट संपला आहे. प्रत्येक पक्षास आपापल्या मर्जी-प्रमाणें वागण्यास आता पूर्ण मोकळीक आहे. समेट आणखी कांहीं महिने असाच पुढें चालावा म्हणून मध्यतरीं प्रयत्न करण्यात आला, पण या समेटा पासून कोणत्याहि पक्षास विशेष फायदा नसल्यामुळे आणि कौन्सिलवाल्या पक्षानें कौन्सिलात शिरण्याची आपली तयारी अधिक जोरानें करणें जरूर असल्यामुळें समेटाची मुदत पुढें वाढली नाहीं. कॉंग्रेसच्या पक्षाचे फंड गोळा करण्याचें व स्वयंसेवक जमविण्याचें काम समेटाच्या बोलण्यानें विनाकारण थंड पडतें, असा अनुभव आल्यानें श्री. राजगोपाळाचार्य, श्री. वल्लभभाई पटेल आणि बाबू राजेन्द्रप्रसाद यांनीं समेटाच्या भानगडींत न पडता आपलें काम अधिक नेटानें करण्यास राष्ट्रीय सभेच्या अनुयायांनीं यापुढे लागावें असे ठरविले हें योग्यच झालें. राष्ट्रीय सभेच्या वर्किंग कमिटीची बैठक ता. २३ मे रोजीं व ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची बैठक ता. २५ मे रोजी मुंबईस भरावयाची आहे. या दोन तीन आठवड्यात राष्ट्रीय सभेच्या कैवाऱ्यांनीं जर मनापासून खटपट केली तर बरेंच कार्य होणार आहे. ३० एप्रिल अखेरपर्यंतच्या कामाकडे लक्ष देता एकंदर हिंदुस्थानच्या फंडासंबधानें गयेच्या कॉंग्रेसनें जो कार्यक्रम ठरविला त्यापैकी एक तृतीयांश कार्यक्रम पार पडल्यासारखा झाला आहे असे दिसून येते. कांहीं प्रांतांनीं आपला कार्यक्रम पार पाडला आहे व कांहींचा कार्यक्रम २३ मे पर्यंत पार पडण्यासारखा आहे. बरेच प्रांत या कामीं मागासलेले

---

* नवाकाळ, ता. ५ मे १९२३

आहेत. तेव्हा ता. २५ मे रोजी भरणाऱ्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीला कार्यक्रम पार पाडण्यासंबंधानें एक तृतीयांशापासून एक द्वितियांशापर्यंत काम झालें आहे किंवा होण्यासारखें आहे, असे दृष्टीस पडेल. या स्थिति-संबंधानें श्री. राजगोपाळाचार्य ह्यानीं प्रसिद्ध केलेल्या धोरणाकडे पाहिलें असता, ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी कायदेभंगाच्या राष्ट्रीय कार्यासंबंधानें निरुत्साही न होता ह्या दिशेनें सतत उद्योग पुढे चालविण्याचा ठराव पास करील असा अंदाज आहे. कौन्सिलवाला पक्ष व कॉंग्रेसचा पक्ष अशी फूट झाल्यानें कार्याची हानि झाली आहे.पण अपरिहार्य अडचणींना उगीच कुरवाळीत बसण्यात काही अर्थ नसतो, हें ध्यानात ठेवूनच राष्ट्रीय सभेच्या कैवाऱ्यानी आपल्या कार्यास पुढें लागणें जरूर आहे. राष्ट्रात अशा प्रकारची फूट असताहि आपल्या संस्था मजबूत करण्यास लागणारा पैसा व निरुत्साह न होण्याइतके स्वयंसेवक राष्ट्रीय सभेला मिळत आहेत. कोणत्याहि ठिकाणीं राष्ट्रकार्यासाठी तुरुंगात जाण्याची योग्य संधी मिळाली असता स्वयंसेवकाची वाण पडत नाही, असा अनुभव मध्यप्रांतातील राष्ट्रीय निशाणाच्या झगड्यानें आणून दिला आहे. खुद्द नागपूर शहरात राष्ट्रीय निशाणाच्या अब्रूसाठी रोज दहा पंधरा स्वयंसेवक तुरुंगात जात आहेत, आणि सांप्रतचा नागपूरचा उत्साह येवढा जबरदस्त आहे कीं, राष्ट्रीय निशाणाच्या झगड्याचें काम दोन तीन महिने एकसारखें चालविलें तरी स्वयंसेवकाची वाण पडेल असे कोणासच वाटत नाही. मध्यप्रांत व नागपूर म्हणजे कौन्सिलवाल्या पक्षाचें माहेरघर, असे असताहि तेथें मोठ्या उत्साहानें तुरुंगात जाण्यास स्वयंसेवक पुढें येत असतात, यावरून काय सिद्ध होतें ? स्वार्थत्याग करण्यास व आत्मक्लेश सोसण्यास लोक तयार आहेत असें सिद्ध होत नाहीं काय ? कौन्सिलवाल्या पक्षाची जर आज फूट नसती तर पंजाबात हिंदु-मुसलमानांची बेकी दृष्टीस पडली नसती, असे उद्गार देशबंधु दास यानीं स्वतःच काढले

आहेत. कौन्सिलमध्ये शिरण्याचें नेमस्ताचें ध्येय राष्ट्रीय सभेंतील कौन्सिलवाल्या पक्षानें आपल्यापुढें ठेवल्यामुळें राजाश्रयासंबंधींच्या बारीक सारीक गोष्टींना राष्ट्रीय महत्व येतें आणि हिंदु, मुसलमान, खिश्चन, ब्राम्हण, लिंगायत, ब्राम्हणेतर, अस्पृश्य असल्या तंटयाच्या बाबी वर डोके काढूं लागतात. ह्या तटयाच्या बाबीहूनहि अधिक श्रेष्ठ असलेले आणि राजाश्रयाशीं यत्किंचितहि संबंध नसलेलें ध्येय ज्या वेळीं राष्ट्रापुढे जोराने मांडलें जाते आणि त्याच ध्येयाकडे राष्ट्रातील कर्त्या, तेजस्वी, व विद्वान पुरुषाचीं अंतःकरणें एकसारखीं लागून राहतात, त्या वेळी राजाश्रयाचा भपका फिका पडतो; आणि धार्मिक किंवा जातिविषयक भेदांना कसें कह्यात ठेवावयाचें ह्याचा धडा राष्ट्र शिकत असतें. लगामाच्या इषाऱ्याप्रमाणें चालण्याचे शिक्षण घोडयाना जे मिळतें ते सारथी आपल्या स्थानावर बसला असतानाच मिळतें सारथी जाग्यावर बसला नाहीं, रथ कोठे न्यावयाचा हे सारथ्याने ठरविलें नाहीं, आणि अशा स्थितीत जर घोडे चालू लागले तर ते आपापल्या घरकुल्याकडे किंवा तबेल्याकडेच जाणार हे उघड आहे. लगाम नुसता तोंडात धरून कह्यात वागण्याचें शिक्षण घोडे आपण होऊन कधीच शिकत नसतात. राष्ट्रामध्ये मोठया राष्ट्रीय ध्येयाची चळवळ जर एकसारखी चाललेली नसेल, त्या ध्येयाकरिता राष्ट्रीय पुढारी एकसारखे क्लेश जर सोशीत नसतील, तर राष्ट्राचे अवयव व राष्ट्राची इंद्रिये विस्कळित होऊन प्रत्येकजण आपापल्या प्रवृत्तीप्रमाणेंच धडपड करू लागतो आणि राष्ट्राच्या संघटित कार्याचा अखेर नाश होतो. कौन्सिलवाल्या पक्षाच्या फुटीमुळे असा नाश होण्यास सुरवात झालेली आहे. यावेळीं राष्ट्रीय सभेच्या कैवाऱ्यानीं आपलें आत्मयज्ञाचें ध्येय एकसारखें राष्ट्राच्या डोळ्यापुढे कायम राहील असा उद्योग जोराने करणें जरुरीचें आहे. श्री. राजगोपाळाचार्य यानीं देखील प्रत्येक व्यक्तीनें व प्रत्येक कॉंग्रेस कमिटीनें आपापल्या दृष्टीनें

आत्मयज्ञ सुरू करून त्या आत्मयज्ञाच्या जोरावर राष्ट्राला एकीचें वळण लावलें पाहिजे, आणि राष्ट्राची झगडण्याची शक्ति रोजच्या रोज वाढवीत गेलें पाहिजे, असे धोरण लोकापुढे माडलें आहे. मवाळ कौन्सिलात जातात, त्या प्रमाणें पुण्याचा रा. केळकराचा पक्षहि कौन्सिलात जाईल, त्या बद्दल विषद मानण्याचे कारण नाही. कौन्सिलाचा उपयोग कितपत आहे, आणि कौन्सिलाना अधिकार काय आहे, याबद्दल सर्वांचे डोळे मिठावरील कराच्या प्रसंगाने आता उघडले आहेत. हिंदुस्थानातील नोकरशाहीच्या प्रचड लष्करी शक्तींशी झगडताना या कौन्सिलाचा उपयोग होण्यासारखा नाही हे आता सिद्ध झालें आहे. हिंदुस्थानचें राष्ट्रीय लष्कर निर्माण करण्याचे कामी सरकारी उपायाचा उपयोग ज्या प्रमाणें २५ वर्षांनीं सहा पथके पूर्ण हिंदी करण्यापुरताच होणार आहे, त्याप्रमाणें स्वराज्याच्या स्थापनेसहि कौन्सिलाचा उपयोग यथातथाच होणार आहे ह्या मार्गानें गेल्यास महात्मा गाधी यानी पूर्वी एकदा म्हटल्याप्रमाणें स्वराज्यप्राप्तीस शभर वर्षाहून एकहि दिवस कमी लागणार नाहीं. या काळात शाहाणे लोक कौन्सिलात गेले काय, कर्ते लोक कौन्सिलात गेले काय, किंवा नुसते मवाळ आणि बगलबच्चे कौन्सिलात गेले काय, स्वराज्यप्राप्तीच्या दृष्टीनें काहींच फरक होणार नाहीं. तेव्हा असात्र फसव्या कौन्सिलाचा नाद राष्ट्राला जितका कमी लागेल आणि या मोहापासून राष्ट्र जितकें अलिप्त राहील तितके आज राष्ट्राचें कल्याण होणार आहे. कौन्सिलच्या नादीं लागूं नका, कौन्सिलच्या पूर्वतयारींत भाग घेऊ नका, आणि कोणताहि उमेदवार उभा राहिला तरि मतें देण्यास जाऊं नका, असा उपदेश लोकाना करीत राहणें हेंच राष्ट्रीय सभेच्या कैवाऱ्याचें एक पवित्र काम आहे. मिठावरील कराच्या वादविवादानें कॉंग्रेसच्या पक्षाचें हें काम सोपें झालें आहे, आणि निवडणुकीची तयारी चालली असता राष्ट्रास योग्य

दिशा दाखविण्यांत राष्ट्रीय सभेनें आळस करता कामा नये, असें श्री. राजगोपाळाचार्य याचें म्हणणे आहे. फोल ठरलेल्या कौन्सिलाच्या निवडणुकीच्या धडपडींत राष्ट्राचें कर्तृत्व गुतून न रहावे अशी खबरदारी घ्यावयाची असल्यास, मध्यप्रातातील जबलपूर व नागपूर येथील लोक राष्ट्रीय निशाणाच्या अब्रूकरिता आत्मयज्ञाचा जो धडा सर्व राष्ट्राला घालून देत आहेत, त्या धड्याचें अनुकरण करण्यास ह्या वेळीं सर्व प्रातांनीं झटलें पाहिजे. राष्ट्राचें पाऊल याच मार्गानें पुढें पडणार आहे. कौन्सिलच्या मार्गाने गेलें असता राजाश्रयासंबधानें राष्ट्रात दुही माजल्यावांचून राहणार नाहीं, आणि कौन्सिलात अखेर हातीं काहीं न लागता दुही माजविण्याचें पाप मात्र पदरीं पडणार आहे. ध्येय फोल, मोह दुहीचा, आणि मार्ग स्वास्थ्याचा; अशी कौन्सिलवाल्या पक्षाची स्थिति आहे. ध्येय भरीव, आवड एकीची आणि उद्योग आत्मयज्ञाचा, अशी राष्ट्रीय सभेची शिकवणूक आहे. या दुसऱ्या शिकवणुकी अगिकार न करण्याइतके राष्ट्र नाउमेद झालेले नाहीं, असे नागपूरच्या राष्ट्रीय निशाणाच्या झगड्यावरून सिद्ध होत आहे. यावेळीं सर्व लोकानीं नागपुरास शक्य ती मदत केली आणि आपापल्या प्रातात दोन तीन आठवडे कसून खटपट केली, तर ता. २५ मे रोजीं मुबईस ऑल इडिया कॉंग्रेस कमिटी भरली असता राष्ट्रात नवा जोम उत्पन्न करण्यास ऑल इडिया कॉंग्रेस कमिटी समर्थ होईल, यात संशय नाहीं.

---

# * कौन्सिलांवर बहिष्कार कां घातला ?



अमृतसरच्या कॉंग्रेसच्या वेळीं कौन्सिलात शिरून कौन्सिलाचा उपयोग करून घेण्याचा ठराव पास झाला असताना, कलकत्त्याच्या स्पेशल कॉंग्रेस-मध्ये व त्यानतरच्या कॉंग्रेसच्या तीन बैठकींमध्ये तीन वर्षे कॉंग्रेसनें बहिष्काराचा ठराव पास केला. आता हा ठराव अधात्री ठेवण्याची सूचना-पुढे येत आहे. कौन्सिलवर बहिष्कार ज्या कारणाकरिता घालण्यात आला तीं कारणें नष्ट झालीं आहेत का ? पंजाब प्रकरण, स्वराज्य व खिलापत या तीन प्रसगीं नोकरशाहीच्या धोरणाचा जो अनुभव आला, त्या अनुभवामुळे कौन्सिलवरील बहिष्काराचा मार्ग राष्ट्राच्या कल्याणाचा आहे असे कॉंग्रेसने ठरविलें. नोकरशाहीं बेताल वागते आणि या बेताल वागण्यास आळा घालण्याचें सामर्थ्य कौन्सिलाच्या अगी नसल्यामुळें तेथें काम करून व्यर्थ वेळ दवडण्यापेक्षा ज्या योगाने नोकरशाहीस आळा बसूं शकेल असलें सामर्थ्य स्वार्थत्यागाच्या जोरावर राष्ट्रात उत्पन्न करण्याची चळवळ करता यावी, हें ध्येय पुढे ठेवून कौन्सिलांवर बहिष्कार घालण्यांत आला त्यानतरच्या तीन वर्षांचा अनुभव आज राष्ट्रापुढे आहे. बहिष्कार घालूं नका, म्हणून म्हणणारा पक्ष राष्ट्रीय सभेंत त्यावेळीं लहान सहान नव्हता. ना. शास्त्री, ना. चिंतामणी, सुरेंद्रबाबू, ना. जिना वगैरे राष्ट्रीय सभेचे कट्टे अभिमानी या कौन्सिलवरील बहिष्कारामुळें राष्ट्रीय सभेला त्यावेळीं सोडून गेले. कौन्सिलात शिरून नोकरशाहीच्या नाकात आपण वेसण घालूं व स्वराज्याच्या प्राप्तीला कौन्सिलांचा मार्ग हाच खरा मार्ग आहे असें दाखवूं हें त्यावेळीं त्याचें म्हणणें होतें व त्या म्हणण्यास अनुसरून हे पुढारी

---

* नवाकाळ' ता. १७ मे १९२३

कौन्सिलात गेलेहि. तीन वर्षांत काय अनुभव आला? जुनीं कौन्सिलें व नवीं कौन्सिलें यात सत्तेच्या दृष्टीनें फारसा फरक नाहीं, असाच अनुभव आला. लाटसाहेबाचा सर्टिफिकेटाचा अधिकार म्हणजे पूर्वीची अरेरावी सत्ताच होय. या अरेरावी सत्तेला कह्यात ठेवण्याचा अधिकार पूर्वीप्रमाणेंच लंडनच्या पार्लमेंटाच्या हातात जसाच्या तसा कायम आहे. हिंदुस्थानांतील कौन्सिलकडे या अधिकाराचा भाग देण्यात आलेला नाहीं. म्हणजे खऱ्या सत्तेचीं वाटणी झालेली नाहीं. राजसत्तेंत हिंदुस्थानाला भागीदार म्हणून घेतलेलें नाहीं. मिठावरील कराच्या वादविवादानें ही गोष्ट आतां सिद्ध झालेली आहे. नवीनपणामुळें अमृतसरच्या वेळीं नव्या कायदेकौन्सिलात जो किंचित् मोहकपणा दिसत होता तो मोहकपणा भ्रामक आहे असे आता सिद्ध झालें आहे. हा भ्रम दूर झाल्यानतर कौन्सिलात शिरण्याचा कौन्सिलवाल्या पक्षाचा हट्ट का? या प्रश्नाचें उत्तर कौन्सिलवाला पक्ष असें देतो कीं, कौंसिलवर बहिष्कार घालून बाहेर स्वार्थत्यागाची चळवळ करून नोकरशाहीचें धोरण बदलूं म्हणून जी अपेक्षा धरण्यात आली होती ती सफल झालेली नाहीं, तेव्हा आत्मक्लेशास कटाळून आम्ही कौन्सिलात शिरून कौन्सिलच्या कामकाजाच्या पद्धतीच्या गाड्याला खीळ घालून काहीं निष्पन्न होतें किंवा कसे हें पाहणार आहोंत. आत्मक्लेशाच्या चळवळीला कटाळलों आहों, तेव्हा कमी दगदगीच्या या मार्गानें तरी आम्हीं उद्योग का करूं नये? कटाळ्यामुळे म्हणा, किंवा तितकी श्रद्धा अगीं नसल्यामुळे म्हणा, ज्याना दगदगीचा मार्ग नको आहे त्यानीं खुशाल आरामाच्या मार्गानें जावें. पण राष्ट्राच्या कल्याणाचाच हा आरामाचा मार्ग आहे अशीं विधानें करून लोकांचा बुद्धिभेद करू नये. आरामाची लालूच स्वयसिद्ध आहे. ह्या लालुचीला बळी पडूं नका म्हणून कोणी कितीहि सागितलें तरी ज्यांना दगदग सोसत नाहीं, ते आरामाचा मार्ग स्वीकारणार. पण हा आरामचा मार्ग

म्हणजेच सत्पक्ष होय, अशी दिशाभूल करणें प्रामाणिकपणाचें लक्षण नव्हे. आरामाच्या कौन्सिलाच्या मार्गानें जाऊन नेमस्तापेक्षां तुम्ही अधिक काय करणार ? बऱ्या वाईट सर्व गोष्टींना अडथळा करून कौन्सिलच्या गाड्याला खीळ घालणार, असें गयेच्या कॉंग्रेसच्या पूर्वी कौन्सिलवाल्या पक्षानें आपलें ध्येय जाहीर केलें. पण गेल्या चार पांच महिन्यांत हें ध्येय देखील टिकलेलें नाहीं. देशबंधू दास या ध्येयावर आता जोर देत नाहींत. देशबंधु दास यांचें ध्येय व विझ्लाटब्राईचें ध्येय आता जवळ जवळ आलें आहे. प्रतियोगी सहकारिता, प्रतियोगी असहकारिता किंवा कौन्सिलें मोडणें अशा प्रकारचें वर्णन आपल्या ध्येयासंबंधानें कौन्सिलवाल्या पक्षानें केलें आहे. या पक्षाचे मुंबईचे अध्वर्यू मि. नटराजन हे आहेत. कौन्सिलें मोडण्याचें ध्येय याना बिलकूल पसत नाहीं. कौन्सिलात अडथळा आणून कौन्सिलाच्या गाड्याला खीळ घालण्यांत अर्थ नाहीं, तर उलट कौन्सिलांचा जितका उपयोग करून घेता येईल तितका करावा, अशा प्रकारचा ताजा उपदेश इंडियन सोशल रिफार्मरमध्यें मि. नटराजन यानीं कौन्सिलवाल्या पक्षाच्या अनुयायांना केला आहे. केळकर खीळ घालतों म्हणून धाक घालणार, जरा थावा म्हणून जयकर म्हणणार, आणि पटेल साहेबानीं खीळ घातलीच तर नटराजन ती काढून टाकणार, अशी चौघाची चार दिशेला चार तोंडे कौन्सिलवाल्या पक्षाचीं झालीं आहेत. असला हा पक्ष कौन्सिलांत करणार तरी काय ! मिठावरील करासंबंधानें जसे आज काहीं सभासदानीं राजीनामे दिले आहेत, व जसे काहीं सभासद लाटसाहेबाच्या सूचना हाणून पाडण्याकरितां अस्तन्या सारीत आहेत, त्याप्रमाणें वागण्यापलीकडे कौंसिलवाल्या पक्षाच्या हातून काहीं होईल असें कोणी म्हणत नाहीं. मग कौन्सिलवाल्या पक्षाचें कौन्सिलात शिरण्याचें कारण कोणतें शिल्लक राहिलें ? नोकरशाहीला वेसण घालण्याचें धोरण जर कौन्सिलात साधण्यासारखें नाहीं तर कौन्सिलांत

जा कशाला ? इतर चळवळींतील दगदग सोसवत नाहीं तेव्हा आरामाच्या मार्गानें आपणांस जाऊं द्या, या पलिकडे कौन्सिलवाल्या पक्षाच्या चळवळींत कांहीं तथ्यांशच रहात नाहीं. दगदगीची चळवळ निर्फळ झाली आहे तेव्हा थोडा वेळ विसावा घेण्यास कोणती हरकत ? विसावा घ्यावयाचा असेल तर कार्यहानि जेथें बसण्यानें होते तेथें बसून विसावा घेणें चांगलें नाहीं. विसावा घेण्याकरिता किंवा झोप घेण्याकरिता उद्योगाच्या मार्गांत हातपाय पसरणें शहाणपणाचें नव्हे. विसावा घ्यावयाचा तर सरळ विसावा घ्या ! इतराच्या मार्गांत आडवे पडूं नका. इतराचा मार्ग दगदगीचा व आत्मक्लेशाचा आहे, खाच खळग्यानीं भरलेला आहे. ठेंचा खातखात हा मार्ग धोपट मार्ग बनावयाचा आहे. नोकरशाहीचे दगड मार्गांत ठिकठिकाणीं आहेत. या फत्तरावर आपटल्यामुळें कित्येकाचें हातपाय मोडले आहेत, तर कित्येकाचें मस्तक रक्तबबाळ झाले आहे. अशा प्रकारच्या हालअपेष्टा जाणून बुजून सोसून जे स्वार्थत्यागी लोक अंधारात राष्ट्राचा नवा मार्ग साफसूफ करीत आहेत, त्याच्याच मार्गांत आरामासाठीं बडया धेडानीं हातपाय पसरून पडावें, व आमच्या ठेंचाहि तुम्हाला लागून आणखी हातपाय मोडले तरी हरकत नाहीं असा धाक घालण्यास प्रवृत्त व्हावे, हें आरामाच्या लालुचीनें मूढ बनण्याचें लक्षण होय ! असहकारितेचा मार्ग धोक्याचा आहे. ह्या मार्गांत कोणास आराम मिळावयाचा नाहीं. दुःख व कष्ट सोसणे हेंच या मार्गांतील जीवित होय ! केवळ श्रद्धेमुळें असला दुःखाचा मार्ग राष्ट्रातील कर्ते पुरुष पत्करीत असतात, श्रद्धेमुळे असल्या दुःखात सुख उत्पन्न होतें, आणि श्रद्धेच्या जोरावरच या दिशेनें जाणाऱ्या मार्गाचा टिकाव लागून अखेर यश येतें. ही श्रद्धा टळमळीत होण्याइतकें गेल्या तीन वर्षांत काहीं झालें आहे काय ? खिलाफतच्या प्रश्नाकडे जर पाहिलें तर काय दिसून येतें ? अलीबंधु व महात्मा गांधी यानीं श्रद्धेनें ही चळवळ सुरू केली

नसती तर गेल्या वर्षी ग्रीसला बेशरमपणानें उघड उघड मदत करण्यास इंग्लंड पुढें सरसावलें नसतें का ? लॉर्ड कर्झन ह्याच्या धोरणास एक प्रकारचा आळा खिलाफतच्या चळवळीनें घातला आहे. अकालींच्या चळवळीला यश आलें ते कशामुळें ? असहकारितेच्या कायदेभंगाच्या चळवळीमुळेंच ना ? ज्या नागपूर प्रातात आपखुशीने तुरुगात जाण्यास पाच दहा म्हणजे हाताच्या बोटावर मोजण्याइतकी मंडळी मिळणे मुष्कीळ होतें, तेथे तुरुंगांत जाणाराचीं सख्या शेकड्यानीं मोजण्याइतका उत्साह असहकारितेनें उत्पन्न केलेला नाही काय ? हिंदुस्थानचे नवे सेक्रेटरी लॉर्ड पील किंवा अडर सेक्रेटरी अर्ल विंटरटन हे हिंदुस्थानची नाडी पाहून हिंदुस्थानची प्रकृति पार्लमेंट सभेला कळवितांना असहकारितेच्या चळवळीचा इतका जोर कमी झाला किंवा वाढला असा हिशोब नेहमीं देत असतात. कौन्सिलवाला पक्ष उत्पन्न झाला आहे हें आपल्या पथ्यावरचेंच आहे असे स्टेट सेक्रेटरी साहेबांना वाटतें. ह्यावरून नोकरशाहीला वेसण घालणारा कोणता पक्ष असेल तर तो असहकारवाद्याचाच होय, अशी प्रतिपक्षानें कबुली दिली आहे हें सिद्ध होत नाहीं काय ? पडित मोतीलाल नेहरू यानीं परवा असे उद्गार काढले आहेत कीं, जर सयुक्त प्रातातील पुढाऱ्यानीं त्याना शिक्षा झाल्या होत्या या सबबीवर कायदे कौन्सिलाना उमेदवार म्हणून उभे राहण्यास मनाई करण्यात आली तर असहकारितेच्या इतर मार्गांत पडून नोकरशाहीची खोड मोडण्यास पडितजी व त्याचे अनुयायी कमी करणार नाहींत. पडितजींनीं घातलेल्या या धाकाचा अर्थ काय ? शाततेच्या कायदेभंगाच्या चळवळीला आज नाहीं उद्या यश आलेंच पाहिजे, आणि नोकरशाहीच्या नाकात वेसण घातली गेलीच पाहिजे, अशा तऱ्हेचा विश्वास ह्या धाकाच्या बुडाशीं नाहीं काय ? रत्नागिरीस कौन्सिलवाल्याचें सम्मेलन झालें, त्या सम्मेलनातहि मुळशी सत्याग्रहास मदत करून स्वयंसेवकांनीं

तुरुंगांत जावें असा ठराव पास झाला. राष्ट्राला तुरुंगाच्या खड्ड्यांत पाडूं नका म्हणून उपदेश करणारांनीं हा ठराव पास कसा होऊं दिला? कायदेभंगाच्या चळवळीवर अंतःकरणाच्या उमाळ्यात विश्वास आहे, पण आरामाच्या लालुचीमुळें कौन्सिलात शिरावेंसें वाटतें, असा दोन मताचा झगडा रत्नागिरीच्या ठरावांत किंवा पंडितजींच्या उद्गारांत दिसून येत नाहीं काय? लाहोरचें ट्रिब्यून पत्र कौन्सिलवाल्या पक्षाचें आहे; पण या पत्रानें देखील नागपूरच्या व मुळशीच्या सत्याग्रहाची पाठ थोपटण्यास कमी केलेलें नाहीं. ह्यावरून असें सिद्ध होतें कीं, महात्मा गांधी यांचा आत्मयज्ञाचा मार्ग संकटाचा जरी असला तरी खरा मार्ग व सत्पक्ष या नात्यानें त्या मार्गाची बरोबरी सांप्रतच्या राजकीय परिस्थीतींत दुसरा कोणताहि मार्ग करू शकणार नाहीं. सर्व मार्गांची तुलना करतां असहकारितेच्या मार्गाचें वजन सर्वांत अधिक भरतें. मग निवडणुकीच्या वेळीं आपल्या बहिष्काराचीं तत्त्वें लोकांच्या मनावर बिंबविण्याकरतां राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांनीं चळवळ करू नये, असा उलट हट्ट धरण्यास कौन्सिलवाल्या पक्षास कोणता अधिकार पोंचतो?



# * कौन्सिलांच्यां बहिष्काराची चळवळ बंद ठेवण्याचा ठराव



ऑल इडिया कॉंग्रेस कमिटीच्या शनिवार सकाळच्या बैठकींत शुक्रवारचा वादविवाद पुढे चालविण्यांत आला, आणि सकाळीं ८॥ वाजता सुरू झालेला वादविवाद १॥ वाजण्याचे सुमारास संपून २ वाजतां मतें घेण्यांत येऊन कौन्सिलाच्या बहिष्काराची चळवळ बंद ठेवण्याचा ठराव ९६ मतें अनुकूल पडून पास झाला. या ठरावास ७१ मतें विरुद्ध पडली, व १०–१२ असामीनीं मते दिलीं नाहींत. चळवळ बंद ठेवण्याचा ठराव संयुक्त प्रातातर्फे श्री. पुरुषोत्तमदास टंडन यानीं पुढे आणलेला होता व या मताचें समर्थन श्री. टंडन व पंडित जवाहिरलाल नेहरू यानीं केलें होतें. हे दोघेहि पूर्ण असहकारवादी असून कॉंग्रेसच्या इतर कामकाजास साप्रतच्या दुहीमुळें फार हरकत येते तेव्हा कौन्सिलवाल्या पक्षाशीं तेढ उत्पन्न होऊ नये म्हणून बहिष्काराची चळवळ बंद ठेवावी, असे या दोघाचें मत पडलें. बहिष्काराची चळवळ बद ठेवणे म्हणजे गयेच्या कॉंग्रेसचा बहिष्काराचा ठराव अजिबात न मानणें नव्हें; मतदारानीं मतें देऊं नयेत, आणि उमेदवार उभे राहू नयेत असा गयेच्या कॉंग्रेसचा ठराव आहे. मते देऊ नयेत हें तत्व कायम आहे मात्र मतदारानीं मतें देऊ नयेत किंवा उमेदवार म्हणून उभे राहू नये म्हणून कॉंग्रेसतर्फे जी चळवळ करावयाची ती चळवळ तेवढी बंद ठेवावी, असा ऑल इडिया कॉंग्रेस कमेटीने कालच्या आपल्या बैठकींत बहुमतानें ठराव पास केला. बहिष्काराचा सबंध ठराव अधांत्री ठेवण्यांत आला नाहीं हे खरें आहे, तथापि या ठरावाला अनुसरून जी चळवळ करावयाची

* नवाकाळ, ता. २७ मे १९२३

ती करू नये असा ठराव ऑल इंडियानें केल्यामुळें कौन्सिलवाल्या पक्षाचा कालच्या ऑल इडिया कॉंग्रेस कमिटीत एक तऱ्हेचा विजय झाला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. कौन्सिलवाल्या पक्षाचीं अधिक मतें पडलीं तीं पंजाब, दिल्ली, सयुक्तप्रात, व बगाल येथून पडलीं. बिहार प्राताशिवाय उत्तर हिंदुस्थानातील बगालसकट सर्व प्रातातील प्रतिनिधि कौन्सिलचा बहिष्कार अधात्री ठेवण्यास तयार होते. बगाल्यात या बाबीसबधानें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभासदात दोन्ही बाजूचे सभासद सामान्यतः सारखे आहेत. पण देशबंधु दास याचें अनुयायी सर्वच आले होते व बाबू शामसुंदर चक्रवर्ती याचे अनुयायी थोडे आले होते. सयुक्त प्राताचा मुख्य भरणा पंडित पुरुषोत्तमदास टंडन याच्याच बाजूचा होता, विरुद्ध असलेले दोन तीनच सभासद होते. नागपूर, वऱ्हाड व महाराष्ट्र याची स्थिति गयेच्या कॉंग्रेसचे सब्जेक्ट कमिटीसारखीच होती. गुजराथ, मुंबई कर्नाटक व मद्रास इलाखा येथील प्रतिनिधींत बहुमत बहिष्कारास अधात्री ठेवण्याच्या ठरावाविरुद्ध होतें. देवी सरोजिनी नायडू आणि टी. प्रकाशम् याच्या दर्जाचे पुढारी अधात्री ठेवण्याच्या बाजूला गेल्यामुळें दक्षिण हिंदुस्थानातीलहि काहीं प्रतिनिधि गयेच्या वेळच्या स्थितींतून फुटले. डॉ. अन्सारी याचीं मतें बदललेलीं नाहींत आणि बहिष्काराची चळवळ करणें उचित आहे असेहि त्याना वाटतें. पण हिंदु-मुसलमानाची बेकी होऊन ती बेकी हटविण्याचें सामर्थ्य कॉंग्रेसमधील दुहीमुळे कॉंग्रेसच्या हातून निघून जात आहे, आणि हें सामर्थ्य गमावण्यापेक्षा बहिष्काराची चळवळ करून उत्पन्न होणारें सामर्थ्य गमावलें तरी पत्करलें, असे डॉ. अनसारी याचें मत पडलें आणि याच मताचा अनुवाद देवी सरोजिनी नायडू यानीं केला. हिंदुमुसलमानाच्या बेकीसंबंधाच्या वरील विचारास डॉ. अन्सारी व देवी सरोजिनी नायडू यानीं वरील प्रकारें उचलून धरल्याकारणाने मुसलमानाच्या वतीनें वजन कौन्सिलवाल्याच्याच

पारड्यात पडलें, आणि कालच्या ऑल इंडिया काँग्रेस कमिटीमध्ये २४ चें मताधिक्य त्याना मिळालें. कालच्या बैठकींत मि. जॉर्ज जोसेफ, रा. अणे, रा. केळकर, श्री. पुरुषोत्तमदास, डॉ. अनसारी, श्री. वल्लभभाई पटेल, श्री. पट्टाभि सीतारामय्या, बाबू घोष, बाबू राजेंद्रप्रसाद, श्री. राजगोपाळाचारियर, टी. प्रकाशम्, देवी सरोजिनी नायडू, शेवटी अध्यक्ष देशबंधु दास यांची आपापल्या पक्षातर्फे भाषणे झालीं. जादा कॉंग्रेस भरवून राजकीय परिस्थितीचा विचार करण्यास कौन्सिवाला पक्ष बिलकूल तयार न झाल्यामुळें जादा कॉंग्रेसचा प्रश्न वादविवादात सामान्यतः मागेच पडल्यासारखा होता. हिंदुमुसलमानाची एकी आणि कौन्सिलवाला पक्ष व काँग्रेस पक्ष यांच्यातील तेढ मिटविणें, हे दोन मुद्दे वादविवादाकरितां पुढे आलेले होतें. याशिवाय महात्मा गाधी याच्या असहकारितेची चळवळ निरुपयोगी झाली किंवा कसें हाहि मुद्दा प्राधान्येकरून पुढे आणण्यात येत होता. रा. अभ्यंकर, रा. केळकर वगैरे मडळींच्यातर्फे असहकारितेची चळवळ फोल झाली आहे, असे सागण्यात आलें. रा. केळकर, रा. अभ्यकर यानीं या चळवळीसबंधानें शक्य तेवढे बोलून टाकलें. शाळा व कोर्टें याच्यासबधाने बहिष्काराची चळवळ जशी अस्तास गेली आहे, तशी कौन्सिलाच्या सबधानें देखील चळवळ अस्तास जाणार, असें रा. केळकर यानीं आपलें ठाम मत दिलें. मि. जोसेफ यानीं असहकारितेच्या चळवळीस उचलून धरताना साप्रत या चळवळीत जोम कमी दिसत आहे, त्याचें कारण वर्किंग कमिटींतील असहकारितेच्या चळवळीच्या पुरस्कर्त्यांची भीतभीत काम करण्याची पद्धत होती, असें आपलें स्पष्ट मत दिलें. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें कौन्सिलवरील बहिष्काराची चळवळ बंद ठेवल्यानें दोन्ही पक्षाची तेढ नाहीशी होणे शक्य नाहीं, हाहि मुद्दा ऑल इडिया काँग्रेस कमिटीपुढे माडण्यांत आला. प्रामाणिक मतभेदामुळे दोन पक्षाची चळवळ निरनिराळ्या स्वरूपाची

होणार आणि तेवढयापुरता दुजाभाव दिसून येणारच. भिन्न मतें प्रदर्शित करीत असताना, किंवा त्या मताना अनुसरून चळवळ करीत असताना एकमेकाचीं मने विनाकारण दुखवूं नयेत असें श्री. राजगोपाळाचारीयर याचें म्हणणें पडले, तेढ नाहीशीं करण्याकरिता मनामध्ये दुष्टभाव ठेवूं नये म्हणजे झाले. पण यापलीकडे जाऊन आपली चळवळ बद ठेवणे प्रामाणिकपणाचे नव्हे. अशा रीतीने चळवळ बद ठेवणे म्हणजे विरुद्ध पक्षाच्या चळवळीकडे एक प्रकारे कानाडोळा करणे होय. असा कानाडोळा करण्यापासून कोणत्याच पक्षास खरा फायदा होत नाही. ऑल इडिया कॉंग्रेस कमिटींत चळवळ बद ठेवण्याचा ठराव केला तरी हा ठराव कोणत्या पक्षाच्या हिताकरिता अंमलात आणावयाचा हे पहावयास नको काय? कौन्सिलवाल्या पक्षाच्या हिताकरिता अमलात आणावयाचा, म्हणजे असहकारवाद्यानीं आपलीं मते निष्कारण सोडून देणे होय. शिवाय जो कौन्लिलवाला पक्ष गयेच्या कॉंग्रेसचा ठराव धाब्यावर ठेवण्यास तयार झाला आहे, त्याच कौन्सिलवाल्याकरिता तुम्हीं आपली चळवळ बंद ठेवा म्हणून ऑल इडिया कॉंग्रेस कमिटीनें जो ठराव केला आहे त्या ठरावाची अंमलबजावणी कॉंग्रेसच्या अनुयायानीं तरी का करावी? कॉंग्रेसच्या ठरावाकडे दुर्लक्ष करण्यास आज ऑल इडिया कॉंग्रेस कमेटीने सागितलें आहे. कॉंग्रेसचे अनुयायी असे म्हणणार की, ऑल इडिया कॉंग्रेस कमिटीचा हा ठराव न मानता गयेच्या कॉंग्रेसचा ठरावच का मानूं नये? श्री. वल्लभभाई पटेल वगैरे मडळींनीं ऑल इडिया कॉंग्रेस कमिटीमध्ये अधात्री ठेवण्याच्या या ठरावाची अम्मलबजावणी होणार नाहीं, असे ऑल इडिया कॉंग्रेस कमिटीस कळविण्यास कमी केलें नाहीं. वर्किंग कमिटींतील असहकारवाद्याचे आजचे पुरस्कर्ते श्री. राजगोपाळचारियर, श्री. वल्लभभाई पटेल, दे. गगाधरराव देशपाडे, बाबू राजेंद्रप्रसाद, बाबू ब्रजकिशोर प्रसाद, शेठ जम्नालाल बजाज

वगैरे मंडळी बहिष्काराची चळवळ अधात्री न ठेवता, कौन्सिलवरील बहिष्काराची चळवळ जोरानें चालविण्याचा निश्चय करण्याचा संभव असल्याबद्दल ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीत पर्यायानें सांगण्यात आलें. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें जरी हा ठराव पास केला तरी कौन्सिलवरील बहिष्काराची चळवळ निरनिराळ्या प्रांतांत चालू ठेवण्यास या ठरावामुळें कोणतीच हरकत येणारी नाही. पंजाब, दिल्ली व संयुक्त प्रांत ह्या प्रांतांत मात्र कौन्सिलवरील बहिष्काराची चळवळ जोरानें होणार नाहीं. तेथील पुढाऱ्यांत प्रमुख असलेले लोक कौन्सिलवाले बनले आहेत. डॉ. अन्सारी, श्री. सतानम् वगैरे असहकारितावादी पंजाब–दिल्लीचे पुढारी अधात्री पक्षाचे झाले आहेत. कौन्सिलाविरुद्ध बहिष्काराची चळवळ जोरानें करण्यास लायक असलेला पुढारी पंजाब, दिल्ली व संयुक्तप्रांत येथे उरलेला नाही. पंडित पुरुषोत्तमदास टंडन व पंडित जवाहरलाल नेहरू हे असहकारवादी असले तरी अधात्री पक्षाचे झाले आहेत. तेव्हा पंजाब, दिल्ली, व संयुक्तप्रांत येथें लायक पुढाऱ्यांच्या अभावामुळे अधात्री ठरावाची अमलबजावणी बऱ्या रीतीनें होईल हे खरे आहे. इतर प्रांतात या ठरावाची अंमलबजावणी होईल, असे आम्हास वाटत नाहीं, उलट या ठरावामुळें कौन्सिलवरील बहिष्काराचे चळवळीस अधिक जोर येण्याचा संभव आहे. बहार प्रांतात या ठरावाचा काहीं उपयोग नाही, उलट या ठरावामुळे तेढ मात्र अधिक वाढत जाणार आहे. बंगाल्यात तेढ मिटविण्यास या ठरावापासून काहीं फायदा होणार नाहीं. बाबू शामसुंदर चक्रवर्ती यानीं बारिसाल येथें प्रांतिक कॉंग्रेस कमिटीमध्यें कॉंग्रेसच्या इतर संस्थाना कॉंग्रेसविरुद्ध जाण्याचा अधिकार नाहीं असें आपलें स्पष्ट मत दिलें असल्यामुळें बंगालच्या दृष्टीनें विचार करताना कालच्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीमध्यें झालेला ठराव पोकळ मानला पाहिजे. कालच्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटींत बारिसालचा वादविवाद

दोन तीन वेळ निघाला होता. पण देशबंधु दास यांनीं अध्यक्ष या नात्यानें या वादविवादास दाबूनच टाकलें. कौन्सिलवाला पक्ष हा बंडखोर पक्ष आहे, असें मि. जॉर्ज जोसेफ यांनीं स्पष्ट सांगितलें. या बंडखोर पक्षास मदत देऊं नये म्हणून व कॉंग्रेससंबंधाचें आपलें कर्तव्यकर्म नीट रीतीनें पार पडून देशसेवा घडावी, म्हणून ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या कालच्या ठरावासंबंधानें कॉंग्रेसच्या पक्षानें कौन्सिलवाल्या पक्षाचें अनुकरण करून बंड कां करूं नये? या विचारसरणीस अनुसरून श्री. वल्लभभाई पटेल वगैरे तीन चार पुढाऱ्यांचीं स्पष्ट भाषणें झालीं. बंगाल, गुजराथ, कर्नाटक, मद्रास, वगैरे प्रांतांत कालच्या ठरावाची अंमलबजावणी होणार नाहीं व कौन्सिलावरील बहिष्काराची चळवळ पंजाब, दिल्ली, व संयुक्तप्रांत याशिवाय इतर ठिकाणीं चालूच राहील, असें कालच्या वादविवादानें स्पष्ट केलें आहे. देशबंधु दास यांनीं आपल्या शेवटच्या भाषणांत कॉंग्रेस-विरुद्ध आपण बंड केलें नाहीं व करणार नाहीं असें सांगितलें. मानसिक वृत्ति पालटण्यासंबंधानें असहकारितेची चळवळ यशस्वी झाली आहे, हें देशबंधु दास यांनीं कबूल केलें. पण प्रत्यक्ष व्यवहाराचे दृष्टीनें असह-कारितेची अंमलबजावणी होत नसल्यामुळें, कौन्सिलांत शिरून तेथें असह-कारितेचा मार्ग स्वीकारण्यास आपण प्रवृत्त झालों आहों, असें त्यांनीं जाहीर केलें. कोणी काणाडोळा करून होणारी मदत आपणाला नको आहे व कॉंग्रेसवाल्या पक्षास स्वतःच्या तत्त्वांना अनुसरून कॉंग्रेससाठीं जेवढी मदत करणें इष्ट वाटेल, तेवढीच मदत देशबंधु दास यांना पाहिजे आहे, असें त्यांनीं सांगितलें. तेढ उत्पन्न होऊं नये म्हणून बहिष्काराचा ठराव अधांत्रीं ठेवणें हें कितपत जरूरीचें आहे? देशबंधु दास यांना जशी कोणाच्या काणाडोळ्यांची मदत नको आहे, त्याचप्रमाणें श्री. वल्लभभाई पटेल वगैरे मंडळींनाहि कौन्सिलवाल्या पक्षाच्या काणाडोळ्याची मदत नको आहे

कौन्सिलाच्या मार्फत किंवा कौन्सिलामध्यें बसून असहकारितेच्या चळवळीस डोळेझाकीच्या मदतीहून अधिक मदत होणें शक्य नाहीं. स्वतःच्या पक्षाचें हित होतें असे वृथा समजून आपली चळवळ तरी कौन्सिलच्या निवडणुकीच्या वेळीं असहकारवाद्यांनीं बंद कां ठेवावी? कौन्सिलवाला पक्ष स्थापल्यानें देशबंधु दास हे जर राष्ट्रीय सभेविरुद्ध बंडखोर ठरत नाहींत तर ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचा कालचा ठराव न मानल्यानें कोणीहि कॉंग्रेसचा अनुयायी बंडखोर ठरणार नाहीं, हें उघड आहे. हिंदु–मुसलमानांची बेकी मोडतांना तुम्हा कॉंग्रेसच्या अनुयायांचे आपापसांत जर तट आहेत तर तुम्ही तरी आमची बेकी कशाला मोडतां, असेंच पंजाबांत कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना सांगण्यांत येतें हें खरें आहे. पण पंजाब व संयुक्तप्रांत यांच्याबाहेर हिंदु–मुसलमानांच्या तंट्याला फारसें महत्त्व नसल्यामुळे हिंदु–मुसलमानांची बेकी मोडण्याकरितां स्वतःचीं मतें सोडून देण्यास कोणी तयार होईल असे आम्हास वाटत नाहीं. कौन्सिलामध्यें शिरण्याच्या लोभामुळेंच हिंदु–मुसलमान, ब्राम्हण–ब्राम्हणेतर या बेक्या उत्पन्न झाल्या आहेत. या बेक्यांचीं भूतें असहकारवाद्यांच्या चळवळीनें गेलीं तीन वर्षें गाडल्यासारखी केलीं होतीं. कौन्सिलवाला पक्ष पुढें येण्याबरोबर हीं भूतें पुन्हा नाचूं लागलीं आहेत. या भुतांचे नाच ज्यांना कमी करावयाचे असतील, आणि खऱ्या ऐकीच्या जोरावर कॉंग्रेसचें पाऊल ज्यांना पुढें पाडावयाचें असेल, त्यांनीं निदान मि. जोसेफ यांनीं कालच्या बैठकींत सांगितल्याप्रमाणें डळमळीतपणा सोडून देऊन जोरकसपणानें बहिष्काराची चळवळ पुढे चालवून कॉंग्रेसची सेवा करण्यास तयार झालें पाहिजे, यांत संशय नाहीं.

---

# * महाराष्ट्र कॉंग्रेस कमिटी

ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें गेल्या सोमवारीं महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटी आणि नागपूर मराठी प्रांतिक कॉंग्रेस कमिटी यांच्यासंबंधाच्या वादाचा निकाल लावला, आणि दे. शिवरामपंत परांजपे यांच्या प्रांतिक कॉंग्रेस कमिटीस कायदेशीर ठरविलें व नागपूरचे डॉ. मुंजे यांच्या तक्रारी फोल ठरविल्या. पुण्याचा व नागपुरचा हा वाद गेल्या डिसेंबरपासून सुरू झाला. या वादाचा अखेरचा निकाल लागण्यास पुरे सहा महिने लागले. कोणत्याहि प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचें आयुष्य अवघें बारा महिन्यांचे असते. या बारा महिन्यांपैकी सहा महिने नागपूरच्या व पुण्याच्या कौन्सिलवाल्या पक्षानें शाब्दिक हरकती घेऊन खाऊन टाकलें! महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटी-संबंधानें गेल्या नव्हेम्बरमध्ये उत्पन्न झालेल्या वादाचा निकाल करण्याकरितां बॅ. सेनगुप्ता व दे. गंगाधरराव देशपांडे यांची कमेटी नेमली होती. ह्या कमिटीनें दोन्ही पक्षांत तडजोड करून, व तडजोडीवर दोन्ही पक्षांच्या सह्या घेऊन दोन्ही पक्षांच्या कबुलीने निकाल दिला. गयेच्या राष्ट्रीय सभेमध्ये जर कौन्सिलवाल्या पक्षाचे ठराव बहुमतानें पास झाले नाहीत, तर पुण्याच्या कौंसिलवाल्या पक्षानें प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या हुद्यांच्या जागा जानेवारी, अखेर सोडून मोकळे झाले पाहिजे, असा ठराव स्पष्ट होता. या ठरावास स्वतः सह्या करून कौन्सिलवाल्या पक्षानें कबुली दिली होती, पण बॅ. जम्नादास मेथा हे गेले सहा महिने महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष म्हणून मिरवतच होते! अशा मिरविण्याची त्यांची त्यांनाच खंत आल्यामुळे म्हणा अथवा इतर कारणामुळे म्हणा, रत्नागिरीच्या सम्मेलनाच्या पूर्वीं त्यांनीं

* नवाकाळ, ता. ३० मे १९२३

आपल्या मिरविण्याचा राजीनामा दिला, आणि बिनदिक्कतपणात त्याच्यावर वरचढ करूं पाहणारे रा. भोपटकर रत्नागिरीत अध्यक्ष म्हणून मिरवूं लागले ! वर्किंग कमिटीनें ह्या दुहीच्यावेळी निकाल दिला, पण वर्किंग कमिटीसच अधिकार नाहीं असा मुद्दा काढून ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीकडे अपील केलें गेलें. बॅ. सेनगुप्ता व दे. गंगाधरराव देशपांडे यांना ज्या मुद्याचा निकाल लावावयास सांगितले होतें, त्या मुद्याचा निकाल त्यांनीं लावला. त्यानंतर झालेल्या निवडणुकीसंबंधाच्या वादाचा निकाल प्रांतिक कॉंग्रेस कमिटीनें लावावयाचा नाहीं, किंवा वर्किंग कमिटीने लावावयाचा नाहीं तर कोणी लावावयाचा ? मुंबईत भरलेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीने चार निवडक सभासदांची कमिटी नेमून त्याजकडे बॅ. जमनादास मेथा यांचें अपील निकालाकरिता दिलें. ह्या कमिटीनें सेनगुप्ता व देशपांडे यांना ज्या मुद्याचा निकाल लावण्यास सांगितले होतें त्या मुद्यापुरताच त्यांना अधिकार होता; आणि त्यानंतर उपस्थितीत झालेल्या सर्व मुद्यांचा निकाल लावण्याचा अधिकार वर्किंग कमिटीस होता, व दे. शिवरामपंत परांजपे यांच्या कमिटीस तोतया म्हणण्याची कौन्सिलवाल्या पक्षाची सवय अत्यंत गर्हणीय आहे, असें आपलें मत दिलें आणि ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें हें मत मान्य केलें. अखेरीस निकाल योग्यच झाला, ही संतोषाची गोष्ट होय. पण गेले सहा महिने पुण्याच्या कौन्सिलवाल्या पक्षाने महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या बोकांडीं बसून एखाद्या भुतानें जसें पछाडावें त्याप्रमाणें सज्जनांचा छळ केला त्याची वाट काय ? सहा महिन्याच्या या तट्यावरून बॅ. जमनादास मेथा किंवा रा. भोपटकर यांच्या सारखीं भुतें पुण्याच्या वेताळाच्या आज्ञेवरून जर दिवसाढवळ्या सज्जनांचे पाय ओढूं लागलीं तर लोकांनीं कसें वागावे ? प्रांतिक कॉंग्रेस कमिटी, वर्किंग कमिटी, किंवा ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी, किंबहुना कॉंग्रेस यांच्यापाशीं सरकारी पोलिसासारखें, असल्या भुतांना

मिरच्यांचा धूर देऊन नाकधुऱ्या काढावयास लावणारें हत्यार नाहीं, हत्यार असलें तरी या हत्याराचा हे कधींहि उपयोग करणार नाहींत, ही गोष्ट येथें विसरता कामा नये. मग असल्या भुताना समाजात स्वैरसचार करण्यास पूर्ण मोकळीक आहे असेच समजावयाचे किंवा कसे ? जर पूर्ण मोकळीक मिळाली तर सार्वजनिक फंड व सार्वजनिक कामे, याचें मातेरें करण्यास हीं भुतें कधीहि कमी करणार नाहींत. सहा महिने अध्यक्ष नसताना अध्यक्ष म्हणून मिरवावयाचें, दुसऱ्या प्रातिक कमिटीचें येळकोट उभे करावयाचें, आपल्या संम्मेलनावर परिषद म्हणून शिक्का मारावयाचा, असला या भुताचा धिंगाणा बद पडणें सार्वजनिक कामकाजाच्या दृष्टीनें अत्यत जरूरीचें आहे हा धिंगाणा बंद पडण्यास एकच मार्ग आहे, आणि तो केवळ लोकाच्या हातीं आहे एखाद्या शब्दाचा आधार घेऊन पाहिजे तसा धिंगाणा घालावयास मोठीशी बुद्धि लागते अशातला भाग नाहीं; उद्दाम अरेरावीपणा अंगीं असला म्हणजे एखादा महाजन, एखादा भोपटकर, किंवा एखादा जमनादास हें काम सहज करू शकतो. सार्वजनिक चारित्र्यांतील वर्तनाचे काहीं सामान्य नियम जर अशा रीतीनें धाब्यावर बसविण्यात आले तर लोकानीच मनुष्यबळ व द्रव्यबळ या दोन्हीं दृष्टीने असल्या भुताना मदत करण्याचें बंद केल्याशिवाय या भुताच्या चेष्टाना आळा बसणार नाहीं. कौन्सिलवाल्या पक्षास असे वाटत आहे कीं, लोकाश्रयाचा झरा आपल्या बाजूनें एकसारखा वहात राहणार आहे, आणि या लोकाश्रयाच्या जोरावर पाहिजे त्या सार्वजनिक कामात वितुष्ट घालण्यास आपणास हरकत नाहीं. सहा महिनेपर्यंत या मडळीने धिंगाणा घालून त्याच्या म्हणण्यात कांहीं अर्थ नव्हता असा निकाल ऑल इडिया कॉंग्रेस कमिटीकडून या मडळीने करून घेतला ! तेव्हा यापुढे कोणत्याहि सार्वजनिक सस्थेत पुण्याच्या कौन्सिलवाल्या पक्षाच्या भुतांना व वेताळांना सार्वजनिक दृष्टया मदत करण्याच्या वेळीं

पूर्ण विचार करूनच लोकांनीं मदत करावी लागेल, हें उघड आहे. एखादा फंड, किंवा एखादी संस्था यांच्या हातीं गेल्याबरोबर सार्वजनिक चारित्र्यातील सज्जनांचें वर्तनाच्या नियमांना धाब्यावर बसवून सदर फंड व सदर संस्था आपल्या कायमची लगामांत कायमची कशी राहील व आपल्या सभोंवारच्या भुतांना सदर फंडाचे जोरावर सार्वजनिक संस्थांतून पाहिजे तसा धिंगाणा घालण्यास कसे सांपडेल याच विचारांत पुण्याचा कौन्सिलवाला पक्ष नेहमीं निमग्न असतो, हें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सोमवारच्या निकालानें सिद्ध केलें आहे. सार्वजनिक चारित्र्यास एक प्रकारचा हिडिस रोग महाराष्ट्रात लागला आहे; आणि एकदां खुर्चीवर बसलें म्हणजे आपला अधिकार असो किंवा संपो, कांहीं केल्या खुर्ची सोडावयाची नाहीं; असले दुष्ट उदाहरण पुण्याच्या कौन्सिलवाल्या पक्षानें सर्व महाराष्ट्रास घालून दिलें आहे. या रोगावर बाहेरून जें औषध द्यावयाचें तें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें दिलें आहे. पण बाहेरून द्यावयाच्या औषधानें रोग पक्का बरा व्हावयाचा नाहीं. या रोगाचीं जीं बीजें सार्वजनिक चारित्र्यात घुसून बसलीं आहेत, त्या बीजांवरहि लोकांनीं नजर पोंचविणें आता भाग झालें आहे. एखाद्या जुन्या राजवाड्याच्या शिखरावर बसलेला पक्षी कावळा आहे का गरूड आहे हें लोकांनीं नीट न्याहळून पाहिलें पाहिजे आणि नीट तपासणी करून आपल्या आश्रयाला योग्य तें वळण त्यावेळीं दिलें पाहिजे. सार्वजनिक चारित्र्य शुद्ध ठेवण्याची खबरदारी घेतली नाहीं, तर एखाद्या राजवाड्याचें शिखर गांठण्याबरोबर कोणताहि कावळा गरुडाप्रमाणें मिरवूं शकतो आणि इतर कावळे जमवून कावकाव करून सार्वजनिक कामांत घोटाळा घालूं शकतो, याची चांगली अद्दल गेले सहा महिने महाराष्ट्राच्या अनुभवास आली आहे. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें दिलेल्या निकालांकडे पाहून महाराष्ट्रातील सार्वजनिक चारित्र्यास असल्या ठेचा वारंवार न लागतील अशी खबरदारी लोकांनीं यावेळीं घेणें जरूर नाहीं का?

१६

# * विद्वान नाहींत



नागपूरच्या राष्ट्रीय निशाणाच्या अब्रूकरिता तुरुगात गेलेले लोक विद्वान नाहींत, हा नागपूरच्या चळवळीवर मोठा आक्षेप आहे. नागपुरास सत्याग्रह करणारे लोक निरनिराळ्या उद्योगधंद्यात कामकाज करणारे आहेत; कॉलेजातून शिकून विद्वान झालेले नाहींत, ही गोष्ट खरी आहे. ह्या पैकीं काहींना राष्ट्रीय निशाण कसे असावें व राष्ट्राला या निशाणाचा काय उपयोग होतो, हें बिनचूक सागता येत नाहीं; यापैकीं काहीना स्वराज्याची व्याख्या देता येत नाहीं, ह्या पैकी काहींना महात्मा गांधी याची असहकारितेची चळवळ कोणत्या स्वरूपाची आहे, हे बरोबर समजत नाही, ह्या पैकीं काहीना शाततेच्या कायदेभगाची मीमासा करण्याचें सामर्थ्य नाहीं; ह्या सर्व गोष्टी खऱ्या आहेत. ह्याच्यापाशीं जे काही आहे तें भक्तीभावाच्या स्वरूपाचें आहे, महात्मा गांधी याच्या चळवळीवर एक प्रकारची त्याची श्रद्धा आहे। नोकरशाहीमुळे दुनिया त्रस्त झाली असून साप्रतच्या दुःखातून सोडविण्याचें सामर्थ्य आत्मयज्ञात आहे असा त्याचा विश्वास आहे, जे पुढारी या आत्मयज्ञाची चळवळ करीत आहेत, त्या पुढाऱ्याच्या सबधाने याच्याजवळ पूज्यबुद्धि आहे, त्याचीं अतःकरणें प्रामाणिक आहेत, आत्मयज्ञ करताना शरीरक्लेश सोसण्याची उत्कट इच्छा त्याच्या पाशी आहे, पण विद्वान मात्र ते नाहींत. विद्वत्तेचें हे न्यून चव्हाट्यावर आणण्याचा सपाटा साप्रत नोकरशाहीने चालविला आहे. नोकरशाहीच्या कच्छपीं असलेल्या पत्रकारांच्या बातमीदाराकडून ज्या बातम्या प्रसिद्ध होतात, त्या बातम्यात नागपुरास तुरुगात जाणारे लोक विद्वान नाहींत, त्याना काय चाललें आहे

* नवाकाळ, ता. २ जून १९२३

तें धड समजत नाही, दुसऱ्यानीं सांगितल्यावरून ते तुरुगात जाण्यास तयार झाले आहेत, असे नानाप्रकारचे टोमणे नेहमीं दृष्टीस पडतात. अशा वेळीं आत्मयज्ञ करणाऱ्या लोकाच्या अगीं असलेले सद्गुण किती योग्यतेचे आहेत, आणि विद्वान नाहीत हा दोष किती किंमतीचा आहे, याचा विचार करणे जरुरीचे झाले आहे. महायुद्धाशीं तुलना केली असता नागपूरच्या सत्याग्रहाचा आत्मयज्ञ अगदी लहान आहे, पण त्या तेवढया मोठया महायुद्धाच्या वेळीं तरी इंग्लडात किती लोकाना हे महायुद्ध कोणत्या उच्च तत्त्वाकरिता सुरू झालें हें समजलें होते? त्या वेळचे मुख्य मत्री मि. ॲस्क्वीथ यानीं महायुद्धाच्या प्रारभीं कित्येक महिने इग्लंड कशासाठीं लढत आहे हें शोधून काढण्याची खटपट केली. कित्येक महिन्यांची धडपड झाल्यानतर इग्लडची सस्कृती जर्मन सस्कृतीहून अधिक चागली आहे, असे कॉलेजातील एका प्रोफेसराने सागितलें, आणि मि. ॲस्क्वीथ यानीं तेच तुणतुणें पार्लमेंटमध्ये चालू ठेविलें! आज तरी महायुद्ध सपून चार वर्षें झाल्यानंतर महायुद्धाच्या बुडाशीं असलेल्या उच्च तत्त्वाची ओळख कोणाला आहे? अमेरिकेचे त्यावेळचे विद्वान प्रेसिडेंट डॉ. विल्सन याच्या लेखाना व उद्गाराना इग्लडच्या मुत्सद्यानी फाटक्या कागदाच्या टोपलींत टाकलें नाहीं काय? असे असता इग्लडनें महायुद्ध कसे जिंकलें? इंग्लडला महायुद्धाच्या तत्त्वांची व्याख्या देता येत नाहीं! कशासाठीं आपण लढत आहोंत, हे इग्लडच्या वीराना समजलें नाहीं, या युद्धापासून जगाचें हित आहे किंवा कसें याची मीमासा या वीरांना करता आली नाहीं; मध्य प्रातातील एखाद्या मॅजिस्टेटपुढें जर इग्लंडच्या सेनानायकाना आरोपी म्हणून उभे केलें, आणखी त्या मॅजिस्टेटनें महायुद्धाच्या बुडाशीं असलेल्या तत्त्वज्ञानासबंधानें त्याची फेरतपासणी केली, तर इंग्लंडच्या सर्व फील्ड-मार्शलाची फें फे झाल्यावाचून रहाणार नाहीं. मध्यप्रातातील जे मॅजिस्ट्रेट

व त्याच्या हाताखालील वकील आज सत्याग्रहाच्या तत्वज्ञानासंबंधानें तुरुंगात जाणाराची फेरतपासणी करीत आहेत. त्यांच्यावर उद्यां जर कोर्टापुढें उभे रहाण्याची पाळी आली, आणि सरकारी नोकरी करून मोरगिरीचे मळे काढण्यास तुम्ही का उद्युक्त झालांत म्हणून जर त्यांना विचारण्यात आलें, तर रस्त्यातील पोरेंहि त्यांची हुर्यो करतील असली बाष्कळपणाची उत्तरें त्याच्या तोंडून निघाल्यावाचून रहाणार नाहींत! आज मॅजिस्ट्रेटी घोड्यावर ते बसले आहेत आणि त्यांच्या चाबकाच्या कक्षेत त्याच्या शेजारी पायीं चालण्याची पाळी प्रामाणिक सत्याग्रही वीरावर आलेली आहे. अशा वेळीं एखाद्या अविद्वान सत्याग्रही आरोपीला तुला स्वराज्य म्हणजे काय हें समजतें काय, म्हणून प्रश्न विचारण्याचा हलकट उद्दामपणा जर मॅजिस्ट्रेटनें दाखविला, आणि नोकरशाहीच्या वकालतच्यानीं मॅजिस्ट्रेटनें आरोपीची कशी टर उडविली म्हणून जर चोहोंकडे तारा पाठविल्या, तर त्यांत कांहीं नवल नाहीं. मॅजिस्ट्रेटी अधिकाराची धुंदी डोक्यावर चढली असताना, दुसऱ्याला कस्पटा-प्रमाणें लेखून त्याची हुर्यो करण्याकडे कल साहजिकपणेंच उत्पन्न होतो!! असल्या धुंदींत हा दोष जर एखाद्यानें दाखविला नाहीं तर तें नवल होय. दारू पिणारा, बरळणारच व त्या दारू पिण्याची बाटली धरणारा बातमीदार या बरळण्याचें कौतुक करणारच! अधिकाराच्या नशेचा हा साहजिक परिणाम आहे; आपणास या दोषाशीं कांहीं कर्तव्य नाहीं. तुरुंगात जाणारे लोक विद्वान नाहींत या आरोपामुळें कोणाचा बुद्धिभेद होऊं नये एवढीच खबरदारी घेणें जरुरीचें आहे. महात्मा गांधी यांच्या असहकारितेच्या चळ-वळीच्या अगी सर्वांना ती तत्वें सांगोपांग समजून देऊन त्या विद्वान बनविण्याचें आज सामर्थ्य नाहीं हें खरें आहे. पण या सामर्थ्याची आज जरुरी नाहीं. यश मिळविण्यास हें विद्वत्तेचें सामर्थ्य चोहोंकडे पसरलेलें

असावें लागतें असें नाहीं. कांहींना समजतें, कांहींना समजत नाहीं; अशी स्थिति नेहमीं असावयाचीच! यशाचें सामर्थ्य तर्कटांगांत नसून विद्वत्ता लढण्याच्या वेळीं उपयोगीं पडत नाहीं. कार्यांत पुरुषाची बुद्धि स्थिर होण्याला विद्वत्तेची जरूरी असतें, पण स्थितधी झालेल्या मुनींच्या सांप्रदायाची अम्मलबजावणी संसारांत घडण्यास सत्याची चाड, प्रामाणिकपणा, श्रद्धा, व आत्मयज्ञ करण्याची तयारी या सद्गुणांचीच अधिक जरूरी असतें. पराक्रम म्हणजे विद्वत्ता नव्हे! सांप्रदायानें ठरविलेल्या तत्त्वाकरितां निश्चयानें श्रद्धापूर्वक केलेल्या आत्मयज्ञाला पराक्रम असें म्हणत असतात. पराक्रम दाखविण्यास ज्या सद्गुणाचा समुच्चय जरूर असतो, तो सद्गुणाचा समुच्चय आज नागपूरच्या वीराच्या अंगीं प्राधान्येंकरून दिसत आहे. विद्वत्तेच्या जोरावर फ्रान्सनें महायुद्ध जिंकलें नाहीं, तर पराक्रमाच्या सद्गुणाच्या जोरावर महायुद्ध जिंकलें, हें विसरतां कामा नये. हिंदुस्थानांत आज उणीव आहे ती विद्वानाची नाहीं, पराक्रमी वीराची आहे. ऑल इंडिया कांग्रेस कमिटीच्या सभेस तास दोन तास जरी हजर राहिलें तरी फाजील विद्वत्तेस ऊत आला आहे, असें तेव्हांच ध्यानांत येतें! शब्दाचे कीस काढण्यांत आमचे लोक प्रवीण झाले आहेत, पार्लमेंटरी वादविवादांत आमचे लोक कोठेंहि मागें हटणार नाहीत, नेमस्तांनीं भरलेली दिल्लींतील असेंब्ली देखील इंग्लंडच्या पार्लमेंट सभेवर आज शब्दच्छलांत ताण करील! पण ही विद्वत्ता आज राष्ट्राच्या उपयोगीं पडत नाहीं, कारण पराक्रमाची व विद्वत्तेची फारकत झाली आहे. महात्मा गांधी यांची असहकारितेची चळवळ ही फारकत काढून टाकण्यासाठींच आहे. विद्वत्तेला आजहि हिंदुस्थानांत आरामाची गुलामगिरी आवडते. विद्वत्तेची ही वेश्यावृत्ति नष्ट झाल्याशिवाय हिंदुस्थानचें कल्याण होणार नाहीं. अशा वेळीं पराक्रमी पुरुषामध्यें ते विद्वान नाहींत म्हणून दोष काढणें म्हणजे राष्ट्राच्या हितावर कुऱ्हाड मारणें होय. ह्या

वेळीं राष्ट्रामध्यें पराक्रमाचेच सद्गुण वाढीस लावले पाहिजेत. आज सर्व दर्जाच्या व सर्व स्थितींतल्या लोकांत आत्मयज्ञाचें जे वारें नागपुरात खेळत आहे त्या वाऱ्याची जर तुम्ही थट्टा करूं लागला, तर विद्वानाची वेशयवृत्ति कधी सपणार नाहीं. पराक्रमाची टर करणाऱ्या विद्वत्तेला विद्वत्ता तरी कसे म्हणावें? पराक्रमाच्या सद्गुणाचें स्वरूप ज्या बुद्धीला समजत नाहीं त्या बुद्धीवर व्यापकपणाचे सस्कार झाले आहेत असे कसे मानावें? पराक्रमाचें प्रतिबिंब ज्या बुद्धींत पडत नाही ती बुद्धि शिकल्यासवरल्यानें निर्मल झाली आहे असे मानण्यास आधार काय? सद्गुणाचें, सत्याचें व परमेश्वराचें स्वरूप ग्रहण करण्याची शक्ति जेथे नाहीं, तेथे विद्वत्ता आहे असे कसे म्हणावे? ही विद्वत्ता नव्हे, नुसती घोकपट्टी आहे! विद्वत्तेने अतःकरण शुद्ध व्हावे लागते आणि परमेश्वरी तेजाचें किरण ग्रहण करण्याइतकी निर्मलता उत्पन्न व्हावी लागते ज्या विद्वत्तेमुळे मनुष्याची बुद्धि परमेश्वराचे अधिष्ठन होऊ शकत नाही, त्या विद्वत्तेस विद्वत्ता म्हणण्याऐवजी विद्वत्तेचे सोग म्हटले पाहिजे! नागपूरच्या राष्ट्रीय निशाणाच्या चळवळीनें ही विद्वत्तेचीं सोंगे आताच चव्हाठ्यावर आलीं आहेत, हे एक प्रकारे बरे झालें आहे. या सोंगाच्या नादीं लागून राष्ट्रास पराक्रमहीन करण्याचा जो प्रयत्न साप्रत करण्यात येत आहे, त्या प्रयत्नास हाणून पाडण्यात ह्या वेळीं खऱ्या देशभक्तानीं मुळींच आळस करता कामा नये. श्रद्धेनें, निश्चयानें व आत्मयज्ञाच्या भावनेनें जे पराक्रमी वीर आज रणमैदानावर उभे आहेत त्या वीरातील सर्वाकडूनच रणमैदानाचें अखेरचें टोक गाठले जाईल असे मुळीच नाहीं. काहीं रणमैदानावर उभे राहण्यापुरते पुढे येतील, काहीं दहा पावलें पुढे गेल्यावर मागें सरकतील, काहीं अर्ध्या वाटेवरच युद्ध सोडून देतील; व कांहीं अखेरपर्यंत टिकतील. कोणत्याहि लढाईत रणमैदानावर हा प्रकार दृष्टीस

पडावयाचाच. हा दोष अपरिहार्य आहे. तेव्हा त्याबद्दल विषाद मानण्याचें बिलकूल कारण नाही. विद्वत्तेच्या ज्या सोंगाना असले दोष दाखवून आपल्या वेश्यावृत्तीवर पांघरूण घालावयाचें असेल त्यानीं खुशाल असल्या दोषारोपाचीं पारायणें करीत बसावे पराक्रमाच्या सद्गुणाचें ग्रहण करण्यास उन्मुख झालेलें राष्ट्र असली पारायणे ऐकतच नाहीं. तेव्हा नागपूरच्या वीरवृत्तीच्या लोकानी निंदकाच्या शिव्याशापामुळे आपला तेजोभंग होऊ न देता, आपल्या कामास श्रद्धेनें व तत्परतेनें स्वतःस वाहून घ्यावे हेंच योग्य. श्रद्धा व तत्परता असल्यावर निंदकाचा उलट उपयोग करून घेता येतो. नागपूरचा सत्याग्रह पराक्रमी वीराचा असल्यामुळें विद्वत्तेचें सोंग घेतलेल्या निंदकाचा ते उपयोग करून घेतील यात संशय नाहीं.



# * महात्मा गांधी चुकले काय?

मद्रासेस असहकारितेच्या चळवळीचें निरीक्षण करतांना महात्मा गांधी यांच्या पदरांत एक ढोबळ चूक बांधण्याचा प्रयत्न दे. बं. दास यांनीं केला आहे. महात्मा गांधी यांनीं लॉर्ड रीडींग याची तडजोड नाकबूल करण्यांत ढोबळ चूक केली, अडाण्यासारखा गडबडगुंडा केला, वाकबगार नसलेल्या मुत्सद्याप्रमाणें कांहींतरी 'बंगलिंग' केलें, असा दे. ब. दास याचा आरोप आहे. युवराज कलकत्त्यास पोंचण्यापूर्वी युवराजाचा कलकत्त्यांतील बहिष्कार उठविण्यात यावा म्हणून लॉर्ड रीडिंग स्वतः कलकत्त्यास गेले, आणि सभाबंदीच्या कायद्याखालीं पकडण्यात आलेल्या कैद्यांना सोडून देतों, युवराजावरील बहिष्कार तेवढा उठवा, अशी तडजोड बडे लाट व बंगालचे छोटे लाट या दोघानीं दे. ब. दास याच्या पुढें तुरुंगात ठेवली. दे. बं दास यानीं ही तडजोड स्वतः मान्य केली, पण आपण तुरुंगात असल्यामुळें आपल्याकडे पुढारीपणा न घेता सदर तडजोड महात्मा गांधी यांजकडे पाठविली. महात्मा गांधी यानीं ही तडजोड पसंत केली नाहीं. सभाबंदीच्या कायद्याखालचे तेवढेच कैदी सोडून उपयोगाचें नाहीं, तर अलीबंधूंसारखे खिलाफतीच्या चळवळींतील मुसलमान कैदीहि सोडले पाहिजेत, असा हट्ट महात्मा गांधी यांनीं धरला आणि यामुळें तडजोड फिसकटली. महात्मा गांधी यांचें हे धोरण चुकीचें झालें असे दे. ब. दास यांचें म्हणणें आहे. हें 'बंगलिंग' झालें. कांहींतरी अडाण्यासारखें अव्यवस्थितपणाचें हें कृत्य झालें. राजकारण माहीत नसले-ल्या पुरुषाच्या हातून ही ढोबळ चूक झाली. भलताच मनुष्य पुढारी बनला गेल्याकारणानें काहीं तरी तिरपागडे झालें. राजकारणांत दासबाबूंची

* नवाकाळ, ता. ८ जून १९२३

दक्षता महात्मा गाधी यानीं दाखविली नाही. आपलेच येळकोट घेऊन बसल्याने राजकारण कसे बिनसते, किंवा ‘ बगलिंग ’ होते, याचें हे उदाहरण आहे. महात्मा गाधी चुकले असे म्हणण्यास दे. ब. दास आज तयार आहेत, ह्याचे कारण तुरुगातून सुटण्याची सधी वाया गेली हे नव्हे. तुरुगवासाच्या दुःखाची फिकीर दे. ब. दास याना नाही, पण राजकारण बिघडले या बद्दल त्याना वाईट वाटत आहे. राजकारण बिघडले ते कसे ? ‘ बगलिंग ’ झाले ते कोठे ? आडमुठेपणा झाला तो कोणता ? दे. ब. दास याचे असे म्हणणे आहे की, अत्यत प्रबळ असलेल्या नोकरशाहीचे पुरस्कर्ते दोघे लाट आपण होऊन तडजोड करण्यास पुढे आले असताना तडजोडी-मुळे जे यश लोकाच्या डोळ्यात शिरले असते त्या यशाला आपण मुकलो आहोंत. थोडेसे यश मिळत असले तरी ते यश हस्तगत करून घेण्यास राजकारणी पुरुषाने चुकूं नये यश मिळाले म्हणून मिरवावयास सापडलें असता जे काम आपोआप होते ते दुसऱ्या कशाने होत नाही Nothing Succeeds Like Success वडे लाट व छोटे लाट शरण आले म्हणून टिमकी वाजवावयास सापडली असती, शेकडो केदी तुरुगातून बाहेर येऊन त्याच्या बधमुक्ततेमुळे आपल्या यशाचा नगारा चोहोकडे वाजत राहिला असता, लाट साहेबाना गाधीनी शरण आणले म्हणून जो तो म्हणत राहिला असता आणि लोकाचा विश्वास त्यामुळे दुणावून पुढचें कार्य सुकर झालें असते. पुढे चालून आलेले हे यशाचे ताट दूर लोटण्यात महात्मा गाधी यानी अडाणीपणाची चूक केली, तेव्हा महात्मा गाधी याच्या धोरणात काही हशील नाहीं, असा हा आरोप आहे. थोडीतरी यशाची चुणुक मधून मधून दाखविता आली पाहिजे. लहान सहान चमत्कार दृष्टीस पडल्यामुळे नमस्कार झडत राहिले पहिजेत, येरवी राजकारण सुकर व्हावयाचें नाही; अशा धोरणाचा व मताचा अंगिकार दे. ब. दास यानी केला आहे.

अली बंधूंना सोडले नाहीं तर तडजोड नको, असा हट्ट महात्माजींनीं कलकत्त्यास लाटसाहेब गेले असताना धरला, इतकेच नव्हे, तर अहमदाबादच्या कॉंग्रेसच्या वेळींहि हाच हट्ट धरला आणि मुंबईस समेटाची सभा अहमदाबादच्या कॉंग्रेसनंतर एक महिन्याने झाली असता पुन्हा तोच हट्ट धरला ! तीन वेळा एकसारखा एकच हट्ट दाखविला. अलीबंधूंच्या स्नेहामुळे व प्रेमामुळे महात्मा गांधी यांनी हा हट्ट दाखविला कीं राजकीय धोरणामुळे हा हट्ट दाखविला? बडे लाटसाहेब सिमला सोडून कलकत्त्यास गेले व तडजोड करण्यास तयार झाले याचें कारण काय? नोकरशाहीला हजारों कैद्यांना कोणत्या तुरुंगांत ठेवूं म्हणून काळजी पडली होती व त्या काळजीमुळे तडजोड पुढे आली, असे म्हणतां येते काय? कैदेत टाकण्याच्या त्रासामुळें तडजोड जर पुढे आली असती तर अलीबंधूंना सोडून देण्यास लॉर्ड रीडिंग यांनीं कां मागे घेतले असते? दहा पांच हजार कैदी सुटावयाचे होते त्यांत दोन चारशें जास्त कैदी किंवा अवधे दोन अलीबंधू सोडून दिले असते म्हणून लाटसाहेबांचे तरी कोणते बिघडणार होते? लाटसाहेब लॉर्ड रीडिंग यांनी अलीबंधूंना सोडून द्यावयाचें नाहीं म्हणून एवढा हट्ट कां धरला! दोनच इसमांची बाब, पण त्याकरितां लॉर्ड रीडिंग यांनी तडजोड कां मोडली! आपण होऊन तडजोड त्यांनीं पुढे आणली होती, आपण होऊन हजारो कैद्यांना सोडून देण्यास ते तयार झाले होते, आपण होऊन शरणागतीचीं लोटांगणें घालीत कलकत्त्यास धरणें धरून ते बसले होते, मग दोनच अलीबंधूंसंबंधानें येवढा दीर्घद्वेष लाटसाहेबांनीं कां दाखवावा! लॉर्ड रीडिंग यांच्यासारखा चतुर व न्यायनिपुण पुरुष अवध्या दोन मुसलमान कैद्यांसाठीं आपली तडजोड फुकट जाऊं देण्यास कसा तयार होतो? ह्या प्रश्नाचा विचार करतांना लॉर्ड रीडिंग यांनीं दीर्घद्वेषामुळें तडजोड वाया जाऊं दिली, असें म्हणणें कधीहि सयुक्तिक होणार नाहीं.

अलीबंधूसबंधाच्या आपल्या स्नेहामुळे महात्मा गाधी यानीं ही तडजोड वाया जाऊ दिली हे म्हणणें जसें खोटें आहे तसेंच दीर्घद्वेषामुळें लॅर्ड रीडिंग घसरले हेहि म्हणणें खोटे आहे राजकारणाचा ओघ न समजल्यामुळें अशी भलतीच टीका करण्यात येते. तुर्की प्रश्न मिटला नसल्यामुळे व तुर्कांच्याविरुद्ध इग्रजाचें धोरण दृष्टीस पडत असल्यामुळें युवराजानीं हिंदुस्थानात जाऊ नये, कारण हिंदुस्थानचे मुसलमान फार खवळले आहेत, ते युवराजावर बहिष्कार घालण्यास चुकणार नाहींत असे युवराजाच्या प्रवासाच्यापूर्वी बजाविण्यात आलें होते. हिंदुमुसलमानाच्यातर्फे असे बजाविण्यात आले होतें, इतकेच नव्हे तर ग्रीसचा पक्ष उचलून धरण्यात इग्रज मुत्सद्यानीं चूक केली आहे असे म्हणणाऱ्या व त्यावेळचे मुख्य मत्री मि. लॉईड जॉर्ज याच्या विरुद्ध असलेल्या इग्लडातील पक्षाचे हेंच मत होते. इग्रजी साम्राज्यातील मुसलमानाची मने दुःखानें होरपळलीं असून टर्कीच्या विरुद्ध धोरण स्वीकारण्यात ग्रीसचे जरी कल्याण झाले तरी हिंदु-मुसलमान दुःखी कष्टी झाल्यामुळे इग्रज साम्राज्याचें एकदर अकल्याणच होणार असे म्हणणारा त्यावेळी इग्लडात विरोधी पक्ष होता. या विरोधी पक्षाचे म्हणण्यात बिलकूल अर्थ नाही, हिंदु-मुसलमान काही तितकेसे खवळलेले नाहीत; आणि युवराज हिंदुस्थानात गेले असता त्याचा चोहोंकडे सन्मान होऊन मुसलमानाच्या खवळण्याचा बुडबुडा फुटून जाईल, अशा मतलबानें युवराजाना हिंदुस्थानात पाठविण्यात आलें. इंग्रजी मुत्सद्याच्या व मि. लॉइड जॉर्ज याच्या धोरणाचा हा मतलब सिद्धीस नेण्याचा बोजा लॉर्ड रीडिंग याच्या मस्तकावर होता. हा मतलब सिद्धीस न जाणें हे टर्कीच्या कल्याणाचें होते. तुर्की राज्यानें स्वतत्र प्रभुत्व उपभोगीत राहिलें पाहिजे, आणि टर्कीच्या या स्वतंत्र प्रभुत्वामुळे सर्व मुसलमानी प्रदेशाचें व हिंदुस्थानसकट अर्ध्या अधिक आशिया खंडाचें जगाच्या कार-

स्थानात कल्याण होणार आहे, हे धोरण महात्मा गांधी व अलीबंधु यांनीं स्वीकारलें होतें. हे धोरण मि. लॉइड जॉर्ज याच्या धोरणाच्या अगदी विरुद्ध होते. मि. लॉइड जॉर्ज याचें धोरण चुकीचे ठरले आहे, पण त्यावेळी सदर धोरण चुकीचे ठरणार म्हणून जे म्हणत होते, त्याच्या दृष्टीने व खुद्द मि. लॉइड जार्ज याच्याहि दृष्टीने, हिंदु-मुसलमानाच्या मनाची स्थिति फार खवळलेली आहे किंवा कसे ही गोष्टच धोरण चुकीचे किंवा बरोबर ठरण्यास एक कारण साहाजिक समजली जात होती. हिंदुस्थानातील लोक खवळलेले असले तर मि. लॉइड जॉर्ज याचे धोरण चुकले, खवळलेले नसले तर मि. लॉइड जॉर्ज याचे धोरण बरोबर ठरले, अशा तऱ्हेचा तो प्रसंग होता ज्याचे स्वरूप या प्रकारचें होते. सभाबंदीच्या कायद्याला लोक जुमानतात किंवा नाहीं, याचा अनुभव घेऊन निकाल देण्याचा तो मुख्य प्रसंग नव्हता. मि. लाइड जॉर्ज याच्या इच्छेप्रमाणे हिंदु-मुसलमान खरे खवळलेले नाहीत असा अनुभव येऊ नये म्हणून महात्मा गांधी त्यावेळीं युवराजावरील बहिष्काराच्या राजकारणाचा डाव खेळत होते. या धोरणात सभाबंदीचा कायदा हे उपांग होते. युवराजावर कडकडीत बहिष्कार पडून हिंदु-मुसलमानाची मनोवृत्ति खरोखर क्षुब्ध झाली आहे, असे इंग्लंडच्या अनुभवास येऊन त्या अनुभवाच्या जोरावर लॉइड जॉर्ज याचे टर्कीविषयीचे धोरण बदलविणे, हे महात्मा गांधी व अलीबंधू याच्या कारस्थानाचे मुख्य अंग होते. सभाबंदीचे कैदी सोडून देण्यास लाटसाहेब तयार झाले, आणि अलीबंधूचे नाव निघाल्याबरोबर त्याच्या तळपायाची आग मस्तकाला पोहोचली, हा भेद लक्षात ठेवला पाहिजे. राजकारणातील धोरणामुळे उत्पन्न झालेला हा भेद आहे, व्यक्तिप्रेमामुळे किंवा व्यक्तिद्वेषामुळे हा भेद उत्पन्न झालेला नाही. अलीबंधूंना सोडून देऊन जर तडजोड झाली असती तर मि. लॉइड जॉर्ज याच्या ज्या धोरणाची जोपासना करण्याकरिता

युवराजाना हिंदुस्थानात पाठवून देण्यात आलें होतें, त्या धोरणावरच नालायकीचा छाप लाटसाहेबानी स्वतःच आपण होऊन मारल्यासारखे झाले असते. लाटसाहेबाना तसे करता येईना ! त्यात त्याचा दोष नाहीं. मंत्रिमडळाच्या धोरणाचे ते ताबेदार आहेत. महात्मा गांधी याना तर मि. लाइड जॉर्ज याच्या धोरणावर, सदर धोरण हिंदु-मुसलमानाच्या मनोवृत्ति खवळून सोडणारे आहे, असा नालायकीचा छाप प्रत्यक्ष मारला गेलेला युवराजाच्या प्रवासाच्या वेळी दाखवावयाचा होता. हा छाप मारून घेण्यास लाटसाहेब आपण होऊन तयार होईनात. हा छाप मारला जाणे त्यावेळी अत्यत जरुरीचे होते. लाटसाहेबानी स्वतः जो छाप मारून घेतला नाही तो छाप प्रत्यक्ष अनुभवामुळे मारला गेला, व मि. लॉइड जॉर्ज याच्या धोरणाला इग्लडात मिळत असलेला पाठिंबा हा छाप मारला गेल्यानतर हलके हलके डळमळू लागला, आणि अखेरीस मि. लाइड जॉर्ज याचें मत्रिमडळ उलथून पडून टर्कीशी गुण्यागोविंदाचा सलोखा होण्याची वेळ आज आली ! गुण्यागोविंदाचा सलोखा होण्याची वेळ येण्याचें जे यश आज दृष्टीस पडत आहे त्या यशाचे कारणात मि. लॉइड जॉर्ज यांच्या धोरणाचा पाठिंबा, युवराजाच्या प्रवासाच्या वेळच्या कटु अनुभवाने डळमळीत होणे हे एक कारण आहे. हिंदू-मुसलमान स्वतःच्या स्वार्थत्यागाने हे कारण उत्पन्न केले असल्यामुळे हिंदी राजकारणात या कारणास अग्रस्थानच दिले पाहिजे. युरोपियन राजकारणात हे कारण दुय्यम प्रतीचें ठरेल यात सशय नाही, पण इतर कारणाशी हिंदी लोकाच्या स्वतःच्या कृतीचा सबध येत नसल्यामुळे हिंदी लोकाच्या दृष्टीनें तीं कारणे दैवाधीनच समजली पाहिजेत. हिंदी लोकाच्या पराक्रमाचे आटोक्यात तुर्की यशाचें एकच कारण होते, आणि तें कारण म्हणजे हिंदी लोकाची प्रक्षुब्ध मनोवृत्ति इग्रजी मुत्सद्याच्या अनुभवास आणून देणे हें होय ! हा डाव साधावा

म्हणून महात्मा गांधीं यानीं लॉर्ड रीडिंग याची तडजोड नाकारली; हा डाव साधावा म्हणून मुंबईच्या तडजोडीच्या सभेत महात्मा गांधी यानीं सर शंकर नाय्यर याच्या सारख्याना पूर्णपणें नाखूष केलें, हा डाव साधावा म्हणून महात्मा गांधीं यानीं तुरुंगात जाण्याचा आत्मयज्ञ केला! आज कर्मधर्मसंयोगानें दैवधीन असलेल्या गोष्टीचाहि पूर्ण पाठिंबा मिळून म. गांधी यांचा डाव साधलेला आहे. लॉर्ड रीडिंग याच्या तडजोडीला जर म. गांधी बळी पडले असते, तर लॉइड जॉर्ज याच्या धोरणाला इंग्लंडचा पाठिंबा मिळाला असता, आणि प्रतिकूल दैवालाहि एका बाजून सारून मि. लाइड जॉर्ज यानी इंग्रजी साम्राज्याची सर्व शक्ति तुर्कीवर फेकण्यास काकू केले नसते! त्यानी काकू केलें, कारण महात्मा गांधीं यानी हिंदुस्थानची प्रक्षुब्ध स्थिति इंग्रजी मुत्सद्याच्या अनुभवास युवराजाचे प्रवासाच्या वेळी आणून दिली. हे मोठें यश महात्मा गांधी याच्या धोरणाला मिळालें असतां, दे. ब. दास ह्याच्या प्रमाणें, कोंडण्याचा खाऊ खाण्याच्या आमिषानें लहान मुलाप्रमाणे ते फसले नाहींत हें योग्य झालें की अयोग्य झालें? थोडासा खाऊ खावयास मिळावा म्हणून हिंदी राजकारणाच्या संसाराचे किती एक पिढयाचे मातेरे करून घेण्यास महात्मा गांधी तयार झाले नाहीत हे 'बंगलिंग' झालें काय? मुख्य धोरण न सोडता उपांगाच्या लोभामुळे महात्मा गांधी फसले नाहीत, हा आठमुठया मुत्सद्याचा गुडबडगुंडा ठरतो काय?



# * लो. टिळक व समूहाचा आत्मयज्ञ

न्यू इंग्लिश स्कूल व फर्ग्युसन कॉलेज याचा सबध सुटून लो. टिळक राजकारणात पूर्णपणें पडल्यानतर, त्याचें सर्व आयुष्य, त्यानीं एकट्यानीं केलेल्या आत्मयज्ञाची एक लाबलचक मालिकाच होऊन बसलें. अखेर पर्यंत हे आत्मयज्ञाचें व्रत त्यानी एकसारखे चालविलें, व फलाची अपेक्षा न करता कर्तव्यकर्म म्हणून सतत लढत राहणाऱ्या व आत्मयज्ञातच सुख मानणाऱ्या तेजस्वी लढवय्याचे उदाहरण राष्ट्रास घालून दिलें. विभूतीने स्वतःच्या एकट्याच्या बुद्धीने निश्चित केलेल्या कर्तव्याच्या जोरावर केलेल्या आत्मयज्ञापासून समूहाच्या आत्मयज्ञाला कोणत्याहि राष्ट्रात प्रारभ झाला पाहिजे. तेव्हा लो. टिळक याचे चरित्र सपते न सपते तोंच हिंदुस्थानात समूहाच्या आत्मयज्ञास प्रारभ व्हावा, हें अगदी साहजिक आहे. महात्मा गाधी यानी जी असहकारितेची चळवळ सुरू केली आहे, ती जगी चळवळ म्हणजे समूहाचा आत्मयज्ञच होय. दक्षिण आफ्रिकेत असताना समूहाच्या आत्मयज्ञाची महति महात्मा गाधी याच्या मनावर बिंबली होती, आणि हिंदुस्थानातहि खरी सधी येण्याबरोबर समूहाच्या आत्मयज्ञाच्या चळवळीस त्यानीं प्रारंभ केला. व्यक्तीच्या आत्मयज्ञाचा मार्ग व समूहाच्या आत्मयज्ञाचा मार्ग, हे दोनहि एकाच स्वरूपाचे असतात. व्यक्तीला जी निंदा सोसावी लागते, किंवा ज्या हालअपेष्टातून जावे लागतें, तीच निंदा व त्याच हालअपेष्टा समूहाच्याहि आत्मयज्ञाच्या कपाळीं लिहिलेल्या असतात. व्यक्तीचा आत्मयज्ञ समूहाकरिता असतो, आणि समूहाचा आत्मयज्ञ मार्गें पुढे हालत राहून अखेरीस यशाच्या पायरीला चढतो. समूहाच्या आत्मयज्ञास जन्म दिला, म्हणजे व्यक्तीच्या आत्मयज्ञाचें कार्य सपतें. ज्या विभूतींनीं

---

* नवाकाळ, ता. २ आगस्ट १९२३

असल्या समूहाच्या आत्मयज्ञास जन्म दिलेला असतो, त्या विभूतींच्या चरित्राकडे पाहून समूहाचा आत्मयज्ञ नेहमी आपला मार्ग आक्रमीत असतो. समूहाच्या आत्मयज्ञास मार्गदर्शक होण्याकरिताच ऊर्फ लोकसग्रह करण्याकरिताच मुक्त झालेल्या पुरुषानीहि कर्मे आचरली पाहिजेत, हे गीतारहस्यातील तत्त्व ध्यानात ठेविले असता लोकमान्य टिळक याच्यासारख्या विभूतीच्या चरित्राचा व साप्रतच्या समूहाच्या आत्मयज्ञाचा कोणता सबध आहे, हे तेव्हाच ध्यानात येते. १८९७ साली लो. टिळक तुरुगात गेल्यानतर लोकाकडून टाळ्या वाजवून घेण्याकरिता हा तुरुगात गेला आहे, अशा प्रकारचे आरोप त्याच्यावर काय कमी झाले? साप्रतच्या राष्ट्रीय निशाणाच्या चळवळीवर हेच आरोप सुरू आहेत. असहकारितेची चळवळ लोकप्रिय व्हावी म्हणून राष्ट्रीय निशाणाच्या समूहाचा आत्मयज्ञ करण्यात येत आहे; अशी निंदा आजकाल काय थोडी ऐकावयास मिळते? लो. टिळक यानी या निंदेची पर्वा केली नाही, आणि त्याच्या आयुष्याचे अखेरीस त्याचे निंदकच स्तुतिपाठक होऊन बसले. फलासबधाने अपेक्षा मनात न धरता आत्मयज्ञ करण्याचा लो. टिळक याचा स्वभाव पडल्यामुळे त्याना अशा निंदेची पर्वा करण्याची जरूरी राहिली नाहीं. आज समूहाच्या आत्मयज्ञाच्या वेळी व्यक्तिशः निंदा किंवा स्तुति जी होते ती पुढाऱ्याची होते, पण बाकीच्या लोकाना आपल्या कृतींत फलाविषयीची पूर्ण उदासीनताच ठेवावी लागते. आज ७५ लोक पकडले, काल सुरतचे ४० पकडले अशा प्रकारच्या बातम्या प्रसिद्ध होण्यापलीकडे अधिक गवगवा समूहाच्या आत्मयज्ञाचा होऊच शकत नाही. तत्काळ स्तुति किंवा निंदा याची पर्वा न करता गभीर व शात वृत्तीनें आत्मयज्ञ करण्यास तयार होणे, हा सद्गुण राष्ट्रात चोहोंकडे पसरलेला असल्याशिवाय कोणतेंहि राष्ट्र वैभवसंपन्न व सदाचाराचें माहेरघर होऊंच

शकत नाहीं. आज अशा प्रकारच्या समूहाच्या आत्मयज्ञाची उदाहरणें हिंदुस्थानात एकसारखीं दृष्टीस पडत आहेत, हे हिंदुस्थानचें सद्भाग्यच समजलें पाहिजे. युवराजाच्या प्रवासाच्या वेळच्या आत्मयज्ञाची समाप्ति होते न होते, तोंच अकालीचा आत्मयज्ञ सुरू झाला, आणि अकालींचा आत्मयज्ञ सपतो तोच राष्ट्रीय निशाणाचा आत्मयज्ञ पुढे आला. या सर्व आत्मयज्ञावर मूर्खासारखे काही तरी करीत आहेत, अशी टीका विरुद्ध पक्षाकडून करण्यात येत आहे. हा मूर्खपणाचा छाप टिळकावर मारण्यास त्याच्या प्रतिस्पर्ध्यांनीं कोठे कमी केले ? आपले सामर्थ्य न ओळखता टिळक या ठिकाणीं घसरला, म्हणून आनद मानणाऱ्या प्रतिस्पर्ध्यांचे उद्गार टिळकाच्या वेळीं काय कमी ऐकण्यात येत होते ! ९७ सालच्या कारागृह-वासानतर टिळकाचे सार्वजनिक आयुष्य सपलें, आणि पोरकटपणाने यानें आपल्या बुद्धिमत्तेची खराबी करून घेतली, म्हणून म्हणणारे काय थोडे लोक होते ! ताईमहाराजाच्या खटल्यात टिळक सापडल्या बरोबर याच्या सार्वजनिक चारित्र्यावर पडदा पडला असे म्हणून मुबईस व पुण्यास काय थोडया लोकानीं आनद मानला ? सुरतेची कॉंग्रेस मोडल्यानतर ‘ टिळक मावळला ’ म्हणून टाहो फोडण्यास काय थोडया लोकानी कसूर केली ? आज याच गोष्टी समूहाच्या आत्मयज्ञासबधानें ऐकूं येत आहेत. राष्ट्रात कुवतच नाहीं, मग समूहाच्या आत्मयज्ञाच्या गोष्टी बोलता कशाला, अशी टीका एकसारखी चालली आहे. नागपुरास एखाद्या दिवशी दोन तीन असामीच तुरुगात गेले आणि यातील एखाद्याने माफी मागितली म्हणजे, चालली मरत ही समूहाच्या आत्मयज्ञाची चळवळ, अशी टीका आजकालहि बारबार वाचावयास मिळत आहे ! असल्या टीकेनें लोकमान्य टिळक कधीहि निरुत्साह झाले नाहींत, असल्या टीकेमुळे त्यानी कधीहि मागे पाऊल घेतलें नाहीं. व्यक्तीच्या काय किंवा राष्ट्राच्या काय, आत्मयज्ञाच्या चळवळीस

भरती ओहोटी असावयाचीच. भरतीनें फुगूं नये व ओहोटीनें अटूं नये, असा त्यानीं क्रम ठेविला होता. तोच क्रम समूहाच्या आत्मयज्ञानेंहि आज पुढें चालविला पाहिजे. लो. टिळक हे स्वतः इतरांना आत्मयज्ञ करा म्हणून सागण्याच्या, उर्फ त्या सबधानें संघटित प्रयत्न करण्याच्या उद्योगांत पडले नाहींत. स्वतःच्या एकटयाच्या आत्मयज्ञानें असला उद्योग करण्याची स्फूर्ति राष्ट्रात आपोआप उत्पन्न होईल, अशी त्याची श्रद्धा होती, आणि राष्ट्रभर असला उद्योग सुरू झाला असता त्या उद्योगाचें नीट संग्रहण व्हावें म्हणून, उर्फ लोकसग्रहाकरिता ते स्वतःच्या एकटयाच्या आत्ययज्ञाचें उदाहरण लोकापुढे ठेवीत असत. पुण्यास पिकेटिंगची चळवळ प्रथम त्यानीं सुरू केली; पण समूहाच्या आत्मयज्ञाचें स्वरूप या चळवळीस येणार असें पहाण्याबरोबर ती चळवळ पुढे चालविणें किंवा कसें हें त्यानीं स्वयं-सेवकावरच सोपविलें. पुण्याच्या पहिल्या पिकेटिंगच्या वेळीं दंगाधोपा होऊ न देतां शातता राखण्याची जबाबदारी आपल्यावर आहे असें लो. टिळक याना कळवून, पिकेटिंगच्या कार्यात अडथळा करण्यास पोलिसनें सुरवात केली. पिकेटिंग चालूं असताना रस्त्यात पूर्ण शातता ठेवण्याचा बोजा मी माझ्या शिरावर घेतों, असे आश्वासन लोकमान्य टिळक यानीं पोलिसला दिलें. त्यावेळीं पोलिस सुपरिंटेंडेट यानीं टिळकाना असे उत्तर दिलें कीं, रस्त्यात शातता राखण्याचें काम बादशहाच्या सरकारचें आहे, व हें काम स्वतःच्या हातून सोडण्यास बादशहाचें सरकार बिलकूल तयार नाहीं. पोलिस सुपरिंटेडेंडच्या या उत्तरामुळें मॅजिस्ट्रेटच्या हुकुमानें ही पिकेटिंगची चळवळ निष्कारण बद पाडण्यांत येणार, हें टिळकानीं त्यावेळीं तेव्हाच ओळखलें; आणि मॅजिस्ट्रेटी जुलमाचे पायीं आत्मयज्ञ करण्यास जे तयार असतील त्यांनीं या चळवळींत पुढे यावें, असें स्वयंसेवकाना त्यांनीं बजावलें. त्यावेळीं एक

दिवस स्वयसेवकांनीं मॅजिस्ट्रेटी हुकूम तोडला, व पुढें पिकेटिंगचें काम बंद पडलें. पुण्याच्या पहिल्या पिकेटिंगच्या वेळीं दंडाची बहुतेक सर्व रक्कम 'केसरी' ऑफिसातून भरणा करण्यास त्यावेळीं लो. टिळक यांनीं कमी केलें नाहीं; पण चळवळ पुढें चालत नाहीं याबद्दल त्यांच्या मनास अत्यंत वाईट वाटलें, व इतराच्या मदतीची अपेक्षा न करतां केवळ फकिरी वृत्तीनें आत्मयज्ञ करण्यास प्रवृत्त होणाऱ्या स्वयसेवकांचा समूह उत्पन्न झाल्याशिवाय हा मॅजिस्ट्रेटी जांच संपावयाचा नाहीं, असें त्याच्या मनाने पक्कें घेतले. आज पंधरा वर्षांनतर लो. टिळक याना पाहिजे होती ती समूहाच्या आत्मयज्ञाची स्थिति प्राप्त झाली आहे. शातता राखण्याचा बोजा आपल्या शिरावर घेणें, आणि दुस-ऱ्यावर अवलंबून न राहता आत्मयज्ञ करू पाहणाऱ्या स्वयसेवकाचा भरणा भरपूर असणें, या गोष्टीची वाण त्यावेळीं लोकमान्य टिळकाना भासली होती, व तशी वाण पुढे भासूं नये म्हणून त्याचे एकसारखे प्रयत्न चालू होते. अत्याचाराचा दोष आपल्या माथीं मारून आपल्या मार्गात नसते अडथळे उभे करण्यांत येतील हें लोकमान्याना माहीत होतें, आणि कुशल सेनानायक या नात्यानें आत्मयज्ञाच्या लढाईंत हे अडथळे टाळण्यास जपलें पाहिजे, असें त्याचें मत होतें. होमरूलची किंवा स्वराज्याची चळवळ त्यानीं सुरू केल्यानंतर, चिरोलसाहेबांवर फिर्याद करण्यात लो. टिळक याचें धोरण कोणतें होतें ? आत्मयज्ञाच्या लढाईंत मॅजिस्ट्रेटी जुलमाची बाब एका बाजूस ठेवून व अत्याचाराची बाब पुढें आणून भलत्याच दिशेनें लढाईच्या ओघास वाहत जाण्यास भाग पाडणे, हा नोकरशाहीचा नेहमींचा कावा आहे, हें लो. टिळक ओळखत होते; आणि असल्या पेंचांतून आपणांस मुक्त होतां यावें म्हणून चिरोल साहेबाच्या खटल्याची त्यांनीं उभारणी केली. धारवाडच्या पिकेटिंगची हकीकत, मदुरेच्या पिकेटिंगची हकीकत किंवा इतर दंग्याधोप्याची हकीकत वाचली असता समूहाच्या आत्मयज्ञाच्या लढाईच्या

वेळीं लढाईची मुख्य जागा सोडून व आडरानांत लढवय्यांना पसगतीनें नेऊन, अत्याचाराच्या क्षेत्रावर उभी राहून नोकरशाही लढाई कशी खेळते, हें सर्वांच्या ध्यानीं आल्यावाचून राहणार नाहीं! रणक्षेत्र नोकरशाहीला बदलतां येऊं नये म्हणून लोकमान्यांनी चिरोलसाहेबावरील खटल्याचा एवढा अट्टाहास केला. व्यक्तीची निंदा चिरोलसाहेबांनी कितीहि केली तरी त्याची पर्वा त्यांना नव्हती, करावयाचें एक व बाहेरून सोंग आणावयाचें निराळें, असल्या धूर्तपणाचा किंवा कपटवृत्तीचाहि हा डाव नव्हता. स्वराज्याच्या राजकारणांत व्यक्तीच्या किंवा समूहाच्या आत्मयज्ञावर जेथें यश मिळवावयाचें असतें तेथें आत्मयज्ञाच्या भूमीशिवाय इतर आखाड्यांत पळून जाण्यास प्रतिस्पर्ध्याला वावच ठेवतां कामा नये, असा झुंजेचा मुख्य नियम आहे. हा नियम आपल्या एकट्या व्यक्तीच्या आत्मयज्ञाकरितां लो. टिळक पाळीत असत. प्रतिस्पर्ध्याला आसन बदलतां येतां कामा नये, या पद्धतीचें महत्त्व त्यांना पूर्णपणें कळून चुकलें होतें, आणि हें महत्त्व ओळखूनच, चिरोल-साहेबाच्या खटल्याचे पायीं लाखो रुपये खर्च करण्यास त्यांनी मागें पुढें पाहिलें नाहीं. असल्या प्रसंगीं हिंदी लोकांच्या पदरीं यश बांधण्यास नोकर-शाही कसची तयार होणार? विलायतेतील चिरोल साहेबाच्या खटल्यांत नोकरशाहीनें टिळकांना यश येऊं दिलें नाहीं, आणि आज महात्मा गांधी यांनीं शांततेच्या व्रताच्या नियमांनी सर्व कार्यक्रम गुरफटून टाकला असला तरी महात्मा गांधी यांच्यामुळेच पूर्वीहून अधिक अत्याचार व दंगेधोपे होत आहेत, असें निःशंकपणें असेंब्लीमध्यें प्रसिद्ध करून, नोकरशाही मॅजिस्ट्रेटी जुलमाच्या जोरावर, समूहाच्या आत्मयज्ञाच्या लढाईंत रणक्षेत्रांतून पळ काढून अत्याचाराच्या भूमीवर तलवार उपसून उभी राहूं पहात आहे! लो. टिळक यांच्या एकट्याच्या आत्मयज्ञाच्या चरित्रांत जे अडथळे आले आणि त्या अडथळ्यांना दूर करण्याकरितां त्यांनीं आपल्या स्थिर बुद्धीनें जे

धोरण आखलें, त्या अडथळ्यांचा व धोरणांचा नीट विचार करून, समूहाच्या आत्मयज्ञाकरिता लोकांना मार्गदर्शक असे नियम घालून देण्याकरिता जर कमिशन नेमण्यात आलें, तर साप्रतच्या राष्ट्रीय निशाणाच्या चळवळीमध्यें कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनीं जे नियम घालून दिले आहेत तेच नियम बरोबर आहेत असें म्हटल्यावांचून सदर कमिशनला गत्यतर राहणार नाहीं. समूहाच्या आत्मयज्ञाचा कार्यक्रम कोणत्या नियमांना अनुसरून चालला पाहिजे, हें ठरविण्याचें लोकसंग्रहाचें काम म्हणजे लो. टिळक याचें राजकीय चरित्र होय. हें ध्यानीं ठेवून व त्याच्या चरित्राचा वारवार विचार करून साप्रतच्या समूहाच्या आत्मयज्ञास निरनिराळ्या प्रकारें मदत करणें इष्ट आहे, असेच त्याची पुण्यतिथि त्याच्या सर्व अनुयायांनीं निक्षून सागत आहे.

---

# * राष्ट्रीय निशाणाचा विजय



गेले शनिवारीं म. गांधी पर्वाचे दिवशीं नागपुरास दे. वल्लभभाई पटेल व बाबू राजेंद्रप्रसाद यानीं कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीच्यातर्फे राष्ट्रीय निशाणाच्या अब्रूकरिता चाललेली सत्याग्रहाची चळवळ यशस्वी रीतीनें परिसमाप्त केली. सत्याग्रहाच्या चळवळींत अशा प्रकारें यश मिळविण्याचें भाग्य फार थोडयाच्याच कपाळीं लिहिलेलें असतें! अकालींच्या चळवळीनतर राष्ट्रीय निशाणाच्या चळवळीनें हें उत्तम यश मिळविलें आहे. ता. १७ रोजीं मॅजिस्ट्रेटी हुकमाची मुदत संपलेली होती. पुन्हां मॅजिस्ट्रेटी हुकूम पुढील दोन महिन्याकरितां काढण्यात येणार नाहीं, असें नागपूरच्या सरकारनें जाहीर केले होते. तेव्हा ता. १७ पासून राष्ट्रीय निशाणाच्या चळवळीला नवें वळण तरी लागणार, किंवा चळवळ यशस्वी तरी होणार, असे गेल्या आठवडयातच सिद्ध झालें होतें. श्री. वल्लभभाई पटेल यानीं वर्किंग कमिटीच्यातर्फे परिसमाप्तीच्या वेळेचें जे जाहीर पत्रक प्रसिद्ध केलें आहे त्यात असे म्हटलें आहे कीं, गांधी–पर्वाची १८ वी तारीख शनिवारी पडल्यामुळे नेहमीची शनिवारची सुट्टी सत्याग्रहाला न घेता शुक्रवारीं सुट्टी घेऊन शनिवारीं राष्ट्रीय निशाणाची मिरवणूक काढण्यात यावी, असें वर्किंग कमिटीच्या मडळींनीं ता. १६ रोजींच ठरवून टाकलें. मनाईचा मॅजिस्ट्रेटी हुकूम जर नाहीं, तर कोण कोणास अडथळा करू शकणार ? गर्दीच्या निमित्तानें पोलिस त्रास देऊं शकतें; पण गर्दी करणें हा राष्ट्रीय निशाणाच्या चळवळींतील हेतूच होऊ शकत नाहीं. तेव्हा १८ तारखेच्या मिरवणुकींत ठराविकच शेसवाशे इसमांनीं जावयाचें, इतरांनीं जाण्याची

* नवाकाळ, ता. २१ आगस्ट १९२३

जरूरी नाहीं असा निर्बंध मिरवणुकीसंबंधाच्या जाहीर पत्रकात दे. वल्लभभाई पटेल यांनीं घातला. कोणाचें मन दुखविलें जाईल, कोणाला खिजविल्यासारखें होईल, अशा तऱ्हेचे दोष देण्यास जागा राहू नये म्हणून सिव्हिल लाइन्समधून ही मिरवणूक जातांना होईल तितकी निमूटपणें मिरवणूक जावी, असेंहि स्वयंसेवकाना कळविण्यात आलें. आपण काहीं चोरून मारून करीत आहों किंवा फसगमतीनें डाव साधीत आहोंत, असें म्हणण्यास कोणासहि जागा राहू नये म्हणून अमक्याच वेळीं अमक्याच रस्त्याने सिव्हिल लाईन्समधून ही मिरवणूक जाईल, असें जाहीर पत्रकात स्पष्टपणें जाहीर करण्यात आलें. सिव्हिल लाइन्समधील जे रस्ते मिरवणुकीसाठीं पसत करण्यात आले ते रस्ते दे. वल्लभभाई पटेल यानीं पसत केलेले होते. पोलिस अधिकारी किंवा मॅजिस्ट्रेट याच्या मर्जीचा या पसंतीशीं काही सबध नव्हता. ता. १८ रोजीं निघालेल्या मिरवणुकीचें वरील तऱ्हेचें जाहीर पत्रक ता. १७ रोजींच नागपुरात चोहोंकडे वाटून प्रसिद्ध करण्यात आलें होते. पोलिस, मॅजिस्ट्रेट व सरकार याच्या माहितीकरिता सदर हस्तपत्रके त्यानाहि देण्यात आलीं होती. मॅजिस्ट्रेटी हुकूम पुढे न काढता जर १८ तारखेच्या मिरवणुकीस पोलिसानें हरकत घेतली, तर तसली हरकत दूर होण्याकरिता सत्याग्रहाचा रोजचा आत्मयज्ञ पुढें चालविण्यात येईल असे आव्हानपूर्वक अधिकाऱ्याना कळविण्यांत आलें होतें. दे. वल्लभभाई पटेल याचा हा जाहीरनामा प्रसिद्ध होण्याला आणि पोलिस ॲक्टच्या ३० कलमाखाली १५ दिवसपर्यंत आम्हीं मिरवणुकीस मनाई करणार आहों असें पोलिसाकडून जाहीर होण्याला एकच गाठ पडली. गर्दी, दंगाधोपा, लोकाना खिजविणें असल्या प्रकारासंबधानें नागपुरास गेले तीन चार महिने सत्याग्रह मडळाकडून अत्यत खबरदारी घेण्यात येत असल्यामुळें दग्याधोप्याच्या किंवा तसल्या इतर कारणानें मिरवणुकीस पोलिसनें अडथळा करण्यास मुळीं सवडच नव्हती.

ता. १८ रोजीं निघालेल्या मिरवणुकीनें पोलिसची अगाऊ परवानगी घेत-लेली नव्हती. आपला कार्यक्रम व्यवस्थित रीतीनें छापून ता. १७ रोजीं दे. वल्लभभाई पटेल यांनीं प्रसिद्ध केला होता. अगाऊ परवानगी घेतली नाहीं या मुद्यावर पोलिस मनाई करील असें वाटलें होतें, पण आपला मूर्ख-पणा आणखी १५ दिवस लांबविण्यांत अर्थ नाहीं, असे नागपूरच्या नोकर-शाहीला वाटलें, आणि ता. १८ रोजींची राष्ट्रीय निशाणाची मिरवणूक सिव्हिल लाईन्समधून दे. वल्लभभाई पटेल व बाबू राजेंद्रप्रसाद यांनीं पसंत केलेल्या रस्त्यानें निर्विघ्नपणें पोलिसनें जाऊं दिली. सत्याग्रहाचें काम संपलें, नागपूरास ता. १८ रोजीं मोठें यश मिळालें! १६००–१७०० सद्‌गृहस्थ आपखुषीनें वर्ष सहा महिन्याच्या कैदेंत जाण्याची किंमत भरून नागपूरचें हें यश खरेदी केलें आहे. शेट जम्नालाल बजाज याच्या एक-टयाच्या स्फुरणामुळें या चळवळीस एकदम राष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें. शेट जम्मालाल बजाज हे स्वतःचा आत्मयज्ञ करण्यास तयार झाल्यामुळेंच राष्ट्रीय निशाणाचें महत्त्व, त्याच्या अब्रूसंरक्षणापासून राजकीय एकीच्या दृष्टीनें राष्ट्राचे होणारे फायदे, आणि आत्मयज्ञाच्या बंधनानें बाधण्यात येणारी निरनिराळ्या प्रातातील निरनिराळ्या राष्ट्रभक्ताची जूट या गोष्टी आज प्रत्यक्षपणें सर्वांच्या अनुभवास आल्या आहेत. अनुमानानें व तर्कानें या गोष्टी लोकापुढें मांडणें निराळें, आणि लोकानीं स्वतः तसे वागून या गोष्टींचा अनुभव स्वतः घेऊन लोकाना प्रत्यक्ष गुण येणें निराळें! अकालींच्या सत्या-ग्रहानें प्रत्यक्ष सिद्धि लोकापुढें उभी केली, पण अकालींच्या सत्याग्रहाला राजकीय स्वरूप कोणी दिलें नाहीं. धार्मिक हेतूनें व धार्मिक कारणाकरिता सदर सत्याग्रह महात्मा गाधी याच्या असहकारितेच्या चळवळींतील धोरणाला अनुसरून करण्यांत आला. नागपूरच्या राष्ट्रीय निशाणाच्या सत्याग्रहाची गोष्ट तशी नाहीं. राष्ट्रप्रेम व राजकीय एकी, या दोन बाबींना धरून राष्ट्रीय निशाणाची

उभारणी करण्यांत आलेली आहे.राष्ट्रप्रेम व्यक्त करण्याचें एक बाह्य चिन्ह याच दृष्टीनें सर्व लोक राष्ट्रीय निशाणाकडे आज पहात आहेत. राष्ट्रशक्ति लोकांत उत्पन्न करण्याचें सामर्थ्य या निशाणात आहे, अशी खात्री दीड दोन हजार लोकाच्या कारागृहवासानें आता सर्वांना पटविली आहे. राजकीय एकीच्या दृष्टीनें निरनिराळ्या प्रातातील स्वयसेवक धर्मक्षेत्राला जसे जावे त्याप्रमाणें आज नागपुराच्या तुरुगात स्वेच्छेनें जाऊन पडले आहेत. राष्ट्रीय निशाणाला सिव्हिल लाईन्समधून नागपूरच्या सरकारनें जाऊ दिलें तरी शेट जम्नालाल बजाज वगैरे मडळीना ताबडतोब तुरुगातून सोडून देण्याइतकी दिलसफाई नागपूरचें सरकार दाखवील, असे आम्हास वाटत नाहीं. चूक कबूल करण्याची आता कोठे थोडीशी संवय सरकारला लागूं पहात आहे. सत्याग्रहाचें औषध असेच आहे कीं, योग्य पथ्य सभाळून जर तें औषध देण्यात आलें, तर हट्टी रोगावरहि तें लागूं पडल्याशिवाय रहात नाहीं. पथ्य न संभाळता जर औषध पुढें करण्यात आलें, तर तसाहि उलट गुण दिसून आल्यावाचून रहात नाहीं. सत्याग्रहाचें पथ्य कसें सभाळावयास पाहिजे व त्या सबधाचे नियम कोणते आहेत, हें राष्ट्रीय सभेच्या पुरस्कर्त्यांना अकालींच्या चळवळींतील व राष्ट्रीय निशाणाच्या चळवळींतील अनुभवानें आतां नीट समजलें आहे. प्रसंग आल्यास पधरा वीस हजार स्वयंसेवक केंद्रस्थानीं आत्मयज्ञासाठीं गोळा करण्याइतकी राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यात नवी शक्ति आहे, हेंहि प्रत्यक्ष अनुभवानें नागपुरास ठरलेलें आहे. गयेच्या कॉंग्रेसमध्ये कायदेभंगाच्या पूर्व तयारीस राष्ट्राने लागावें, असे ठरविण्यात आलें, ही तयारी कोठें आहे, व गेले आठ दहा महिने या पूर्वतयारीच्या दृष्टीनें राष्ट्रानें काय केले, असा कुत्सित प्रश्न कित्येक लोक विचारतात. वीस पंचवीस हजार आत्मयज्ञ करणारे स्वयसेवक राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्याना राष्ट्रीय सभेनें हाक मारली असता, मिळण्यास कमी पडणार नाहीं, असे

नागपूरच्या राष्ट्रीय निशाणाच्या चळवळीनें आज सिद्ध केलें आहे, राष्ट्रीय निशाणाचीच अब्रू राखली गेली आहे असें नव्हे तर राष्ट्रीय सभेचीहि अब्रू आज राखली गेली आहे. राष्ट्रीय सभेची वाताहत लवकरच लागेल म्हणून आनद मानणारे काहीं कौन्सिलवाले आहेत; पण त्याच्या आनंदावर राष्ट्रीय सभेला मिळालेल्या या विजयानें विरजण पडल्यावाचून राहणार नाहीं. सत्याग्रहाचें औषध लागू पडलें आहे, गुण येऊं लागला आहे, या मार्गानें एकेक गाठ तोडत व सोडत गेलें पाहिजे. शेट जम्नालाल बजाज वगैरे मडळींना काहीं दिवस कारागृहवासाचें दुःख नाहक या पुढे सोसावें लागणार, अशीं चिन्हें दिसत आहेत. पण या असल्या कारागृहवासामुळेंच राष्ट्रीय निशाणाची व राष्ट्रीय सभेची अब्रू आज साभाळण्यात आली असल्यामुळें, तुरुगातील त्याची या पुढील तपश्चर्या राष्ट्रास अधिक तेजस्वी करण्यास उपयोगी पडेल, यात तिळमात्र सशय नाहीं.

---

# * दिल्लीच्या कॉंग्रेसची तडजोड



प्रतिनिधींच्या सख्येच्या दृष्टीनें आणि लोकांच्या उत्साहाच्या दृष्टीनें दिल्लीची जादा कॉंग्रेस अगदी रोडकी झाली. हजार पधराशे प्रतिनिधी आणि हजार पंधराशे प्रेक्षक एवढाच समुदाय कॉंग्रेस मडपात जुळत होता. दिल्ली शहरात तर कॉंग्रेसविषयीं एक प्रकारची अनास्थाच दिसून येत होती. उत्साह उत्पन्न करण्याच्या दृष्टीनें दिल्लीची जादा कॉंग्रेस जरी फारशी उपयोगी पडली नाहीं, तरी तडजोड घडवून आणण्याच्या दृष्टीने या जादा कॉंग्रेसने विशेष महत्त्वाचें काम केलें आहे. काहीं तरी तडजोड घडून आली पाहिजे अशा बुद्धीनेंच प्रत्येकजण दिल्लीस गेलेला होता. मौ. महंमद अल्ली सुटून आलेले होते, आणि महात्मा गाधी याच्या कॉंग्रेसच्या पक्षाचा पुढारीपणा त्याजकडे गेलेला होता. कौन्सिलावर बहिष्कार घालण्यासंबधानें मौ. महमदअल्ली व डॉ. किश्लू हे दोघेहि दोन वर्षापूर्वीप्रमाणेंच आजहि कौन्सिलें नकोत असेच्च म्हणणारे दिल्लीस होते. आपण जी थुकी तोंडातून बाहेर थुकून टाकली त्याच थुकीला पुन्हा चाटत बसण्याचें काम जितके निंद्य आहे तितकेच सरकारनें आपल्या मागणीचा विचार केला नसताना पुन्हा कौन्सिलात जाण्याचा उद्योग करणें निंद्य होय, असे दिल्लींत मौ. महमदअल्ली यानी बऱ्याच प्रसगीं बोलून दाखविलें ! तडजोडीचा ठराव काय किंवा कायदेभगाचा ठराव काय, दोन्ही ठरावाच्या प्रसगीं मौ. महमद अल्ली किंवा डॉ. किश्लू यानीं कौन्सिलावर बहिष्कार घालण्यास उद्युक्त करणारीं अशींच भाषणें केलीं. कौन्सिलवाल्या पक्षाकडून कौन्सिलात जाण्याची तरफदारी राष्ट्रीय सभेच्या मंडपांत बहुतेक करण्यात आली नाहीं असें म्हटलें तरी चालेल. आमचा मार्ग तुम्हाला चुकीचा

---

* नवाकाळ, ता. २० सप्टेंबर १९२३

वाटत असला तरी थोडे दिवस आम्हाला संभाळून घ्या, असे म्हणण्यावरच कौन्सिलवाल्या पक्षाचा कटाक्ष विशेष होता! कौन्सिलांच्या बहिष्काराची छाया कॉंग्रेस मंडपांत पडून राहिली होती. सामान्यतः सर्वांचा कल कौन्सिल-वरील बहिष्काराच्या बाजूचाच होता. मग कौन्सिलांच्या बहिष्कारासंबंधानें करावयाची चळवळ अधांत्री ठेवण्याच्या तडजोडीला मौ. महंमदअल्ली वगैरे मंडळींनीं कशी समति दिली? अधांत्री ठेवण्याचा ठराव मुंबईस भरलेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमेटीनें पास केला होता, आणि सदर ठरावा-च्या बाहेर दिल्लीच्या जादा कॉंग्रेसनें कांहींहि तडजोड केलेली नाहीं. कौन्सिलात जाण्याची चळवळ कौन्सिलवाल्या पक्षानें स्वतःच्याच जबाबदारीवर करावयाची आहे; कॉंग्रेसच्या कमिट्यानीं या कामीं पैसाहि खर्च करावयाचा नाहीं, वेळहि खर्च करावयाचा नाहीं, आणि चळवळहि करावयाचीं नाहीं; कॉंग्रेसच्या तर्फे म्हणून काहींहि व्हावयाचें नाहीं! व्यक्तिशः ज्याला जसें बरें वाटेल तसें त्यानें वागावें अशा धर्तीची ही तडजोड आहे. कौन्सिलांत जाण्याचा मार्ग ज्याना पसंत वाटत असेल त्यानीं खुशाल स्वीकारावा, पण ज्याना तो पसंत वाटत नसेल त्यांनीं कॉंग्रेसच्या कार्याकरितां म्हणूनहि मतें देण्यास जाण्याची बिलकूल जरुरी नाहीं. कॉंग्रेसचें काम कौन्सिलबाहेरचें आहे. कौन्सिलांशीं संबंध कॉंग्रेस ठेवूं इच्छित नाहीं किंवा कौन्सिलामार्फत कामहि करूं इच्छित नाहीं; पण कौन्सिलात जाण्याची ज्यांना इच्छा आहे त्यांना कॉंग्रेसच्या मुख्य चळवळींत कामकाज करण्यास हरकत येऊं नये म्हणून, आणि कॉंग्रेसला झुगारून ही मंडळी कौन्सिलात गेली असा त्याचे कपाळींचा लोकापवाद टळावा म्हणून व्यक्तिशः स्वतःच्या जबाबदारीवर कौन्सिलात जाण्याची त्याना मुभा देण्यात आली आहे! कॉंग्रेसच्या विरुद्ध वागतात हा लोकापवाद टळला असता कायदेभंगाच्या चळवळींत सामील होण्यास दे. बं. दास वगैरे पुढाऱ्यांना सोयीचें होणारें असल्यामुळें, लोकापवादाचा

त्यांच्या कपाळींचा टिळा पुसून टाकण्यांत आला आहे. मुंबईस झालेल्या तडजोडीबाहेर ही तडजोड अधिक गेलेली नाहीं; पण कौन्सिलावरील बहिष्कारासंबंधानें इतपत तरी तडजोड कां मान्य झाली? मौ. महमद अल्ली, डॉ. किश्चल्, बाबू राजेंद्रप्रसाद, दे. वल्लभभाई पटेल, दे. गिडवानी वगैरे मंडळींनीं कौन्सिलबहिष्कारासंबधाचा एक प्रकारचा आपला पराभव होत आहे, असे कॉंग्रेसच्या मंडपात स्पष्टपणें जाहीर केले, आणि एकी व्हावी म्हणून हा पराभव आम्ही खाली माना घालून गिळतों आहों असेंहि त्यानीं सर्वांना निवेदन केलें! कौन्सिलवरील बहिष्कारासंबधानें अशी विल्हेवाट कबूल करण्याचें काय प्रयोजन होतें? दिल्लीच्या जादा कॉंग्रेसमध्यें मौ. महमद अल्ली यानीं जरी गयेच्या कॉंग्रेसप्रमाणें कौन्सिल बहिष्काराचा ठराव पुढें आणला असता तरी तो बहुमतानें पास झाला नसता म्हणून त्यानीं तडजोड केली, असे काहींचें म्हणणे आहे. प्रतिनिधींचीं मतेंच जर मोजलीं असतीं तर मौ. महंमद अल्ली याना दिल्लीस मताधिक्य मिळालेंच असतें असे नाहीं. मताधिक्याचा कांटा दे. ब. दास याच्या बाजूला झुकल्यासारखा होता; पण या झुकण्यात विशेष अर्थ नव्हता. पधराशे सोळाशें प्रतिनिधींत बंगालचेच सातशें प्रतिनिधी हजर होते! बंगालच्या निवडणुकीसंबधानें तंटा उपस्थित होऊन अखेर निकाल दे. बं. दास याच्या बाजूचा झाल्यामुळें बंगालचे कौन्सिलवाले तेवढे पाच सहाशे कॉंग्रेस मंडपांत हजर होते, आणि बाबू शामसुंदर चक्रवर्ती याच्या बाजूच्या प्रतिनिधींना मज्जाव करण्यात आला होता. अशा तऱ्हेची एकतर्फेची निवडणूक राष्ट्रीय सभेच्या कामात अधिक फाटाफूट उत्पन्न करण्यास कारणीभूत झाल्यावांचून राहणार नाहीं, व त्यामुळें बाबू शामसुंदर चक्रवर्ती याच्या बाजूच्या प्रख्यात पुढाऱ्यांनाहि दिल्लीच्या कॉंग्रेसच्या मंडपात येता आलें नाहीं, अशा तऱ्हेचे दुःखोद्गार या निवडणुकीचा निकाल

देतांना पंचानीं काढलेले आहेत. बंगाल्यात दे. ब. दास याच्या पक्षाचें खरें वर्चस्व नाहीं आणि दिल्लीच्या कॉंग्रेसमध्यें हजर राहिलेल्या बंगालच्या प्रतिनिधींत बगालपेक्षा बनारसचा भरणा विशेष होता, अशीहि तक्रार आहे. अशा स्थितींत खरा विचार करण्याला बंगालचीं हीं पाचसहाशें मतें एकाबाजूस काढून ठेवणें जरूर होतें. बगालचीं हीं पाचसहाशे मतें एका बाजूस काढून ठेवून बाकीच्या हजारबाराशें प्रतिनिधींचीं मते जर घेण्यात आली असतीं तर दोन तृतियाश मतें कौन्सिलच्या बहिष्काराच्या बाजूचीं व एक तृतियाश मतें कौन्सिलवाल्याच्या बाजूचीं दृष्टीस पडलीं असतीं. गयेच्या राष्ट्रीय सभेनतर पुढाऱ्यात जरी चलबिचल झालेली असली, तरी सामान्य लोकमतात चलबिचल झालेली नाहीं, असेच वरील आकडयावरून सिद्ध होतें. दिल्लीच्या जादा कॉंग्रेसच्या मडपात कौन्सिल सबधानें तडजोड न होता दोन तट होऊन गयेप्रमाणें मतें घेण्यावर जर पाळी आली असती, तर पाच सहाशे माताचा एक गठ्ठा दे. बं. दास याच्या हाती सापडल्यामुळे माताधिक्य कदाचित् त्याच्या बाजूचें थोडेसे झुकलें असतें, हे खरे आहे. मताधिक्यानें दे. बं. दास याच्या बाजूचा जरी निकाल लागला असता, तरी आपल्या मताला चिकटून राहून आपल्या माताची चळवळ कॉंग्रेसच्या कमिटयाच्या मार्फत जरी नाही तरी स्वतःच्या सस्थाच्या मार्फत करण्यास मौ. महमद अल्ली वगैरेंना कोणती हरकत होती? मुबईचा अधात्री ठेवण्याचा ठराव पास झाल्यानतर स्वतःचीं मतें सोडून देण्यास दे. वल्लभभाई पटेल वगैरे मडळी जशी तयार झाली नव्हती तशी आजहि का तयार झाली नाहींत? दे. ब दास याच्या हातातील पाच सहाशें बगाल्याच्या गठ्ठयाला भिऊन त्यानीं तडजोडीचा मार्ग स्वीकारला असे मुळींच नाहीं. कायदेभगाच्या चळवळीसंबंधानें तडजोड अधिक उपयोगी पडणारी आहे, असे मौ. महंमद अल्ली व डॉ. किश्लू यांच्या

दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें तडजोडीचा मार्ग स्वीकारणें त्याना श्रेयस्कर वाटलें. मुंबईच्या ऑल इंडिया कॉंग्रेसच्या वेळेपेक्षा आज नवी स्थिति ती कोणती झाली ? मुंबईच्या ऑल इंडिया कॉंग्रेसच्या वेळीं जर तडजोड या पुढाऱ्यानी मान्य केली असती तर कायदेभंगाच्या चळवळीला अधिक मदत झाली असती का ? या प्रश्नास असें उत्तर आहे की, पुढील वर्षसहा महिन्यात लहान मोठया कायदेभगाच्या चळवळीना उत्तेजन देऊन होईल तितक्या लवकर कायदेभगाची मोठी चळवळ सुरू करण्याचा जो बेत मौ. अहंमद अल्ली व डॉ. किश्चलू यानीं सुटून आल्यानतर केलेला आहे, तो बेत मुंबईच्या तडजोडीच्या वेळीं पुढाऱ्यापुढें नव्हता. स्वराज्य मिळविल्यासारखे करून महात्मा गाधी यांना आम्ही आमच्या उद्योगानें सोडविलें, अशा प्रकारची मोठी उमेद मौ. महमदअल्ली व डॉ. किश्चलू यानीं धरलेली आहे. येरवडयाच्या तुरुंगाची किल्ली हुडकून काढून स्वराज्यामार्फत महात्मा गाधी याना सोडविण्याच्या कार्यक्रमाला मौ. महमदअल्ली यानी स्वतःस वाहून घेतलें आहे. लहान सहान कायदेभगाचें शिक्षण प्रत्येक प्रातात सर्व लोकाना देत राहून दोन तीन वर्षांचे आत स्वराज्याची तयारी गाठण्याइतक्या मोठया प्रमाणावर कायदेभग सुरू करण्याचा हा कार्यक्रम आहे. मौ. महंमद अल्ली व डॉ. किश्चलू याच्या या कार्यक्रमाला पूर्णपणें उचलून धरण्यास दे. ब. दास, पडित मोतिलाल नेहरू, डॉ. अनसारी वगैरे मडळी अनुकूल आहेत. प्रातिक कायदे–कौन्सिलांत मताधिक्य होऊन तेथील टक्करीचा उपयोग करून घेण्याची आशा कौन्सिलवाल्या पक्षानें आता सोडल्यासारखीच आहे ! असेंब्लीमध्ये काहीं नेमस्ताच्या सहाय्यानें चागल्या टक्करी देतां येतील एवढीच आशा दे. बं. दास यांना उरलेली आहे. असेंब्ली मोडतां आली तर पहावी, एवढयाकरिता हा उद्योग नवबरपर्यंत दे. ब. दास करणार आहेत. असेंब्लींत मताधिक्य मिळून असेंब्ली मोडल्याचें पुण्य आपणास

मिळेल, अशी खात्री दे. बं. दास याना आज नाहीं. कौन्सिलवाल्या पक्षांतील बरेच लोक कौन्सिलें मोडण्याच्या ध्येयाच्या विरुद्ध आहेत ! अशा स्थितींत नवंबरात निवडणुकी झाल्यानतर दे. ब दास याची कौन्सिलमार्फत काम करण्याच्याबाबींत चागली निराशा होईल, अशीं आज स्पष्ट चिन्हें दिसत अहेत. अशी निराशा होण्याची स्पष्ट चिन्हें दिसत असताना नवंबर-नंतर दे. बं. दास यांनीं कोणत्या मार्गाला लागावयाचें याचा विचार करणें कौन्सिलवाल्या पक्षाच्या पुढाऱ्याना भाग नाहीं काय ? कौन्सिलवाल्या पक्षाच्या पुढाऱ्यानीं या सबधाचा विचार दिल्लीस केला, आणि लहान सहान कायदे-भग कोठेहि सुरू झाले असता त्याना उत्तेजन देऊन मोठया कायदेभगाला राष्ट्राला तयार करण्याच्या मार्गाला लावणें अत्यत जरूरीचें आहे, असे दे. ब. दास यानीं मनानें दिल्लीस पक्के घेतलें. कौन्सिलाच्या मार्फतच आपण हें सर्व घडवून आणूं अशी आशा उरलेली नसल्यामुळें नवबरनतर मौ. अहमद अल्ली व डॉ. किश्लू याच्या मार्गानें जाण्याची जरुरी दे. ब. दास याना विशेष वाटली. कायदेभगाच्या ठरावाची जरूरी दे. बं. दास याच्या मनाला पूर्णपणे पटल्यामुळें या कामीं त्याची पक्की मदत मिळवी म्हणून मौ. महमद अल्ली व डॉ. किश्लू हे कौन्सिलात शिरण्याच्या प्रश्नासबधानें मुबईच्या तडजोडीस राजी झाले. कौन्सिलात शिरण्याच्या बाबींत पाचशे बगाली मताचा गठ्ठा दे. दास याच्या हातीं असताना स्वत:ला पाहिजे होता तसाच ठराव दे. बं. दास यानीं का करून घेतला नाहीं ? देशबधूंना तसा ठराव करून घेता आला असता, नाहीं असें नाहीं; पण काय बिघडतें म्हणून त्यानीं तसा ठराव करून घेतला नाहीं. कोणतें कार्य बिघडतें ? असेंब्ली जर मोडता आली नाहीं, किंवा असेंब्लींतील टक्करीच्या मार्फत जर देशात प्रचड कायदेभगाची चळवळ सुरू करता आली नाहीं तर आपलें कार्य बिघडून जाते, असेच दे. बं. दास यांचें स्पष्ट मत आहे.

नोकरशाहीशीं केव्हां सहकारिता तर केव्हां असहकारिता करण्याचें पुण्याचें मत दे. बं. दास याना बिलकूल मान्य नाहीं ! प्रचंड कायदेभंगाशिवाय काहीं होणार नाहीं, असेंच त्याचें ठाम मत आहे; व दिल्लीच्या कॉंग्रेसच्या मंडपांत हें मत शक्य तितक्या स्पष्ट शब्दात बोलून दाखविण्यास त्यांनीं बिलकूल कमी केलें नाहीं. नवंबरनतर मौ. महमद अल्ली याच्या कायदे-भगाच्या चळवळींत सामील होण्याचें वचन दे. बं. दास यानीं उघडपणें दिल्यामुळें ज्या कारणाकरिता देशबधूंनीं आपल्या हातांतील पांचशें बगाली मताचा गठ्ठा उपयोगात आणण्याचें नाकारलें, त्याच कारणाकरिता. मौ. महंमद अल्ली यानीं कौन्सिलावरील बहिष्कारासबंधानें थोडें पडतें घेण्याची कबुली दिली ! या तडजोडीमुळें कायदेभंगाच्या चळवळीस जोर येणार असून हिंदु–मुसलमानातील तेढ आपोआप नष्ट होणाऱ्या मार्गाला लागणारी आहे. इतकेंच पैसे जुळविल्यावर, इतक्याच स्वयसेवकानीं नावें नोंदविल्यावर, इतराची तयारी झाली आहे किंवा नाहीं तें पाहून, अशा प्रकारच्या आडकाठया कायदेभगाच्या चळवळीच्या मार्गात दिल्लीच्या ठरावानें ठेविलेल्या नाहींत. उद्या करा, नाहीं तर तीन महिन्यानीं करा, शांततेच्या कायदेभगाची चळवळ एकसारखी चालू ठेवण्याची जबाबदारी मौ. महंमद अल्ली याच्या शिरावर दिल्लीच्या जादा कॉंग्रेसनें ठेविली आहे. आणि या कामीं पूर्णपणें मदत करण्याचें अभिवचन दे. बं. दास वगैरे पुढाऱ्यानीं मौलाना महमद अल्ली यांना दिलें आहे. अशा स्थितींत आपले बारीक सारीक मतभेद एका बाजूस ठेवून सर्व हिंदी राष्ट्रानें एकमतानें व एकदिलानें मौ. महमद अल्ली याच्या चळवळीस उचलून धरण्यास पुढें येणे आज अत्यंत जरुरीचें आहे.

---

# * सन्मान कोणाचा करावयाचा ?

मुंबईच्या कार्पोरेशनमध्ये मावळत्या गव्हर्नर साहेबाना मानपत्र देण्याचा प्रश्न थोडासा मागे पडला आहे. मुबईचें लोकमत असल्या सन्मानास विरुद्ध आहे म्हणून हा प्रश्न पुढे आणणें गव्हर्नरसाहेबाच्या स्तुतिपाठकासहि बरेंच कठीण झालें आहे. मुबईचें लोकमत कोणत्या बाजूचें आहे, हें गेल्या चारपाच दिवसात स्पष्ट झालेलें असल्यामुळें आणखी एक दोन आठवडे तरी मुबईच्या कॉर्पोरेशनमध्ये हा प्रश्न पुढें येईलसे वाटत नाहीं. तथापि ऑक्टोबरच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या आठवडयात या प्रश्नाची चर्चा पुन्हा सुरू होईल असे दिसतें. मुबईच्या कॉर्पोरेशनमध्यें निरनिराळे वशिले लावून मताधिक्याची मोट कशीतरी जर बाधली गेली तर लोकमत इतकें खवळलें असताना मावळत्या गव्हर्नर साहेबानीं तरी हें असलें मानपत्र कसे स्वीकारावें ! मानपत्र काय कोणीहि देऊं शकतो ! गणेश खिडींतील किंवा मलबार हिलवरील बटलरहि एखादा सोन्यारुप्याचा करडक मानपत्रासह मावळत्या गव्हर्नर साहेबाना अर्पण करू शकेल, नाहीं असें नाहीं; पण हा आपला सन्मान प्रजाजनाच्यातर्फे होत आहे, असें सदर मानपत्र स्वीकारताना गव्हर्नर साहेबानीं कसें मानावयाचें ! सार्वजनिक रीतीनें सन्मान करण्याची पद्धत अतःकरणाचा ओलावा असल्या-शिवाय हास्यास्पद ठरत असते. मुंबई शहराच्या अंतःकरणात ओलावा नाहीं, हें गेल्या दोन आठवडयातील गडबडीवरून सिद्ध झालें आहे. मानपत्र देऊ नये असे म्हणणारानीं आपलें मत मुबई शहरास मान्य आहे, असें सिद्ध करून दाखविलें आहे. निरनिराळ्या प्रकारानीं मुंबई शहराचें

* नवाकाळ, ता. २९ सप्टेंबर १९२३

लोकमत मावळत्या गव्हर्नर साहेबाना द्यावयाच्या मानपत्राविरुद्ध प्रकट होत असताना गव्हर्नर साहेबाचा कैवार घेऊन कोणीहि अनुकूल मत प्रकट केलें नाहीं, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. गव्हर्नरसाहेबांच्या मानपत्राविरुद्ध गवगवा चालला असताना, गव्हर्नरसाहेबाना मानपत्र दिलेंच पाहिजे अशा प्रकारच्या आग्रहाचा एकहि लेख मुंबईच्या टाइम्सनें देखील लिहिलेला नाहीं. गव्हर्नरसाहेबाच्या सन्मानाकरता अमुक करा तमुक करा, म्हणून अंतःकरणपूर्वक खटपट करणाराचें मत लोकाना ग्राह्य होण्यासारखें जरी नसलें तरी सदर उद्योग करणाराच्या अंतःकरणांत ओलावा असावयास नको काय ? मानपत्राचा ठराव आला तर आला पुढे, नाहीं तर नाहीं; झाला पास तर झाला पास; अशी अनास्था मानपत्रवाल्यात दृष्टीस पडत आहे. आपला ठराव फेटाळला गेला काय, किंवा पास झाला काय, दोहोंबद्दल बेफिकिरी दाखविण्यात एकप्रकारची फुशारकी मारण्यांत येत आहे. कळकळ म्हणून मानपत्रवाल्यात कोठेंच दृष्टीस पडत नाहीं. वेठीला पकडलेला मनुष्य जसे ओझें वहात असतो, आणि आपल्या पाठीवरील माल वाटेत धक्का लागून पडला असता इतराबरोबरच बेफिकीरपणानें जसा हासत उभा रहातो, याप्रमाणेंच मानपत्राचें ओझे शिरावर घेणाराचीं आज स्थिति आहे. हें ओझे खाली पडून त्याचीं बंधनें जर तुटलीं तर कशी गंमत झाली म्हणून इतराबरोबरहि हासण्यात हे सामील होत आहेत ! खेळाडू ज्या प्रमाणें जयापजयाविषयीं तितकासा तत्पर नसतो, व सर्वांबरोबर हासण्या-खेळण्यास नेहमी उत्सुक असतो, तशाच वृत्तीनें मानपत्र देण्याचा खेळ खेळण्यात येत आहे. खेळाच्या पलीकडे अंतःकरणाची कळकळ यात नाहीं. बऱ्या रीतीने आपण खेळले, आपण व्यवस्थेशीर उडी मारून दाखविली, मग या बाजूचा जय झाला काय किंवा त्या बाजूचा जय झाला काय, दोनहि प्रसंगीं

स्मितहास्य करण्यास हे तयारच ! असा वृत्तीच्या लोकांनीं उद्या मुबईच्या कॉर्पोरेशनमध्यें मताधिक्य करून जर मानपत्र देण्याचा ठराव पास करून घेतला तर तें मानपत्र कोणीहि स्वाभिमानी गव्हर्नर कधीहि स्वीकारणार नाहीं. अशा जुलमाच्या रामरामांत गव्हर्नरसाहेबांना आनंद तरी कोठून होणार ? लॉर्ड सिडनहॅम याच्या कारकीर्दीचे अखेरीस त्यांच्या भक्तांनीं पुतळा तयार करण्याकरितां वर्गणी केली आणि पुतळाहि तयार झाला. पण त्या पुतळ्याकडे कोणीहि ढूंकून पहात नाहीं. असल्या अशुभ पुतळ्याचें दर्शन घेण्याची कोणास इच्छा होणार ? जरीमाईचें देऊळहि बांधण्यांत येतें, तशांतलाच लॉर्ड सिडनहॅम याचा हा पुतळा आहे. कोणत्याहि पिशाच्चाला दहींभात व लिंबलोणी अर्पण करण्यात येतें, तशांतलींच ही गव्हर्नर साहेबांचीं मानपत्रें आहेत. पिसाच्चाचा सन्मान करण्यासारखी वृत्ति मानपत्र देणाराची आहे किंवा कसे, हें नीट तपासून घेतल्याशिवाय हल्लींच्या काळीं कोणाहि अधिकाऱ्यानें कोठेंहि मानपत्र घेऊं नये. कारण असल्या मानपत्रामुळें अधिकाऱ्याच्या अधिकाराला उजाळा येण्याऐवजीं काळीमाच अधिक लागत असतो. स्वतःच्या अधिकाराची दुष्कीर्ति कायमची पुढें चालणार नाहीं, येवढया गोष्टीला तरी जुलमी अधिकाऱ्यांनीं जपणें जरुरीचें नाहीं काय ? जेथें अतःकरणात कळकळ नाहीं; तेथें मानपत्राचें सोंग उभारण्यात आलें तर त्या सोंगामुळें दुष्कीर्ति अधिक पुढें चालते; आणि आपल्या मागून येणाऱ्या अधिकाऱ्यांचा बोज आपोआप कमी होऊं लागतो. मुंबईच्या कार्पोरेशननें उद्या जर मानपत्र देण्याचें ठरविलेंच तर तें मुंबईच्या गव्हर्नर साहेबांनी साफ घेऊं नये. मानपत्र देणाऱ्यांत कळकळ असती, तर ती कळकळ गेल्या पांच दहा दिवसांच्या हालचालींत कोठेंतरी दृष्टीस पडावयास पाहिजे होती ना ? मानपत्र दिलेंच पाहिजे; चांगलें कृत्य आहे; असल्या गव्हर्नरसाहेबांचा असला सन्मान

करावयाचा नाहीं तर सन्मान करण्याच्या पद्धतीचा जगात उपयोग तरी काय, अशा प्रकारच्या विचारांनीं एकाचें तरी अंतःकरण गेल्या पाच दहा दिवसांत पेटलेलें दिसून आलें काय ? गव्हर्नर साहेबांचा कैवार घेण्यासबंधानें आतांपर्यंत एकसारखा थंडावाच दृष्टीस पडत आहे. कसें बोलूं, काय बोलूं कसा ठराव पुढें आणूं, अशी कुचराई चाललेली आहे. गव्हर्नर साहेबाच्या व त्यांच्या भक्तांच्या कानांवर ही कुचराई आलेली नाहीं काय ? खरा विचार केला असतां असला थंडावा दृष्टीला पडणें अगदीं सहाजिक आहे, असे कोणाच्याहि ध्यानीं आल्यावांचून राहणार नाहीं. भक्त म्हणविणारामध्यें तरी उत्सुकता कोठून दृष्टीस पडावी ? महात्मा गांधीं यांना सहा वर्षांची शिक्षा ज्या गव्हर्नराचे कारकीर्दींत झाली, त्या गव्हर्नरचा सन्मान करा म्हणून लोकांना कोणच्या तोंडानें कोण सांगणार ? सिडनहॅम व इर्लीचें गव्हर्नर या जोडीच्या नावाचा उच्चार करणेंहि पाप समजलें जाईल, अशी स्थिति असताना सन्मान करण्यास कोण पुढें येणार ? मुसलमानांनीं कोणाचा सन्मान करावयाचा ? अलीबंधू व इतर मुसलमान पुढारी याच्या-वरील कराचीच्या खटल्याची हकीकत लोक विसरलें आहेत काय ? महात्मा गांधी याचा कार्यक्रम लोकाच्या हातून पूर्णपणें पार पडत नसेल, पण ज्याना आपण श्रेष्ठ साधूपुरुष समजतो त्यालाच गव्हर्नर साहेबांनीं तुरुंगात टाकलेलें आहे, याची आठवणहि बुजून जाण्याइतकें बुद्धिमांद्य लोकांत आहे, असें गव्हर्नरसाहेब समजतात काय ? धारवाड प्रकरणाचें स्मरण कर्नाटकला होण्याचे दिवस निघून गेले, असें अधिकाऱ्याना वाटत आहे काय ? मुळशीच्या सत्याग्रही कैद्यापैकीं दे. देव याच्या पाठीवर ओढलेल्या फटक्यांचे वण अदृश्य होण्याच्या पूर्वींच महाराष्ट्रातील लोक गव्हर्नरसाहेबांना मानपत्र कोणत्या करंडकांत द्यावयाचें याचा विचार करण्यास निमग्न होतील, असें अधिकाऱ्यांना कसें वाटेल ? तुरुंगाची शिक्षा भोगून बाहेर येणाराचा

सन्मान करण्याचा सांप्रतचा काल आहे. लाल लजपतराय, दे. बं. दास, पं. मोतीलाल नेहरू, अकालींचे पुढारी, व राष्ट्रीय निशाणाच्या चळवळीचे आधारस्तंभ जम्नालाल बजाज यांचा सन्मान सांप्रत लोक करीत आहेत. सन्मानांचा व मानपत्रांचा प्रवाह अशा रीतीनें वहात असतांना या पवित्र प्रवाहांत आपणहि स्नान करून घेण्याची इच्छा जुलुमी व पापी अधिकाऱ्यांनीं कां धरावी? अंतःकरणांत पश्चात्ताप उत्पन्न होऊन पापक्षालन करण्याकरितां असल्या गंगेंत स्नान करण्याचा अधिकार पतितांनाहि प्राप्त होतो हें खरें आहे. पण नोकरशाहीच्या अंतःकरणाची वृत्ति तशा रीतीनें बदलून जाईतों, नोकरशाहीनें असल्या मानपत्राच्या उलाढालींत कशास पडावें?

---

# * करणी आणि शिष्टाई



प्रांतिक कौन्सिलें व दिल्लीची असेंब्ली यांच्या निवडणुकी नोव्हेंबरचे प्रारंभाला व्हावयाच्या असून, निवडणुकीकरितां उभे राहिलेल्या उमेदवारांच्या याद्या आतां तयार झाल्या आहेत. या याद्याकडे पाहतां कोणत्याहि प्रांतिक कौन्सिलांत कौन्सिलवाल्या पक्षास बहुमत मिळण्याची मुळींच आशा नाहीं, असें दिसून येतें. दिल्लीच्या जादा कॉंग्रेसच्या वेळीं कौन्सिलवाल्या पक्षानें प्रांतिक कौन्सिलात बहुमत करण्याची आशा सोडून दिली, व हें करणें वस्तुस्थितीस धरून होतें असें आता स्वच्छ दिसत आहे. असेंब्लीमध्येंहि कौन्सिलवाल्या पक्षाचें बहुमत होऊ शकत नाहीं, असेंच उमेदवाराची यादी सांगत आहे. नव्या कौन्सिलांत व असेंब्लीमध्यें एकदर चार प्रकारचे सभासद दिसून येणार आहेत. पहिला प्रकार म्हणजे बगलबच्यांचा होय ! हे बगलबच्चे केवळ स्वतःच्याच फायद्यासाठीं कौन्सिलांत किंवा असेंब्लींत निवडून येण्याचा प्रयत्न करणार हें उघड आहे. नोकरशाहीच्या तंत्रानें वागावयाचें; नोकरशाहीची मर्जी संपादन करून घेऊन होईल तितका आपला फायदा करून घ्यावयाचा; आणि आपल्या इच्छेप्रमाणें घडून न आल्यास नोकरशाहीवर रुसल्यासारखें करून, केव्हां केव्हां मतें देण्याचें टाळून किंवा विरुद्ध पक्षाच्या बाजूनेहि मत देऊन आपल्या तोंडावरहि भाकरीचा एखादा तुकडा टाकावयास नोकरशाहीस सुचवावयाचें; हा बगलबच्यांचा क्रम आहे. बगलबच्यांचें स्वरूप अशा प्रकारचें असल्यामुळें निवडणुकीच्या वेळीं या बगलबच्याना निरनिराळ्या प्रकारची अप्रत्यक्ष मदत करण्यास व त्याच्या प्रीत्यर्थ स्वतःचें वजन पर्यायानें खर्च करण्यास

* नवाकाळ, ता. १३ आक्टोबर १९२३

नोकरशाही चुकणार नाहीं, हें उघड आहे. सरकारी वजन पर्यायानें कोणासाठीं किती खर्च करण्यांत येतें हें पाहिलें असतां, बगलबच्चा कोण हें समजण्यास अडचण पडत नाहीं. बडे श्रीमत व स्वार्थी पण उपद्व्यापी गरीब मिळून बगलबच्याचा वर्ग बनत असतो. दुसरा पक्ष नेमस्ताचा होय. या नेमस्तांना नोकरशाहीची मर्जी संपादन करावयाची असते, पण ती आढयतेनें संपादन करावयाची असतें. लोकांनीं प्रत्यक्ष करणी करून स्वराज्य संपादन करण्यापेक्षां शिष्टाईच्या मार्गानें स्वराज्य मिळविता देण्यासारखें आहे असें या नेमस्तांचें धोरण असल्यामुळें, शिष्टाईच्या कामीं लोकांना व नोकरशाहीला उपयोगी पडणारे आम्ही आहोंत असे भासवून आपल्या वकिलीची फी म्हणून कायदे–कौन्सिलांत आम्हास निवडून द्या असे लोकाना ते सांगतात; आणि दिवाणगिरीचीं कामें आम्हाला सांगून राज्यकारभारात शिष्टाईकरितां आम्हास हिस्सा द्या, अशी मागणी ते नोकरशाहीकडे करतात. बगलबच्यांची दृष्टि लोकाकडे बिलकूल नसते, नोकरशाहीच्या नेत्रसंकेतावर यांची दृष्टि खिळून गेलेली असते. वकिलीचें गिऱ्हाईक मिळविण्यापुरते नेमस्त लोकांकडे पाहतात; आणि अधिकाराकरिता व वैभवाकरितां नोकरशाहीच्या आर्जवानें नेमस्त वागतात. नेमस्ताच्या या शिष्टाईच्या सांप्रदायाविरुद्ध नॉन व्हायओलंट नॉन को-आपरेशनचा किंवा प्रत्यक्ष करणीचा उर्फ डायरेक्ट ॲक्शनचा स्वतंत्र सांप्रदाय महात्मा गांधी यांनीं सुरू केला असून, राष्ट्रीय सभेनें प्रत्यक्ष करणीचेंच व्रत स्वीकारलें आहे. या प्रत्यक्ष करणीच्या मताला कायदे–कौन्सिलात बसणारे नेमस्त अनुकूल नसल्यामुळें, कायदे-कौन्सिलात बसणाऱ्या नेमस्ताच्या जागा आपण पटकावून कायदे–कौन्सिलें एकदाची मोडून टाकलीं म्हणजे प्रत्यक्ष करणीच्या मार्गाला राष्ट्रांत जे अडथळे येतात ते अडथळे नाहींसे होतील, आणि सर्व लोकाकडून प्रत्यक्ष करणीचें संग्रहण चांगलें करण्यात येईल, अशा आशेने पं. मोतीलाल नेहरू

व दे. ब. दास यानी कौन्सिलें मोडण्याकरिता कौन्सिलवाला पक्ष निर्माण केला आहे. कौन्सिलें मोडण्याकरिता जी तयारी करावी लागते तितक्या तयारीनें प्रत्यक्ष करणीचा मार्ग लोकाना चागल्या रीतीनें चोखाळावयास येणें अधिक खात्रीचें व अधिक यश देणारे असल्यामुळें, कौन्सिलें मोडण्याच्या पहिल्या उपद्व्यापात व्यर्थ वेळ दवडूं नये, असे म्हणणारा कॉंग्रेसचा पक्ष आहे. राष्ट्राच्या उभारणीला व सवर्धनाला प्रत्यक्ष करणीशिवाय दुसरा मार्गच नाही, खादी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, अत्यजोद्धार, व राजकीय दृष्टया सर्व धर्माच्या व समजुतीच्या लोकाचें समेलन, हा एवढाच काय तो प्रत्यक्ष करणीचा मार्ग आहे हा प्रत्यक्ष करणीचा मार्ग चोखाळीत असताना प्रतिस्पर्ध्याला दोन रट्टे देण्यासहि हरकत नाही, अशी व्हायलन्सची उर्फ मारामारीची जोड या प्रत्यक्ष करणीच्या मार्गाला देऊन आयर्लंडने स्वराज्य सपादिले आहे. हिंदुस्थानच्या साप्रतच्या राजकीय स्थितींत ही मारामारीची जोड या करणीला प्रत्यक्ष देणें शक्य नसल्यामुळे हे कुपथ्य राष्ट्रीय सभेने समजून उमजून टाळलेलें आहे. शिष्टाईचा मार्ग निरुपयोगी ठरून प्रत्यक्ष करणीच्या मार्गाला आयर्लंड लागण्यापूर्वी पार्नेलने पार्लमेंट-मधील अडथळ्याचा मार्ग स्वीकारला होता; तसा हिंदुस्थाननेंहि अडथळ्याचा मार्ग काहीं काळ स्वीकारावा, व मग या अडथळ्याच्या मार्गामुळेच लोकात जागृति उत्पन्न होऊन लोक प्रत्यक्ष करणीच्या मार्गास लागतील असे समजून, प्रत्यक्ष करणीच्या मार्गातील पूर्वतयारी म्हणून कौन्सिलवाल्या पक्षाने आपला कार्यक्रम आखला आहे. पार्नेलचे अडथळे सपल्यानतर प्रत्यक्ष करणीच्या मार्गाला आयर्लंड लागलें हे खरे आहे. पण हा नुकता काळाचा क्रम आहे; कार्य-कारण-भाव सबध यात नाहीं. तेव्हा हिंदुस्थाननेंहि तितकाच मधला वेळ व्यर्थ दवडला पाहिजे असे म्हणण्यात अर्थ नाहीं. हा मधला वेळ व्यर्थ दवडावयाचा नाहीं, तर काय करावयाचें ? प्रत्यक्ष करणीच्या

मार्गाचा संग्रह लोकानीं जितक्या तत्परतेनें करावयास पाहिजे होता तितक्या तत्परतेनें गेल्या तीन वर्षांत काम न झाल्यामुळें, लोकात तितकी तत्परता उत्पन्न होईतों कौन्सिलात अडथळ्याचा उपयोग करून का पाहू नये असें कौन्सिलवाल्या पक्षाचे म्हणणे आहे. या म्हणण्यावर उत्तर असे आहे की, प्रत्यक्ष करणीचा मार्ग यशस्वी होऊन स्वराज्य मिळण्यास लोकाची जितकी तत्परता दिसावयास पाहिजे होती तितकी तत्परता दिसत नाहीं हें जरी खरे असलें, तरी प्रत्यक्ष करणीचा प्रभाव लोकाच्या मनावर पडत नाहीं असे म्हणणें मात्र खोटे आहे. खादी चळवळीनें काहीं काम कमी केलेलें नाहीं. पंजाबात व संयुक्तप्रांतात आज जरी नोकरशाहीला हिंदु मुसलमानात तंटे लावता येत असले, तरी मुसलमानाची दृष्टि हिंदी स्वराज्याकडे महात्माजींनीं कायम वळवून टाकली आहे, यात शंका नाहीं. अस्पृश्यतेचें निवारण गेल्या तीन वर्षांत जितके झालें आहे, तितके पूर्वीच्या ३० वर्षांतहि झालेलें नाहीं, हें सर्वांना कबूल केलेच पाहिजे. बहिष्काराची चळवळ आज नेमस्ताच्याहि डोक्यांत शिरली आहे. अकालींची चळवळ व नागपूरच्या राष्ट्रीय निशाणाची चळवळ, या चळवळी तर आत्मयज्ञाची प्रेरणा दिली असता प्रत्यक्ष करणीचा मार्ग लोकास रूढ होण्यास कशी चांगली मदत मिळते, याचीं मूर्तिमंत उदाहरणें आहेत. करणीच्या मार्गाला लोकाना जर लावावयाचें असेल तर आत्मयज्ञाचीच प्रत्यक्ष कृति लोकापुढे ठेवून आपल्या स्वतःच्या संगतीच्या जोरावर लोकाना आपल्याप्रमाणे वागावयास लाविलें पाहिजे. उपदेशापेक्षा कृतीला अधिक महत्त्व आहे! हजारो लोकानीं केलेला उपदेश वाया जातो, पण मूठभर निश्चयी लोकाची कृति एकदम फलद्रूप होऊ शकते. कृतीचा परिणाम लोकाच्या मनावर फार होतो, व कोरडा उपदेश ऐकून जी अनास्था टाकून देण्यास लोक तयार होत नाहीत ती अनास्था कृतीमुळे आपोआप नष्ट होते. महात्मा गांधी यांचा कार्यक्रम फलद्रूप होत नाहीं,

याचें कारण आत्मयशाची जोड जितकी मिळावयास पाहिजे तितकी ती मिळत नाहीं हें होय! आत्मयशानेंच प्रत्यक्ष करणीचा मार्ग यशस्वी होणार आहे असे दिल्लीच्या जादा कॉंग्रेसनेंहि ठरविलें असल्यामुळे, कौन्सिलातील अडवणुकीच्या पायी व्यर्थ वेळ दवडण्याची जरूरी कॉंग्रेसच्या अनुयायाना बिलकूल नाहीं. अर्थात् करणीच्या मार्गावर ज्याची श्रद्धा आहे, त्यानीं साप्रतच्या निवडणुकीच्या वेळीं मते देण्यास जाणे बिलकूल उचित नाही. असल्या लोकापाशीं मते मागणेहि बरोबर नाही व त्यानीं मतें देणेहि बरोबर नाहीं. मतदारामध्ये जे बगलबच्चे असतील ते बगलबच्याना मतें देतील, हें सरळ आहे. मतदारामध्ये जे नेमस्ताच्या शिष्टाईच्या मार्गाचे असतील, त्यानीं शिष्टाईच्या मार्गाला बहिष्काराची जोड ना. शास्त्री यानीं यावेळीं दिली असल्यामुळे नेमस्तात जे बहिष्कारवादी असतील त्यानाच मतें द्यावी हे सयुक्तिक होय. नेमस्त बहिष्कारवादी झाला असता कॉंग्रेसच्या पक्षाकडे अधिक झुकतो, आणि सर्व राष्ट्राच्या एकीच्या दृष्टीनें नेमस्त पक्षाच्या मतदारानींहि नेमस्तातील बहिष्कारवाद्याना उचलून धरणे अधिक श्रेयस्कर आहे. दिवाण ना. पराजपे किंवा सर चिमणलाल सेटलवाड याच्यासारख्या नेमस्ताना तुम्ही बहिष्कारवादी आहात किंवा कसे, हे हडसून खडसून विचारून मग नेमस्तानीं मतें द्यावींत. ही सावधगिरी न घेतल्यास नेमस्तापैकीं काहीं पुढारी ना. शास्त्री याच्यासारख्याना तोंडघशीं पाडतील, हे नेमस्त पक्षाने निवडणुकीच्या वेळीं ध्यानात ठेवलें पाहिजे. राष्ट्रीय सभेच्या अनुयायापैकीं ज्याचीं मने शिष्टाईच्या मार्गाविषयी अगदीं विटलेलीं आहेत व प्रत्यक्ष करणीचा मार्ग ज्याना पसत आहे, त्यानीं स्वतः मतें देण्यास जाऊ नये, इतकेंच नव्हे, तर कोणी विचारल्यास मतें देणें पाप होय, अशीच सल्ला मतदाराना दिली पाहिजे. प्रत्यक्ष करणीच्या अनुयायापैकीं काहींचा पदर शिष्टाईच्या मार्गाशीं लागतो; काहींना अडथळे पसंत पडतात, तेव्हा

तेवढयास मते देण्यास हरकत कोणती? असे म्हणणारे जे राष्ट्रीय सभापैकी मतदार असतील, त्याना मतें देण्याची मुभा दिल्लीच्या जादा कॉंग्रेसने दिली आहे. कौन्सिलच्या वादाची ही कटकट नको, अशा अनास्थेनें मतें देणारा चाहि शिष्टाईच्या पदरवाल्यात व अडथळयाच्या भक्तात बराच मोठा जमाव आहे. या असल्या मतदारानीं कोणास मते द्यावी असा या ठिकाणीं साहजिकच प्रश्न उत्पन्न होतो. कौन्सिले किंवा असेब्ली मोडण्याच्या इराद्याकडे जर पाहिले तर उभे राहिलेल्या उमेदवारात तसल्या इराद्याचे फारच थोडे लोक आहेत, असे दिसून येते. कौन्सिलवाल्या पक्षाची म्हणून जी यादी प्रसिद्ध झाली आहे, तीत शिष्टाईशी पदर लागलेले लोक फार! मद्रास पुणे, नागपूर, पजाब वगैरे बहुतेक ठिकाणी बहिष्कारवादी व शिष्टाईशी पदर लागलेले असेच उमेदवार उभे राहिले आहेत. दे. ब दास याना उचलून धरणारे हाताच्या बोटावर मोजण्याइतकेच आहेत. दे. पटेल याची गणना कौन्सिले मोडणारात केली पाहिजे, तर दे. केळकर याची गणना शिष्टाईचा पदर लागलेल्यात केली पाहिजे शिष्टाईचा पदर असलेली ही मडळी व नेमस्तातील बहिष्कारवादी मडळी ह्याच्यामध्ये विशेष अतर नाहीं. शिवाय आम्ही कोणत्याच पक्षाचे नाही असे म्हणणारे बिनपखाचे पडित मदन मोहन मालवीय, बॅ. बॅप्टिस्टा, बॅ. जिना, बॅ. जयकर वगैरे पक्षी कौन्सिलात व असेब्लींत शिरू पहात आहेत. या बिन पखाच्या मडळीचा पदर शिष्टाईशी येतो, बहिष्काराशी येतो, कौन्सिल मोडण्याशीं येतो, प्रत्यक्ष करणीशी येतो, व प्रसग विशेषीं बॅ. बॅप्टिस्टासारखी निस्पृह मडळी व्हाओलन्समधील उर्फ मारामारीमधील सद्गुणाचाहि योग्य प्रसगीं नीरक्षीरन्यायानें सन्मान करण्यास धजणारी आहे, हें ध्यानात ठेवले पाहिजे. कॉंग्रेसच्या अनुयायापैकीं मते देणें जेवढयाना इष्ट वाटत असेल त्यानी कौन्सिले मोडणाराचा प्रथम सन्मान

करावा हें अगदीं बरोबर आहे. हें काम झाल्यानतर एक पदराचा काय, दोन पदराचा काय, किंवा पांच पदराचा काय, सर्व पदराच्या उमेदवाराना आपापल्या आवडीप्रमाणें मदत करण्यास कोणतीच हरकत नाहीं. दे. केळकर उद्या दिवाण झाले तर प्रत्यक्ष करणीच्या मार्गाला ते मुकतील हे खरे, पण नुसत्या दिवाणगिरीच्या कामाचाच जर विचार केला, तर डॉ. पराजपे याच्या जागीं बॅ. जयकर आले काय, बॅ. बॅप्टिस्टा आले काय, किंवा बॅ. जिना आले काय, राष्ट्राला वाईट वाटण्याजोगे काय आहे? प्रत्यक्ष करणीच्या मार्गाला हे लोक लागले असता देशाचें अधिक कल्याण होईल यात बिलकूल सशय नाही. पण हे ऐकत नाहीत. पूर्वग्रहामुळे किंवा सवयीमुळे प्रत्यक्ष करणीच्या मार्गात निश्चयाने व उत्सुकतेनें पडण्याचे धाडस बॅ. बॅप्टिस्टा, किंवा बॅ. जयकर याच्यात आज उत्पन्न होऊं शकत नाही, हे आमचे दुर्दैव होय! तथापि बॅ. जयकर किंवा बॅ बॅप्टिस्टा यानी या हिय्येच्या अभावीं दिवाणाच्या जागेवर बसूं नये, असे मुळींच आम्ही म्हणत नाही. तेव्हा निवडणुकीच्या वेळी कॉंग्रेसच्या अनुयायापैकी ज्याना मते देणे इष्ट वाटत असेल त्यानी एक शेमल्याचा सरदार आहे का दहा शेमल्याचा सरदार आहे, या भानगडीत न पडता ज्याच्या त्याच्या लायकीप्रमाणे व आपापल्या आवडीप्रमाणें मते देण्यास हरकत नाहीं. ही मतें देताना जे प्रत्यक्ष करणीच्या पक्षाचे आहेत, त्याना मात्र विनाकारण आग्रह करून खोटया मार्गाला फूस लावून नेण्यात येऊ नये, व कॉंग्रेसच्या नावाचा खोटा उपयोग करण्यात येऊं नये, अशी आमची विनति आहे.



# * कोकोनाडाची कॉंग्रेस



कोकोनाडा कॉंग्रेसच्या कामास गेले शुक्रवारीं (ता. २८ डिसेंबर १९२३) सुरवात होऊन मंगळवारीं कॉंग्रेसचें काम यशस्वी रीतीनें पार पडलें. आंध्र व तामीळ नाड ह्या दोन प्रदेशांतील लोकांमध्यें ह्या कॉंग्रेससंबंधानें विशेष उत्साह दिसून येत होता; व बेझवाड्यापासून कोकोनाडापर्यंत चार पांच स्पेशल गाड्याहि सोडणें भाग पडण्याइतका समुदाय कोकोनाडाच्या गांधीनगरामध्यें जमला होता. कॉंग्रेसच्या तंबूंत १५ हजार लोकांना बसण्याइतकी सोय होती, पण प्रेक्षक व प्रतिनिधी मिळून १५ हजाराहून अधिक लोक मंडपांत हजर होते, शिवाय मंडपाबाहेर यात्रेप्रमाणें जुळलेल्या आसपासच्या लोकांची एवढी गर्दी होती कीं, कोकोनाडाच्या गांधी-नगरांत एक दोन दिवस एक लाख लोक एकसारखे फिरत होते असें म्हणण्यास हरकत नाही. लोकांच्या उत्साहाच्या दृष्टीनें विचार केला असतां नागपूर, अहमदाबाद व गया ह्या कॉंग्रेसच्या तोडीचीच कोकोनाडा कॉंग्रेस झाली असें म्हणावें लागतें. एवढा मोठा समुदाय लोटला असताहि आंध्र प्रदेशाच्या कार्यक्षम पुढाऱ्यांनीं व उत्साही स्वयंसेवकांनीं सर्व व्यवस्था उत्तम प्रकारें ठेवली व कोठेंहि न्यून पडूं दिलें नाही, ही संतोषाची गोष्ट होय. शंभर एकर जमिनीवर खादीच्या कापडाचें व ताडपत्र्यांचे गांधी-नगर व्यवस्थित रीतीनें वसविण्यांत आलें होतें, जमलेला प्रचंड समुदायहि खादीशिवाय दुसरें कांहीं वापरीत नव्हता. खादीसंबंधानें आंध्र देशाचें महत्त्व कोकोनाडा कॉंग्रेसच्या वेळीं उघडण्यांत आलेल्या खादीच्या प्रदर्शनावरून सर्वांच्या मनास पटलें, इतकेंच नव्हे तर कॉंग्रेसच्या भव्य तंबूंत असलेल्या व गांधीनगरांत

* नवाकाळ, ता. २ जानेवारी १९२४

फिरणाऱ्या लोकसमुदायानेहि खादीचा प्रसार आंध्र देशांत इतर प्रांतांहून अधिक झाला आहे हीच गोष्ट सर्वांच्या मनावर विशेषेकरून बिंबविली. मौलाना महमद अल्ली व मौलाना शौकत अल्ली ह्यांचें स्वागत सर्व लोकांनीं अत्यंत मनःपूर्वक केलें. मुसलमानांचें लक्ष स्वराज्याकडे विशेष लागून राहील अशा प्रकारची जी खटपट अल्ली बंधूंनी तुरुंगातून सुटल्यानंतर एकसारखी चालविली आहे, त्या खटपटीला चांगलें यश कोकोनाडा येथें आलें, यांत संशय नाहीं. हिंदु–मुसलमानांची एकी आणि कौन्सिलच्या मृगजळापासून अलग राहून कायदेभंगाच्या दृष्टीनें बहिष्कार कार्याला जोर देण्याकरितां अमलांत आणावयाचा विधायक कार्यक्रम ह्याच गोष्टी कोकोनाडाच्या कॉंग्रेसमध्ये प्रधान्येंकरून पुढे आल्या होत्या; - आणि ह्या गोष्टींसंबंधानें कॉंग्रेसचे ठराव सर्व राष्ट्राला मार्गदर्शक असेच झाले याबद्दल वाद नाहीं. मौ. महमद अल्ली ह्यांनीं आपल्या भाषणांत हिंदु–मुसलमानांच्या एकीचा इतिहास सविस्तर देऊन एकोप्यानें विधायक कार्यक्रम अमलांत आणण्याची जरूरी सर्व राष्ट्राला चांगल्या रीतीनें पटवली, आणि अध्यक्षांचे भाषणाला अनुसरूनच राष्ट्रीय सभेचे ठराव करण्यांत आले. हिंदु–मुसलमानांच्या एकीसंबंधानें मुळींच वादविवाद नव्हता. ह्या एकीला अनुसरून बंगालमध्यें जो नवा करार दे. ब. दास ह्यांनीं तयार केला त्या करारासंबंधानें फार मतभेद दिसून आला. हा करार बंगाल्यांत घाईघाईनें तयार करण्यांत आला, आणि सदर करार घाईघाईनें लोकांवर लादण्याचा प्रयत्न कोकोनाडा येथें झाला. लाला लजपतराय, पंडित मदनमोहन मालवीय वगैरे पुढारी ह्या घाईच्या विरुद्ध असल्यामुळे बंगालच्या करारास महत्त्व देऊं नये, असेंच कोकोनाडा येथें जमलेल्या प्रतिनिधींचें मत पडलें. कॉंग्रेसने हिंदुमुसलमानांमधील करारासंबंधानें कोणताच मुक्रर असा ठराव पास केला नाहीं. राष्ट्रामध्यें सांप्रत ह्या करारासंबंधानें जी चर्चा चालली आहे त्या चर्चेतील गुणदोषांचा नीट

विचार करून आणखी दोन महिन्यात डॉ. अनसारी ह्यांच्या कमिटीनें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीकडे दुसरा रिपोर्ट पाठवावा असें कॉंग्रेसनें ठरवलें, ही गोष्ट योग्यच झाली. दुसरा रिपोर्ट मागताना बंगालच्या कराराचाहि उल्लेख ठरावात करावा किंवा कसे ह्यासंबंधानें मात्र तटा उपस्थित झाला. डॉ. अनसारी यांच्या कराराइतके महत्त्व बंगालच्या करारास देण्याची जरूरी नाहीं, बंगालचा करार कॉंग्रेसपुढे अशा रीतीनें न येता डॉ. अनसारी यांच्या कमिटीमार्फतच यावा, अशा तऱ्हेचे प्रतिनिधींचें बहुमत कोकोनाडा येथे होतें. कॉंग्रेसच्या ठरावात बंगालच्या कराराचा जर उल्लेख झाला नाहीं तर त्या योगाने बंगालचा अपमान होईल, अशा तऱ्हेचे उद्गार दे. बं. दास यांनी स्वत. काढल्यामुळे सब्जेक्टस् कमिटीमध्ये बंगालच्या कराराचा उल्लेख ठरावात बहुमताने करण्यात आला. दे. बं. दास किंवा बंगाल ह्यांचा अपमान करण्याची बुद्धि कोणामध्येहि नसल्याळे श्रीयुत राजगोपाळ-चारियर ह्यानीहि कॉंग्रेसच्या मंडपात ह्या उल्लेखास विरोध केला नाहीं. पण या उल्लेखाविरुद्ध बंगालचे नागबाबू व शामसुंदर चक्रवर्ती ह्यांनीं आपली मतें बंगालतर्फे उघडपणे दिल्यामुळे आणि बंगाल्याहून आलेल्या प्रतिनिधींचें मताधिक्यहि दे. बं. दास ह्यांच्या विरुद्ध दिसून आल्यामुळे व्यक्तिशः कोणाचा अपमान करण्याचा संबंध ह्या बाबीत येऊं शकत नाहीं असे आपोआप स्पष्ट झालें. बंगालला अशा रीतीनें बाहेर धुडकावून लावून बंगालचा अपमान करू नका म्हणून दे. बं. दास यानीं सब्जेक्टस् कमिटी-प्रमाणेंच कॉंग्रेसच्या मंडपातहि पुन्हा जोरानें आपलें म्हणणें सर्व प्रतिनिधींपुढें मांडलें. व्यक्तिमाहात्म्याला एका बाजूस ठेवून आपलें मत स्पष्टपणें देण्याचा कल कोकोनाडामध्यें यंदा विशेष दिसून येत होता; आणि या कलाला अनुसरून बंगालचा उल्लेख करूं नये असे म्हणण्याला मतें मोजताना प्रचंड बहुमत अनुकूल आहे असे दिसून आलें. मतेघेण्याचा हा प्रसंग कोकोनाडाच्या

कॉंग्रेसमध्ये महत्त्वाचा झाला. बाब क्षुल्लक होती ही गोष्ट खरी आहे; पण गयेच्या कॉंग्रेसच्या वेळीं कौन्सिलवाल्या पक्षाच्या विरुद्ध जितक्या जोरानें मताधिक्य दिसून आलें जितक्या जोरानेंच मताधिक्य कोकोनाडा कॉंग्रेस-मध्यें सदर प्रसगीं दिसून आल्यामुळे, वारा कोणत्या बाजूनें वहात आहे हें अजमावण्याच्या दृष्टीनें मतें मोजण्याचा सदर प्रसग महत्त्वाचा ठरला. दे. ब. दास ह्याच्या पक्षाच्या बाजूला जर एक मत तर सदर पक्षाच्या विरुद्ध दोन मते असे जें प्रमाण गयेच्या बैठकीच्या वेळी दिसून आलें, तेंच प्रमाण कोकोनाडा येथेहि कायम ठरलें. दिल्लीच्या कॉंग्रेसनें कौन्सिलवाल्या पक्षास दिलेली सवलत तात्पुरती होती, ह्या विषयीचाहि निर्णय कोकोनाडा येथें दे. भ. राजगोपाळचारियर याच्या ठरावानें झाला. दिल्लीच्या कॉंग्रेसमध्यें कौन्सिलवाल्या पक्षास ज्या ठरावाने तात्पुरती सवलत मिळाली, त्या ठरावासहि असहकारितेचा ठराव अशीच सज्ञा दिल्लीस देण्यात आली होती; पण ही सवलत तात्पुरती आहे का कायमची आहे, आणि कौन्सिलवरील बहिष्कारासबधानें कॉंग्रेसचे मत व धोरण बदललें आहे किंवा काय, अशी शका उपस्थित झाल्यामुळे श्री. राजगोपाळाचारियर ह्यानीं गयेप्रमाणें दिल्लीचाहि कॉंग्रेसचा असहकारितेचा ठराव कायम ठेवून सदर शंकाना वाव राहू नये म्हणून, बहिष्कारत्रयीसबंधानें कॉंग्रेसचें मत व धोरण बिलकूल बदललें नसून कायदेभगाच्या दृष्टीनें बहिष्कारत्रयीस जोर यावा म्हणून विधायक कार्यक्रम सर्व राष्ट्रानें अमलांत आणावा, अशा आशयाचा ठराव सब्जेक्टस् कमिटीपुढें माडला. बंगालच्या कराराचा नामनिर्देशहि ठरावात नको असे ज्याप्रमाणें कॉंग्रेसने ठरवलें, त्याप्रमाणेंच दिल्लीच्या ठरावाचाहि उल्लेख श्रीयुत राजगोपाळाचारियर ह्याच्या ठरावांत नको असें म्हणणारा एक पक्ष कोकोनाडाच्या कॉंग्रेसमध्ये होता, आणि पडित सुंदरलाल ह्या पक्षाचे पुढारी होते. बगालच्या करारासंबधीच्या ठरावाने वारा कोणत्या

बाजूला वहात आहे हें स्पष्ट झाल्यामुळे, कोकोनाडाच्या कॉंग्रेसच्या ठरावांत दिल्लीच्या तडजोडीचाहि उल्लेख नको असा आग्रह धरण्यात अर्थ नव्हता ही गोष्ट बाबु शामसुंदर चक्रवर्ती वगैरेंच्या मनाला पटली होती, हेंहि खरें; व अध्यक्षांनी सर्वांची समजूत घालण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न केला होता, हेहि खरें; तथापि बाबू शामसुंदर यांनीं दिल्लीच्या नांवाचाहि नामनिर्देश नको अशा आशयाचा आग्रह धरल्यामुळे कॉंग्रेसमध्यें दे. राजगोपाळाचारियर याच्या ठरावावर मतें घेण्याचा प्रसंग आला. दे. राजगोपाळाचारियर याच्या ठरावाला मतें ७०३ अनुकूल पडली व बाबू शामसुंदर यांच्या बाजूची ४१३ मतें पडलीं आणि दे. राजगोपाळाचारियर याचा ठराव पास झाला. कायदेभंग, बहिष्कारत्रयी, व विधायक कार्यक्रम यांची साखळी कॉंग्रेसनें योग्य तऱ्हेनें जुळविली असून, कौन्सिलवाल्या पक्षाचीं मनें न दुखविता असहकारितेची तत्वें कोकोनाडा मुक्कामीं कायम करण्यांत आलीं आहेत, ही संतोषाची गोष्ट होय. असा योग जुळवून आणण्याचे श्रेय मौ. महंमद अल्ली ह्यांना जितकें दिलें पाहिजे तितकेंच दे. बं. दास व दे. राजगोपाळाचारियर ह्यानाहि दिलें पाहिजे. कायदेभग, बहिष्कारत्रयी व विधायक कार्यक्रम ह्या संबंधाची चळवळ पुढील वर्षात एकसारखी सुरू राहील अशा प्रकारची सर्व व्यवस्था मौ. महंमद अल्ली ह्यानीं कोकोनाडा येथें करून घेतली आहे; त्याना पाहिजे ते सेक्रेटरी व त्यांना पाहिजे ती वर्किंग कमिटीहि कोकोनाडा येथें नेमण्यांत आलेली असल्यामुळें, कॉंग्रेसच्या कामकाजात नवा जोम मौ. महमद अल्ली लवकरच उत्पन्न करतील, असा भरंवसा सर्वांस वाटत आहे.

---

# * महात्मा गांधी यांचा संदेश



तुरुंगातून सुटल्या बरोबर म. गाधी ह्यानीं राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष मौ. महंमद अली ह्याना पत्र लिहून हिंदी राष्ट्राला जो संदेश कळविला आहे, त्या संदेशात महात्माजींच्या असहकारितेच्या चळवळींतील मुख्य तत्त्वें प्राधान्येंकरून नोंदण्यात आलीं असून महात्माजींची पूर्वींची श्रद्धा जशीच्या तशी कायम आहे, असें स्पष्टपणे त्यातम्हटलें आहे. लो. टिळक ह्याना सहा वर्षाच्या कारागृहवासाच्या यातना सोसाव्या लागल्या तरी जसा त्याच्या मतात फेरबदल झाला नाहीं, उलट स्वतःच्याच कार्यक्रमावर त्याची श्रद्धा जशी अधिक दृढावली, तशीच महात्माजींची स्थिति आहे. शाततेची असहकारिता, विधायक कार्यक्रम व कायदेभग, ह्या संबंधानें दोन वर्षे एकातात मनन करून आपली विचारसरणी बिनचूक आहे असेंच महात्माजींना अखेरीस आढळून आलें आहे. शाततेच्या कायदेभंगाचा इलाज हा लढाईहून अधिक चागला मार्ग आहे असे महात्माजींचें ठाम मत बनलें आहे. अमेरिकेतील लेखक ह्या शाततेच्या कायदेभगास व असहकारितेच्या चळवळीस 'नॉन व्हाओलट कोअर्शन' उर्फ शाततेचें दडपण असें नाव देत असतात. प्राचीन इतिहासात व अर्वाचीन इतिहासातहि शाततेच्या दडपणाच्या ह्या मार्गाचें अवलंबन थोर विभूतींनीं राष्ट्राच्या व साम्राज्याच्या निरनिराळ्या संकटाच्या वेळीं केलेलें दृष्टीस पडतें. दक्षिण आफ्रिकेतील लढ्यापासून म. गाधी सत्याग्रहाच्या उर्फ शाततेच्या दडपणाच्या मार्गाला लागले आहेत. दक्षिण आफ्रिका, चंपारण्य, रौलेट ॲक्टच्या वेळचा सत्याग्रह, आणि युवराजांच्या प्रवासाच्या वेळची चळवळ, या सर्व प्रसंगीं शाततेच्या

* नवाकाळ, ता. ९ फेब्रवारी १९२४

दडपणाचेंच अस्त्राचा त्यानीं चागला उपयोग करून घेतला, आणि प्रसगामुळे ह्या मार्गातील पथ्यापथ्याचा विचार आपोआपच त्याच्यापुढे उभा राहिला. कायदेभंगाची चळवळ सुरू करावयाची असल्यास राष्ट्रीय सभेसारख्या सभेची प्रथम मान्यता घेऊन चळवळींत पडणाऱ्यानीं कोणत्या शर्ती पाळल्या पाहिजेत, ह्या सबंधाचे नियम म. गाधी ह्यानीं अहमदाबादच्या कॉंग्रेसच्या वेळी तयार केले, आणि त्यानतर ज्या अडचणी आल्या त्या अडचणी दूर करण्याकरिता विधायक कार्यक्रमाचें पथ्य महात्माजींनी कायदेभंगाच्या चळवळीस लावून दिलें. पथ्यापथ्याचा विचार, आचरणाच्या नियमाची साखळी, आणि स्थल व प्रसंग ह्या सबधाचा निर्णय इत्यादि बाबींसबधानें शाततेच्या दडपणाच्या मार्गाचें शास्त्रच महात्माजींनीं बनविलें आहे. ह्या शास्त्राच्या मुख्य अगाचा व उपागाचा शातपणें दोन वर्षे तुरुंगात विचार करून हें नवे शास्त्र हिंदुस्थानास कल्याणप्रद झाल्यावाचून राहणार नाही, असा सिद्धात महात्माजी आपल्या सदेशात हिंदी राष्ट्रापुढें ठेवीत आहेत. हिंदु–मुसलमानाच्या एकीशिवाय असहकारितेची चळवळ यशस्वी होणे शक्य नाही, असेच महात्माजी दोन वर्षानतर आज पुन्हा सर्व राष्ट्रास बजावीत असून, हिंदु–मुसलमानातील साप्रतच्या बेकीच्या प्रकारामुळे महात्माजींचे मन साहजिकच खिन्न झाले आहे. महात्माजीच्या अगात शक्ति आल्यावर हिंद–मुसलमानाच्या बेकीचीं कारणें दूर करण्याच्या मार्गाला ते ताबडतोब लागतील ह्यात सशय नाही हिंदुस्थानचें दारिद्र्य लक्षात घेता त्या दारिद्र्यातून सुटण्याचा मार्ग म्हणजे खादीचीच चळवळ होय, हा महात्माजींचा सिद्धात जसाच्या तसा कायम आहे. कायदेभगाच्या मोठ्या चळवळीसाठीं राष्ट्र तयार करावयाचें असल्यास विधायक कार्यक्रमाची जशी जरूरी आहे, तशीच जरूरी सरकारी शाळा, कोर्टें व कौन्सिलें याजवरील

बहिष्काराचीहि आहे. कौन्सिलावरील बहिष्कारासंबंधानें दिल्ली व कोकोनाडा येथें जी तडजोड झाली, त्या तडजोडीसबंधाची सविस्तर हकीकत निरनिराळ्या पुढाऱ्याच्या तोंडून प्रत्यक्ष ऐकण्याच्या आधीं महात्माजी कांहीं मत देऊं इच्छित नाहींत ह्या तडजोडीच्या विरुद्ध मत आतां देऊन तरी काय करावयाचें आहे ? पुढील कार्यास जुन्या वादाच्य निर्णयात पडण्याची फार जरुरी नाहीं. हिंदी स्वराज्य संपादन करण्याचे कामी शाततेच्या असहकारितेचाच मार्ग यशस्वी होणार असून, त्या मार्गानेंच पुढे पाऊल महात्माजी टाकणार आहेत. शाततेचें नुसतें ढोंग असून इतर अत्याचारावर पाघरूण घालण्याकरिता व प्रतिस्पर्ध्याच्या डोळ्यात धूळ फेकण्याकरिता शाततेचें सोंग महात्माजींनी आणलें आहे, असा आरोप ॲग्लो-इडियन पत्रें महात्माजींवर करीत असतात. शाततेचे ढोग नसून कायदेभगाच्या चळवळीच्या विचारसरणीचा पाया शाततेच्या तत्त्वावर उभारलेला आहे असे महात्माजींचें म्हणणे आहे! शाततेचें तत्व सुटलें म्हणजे कायदेभगाची सर्व इमारत ढासळून पडते एवढी गोष्ट जर लोकाच्या व अधिकाऱ्याच्या मनावर बिंबली तर आपलें कार्य बरेंच होईल, असे महात्माजींना वाटत आहे. महात्माजींनीं जो अपूर्व आत्मयज्ञ केला, आणि निरनिराळ्या बिकट प्रसंगीं आपली बुद्धि यत्किंचितहि ढळूं न देण्याची सावधगिरी घेतली, त्या आत्मयज्ञाकडे व सावधगिरीकडे पाहिलें असतां शाततेच्या तत्त्वाचें नुसते पाघरूण महात्माजींनीं घेतलें आहे असे कोणीहि म्हणणार नाहीं. नॉन व्हायोलेलट कोअर्शनचा उर्फ शाततेच्या दडपणाच्या मार्गाचा अभ्यास व अनुभव कित्येक वर्षें घेऊन दोन वर्षे एकातात त्या मार्गाची नीट तपासणी करून महात्माजी आपलें असहकारितेचें शास्त्र लोकापुढें पुन्हां जोरानें मांडण्यास सुरवात करणार आहेत. असहकारितेच्या चळवळीचा पूर्वार्ध आज सपला असून महात्माजींच्या बधमुक्ततेपासून उत्तरार्धास आरंभ होत आहे. एका भागावर

परमेश्वरानें पडदा पाडला आहे. गेल्या चार वर्षांच्या झटापटीचें जर निरीक्षण केलें तर प्रत्यक्ष यशासंबंधानें महात्माजी विजयी झाले असेंहि म्हणता येत नाहीं. आणि महात्माजी पराभूत झाले असेहि म्हणतां येत नाहीं. महात्माजींच्या सुटकेसंबधाची बातमी ऐकून साप्रतच्या परिस्थितीसबधाने न्यूयॉर्कच्या टाइम्सनें असे उद्‌गार काढले आहेत कीं, बोअर युद्धाच्या अखेरीस ज. स्मटस व ज. बोथा यानीं ज्याप्रमाणें इंग्लंडशीं तह करण्यास समति दिली त्याप्रमाणें महात्माजीनीं देखील आता शाततेच्या असहकारितेच्या चालू लढाईत इंग्लडशीं तह करण्यास पुढे यावे. इंग्लडातील मजुराच्या मत्रिमडळानें या बाबीसबधाने दोन पावलें पुढे येऊन तहाच्या गोष्टी बोलण्यास जर प्रारभ केला तर चार पावलें पुढे जाऊन त्या गोष्टी ऐकण्यास महात्माजीं कधीहि कमी करणार नाहींत. बोअर युद्धाच्या अखेरीस इंग्लडात लिबरल पक्ष अधिकारारूढ झाला व त्यावेळचे मुख्य मत्री सर हेन्री बॅनरमन ह्यानीं लढाईपेक्षा शाततेची तडजोड इंग्लडला अधिक श्रेयस्कर आहे असे ठरवून ज. बोथा याजबरोबर तहाचें बोलणें सुरू केले. बोअर लोकाच्या दर्जास व राष्ट्रीय अभिमानास बिलकूल धक्का लावता कामा नये, त्याचा पराभव झाला असला तरी बरोबरीच्या नात्याची तलवार त्यानीं गाजविली आहे, व आणखीहि तसा पराक्रम पुढे करून दाखविण्याचें सामर्थ्य बोअर लोकाचे अगी आहे, अशी कबुली सर हेन्री बॅनरमन ह्याच्या मत्रिमंडळानें त्यावेळीं दिली, आणि मगच दक्षिण आफ्रिकेचा तह झाला. दक्षिण अफ्रिकेच्या लढाईत ज. बोथा ह्यानीं जशा प्रकारचा पराक्रम गाजविला, तशाच प्रकारचा पराक्रम शाततेच्या असहकारितेच्या गेल्या चार वर्षांच्या युद्धातहि महात्मा गाधीं ह्यानीं गाजविला आहे, अशी कबुली अमेरिकेतील प्रमुख पत्रेंहि आजच्या प्रसगीं पर्यायानें देत आहेत, हें शुभ चिन्हच समजलें पाहिजे. बोअर लोकाशीं इंग्लडने जसा तह केला तशा प्रकाराचा तह हिंदुस्थानशीं

करण्यास मजुरांचें मत्रिमंडळ जर ह्या वेळीं पुढें आलें, तर म. गांधीं तशा प्रसंगीं ज. बोथा याच्याप्रमाणेंच वागतील ह्यात संशय नाहीं. म. गांधीं ह्याना ज. बोथा ह्याच्याप्रमाणें वागण्यास योग्य सामर्थ्य यावें म्हणून हिंदु–मुसलमानाची एकी दृढ करून पुढील दोन तीन महिन्यात सर्व राष्ट्र खादीमय करून टाकणें आज सर्व देशभक्ताचें कर्तव्य आहे; आणि म. गांधीं ह्याच्या प्रोत्साहनानें राष्ट्राची आत्मयज्ञाची शक्ति एक दोन महिन्यात दुपटीतिपटीने वाढविण्यास सर्व लोक मनःपूर्वक झटतील, असा आम्हास भरवसा वाटत आहे.

———

# * असेंब्लीला धाब्यावर बसविलें



दिल्लीच्या असेंब्लीनें सोमवारीं (ता. १७ मार्च रोजी) सर्व कर नामंजूर केले, पण मगळवारीं लाटसाहेब लॉर्ड रीडिंग ह्यानीं असेंब्लीला उलट धाब्यावर बसविलें! असेंब्लीनें मारून टाकलेलें बिल जिवंत करण्याचा अधिकार सर्टिफिकेटाच्या मार्फत लाटसाहेबाना मिळालेला आहे. ह्या सर्टिफिकिटाचा उपयोग करण्यासंबधाचे नियम गेल्या आठवड्यात स्टेट सेक्रेटरीसाहेबाच्या संमतीनें दुरुस्त केले असून नव्या नियमाप्रमाणें सर्टि-फिकिटाची सही करण्यापूर्वी आपणास पाहिजे त्याप्रमाणें बिलात फेरफार करून मारून टाकलेलें बिल स्वतःच्या शिफारशीसह असेंब्लीकडे पुन्हा एकदां संमतीकरिता पाठवावें अशी नवी पद्धत लाटसाहेबानीं अंमलात आणली आहे. मारून टाकलेल्या बिलात दुरुस्ती करून सदर बिल पास करा, अशी लाटसाहेबानीं शिफारस असेंब्लीला मंगळवारीं केली. अशी शिफारस करणें म्हणजे प. मोतीलाल नेहरू ह्यानीं म्हटल्याप्रमाणें असेंब्लीच्या मस्तकावर पिस्तुल रोखणेंच होय. तुम्ही संमति द्या नाहींतर सर्टिफिकिटानें हें बिल पुन्हां मी जीवंत करतों, अशा धर्तीचें पिस्तुल गेले मंगळवारीं असेंब्लीवर रोखण्यांत आलें, आणि असा धाक घातला असताहि असेंब्लीनें लाटसाहेबानीं दुरुस्त केलेलें बिल आपल्या पुढें येऊं न देण्याचेंच नाकारलें! लाटसाहेबाची ही शिफारस म्हणजे असेंब्लीला धाब्यावर बसविणे होय. कराच्या बिलाला सर्टिफिकिट देऊन लाटसाहेब राष्ट्रीय पक्षाची पर्वा न करता राज्यकारभार चालवूं पहात आहेत. तुम्हाला आमची पर्वा नाहीं तर आम्हालाहि तुमची पर्वा नाहीं, उलट तुम्हास आम्ही धाब्यावर

* नवाकाळ, ता. २० मार्च १९२४

बसवितों, असे लाटसाहेबांनीं सर्व कौन्सिलवाल्याना बजावलें आहे. मध्यप्रांतांत नागपूर येथें जी स्थिति उत्पन्न झाली आहे, तीच स्थिति दिल्लीसहि उत्पन्न झाली आहे. नागपूरच्या कौन्सिलशिवाय व दिवाणाशिवाय राज्यकारभार चालविण्यास मध्यप्रातांचें सरकार तयार झालें आहे. डॉ. मुंजे वगैरे मंडळींना नागपुरास जसे धाब्यावर बसविण्यात आलें आहे, त्याप्रमाणें दिल्लीलाहि पं. मदन मोहन मालवीय, पं मोतीलाल नेहरू, दे. पटेल वगैरे मंडळींना धाब्यावर बसविण्यात आलें आहे. प मदन मोहन मालवीय ह्यानी सर्व कर नामजूर करिताना स्वराज्यासंबधाची मागणी अत्यंत अल्पप्रमाणावर आणून ठेवली आहे, एवढाच काय तो नागपूर व दिल्ली ह्याच्यामध्यें फरक आहे. मॉटेग्यू-चेम्सफर्ड ॲक्टामध्यें पुन्हा फेरबदल आता झाला पाहिजे व दुसऱ्या हप्त्याची चौकशी झाली पाहिजे, येवढेंच काय तें पं. मदन मोहन मालवीय यांचे मागणे आहे. संपूर्ण स्वराज्यहि त्यानीं मागितलें नाहीं, किंवा वसाहतीचें राज्यहि त्यानीं मागितलें नाहीं. काही तरी फेरफार करा व एखादे तरी पाऊल पुढे सरका, एवढी अगदी अल्प मागणी प. मदन मोहन मालवीय ह्यानीं केली आहे. पंडितजींची ही मागणी ना. शास्त्री किंवा सर तेजबहादूर सप्रू, ह्याच्या सारख्या नेमस्ताच्या मागणीहून निराळी नाहीं. ह्या अल्पस्वल्प मागणीला मान देण्यात यावा म्हणून करांचें बिल पं. मदन मोहन मालवीय ह्यानीं नामंजूर केलें असून, लाटसाहेबानीं पंडितजींना व त्याच्या दोस्ताना दिल्लीच्या उन्हाळ्यात धाब्यावर भर उन्हात तडफडत ठेवलें आहे! ह्या ठिकाणीं ना. शास्त्री व तेज बहादूर सप्रू ह्यानीं देखील पंडितजींच्या मदतीकरिता धावून जाऊन धाब्यावरील रखरखलेल्या उन्हाचा मारा स्वतःच्या अंगावर घेणें जरुरीचें नाहीं काय? प. मदन मोहन मालवीय हे राउंड टेबलाचे भोक्ते आहेत; म. गांधी व लाटसाहेब ह्याचें राउंड टेबल बनविण्याचा प्रयत्न पंडितजींनीं पूर्वी बराच

केला, पण त्यात त्याना यश आलें नाही. त्याचा राउड टेबलचा कैवार पूर्वीप्रमाणेंच जाज्वल्य असताहि मॉंटेग्यू–चेम्सफर्ड ॲक्टाची रिव्हिजन करतों म्हणा म्हणजे आम्ही सतुष्ट आहोंत, अशी कबुली देण्यासहि ते तयार झाले आहेत. पाच पाडवाना पाच गाव द्या, असलीहि शिष्टाई करण्यास प. मदन मोहन मालवीय आज तयार आहेत. पण ऐकतो कोण ? सुईच्या अग्रावरीलहि भूमि मिळूं द्यावयाची नाही असा जेथे हट्ट आहे, तेथे पडितजींच्या शिष्टाईचा उपयोग काय ? शिष्टाईच्याच दृष्टीने जर विचार केला तर ना. शास्त्री किंवा तेज बहाद्दूर सप्रू ह्याना देखील पंडित-जीच्या मागणीविरुद्ध ब्रहि काढता येण्याजोगा नाहीं. नेमस्ताच्या मागणी पलिकडे न जाता तडजोड करण्यास प. मदन मोहन मालवीय तयार असताना त्याना धाब्यावर बसविण्यात आलें आहे. असेंब्लीला अशा रीतीनें धाब्यावर बसविण्यात आल्यानतर पुढे मार्ग कोणता, असा साहजिकच प्रश्न उत्पन्न होतो. सरकारचें आज काहीं आडत नाही, लाट साहेबानीं सर्टिफिकिट दिलेले कर निमूटपणें लोक भरतील; आणि सरकारी खाती पूर्वीप्रमाणे जशीच्या तशीं चालतील. काही वेळ धाब्यावर बसविल्यानें पं. मदन मोहन मालवीय ह्याच्यासारख्याचेंहि व्यक्तिशः काहीं अडणारे नाहीं. कारण धाब्याच्या खाली बसण्याची जशी त्याना सवय आहे, तशीच धाब्यावर बसण्याचीहि त्याना सवय आहे. उन्हात, पावसात, व थडींत ते धाब्याच्या खालींहि बसूं शकतात, व धाब्याच्या वरहि बसूं शकतात. कर नामजूर करण्यानें जसें सरकारचें काहीं नडत नाहीं, त्याप्रमाणेंच धाब्यावर बसविल्यानें पुढाऱ्यांचेंहि व्यक्तिशः काहीं नडत नाहीं. व्यक्तिशः जरी नडलें नसलें, तरी नुसतें धाब्यावर सहनशीलतेनें बसणें म्हणजे स्वराज्याच्या मार्गाला लागणे नव्हे, हा फरक ध्यानात ठेवला पाहिजे. सांवलींतून उन्हात हाकून देण्यात आलें आहे.

ह्या उन्हातच स्वतःचें घर स्वतः बाधण्यास तयार झाल्याशिवाय व तसें बाधून दाखविल्याशिवाय स्वराज्याचें दर्शन कधीहि व्हावयाचें नाहीं. मागणीसबधानें नेमस्ताना कुरकुर करण्याचें कारण जरी प. मदन मोहन मालवीय ह्यानीं ठेवलेलें नाहीं, तरी ना. शास्त्री किंवा सर तेज बहादूर सप्रू ह्याच्यासारखे नेमस्त उन्हात राहण्यास, राबण्यास व स्वतःचे घर बाधण्याची खटपट करण्यास राजी होतील असा रग दिसत नाहीं. ब्रिटानियाईच्या झेंडया-खालीं विलायतची यात्रा करण्यास ही मडळी तयार होतील, पण हिंदुस्थानच्या उन्हातच स्वतःच्या स्वराज्याचें देवालय बाधण्याकरिता उन्हात राबून स्वतःच्या मस्तकावर दगडमातीचें ओझे घेण्यास ही मडळी तयार होणार नाहीं. दगडमाती स्वतःच्या हाताने हालवून नवीन देवालय बाधण्यास किंवा जुन्या-देवालयाचा उद्धार करण्यास सर्व साधुसतानी शिकलें पाहिजे व तसा अभ्यास केला पाहिजे, असा जो तुकाराम महाराजाचा उपदेश आहे तोच उपदेश ह्याहि प्रसंगी स्वराज्याच्या अभिमान्यानी ध्यानात ठेवला पाहिजे. सर्टिफिकिटाला मजुराचें मत्रिमडळ हरकत घेऊ शकणार नाहीं येवढयापुरता मिठावरचा कर लाटसाहेबानी कमी केलेला आहे. मजुराच्या मत्रिमडळाला चुचकारून त्याच्या नाकातील आपली वेसण कायम ठेवण्याचा नोकरशाहीचा हा कावा आहे. अशा स्थितींत विलायतची यात्रा केल्यानें स्वराज्याचें पाऊल जोरानें पुढे पडेल म्हणून अपेक्षा करण्यात काहीं अर्थ नाहीं. धाब्यावर बसविण्यात. आले आहे, तेव्हा नोकरशाही काहीं तडजोडीचें बोलणे सुरू करील म्हणूनहि अपेक्षा करण्यात अर्थ उरलेला नाहीं. आमच्या नावेत बसा आणि पलिकडच्या तीरावरील देवालयातील स्वराज्याचें दर्शन घ्या, अशा तऱ्हेचें नव्या स्टेट सेक्रेटरीसाहेबाच्या तोंडून नोकरशाहीनें वद-विलें आहे ! नोकरशाहीच्या नावेत आराम आहे , वल्ही वल्हविण्याचे कष्ट फारसे करावे लागणार नाहीत; पैलतीराला जाण्याचें अनुष्ठानहि कष्टाचे

नाहीं. अनुष्ठान जरी कष्टाचें नसलें तरी तें स्वतःचें स्वराज्य नव्हे. दुसऱ्याच्या तंत्रानें वल्हीं वल्हवून आरामानें कोठें स्वराज्याची प्राप्ती होत असते ? आमच्या तत्राने जर काम करणार नसलां तर आमच्या नावेंतच तुम्हांस घेत नाहीं; असे असेंब्लीला लाट साहेबांनीं बजाविलें आहे. हिंदी स्वराज्याला खरोखर पाहूं गेलें असता इंग्रजाच्या नावेची जरुरी काय आहे ? इंग्लंडांत जाऊन स्वराज्य आणावयाचें, दुसरा मार्गच नाहीं, असें म्हणणाराना इंग्रजीं नाव पाहिजे हें बरोबर आहे. पण येथेच बसून स्वराज्याची प्राप्ति कां होऊं नये ? नावेंत पाऊल कशाला ठेवावयास पाहिजे ? नावेंत पाऊल ठेवणारानाहि लाटसाहेबानीं बाहेर हांकलून दिलें आहे, पैलतीरावर स्वराज्याचें मंदिर कां असावें ? आम्ही ज्या तीरावर उभे आहों, ज्या धाब्यावर आम्हास बसविण्यात आलें आहे, रखरखलेल्या उन्हात जेथें आम्हांस सोडून देण्यांत आलें आहे, तेथें स्वराज्याचें सुंदर मंदिर का बांधण्यात येऊं नये ? म. गांधी असलें मदिर बांधण्याची खटपट करीत आहेत. धाब्यावर स्वस्थ न बसता महात्माजींचीच खटपट अधिक जोराने पुढे चालविणें प. मदन मोहन मालवीय वगैरे असेंब्लीच्या पुढाऱ्याना आता इष्ट नाहीं काय ?



# * श्रीशिवाजी-महोत्सव



'इंग्रजी राज्य बुडालें' ह्या नावाचें जें एक चोपडें विलायतेस प्रसिद्ध झालें आहे, त्या चोपडयात पुण्याच्या ब्राम्हणांनीं पूर्वजाच्याबद्दल अभिमान उत्पन्न करून नोकरशाहीच्या विरुद्ध चळवळीस २५-३० वर्षापूर्वी सुरवात केली असा उल्लेख केला असून इंग्रज राज्याच्या नाशाचा प्रारंभ तेथून धरला आहे. लो. टिळक ह्यानीं उर्जितावस्थेस आणलेल्या श्रीशिवाजी-महोत्सव, श्री गणपती महोत्सव, व इतर राष्ट्रीय महोत्सव ह्याना उद्देशून सदर पुस्तकांत वरील उल्लेख आहे. लो. टिळक ह्याचें प्रत्यक्ष नांव सदर पुस्तकात कोठेंच नमूद केलेलें नाहीं. श्रीशिवाजीमहाराजाच्या स्मारकाची चळवळ प्रथम लोकापुढें आणणारे न्या. रानडे वगैरे पुण्याच्या ब्राम्हणाचा उल्लेख सदर पुस्तकात कोठें नाहीं. पुण्यातील सामान्य चळवळींचें दिग्दर्शन व्हावें एवढयापुरतेच 'पुण्यातील ब्राम्हण' असे शब्द वापरलेले आहेत. श्रीशिवाजीमहाराजाचा सांप्रदाय उर्फ शिवाजी-कल्ट या नावानें अँग्लो-इंडियन पत्रें वीस वर्षापूर्वी महाराष्ट्राच्या पुढाऱ्याना सबोधून महाराष्ट्रातील चळवळीस शिव्याशाप देत असत. ही शिव्याशापाची पद्धत पुढें हलके हलके बदलून टिळकाचा सांप्रदाय उर्फ टिळक कल्ट ह्या नावानें महाराष्ट्रातील चळवळींना संबोधण्याचा प्रघात पाडण्यात आला आहे. ह्या टिळकांच्या सांप्रदायानें नोकरशाहीच्या सत्तेचा पाया पोखरला, आणि म. गांधी ह्याच्या सांप्रदायातील पडितजींनीं नोकरशाहीचा डोलारा कोसळून पाडला, अशी इंग्रजी राज्य बुडालें ह्या पुस्तकांतील विचारसरणी आहे. हिंदी राष्ट्राच्या विरुद्ध असलेले लेखक श्रीशिवाजी महोत्सव, श्रीगणपति महोत्सव, टिळक-

* नवाकाळ, ता. ६ मे १९२४

चरित्र, व गांधींची चळवळ ह्या सर्वांकडे कोणत्या दृष्टीने पहातात हें वरील विचारसरणीवरून ध्यानी येणारें आहे. श्रीशिवाजी–महोत्सव किंवा श्रीगणपति–महोत्सव ह्याच्यासारख्या ऐतिहासिक व धार्मिक चळवळींचा संबंध म. गांधी ह्यांच्या असहकारितेच्या चळवळीशी कसा जोडण्यांत येतो हे विचार करण्यासारखे आहे. शिवाजीसांप्रदायानेहि इंग्रजांचें राज्य गेलें नाही आणि आज गांधींच्या सांप्रदायानें इंग्रजी राज्य गेलें नाहीं, मग ह्यांच्याविरुद्ध ओरड कशाला? इंग्रजी राज्य जावो किंवा राहो, त्या प्रश्नाशीं श्रीशिवाजीमहाराजांच्या उत्सवासंबंधाने विचार करताना आम्हास काहीं कर्तव्य नाहीं. श्रीशिवाजी महाराजांच्या काळात, त्यांच्या उत्सवाच्या काळात आणि हल्लींच्या म. गांधी ह्यांच्या चळवळीचे काळात तिघांचाहि उल्लेख एके जागीं व एक प्रसंगीं प्रतिस्पर्ध्यांनीं करण्याइतका कोणता धागा आहे, येवढें मात्र नीट रीतीने पाहून घेणे जरूर आहे. स्वराज्याची स्थापना करण्याचें कार्य शहाजी महाराजांच्या वेळेपासूनच सुरू झाले होतें. डेक्कनमधील मुसलमानी राज्यांच्या आपापसातील कलहाचा व बाहेरील उलाढालींचा सहजगत्या जेवढा फायदा शहाजी महाराजांच्या पदरीं पडावयास पाहिजे होता, तेवढा पडला नाहीं, पण श्रीशिवाजी महाराजांनी जे केले तें करण्यास शहाजीचे मन कधींहि धजलें नाहीं. बुद्धिमत्ता व साधनांची अनुकूलता कमी होती अशातला भाग नाहीं. न्यून होतें ते श्रद्धेसंबंधाने होतें. हे कार्य आपल्या हातून पार पडणार अशी श्रद्धाच नव्हती. मुसलमानांना चिकटून राहण्यात आपलें कल्याण अधिक होईल, अशी खुद्द शहाजींची श्रद्धा होती व मुसलमानी धर्म स्वीकारणाऱ्या त्यांच्या काही मेहुण्याचीहि श्रद्धा तशीच होती. मुसलमानांशी फटकून राहिल्याने आपलें, आपल्या देशाचें व धर्माचें कल्याण अधिक होईल अशी जिजाबाईची व तिच्या मुलाची श्रद्धा होती. शिवाजी महाराजांच्या

वडिलांची श्रद्धा निराळी, मामाची श्रद्धा निराळी, व खुद्द मातोश्रींची श्रद्धा निराळी, असा त्यावेळीं फरक होता. राष्ट्रामध्यें धर्मसेवेने श्रद्धेची जोपासना साधुसंत ईश्वरी प्रेरणेने करूं लागले होते, आणि धार्मिक श्रद्धा श्रीशहाजी महाराजामध्येहि होती. पण ह्या धार्मिक श्रद्धेच्या जोरावर कल्पनातीत हाल-अपेष्टा सोसण्यास राष्ट्रांतील कर्ते पुरुष व बहुजन समाज पुढें येईल अशी मनाची खात्री पटण्याइतकी शहाजी महाराजाची स्वतःची श्रद्धा जाज्ज्वल्य नव्हती. राष्ट्रात ही श्रद्धा पसरत चालली होती, आणि खुद्द श्रीशिवाजी महाराजानीं स्वराज्यस्थापनेचा उद्योग शेवटास नेईपर्यंत महाराष्ट्राचा स्वतःचा विश्वास स्वतःच्या श्रद्धेवर बसलेला नव्हता. औरंगजेबाशीं पुढें जे स्वातंत्र्याचे युद्ध महाराष्ट्रास वीस वर्षे एकसारखे करावें लागलें, त्या युद्धाच्या वेळी मात्र केवळ श्रद्धेच्या जोरावरच लढण्याचा प्रसग आल्यामुळें साधुसतानीं उत्पन्न केलेल्या श्रद्धेचें पुण्य मूर्तिमत राष्ट्रापुढे उभें राहिले. आत्मयज्ञ श्रद्धेशिवाय शक्यच नाहीं, आणि बहुजन समाजाच्या आत्मयज्ञाशिवाय केवळ व्यक्तीच्या आत्मयज्ञानें राष्ट्राचे संवर्धन व सगोपन होत नाहीं. ही श्रद्धेची शक्ति लोकांच्या प्रत्ययास आणून देण्यास श्रीशिवाजी महाराजाचें चरित्र व तदनतरचें महाराष्ट्रातील स्वातंत्र्याचें युद्ध ह्या दोन गोष्टी फार उपयोगी पडणाऱ्या आहेत. लोकामध्यें श्रद्धा वाढविण्यास श्रीशिवाजी महोत्सवचा फार उपयोग होत असल्यामुळे महाराष्ट्रातील कर्त्या पुरुषानीं ह्या उत्सवाचीं सेवाचाकरी करण्यात मोठी धन्यता मानली आहे. औरगजेबाच्या कारकीर्दीच्या वेळीं मुसलमानाच्या धार्मिक श्रद्धेतील धर्मवेडेपणाशीं झुंजावयाचें असल्यामुळे साधुसंतानाहि तितक्याच जोमानें उलट दिशेला ताणून धरणें भाग पडलें, तो काळ धार्मिक श्रद्धेच्या झगडयाचा होता. इंग्रजी सत्तेचा असल्या श्रद्धेशीं काहीं संबंध नाहीं. दुसऱ्याचें रक्त शोषण करून स्वतःचें राष्ट्र सुसंपन्न कसें करावयाचें, अशा प्रकारच्या राष्ट्रीय

सेवेंतील वेडेपणामुळें जीं साहसाचीं, तत्परतेचीं व आत्मयज्ञाचीं कृत्यें इंग्रजाच्या हातून हिंदुस्थानात पाय ठेवल्यानंतर घडलीं आहेत, त्या कर्मावर इंग्रजी राज्याची उभारणी झाली आहे. श्रद्धा आणि तदनुषंगिक एकतानता उर्फ वेडेपणा इंग्रजी सत्तेच्या बुडाशीं हिंदुस्थानात आहे, पण ती श्रद्धा धर्मबुद्धीपासून उत्पन्न झालेली नसून राष्ट्रवैभवाच्या सेवेपासून उत्पन्न झालेली आहे. ह्या श्रद्धेशीं जर टक्कर द्यावयाची असेल, तर राष्ट्रात श्रीशिवाजी महाराजाच्या वेळेप्रमाणे उलट दिशेनें जाणाऱ्या श्रद्धेला उत्पन्न करणें जरुरीचें आहे. राष्ट्रप्रेम व धर्म ह्यांना संलग्न करून राष्ट्राला सुसंपन्न करण्याच्या सेवेपासून उत्पन्न होणारी श्रद्धा स्वदेशीच्या चळवळीच्या वेळीं लो. टिळक ह्यानीं महाराष्ट्रापुढें ठेविली. श्रीशिवाजी महोत्सव दरसाल साजरा केला, श्रीगणपति महोत्सवांत अत्यत परिश्रम केले, आणि तीस वर्षांच्या तपश्चर्येनें नव्या धर्तीची श्रद्धा राष्ट्रात उत्पन्न करून, त्या श्रद्धेला पूर्वजांच्या सर्व तत्त्वज्ञानाचें पूर्ण पाठबळ आहे हें सिद्ध करण्याकरिता लो. टिळक ह्यानीं गीतारहस्य लिहिलें. रक्त-शोषण किंवा एक्सप्लॅयटेशनच्या तत्त्वावर उभारलेल्या सत्तेला तोंड द्यावयाचें असल्यास इंग्रजाच्या श्रद्धेला आपली श्रद्धा तितक्याच जोरानें भिडविल्यावाचून सोय नाहीं. बंगालच्या फाळणीच्या वेळीं व त्यानंतरच्या स्वदेशीच्या चळवळीच्या वेळीं नव्या श्रद्धेचा पाया रचला गेला. पण बहुजन समाजाच्या अंगवळणीं पडून ही श्रद्धा फलद्रूप होण्यास अनन्य भक्ति किंवा एकतानता, उर्फ विरुद्ध पक्ष म्हणतो तसला वेडेपणा ह्या श्रद्धेमध्यें उत्पन्न करण्याचें म. गांधी याच्या वाट्यास आलेलें आहे. एकतानता असल्याशिवाय स्वदेशींतून निघणाऱ्या स्वराज्याची चळवळ कधींहि फलद्रूप म्हणावयाची नाहीं; आणि ही एकतानता खादीच्या चळवळीच्या रूपानें आजकाल प्रकट होत आहे. श्रद्धेचें हें तीव्र स्वरूप

आहे. ह्या स्वरूपास हसणारे हसोत, वेडे म्हणणारे नांवें ठेवोत, किंवा प्रतिपक्षी धिःकारोत; श्रीशिवाजी महाराजाच्या महाराष्ट्राकडे जर पाहिलें, तर असल्या श्रद्धेच्या एकतानतेनें महाराष्ट्र एकेकाळीं अलौकिक आत्मयज्ञ करण्यास समर्थ झाला होता असें दिसून येईल. धार्मिक लढयाचे ते दिवस होते, आज तशी स्थिति बिलकूल नाहीं. हिंदु व मुसलमान ह्यानीं एकोप्यानें वागूनच रक्त शोषणाच्या उर्फ एक्सप्लॉयटेशनच्या कचाटयातून सर्व हिंदी राष्ट्रास सोडवावयाचें आहे ख्रिस्ती धर्माशीं किंवा दुसऱ्या कोणत्याहि धर्माशीं हा झगडा मुळींच नाहीं. तथापि ह्या झगडयात देखील श्रद्धेची एकतानता अत्यंत जरुरीची आहे. खादीच्या चळवळीच्या रूपानें हल्लीं राष्ट्राला जरूर असलेली श्रद्धा प्रकट होत असून श्रद्धेच्या जोरावर एकसारखें स्वराज्याच्या मागे लागा आणि ह्या श्रद्धेमुळे संयमेंद्रिय होऊन स्वसुखाचा त्याग करण्याची प्रवृत्ति वाढवा, म्हणजे आत्मयज्ञ कसा करावा हें आपोआप राष्ट्राच्या ध्यानीं येईल, आणि त्यानंतर श्रद्धावान, तत्पर व संयमेंद्रिय झालेलें राष्ट्र स्वराज्याच्या शिखरास पोहोंचल्या वाचून राहणार नाहीं; अशी ग्वाही श्रीशिवाजी महाराजाचा काळ सर्व महाराष्ट्रास देत आहे.

---

# * महात्माजींचें मत



कॉंग्रेसच्या अनुयायानी कौन्सिलात शिरावें किंवा कसें ह्या संबंधाचा वाद गेल्या वर्षी ज्या वेळी जोरात होता, त्या वेळीं कौन्सिलवरील बहिष्कार कायम ठेवणाऱ्या पक्षाला असें सांगण्यात येत होतें कीं, आपल्या सहा वर्षांच्या शिक्षेनंतर महात्मा गांधी सुटून आल्यावर कौन्सिलवाल्या पक्षास आशीर्वाद दिल्यावांचून राहणार नाहींत. लाला लजपतराय, पं. मोतीलाल नेहरू, व देशबंधु दास ह्या तिघाचीं मते ज्याप्रमाणें असहकारितेच्या चळवळींतील एक दोन वर्षांच्या अनुभवानें बदललीं, त्याप्रमाणें महात्मा गांधी ह्याचेंहि मत कैदेंतून सुटल्यानतर बदललेलें दिसल्यावाचून राहणार नाहीं, असा कौन्सिलवाल्याचा कयास होता. पण ज्याप्रमाणें लोकमान्य टिळक १९१४ सालीं कैदेंतून सुटून आल्यावर कारागृहवासानें किंवा त्याच्या पश्चात पसरलेल्या शिथिलतेमुळें आपल्या पूर्वीच्या मतात फेरबदल करण्यास तयार झाले नाहींत, त्या प्रमाणें महात्मा गांधी ह्यानीं देखील कारागृहवासानतर आपलें पूर्वीचें धोरण बदललेलें नाहीं. जुहूच्या मुक्कामीं महिना दोन महिने एकसारखा खल करून महात्मा गांधी ह्यानीं आपली पूर्वीचीं मतें जशींच्या तशींच कायम आहेत, आणि आपण कौन्सिलात जाण्याविरुद्ध पूर्वीप्रमाणें आताहि आहों, असें जाहीर केलें आहे. महात्मा गांधी ह्याच्या या जाहीर-पत्रकानें कौन्सिलात शिरलेल्यावर कांहीं परिणाम होईल अशातला भाग नाहीं, पण इतर लोकाना स्वतःचीं मतें बनवितांना या जाहीरपत्रकाचा फार उपयोग झाल्यावाचून राहणार नाहीं. पूर्वीच्या सन्माननीय ग्रंथाचा आधार, पूर्वीच्या थोर ऋषींचीं व पुरुषाचीं मतें व चरित्रें, हल्लींच्या परिस्थितीचें

---

* नवाकाळ, ता. २४ मे १९२४

पर्यालोचन, आणि ह्यात नामांकित पुढाऱ्यांचीं मतें व चरित्रें, या चार विभागांना अनुसरून स्वतःचें अंतःकरण व स्वतःची बुद्धि ज्या मार्गाकडे ओढा घेत असेल, त्या मार्गाचीं मतें प्रत्येकानें स्वीकारावयाचीं असतात. ह्यांत थोर पुरुषांच्या मतांना, स्वतःचीं मतें बनवितांना, प्रत्येक व्यक्तीकडून विशेष मान देण्यात येतो. स्वतःची मतें बनविण्याचाच हा प्रकार आहे. व्यक्तिपूजा किंवा अंधश्रद्धा म्हणून ह्या प्रकाराला दोष देण्यात इंशील नाहीं. लहान थोर सर्व व्यक्तींना आपलें स्वतःचें 'मनः पूत' कोणतें हें ठरवितांना, थोर पुढाऱ्याच्या मतावर एक चतुर्थांश इतके तरी अवलंबून राहणें भाग पडतें. पूर्वीच्या ऋषींचीं मतें विभिन्न दिसतात, शास्त्राधार निरनिराळे सापडतात, मतामताचा गलबला ऐकू येतो, स्वतःच्या भावना, स्वतःची स्फूर्ति किंवा स्वतंत्र कार्यविचार ह्या विषयीं स्वतःचीच बुद्धि साशंक होऊन तर्क अप्रतिष्ठित होतो, अशा प्रसंगीं मतें बनवितांना माझ्यापेक्षा अधिक पूज्य मानल्या गेलेल्या व्यक्तीची भावना व स्फूर्ति विशेष आदरणीय असली पाहिजे असा बुद्धीचा निश्चय करून, मतामताच्या गलबल्यांतून बाहेर पडावें लागतें. नेता आणि अनुयायी, गुरु आणि शिष्य, वगैरे प्रकारचीं नातीं वरील कारणानेंच उत्पन्न होत असतात. कौन्सिलसंबंधाच्या वादात दे. ब. दास व प. मोतीलाल नेहरू ह्यांच्या स्वार्थत्यागाला व बुद्धिमत्तेला तोडीस तोड देणारा पुढारी बहिष्कारत्रयीस धरून चालणाऱ्यामध्यें गेलीं दोन वर्षें प्रत्यक्षपणें वावरत नसल्यामुळें पुष्कळांचा निश्चय डळमळीत होऊं लागला होता. असहकारवाद्यांतील ही न्यूनता महात्मा गांधी ह्यांच्या जाहीरपत्रकानें आतां भरून निघाली आहे. बहिष्कारत्रयी जरी प्रत्यक्षपणें विजयी झालेली दिसत नाहीं, तरी नोकरशाहीशीं अलिप्तपणें वागण्याचा जो सामान्य क्रम बहुजनसमाजांत उत्पन्न झाला आहे, त्या क्रमाकडे पाहिलें असतां असहकारवाद्यांची तीन वर्षांची चळवळ निष्फळ

झाली असें म्हणतां येत नाहीं. लोकाच्या विचारसरणींतच तीन वर्षात मोठा फरक पडला आहे. हा फरक म्हणजे असहकारवाद्याना मिळालेलें मोठें यश होय. कौन्सिलांत प्रवेश केल्याने हेंहि यश तुम्ही गमवाल, आणि हजारों लोकानीं तुरुंगात जाऊन जी नवी विचारसरणी लोकांच्या आंगवळणीं पाडली आहे त्या विचारसरणीलाहि तुम्ही मातीत लोळवाल, अशी कौन्सिल-वाल्याबद्दल सर्वांना साहजिकच भीति वाटत आहे. ह्या भीतीसबंधानें दे. बं. दास ह्याचें असे म्हणणें आहे कीं, कौन्सिलवाले सरकारशी टक्कर देत असल्यामुळें लोकाच्या नव्या विचारसरणीस धक्का लागण्याचें कारण नाहीं. कौन्सिलबाहेरच्या कामानें वाढीस लागलेली नवी विचारसरणी बाहेरचे काम सोडून दिल्यास आपोआप खुजट होणार हें कोणीहि कबूल करील. कौन्सिलातील पार्लमेंटरी टक्करीच्या जोरावर नव्या विचारसरणींत जोम उत्पन्न करता येणेंच शक्य नाही. कौन्सिलातील कामकाजानें नव्या विचारसरणीलाच जर दुजोरा द्यावयाचा असला तर विधायक कार्यक्रमातील गोष्टीच कौन्सिलात पास करून नोकरशाही आडवी आल्यास कौन्सिलें सोडून पुनः लोकाच्या विचारसरणीत बाहेरून जोम उत्पन्न करण्याच्या मार्गास लागणें भाग आहे. कौन्सिलात बसून तेथून असला जोम उत्पन्न करणें मुष्कि-लीचें आहे, असे ठरल्यानतरच कौन्सिलवर बहिष्कार घालण्यात आलेला होता; मग पुन्हा पुन्हा त्याना त्याच गोष्टीची पूर्वीप्रमाणें आणखी एकदा परीक्षा पहात बसण्यात कोणतें हंशील ? जे पूर्वी झालें तेंच पुनः होणार, गलबला काय तो पदरात पडणार, हा गलबला पदरात काय म्हणून घ्यावयाचा ? आजच दे. ब दास व प. मोतीलाल हे आपल्या कौन्सिलातील टक्करीच्या कार्यक्रमात फेरबदल करीत आहेत ना ? नोकरशाहीनें कौन्सिलात अडथळा केलाच तर तेवढ्यापुरती टक्कर द्यावयाची आणि इतर सर्व वेळीं कौन्सिलाच्या कमिट्यातून नोकरशाहीशीं खुशाल सहकार्य करावयाचें,

असें आपलें प्रतियोगी सहकारतेंचें उर्फ रिस्पॉन्सिव्ह कोऑपरेशनचें धोरण थोड्या निराळ्या शब्दानीं महात्मा गांधी ह्याच्या जाहीरपत्रकाबरोबरच दे. बं. दास व पं. मोतिलाल नेहरू यानीं लोकापुढें ठेवलें आहे ना? पाव कामात आज सहकार्य, अर्ध्यामुर्ध्या कामात उद्या सहकार्य, दिवाणाची जागा पत्करून दिवाणगिरीमार्फत परवा सहकार्य अशा रीतीनें तीन पावलात तीन रंग झाल्यावर कौन्सिलातील कामकाजामुळें नव्या विचारसरणीस कोठून जोम मिळणार? असहकारितेची नवी विचारसरणी जर कर्त्या पुरुषाच्या चरित्रामुळें बुडावयची असेल, तर तीं कौन्सिलवाल्याच्या कृत्यानींच बुडणारी आहेत, यात सशय नाहीं ही नवी विचारसरणी, अशा रीतीनें बुडावी अशी कौन्सिलवाल्याची बिलकूल इच्छा नाही, पण त्याची कृति मात्र या विचार-सरणाला मारणारी आहे, असा प्रत्यक्ष अनुभव आहे! कारण, राष्ट्रातील काहीं पुढाऱ्याचें चरित्र व कर्त्या पुढाऱ्यानीं स्वीकारलेलें धोरण ह्यावर राष्ट्राची विचारसरणी निम्याहून अधिक अशानें अवलबून असते. विचार-सरणीच्या खाबापैकी पुढाऱ्याचे चरित्र व धोरण हे दोन खाब आहेत. ज्या खाबावर नेहमींच विचारसरणीची इमारत उभारलेली असते असे स्मृति-कारानीं सागितलें आहे, त्या चार खाबापैकीं दोन खाब अशा रीतीनें कौन्सिलवाल्याच्या कृतीनें ढासळले जात असता महात्मा गाधीं ह्यानीं स्वतःच्या चरित्रानें व धोरणानें असहकारितेच्या नव्या विचारसरणीस पुनः सावरून धरले आहे, ही संतोषाची गोष्ट होय. कौन्सिलवाल्याच्या चरित्रा-कडे किंवा धोरणाकडे विशेष लक्ष देऊन त्यातच आपल्या विचारसरणीला गुतवून न ठेवता स्वतःच्या मार्गानें पुढे पाऊल टाकण्याची तयारी आता असहकारवाद्यानीं करण्यास हरकत उरलेली नाहीं. कौन्सिलात गेले ते गेले, त्याच्याबद्दल विनाकारण शोक करीत बसण्यात किंवा त्याचा उद्धार व्हावा म्हणून प्रयत्न करण्यात हंशील नाहीं, अशी मनाची खूणगांठ बाधून,

असहकारवाद्यांनीं कौन्सिलवाल्यांचें नांव सोडून देऊन आपला मार्ग अव्य-भिचारी श्रद्धेनें ह्यापुढें चोखाळावा अशा तऱ्हेचा जो उपदेश महात्मा गांधी ह्यांनीं आपल्या जाहीर पत्रकांत सर्वांना केला आहे, त्या उपदेशाला अनुसरून कौन्सिलवाल्यांना दोष देण्याच्या काथ्याकुटांत निष्कारण वेळ असहकारवादी घालविणार नाहींत, असा आम्हास भरवसा आहे.

---

# * पराभव व फजिती



'पराभूत व फजित झालेला' ह्या मथळयाखालीं म. गांधी ह्यानीं अहमदाबादच्या ऑल इडिया कॉंग्रेस कमिटीच्या बैठकीसंबंधानें लिहिलेला लेख फार महत्वाचा आहे. मथळयांतील पराभव झाला व फजिती झाली हे शब्द वाचून, म. गाधी कॉंग्रेसच्या राजकारणात चारीं मुडे चीत झाले आहेत आणि कौन्सिलवाल्या पक्षाच्या तंत्रानें वागण्याशिवाय त्यांना आता मार्ग उरलेला नाहीं, असा अर्थ काहींनीं त्याच्या लेखाचा केला आहे. असा अर्थ सदर लेखाचा करणाऱ्याविषयी 'अरसिकेषु कवित्व निवेनम् शिरसि मा लिख मा लिख मा लिख' म्हणून उद्गार कोणाहि सद्गृहस्थाच्या तोंडून निघाल्यावांचून रहाणार नाहींत. अहमदाबादच्या ऑलइंडिया कॉंग्रेस कमिटीमध्ये म. गाधी ह्याच्या बाजूचेंच मताधिक्य एकसारखें होतें, ह्या विषयीं बिलकूल सशय नाहीं. आकडे मोजण्याच्या मताधिक्याच्या दृष्टीनें आपला पराभव झाला असें म. गाधी मुळींच मानीत नाहींत. सूत काढणें व बहिष्कार पचक अंमलात आणणें ह्या तत्त्वांना महात्माजींना मताधिक्य मिळालें, पण सदर तत्त्वें न पाळणाराना दड करण्याच्या कामांत राष्ट्रांत राजकीय वातावरणांत जो जबर पाठिंबा असावयास पाहिजे तो जबर पाठिंबा ऑलइंडिया कॉंग्रेस कमिटीच्या मार्फत म. गांधी ह्याना मिळाला नाहीं. हा पाठिंबा नसतांना महात्माजींनीं दंडाच्या कलमासबंधानें आग्रह धरला नाहीं, एवढीच काय ती पराभवाची बाब आहे. मताधिक्यानें दंडाचाहि भाग पास झाला असताना महात्माजी सदर बाब सोडून देण्यास आपणाहून तयार झाले. ह्याला स्वराज्यपक्षाचें दटावणेंहि कारणीभूत नव्हे, किंवा स्वत:च्या

---

* नवाकाळ, ता. ४ जुलै १९२४

मताविषयीं शंका उत्पन्न झाली म्हणून महात्माजींनीं तसें केलें, असेंहि नव्हे. कॉंग्रेसचें अधिकारी मडळ एकजुटीचे व एकमताचें असलें पाहिजे, एरव्हीं कार्यकर्ती संस्था ह्या नात्यानें कॉंग्रेसचें महत्व वाढणार नाहीं; हें महात्माजीचें मत अद्याप जसेच्या तसेच कायम आहे. महात्माजी सेनानायकहि आहेत, आणि सेनाकर्तेहि आहेत. सरकारी अधिकाऱ्याना सेनानायक व्हावयाचें असतें, सेनाकर्ते किंवा सैन्याला उत्पन्न करणारे ह्या नात्याचें काम प्रस्थापित झालेली सत्ता आपोआप करीत असते. कौन्सिलात एकदा शिरल्यानतर तेथे काम सेनानायकाचे करावयाचें असतें, सैन्य उत्पन्न करण्याचें काम करावयाचें नसते. कॉंग्रेसच्या पुढाऱ्याना सेनानायक ह्या नात्यानें लढावें लागतें, सैन्यात शिस्त ठेवावी लागते, आणि लढत असताना व शिस्त ठेवीत असताना सैन्यहि उत्पन्न करण्याचे काम करावे लागतें. लढण्याच्या पद्धती-संबधानें म. गाधी ह्याचा पराभव ऑलइडिया कॉंग्रेस कमिटीमध्ये झालेला नाहीं. तसा आपला पराभव झाला असे ते स्वत: मानीत नाहींत. पण दडाची शर्त अमलात आणण्याकरितां जितक्या सैनिकाची भरती व्हावयास पाहिजे तितक्या सैनिकाची भरती अद्याप झालेली नाहीं एवढया बाबीपुरताच महात्माजींचा पराभव झालेला आहे. ह्याहि बाबीसबधानें साधें मताधिक्य महात्माजींना मिळालें खरें, पण तेवढे मताधिक्य दंडाचीं कलमें अंमलात आणण्यास केव्हाहि उपयोगी पडत नाहीं. जगातील साधा व्यवहार ह्याच पद्धतीनें चाललेला आहे. डोळे मिटून अंतःस्थ दृष्टीने पहाण्याची ह्या कामीं काहीं जरुरी नाहीं. हा धोपट मार्ग आहे, आणि उघड उघड व्यवहार आहे. आपल्या कार्याला जरूर तितकीं शहाजोग माणसें जर मिळत नसतील, तर तशीं माणसें मिळेपर्यंत काहीं शर्ती तंतोतंत पाळूं नयेत हा जगातील सामान्य नियम आहे. ह्या नियमाला अनुसरून आपणाला जरूर तितकी शहाजोग व बावनकशी माणसे मिळण्याइतकी भरपूर संख्या नाहीं,

एवढेच काय तें ऑलइंडिया कॉंग्रेस कमिटीच्या ठरावांनीं सुचविलें आहे. हा आपला पराभव होतो असें महात्माजींनीं कबूल करण्यापासून कौन्सिलवाल्या पक्षाच्या नादीं महात्माजींना लागल्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं, असा अर्थ कसा काढावयाचा हेंच आम्हास समजत नाहीं. सेनानायक ह्या नात्याच्या जबाबदारीबरोबरच सेनाकर्ते ह्या नात्याची जबाबदारी महात्माजींवर आहे, हें इतराप्रमाणें महात्माजी ओळखून आहेत. आज जरूर तेवढी सख्या जर मिळत नाहीं, तर ती मिळविण्याच्या मार्गाला म्हणजे सैन्य उत्पन्न करण्याच्या मार्गाला महात्माजींनीं लागलें पाहिजे. हें कर्तव्यकर्म पुढील चार सहा महिने तत्परतेनें बजावण्यास महात्माजी तयार आहेत, हें त्याच्या लेखाचा महत्त्वाचा उत्तरार्ध आज जो प्रसिद्ध करण्यात आला आहे त्यावरून स्पष्ट होत आहे. कौन्सिलवाल्या पक्षाच्या तंत्राने वागून कॉंग्रेसचा गाडा पुढे ढकलण्यात अर्थ नाहीं, हें त्याचें मत कायम असून कॉंग्रेसचे अधिकारी मडळ एकमताचें व एकजुटीचें करण्याचा आपला कार्यक्रम महात्माजींनीं बिलकूल सोडून दिलेला नाहीं. हिंदु-मुसलमानाच्या एकीच्या व खादीच्या चळवळीच्या मार्फत हा कार्यक्रम आपोआप अमलात येईल, आणि नंतर खादीच्या स्वरा-ज्याकडे राष्ट्राचें पाऊल जोरानें पडेल अशीच उमेद महात्माजींना वाटत आहे. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीमध्यें महात्माजींची फजिती झाली, महात्माजींना आपल्या पक्षाची लाजहि राखता आली नाहीं व दुसऱ्या पक्षाला हाणूनहि पाडता आलें नाहीं इतकी महात्माजींची छी-थू उडाली, मानखंडणा होऊन महात्माजीना व अलीबंधूंना अश्रू ढाळता ढाळता पुरेवाट झाली, ह्याहून आणखी महात्माजींच्या पक्षाची रेवडी उडण्याची ती काय शिल्लक आहे; अशी काहींनी महात्माजींच्या लेखातील "हबल्ड" उर्फ फजीत झालेला ह्या मथळ्यावरून टीका केलेली आहे. अशी टीका होण्यापर्यंत

लेखाचा साधा अर्थ आमच्यांतील कांहीं लोकाना समजूं नये ही दुर्दैवाची गोष्ट होय. बार्डोलीच्या ठरावानंतर दिल्लीस भरलेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीमध्यें काहीं सभासदांनीं महात्माजीच्या शांततेच्या मतावर भरभक्कम तोंडसुख घेतलें होतें. तसलेंच तोंडसुख वऱ्हाडच्या काहीं सभासदांनीं अहमदाबादेस घेण्यास कमी केलें नाहीं. खुद्द दे. बं. दास ह्याना महात्माजींची जी विचारसणी कबूल करावी लागली, त्या विचारसरणीलाहि पायाखाली तुडवून उद्दामपणाने महात्माजींवर तोंडसुख घेण्याचा देखावा अहमदाबादेस दृष्टीस पडावा, ही स्थिति महात्माजींना खालीं मान घालण्यासारखी वाटत आहे. आपल्या मताचा कोणी अनुयायी नसला तरी त्याबद्दल महात्माजींना स्वतः वाईट वाटून घेण्याचें कारण नाहीं. मतभेद असणें निराळें, तुच्छतेनें दुसऱ्याचीं मतें धिक्कारणें निराळें. आपलीं मतें कांहीं व्यक्तींकडून अत्यंत तुच्छतेनें धिक्कारलीं जाण्यात काहीं लोक नकळत प्रौढी मिरवीत आहेत असा देखावा जेव्हा महात्माजींनीं पाहिला तेव्हा स्वतःचीं मतें इतक्या तरी थोडया व्यक्तींकडून का धिक्कारलीं जावींत, ह्यासंबंधाचा विचार त्याच्या अंतःकरणात आतल्या आत आपोआप उत्पन्न झाला, आणि ह्या मानखडनेपुढें शात वृत्तीनें मान वाकविण्यास ते तयार झाले. ह्या खालीं मान घालण्याचा प्रसग उद्धटाच्या वरचढपणामुळें थोर विभूतींवर नेहमीं येत असतो. अशा प्रसंगीं खालीं मान घालून परमेश्वराला शरण जाण्याचा व धावा करण्याचाच मार्ग सर्व थोर विभूतींनीं आजपर्यंत स्वीकारलेला आहे. गंगेवर स्नान करून शुचिर्भूत स्थितींत धर्मसेवा करण्याकरतां निघालेल्या एकनाथ महाराजावर नास्तिक उद्धटानें ज्याप्रमाणें पाच सात वेळा चूळ टाकली, त्याप्रमाणेंच दिल्लीच्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या वेळीं व अहमदाबादच्या ऑल इंडिया कांग्रेस कमिटीच्या वेळीं महात्माजी डोळ्यापुढें न खपणाऱ्या एका घमेंडानंदनानें महात्माजींवर भरसभेंत एक तऱ्हेनें

थुंकण्यास कमी केलें नाहीं. एकनाथ महाराजांनीं चूळ अंगावर टाकणाराला किंमपिहि उलट शब्द न बोलता खालीं मान घालून गंगेत स्नान करण्याचा जसा क्रम स्वीकारला, तसाच खालीं मान घालण्याचा व आपल्या कार्यास लागण्याचा क्रम महात्माजींनीं स्वीकारला आहे. एकनाथ महाराजाना पाच सात चुळा अंगावर टाकून घ्याव्या लागल्या, तेव्हा महात्माजींना देखील आणखी काहीं प्रसंगीं अशीच खालीं मान घालावी लागेल, ह्यात संशय नाहीं. अशी खालीं मान महात्माजींनीं घातली तरी उद्धट उद्दाम-पणाचा विजय झाला असे इतर तसल्याचं निर्लज्जाशिवाय इतर कोणीहि मानणार नाहीं. असले उद्धट व असले निर्लज्ज सर्व काळीं व सर्व प्रसंगीं नकळत साधुसताचा छळ करीत आले आहेत. ह्याच्या दर्शनानें व संगतीनें मान खालीं घालण्याचा प्रसंग कोणत्या मोठया पुरुषावर आजपर्यंत आलेला नाहीं ! डोळे मिटून नीट आपले विचार तपासण्याची ज्याना जरुरी वाटत नाहीं व जगातील व्यवहाराचा साधा धोपट मार्ग पहाण्यापलीकडे जे जाऊं इच्छित नाहींत, त्यानीं देखील, "दुर्जन प्रथम वदे" ह्या म्हणीच्या सत्यतेचा अनुभव येऊन महात्माजींचें कोमल मन ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या बैठकींत अत्यंत हळहळलें, असा सरळ अर्थ ह्या फजितीचा का करूं नये !

---

# * हिंदु–मुसलमानांची पायधरणी

ता. १८सप्टेंबरपासून ता. ८ आक्टोबरपर्यंत २१ दिवसाचा उपवास महात्माजींनीं सुरू केला आहे. तपश्चर्या ह्या नात्यानें ह्या उपवासाला महत्त्व आहेच, पण हिंदु–मुसलमानामध्यें साप्रत जी द्वेषबुद्धि पसरत चालली आहे, त्या द्वेषबुद्धीला आळा घालण्यांत यावा म्हणून दोनहि समाजाची मुख्यत्त्वें-करून पायधरणी करण्याकरिता, हा उपवास महात्माजींनीं सुरू केला आहे. सात्विक बुद्धीनें पूर्णपणे उपाशी राहून, हिंदु-मुसलमानाच्या तट्याचा तुम्ही आपसांत गोडीगुलाबीनें निकाल लावा म्हणून महात्माजींनी सर्वांचे पाय धरले आहेत. कोहाट, दिल्ली, लखनौ, नागपूर आणि गुलबर्गा येथील हिंदु–मुसलमानाच्या दंग्यामुळे महात्माजींचें अंतःकरण विदीर्ण झालें असून, लोकांचें पाय धरून दोनहि समाजातील विचारी पुरुषाच्या चरणीं एकी व्हावी म्हणून आपले प्राण अर्पण करण्याचा महात्माजीचा हा यज्ञ आहे. हिंदु–मुसलमानाचे दंगे सुरू झाल्यानंतर प्रत्येक समाजातील गुंडाच्या हातीं लाठीची सत्ता जाते, आणि नाना प्रकारचे जुलूम बायकांवर व दुर्बलांवर करण्यात येतात. महात्माजी हे अहिंसेच्या तत्त्वाचे जरी पूर्णपणें अभिमानी असले तरी असल्या जुलमाच्या वेळीं घरच्या बायकांची अब्रू वाचविण्या-करितां आणि आपल्या देवाच्या मूर्ति फोडल्या जाऊ नयेत म्हणून प्रत्येकानें प्राण जाईतों बायकांचें व देवताच्या मूर्तींचें संरक्षण केलें पाहिजे, असेंच महात्माजींचें मत आहे. मनाचा दुबळेपणा महात्माजींना बिलकूल पसंत नाहीं. एकमेकानीं एकमेकाचा प्राण घेतल्याशिवाय तंटा मिटत नाहीं अशी वस्तुस्थिति दृष्टीस पडल्यावर, महात्माजी स्वतः शौकत अल्लींशी द्वंद्वयुद्ध करण्यास उभे ठाकल्यावाचून रहाणार नाहींत. ता. १८ सप्टेंबरच्या 'यंग

* नवाकाळ, ता २० सप्टेंबर १९२४

इंडिया'मध्ये "प्रश्नातला प्रश्न" ह्या मथळ्याखालीं लिहिलेल्या अग्रलेखात महात्माजींनीं वरील तऱ्हेचें विधान केलें आहे. शौकत अल्लींच्या बोटांच्या तडाख्यानें माझ्या देहाचा गोळा होऊन पडला तर स्वतःचें सरक्षण करण्याची शक्ति हिंदूंमध्यें उत्पन्न झाली म्हणून समजावें, आणि जर शौकत अल्लींच्या धिप्पाड शरीरास मी जमिनीवर लोळविलें तर मुसलमानाचें दरडावणें संपलें म्हणून समजावें, असा तऱ्हेचें स्वसरक्षणाकरिता पूर्ण प्राणत्याग करण्याच्या मनाच्या निश्चयाचें चित्र महात्माजींनीं रेखाटलें आहे. मनाचा हा निश्चय म्हणजेच खरें शौर्य होय. हें शौर्य आज हिंदूंमध्यें नसल्यामुळें, आणि मुसलमानातील विचारी पुढारीहि एकीकरिता असलें शौर्य दाखवीत नसल्यामुळे दोनहि समाजांतील गुंडाच्या हातात एक प्रकारची सत्ता जाऊन स्त्रियाच्या पातिव्रत्याची व मालमत्तेची मालकीहि गुंडाच्याकडे आजकाल जात आहे. हिंदु पुढारी काय किंवा मुसलमान पुढारी काय, दोघेंहि आपापल्या मालमत्तेचे व बायकांच्या अब्रूचे मालक राहिले नसून, सोटा हातात घेऊन घरापुढें उभा राहणारा गुंडच घरातील बायकाचा व चीजवस्तूंचा मालक होऊन बसला आहे. ही समाजाची स्थिति दोघाच्याहि धर्मांना अत्यत लाछनास्पद आहे. गुडशाही माजली आहे, आणि ही गुंडशाही समाजातील विचारी पुरुषाच्या एक तऱ्हेच्या संमतीनेंच जन्मास आली असून विचारी पुरुषाच्या पाठिंब्यामुळेंच ह्या गुडशाहीचा फैलाव होत आहे. ह्या स्थितीला आळा घालणें दोनहि समाजातील विचारी पुरुषाच्या हातीं अद्याप आहे. विचारी पुरुषानीं मनात आणलें तर ही स्थिति हा हा म्हणता पालटल्यावाचून राहणार नाहीं. पण दंग्याधोप्यासंबंधानें जे नानाप्रकारचे तर्ककुतर्क आणि विलक्षण अफवा समाजात पसरत असतात, त्यामुळें मनोविकार क्षुब्ध होऊन विचारी लोकानाहि एकीच्या मार्गाकडे दुर्लक्ष करावेंसें वाटूं लागलें आहे. हें दुर्लक्ष आत्मघात केल्यावाचून रहाणार नाहीं. ह्या दुर्लक्षामुळे दोनहि समाजाचा नाश होत आहे. हा नाश स्वराज्यालाहि मारून टाक-

णारा आहे. स्वराज्य गेलेलें पत्करलें असें म्हणण्यापर्यंत कांहीं विचारी लोकांच्या बुद्धीला भ्रंश होऊं लागला आहे. हा बुद्धिभ्रंश टाळण्याकरितां महात्माजींनीं २१ दिवसाच्या उपवासाचें व्रत स्वीकारून दोनहि समाजांतील पुढाऱ्याचे पाय घट्ट धरले आहेत. दोनहि समाजातील पुढाऱ्यानीं योग्य वेळींच शुद्धीवर यावें, आणि आपलें कर्तव्य ओळखून दोनहि समाजांना लागलेलें लांछन धुवून टाकावे, म्हणून महात्माजी हिंदु–मुसलमानांची प्रार्थना करीत आहेत. अशी प्रार्थना तुरुंगातून सुटल्यापासून सर्व खासगी भाषणांत महात्माजींनीं सर्वांची केली आहे. सभातून बोलताना ह्याच प्रार्थनेवर महात्माजींनीं एकसारखा जोर दिला आहे, आणि हिंदु-मुसलमानाची एकी हाच मुख्य विषय आपल्या लेखाचा करून ठेवला आहे. इतकें केलें तरी दोनहि समाजातील विचारी लोक ह्या प्रश्नाकडे दुर्लक्षच करीत आहेत, कांहीं केल्या ऐकतच नाहींत. बुद्धिभ्रंशाच्या तडाख्यांतून सुटून बाहेर पडणेंच विचारी लोकाच्या जिवावर येऊं लागलें आहे ! बुद्धिभ्रंश म्हणजेच आपला प्राण अशी माया विचारी लोकात पसरली आहे. विचारी लोकाच्या डोळ्यावरील अंधःकाराचे हे पटल दूर करण्याकरिता आणि एकीच्या स्वराज्यातील खऱ्या प्राणाकडे विचारी लोकाचें लक्ष लागावें म्हणून प्राण जाईतों मी दोन्ही समाजाचे पाय धरून बसतों, असा हट्ट महात्माजींनीं धरला आहे. महात्माजींसारखा पुरुष आपले प्राणहि वेंचून ज्या अर्थी ह्या प्रश्नाकडे विचारी लोकाचें लक्ष वेधण्यास निश्चयात्मक बुद्धीनें धरणें धरून बसला आहे, त्या अर्थी हिंदु-मुसलमानाच्या एकीचा प्रश्न तितक्याच महत्त्वाचा आहे, असे पहिल्या झटक्यासरशीं प्रत्येकास वाटल्यावाचून रहाणार नाहीं. असें वाटावयास लावण्याकरिताच हा उपवास आहे. कारागृहवासामुळें आणि त्यानंतरच्या दुखण्यामुळें महात्माजींची प्रकृति अधिक क्षीण झाली आहे, तेव्हा २१ दिवसाच्या उपवासात त्याच्या देहाचें काय होईल हे कोणी सांगावें ! पण प्राणत्यागापर्यंत पाळी आली तरी प्राणत्याग

करून हिंदु-मुसलमानाच्या एकीकडे सर्व राष्ट्राचें लक्ष वेधण्याचा महात्माजींनीं निश्चय केलेला दिसत आहे. शौकत अलीशीं द्वंद्व-युद्ध करण्यात शौकत अलीच्या बोटानीं जर माझ्या शरीराचा चेंदामेंदा केला, तर तो चेंदामेंदा हिंदु समाजात खरें शौर्य उत्पन्न करील असे जे उद्गार महात्माजींनीं आपल्या लेखात काढले आहेत, त्या उद्गाराकडे पहाता, उपवासानें प्राणत्याग करून असल्या सात्विक पायधरणीनेंच सर्व राष्ट्राला शुद्धीवर आणण्याचा मार्ग महात्माजींच्या बुद्धीनें साप्रत स्वीकारला आहे, असेच म्हणावें लागतें. राष्ट्राची बुद्धि शुद्ध करण्याकरिता आपल्या प्राणाची आहुति देण्यास महात्माजी तयार झाले आहेत, ह्या वेळीं आपलें कर्तव्यकर्म करण्यास हिंदूंचे व मुसलमानाचे पुढारी कसे मागे घेतील ? महात्माजींच्या उपवासास सुरवात होण्याबरोबर हकीम अजमल खान, स्वामी श्रद्धानंद, व मौ. महंमद अली ह्या तिघानीं तावडतोब हिंदूंच्या व मुसलमानाच्या पुढाऱ्याना दिल्लीस येण्याविषयीं निमत्रणें पाठविलीं असून, ता. २३ सप्टेंबर रोजीं हिंदु-मुसलमानाच्या सर्व पुढाऱ्याची परिषद सदर निमत्रणावरून दिल्ली येथें भरणार आहे. ह्या परिषदेस हिंदुस्थानातील सर्व प्रातातील पुढारी हजर रहातील, आणि विषेशतः पजाब, दिल्ली, लखनौ, प्रयाग व काशी येथील हिंदु-मुसलमानाचे पुरस्कर्तें मोठया सख्येनें हजर रहातील, ह्यात संशय नाहीं. २१ दिवसाचे आत हिंदु-मुसलमानाचे पुढारी मनःपूर्वक प्रयत्न करूं लागले आहेत, आणि हिंदु-मुसलमानाच्या एकीकडे कोणाहि विचारी पुरुषाचें दुर्लक्ष शिल्लक राहिलेलें नाहीं, असा अनुभव महात्माजींना आणून देणें सर्व राष्ट्रभक्तांचें पवित्र कर्तव्य आहे. हकीम अजमलखान व स्वामी श्रद्धानंद ह्यानीं वेळ न गमावता परिषद बोलावण्याचें ठरविल्याबद्दल त्याचें आभार मानून हिंदु-मुसलमानांच्या प्रश्नाचा विचार करणाऱ्या सर्व राष्ट्रभक्तांनीं ता. २३ सप्टेंबर रोजीं दिल्लीस हजर राहण्यास चकूं नये, अशी सर्व पुढाऱ्यांना आमची विनंति आहे.

# * प्राण असेतों सूत काढणार



म. गांधी ह्यांचा २१ दिवसांचा उपवास उदईक बुधवारीं सायंकाळीं सोडण्यांत येणार आहे. १४ व्या दिवसानंतर महात्माजींची प्रकृती क्षीण झाली, तथापि त्यांच्या शरीरावर सात्विक तेज अधिक चमकूं लागल्यामुळें २१ दिवसांचा उपवास त्यांच्या हातून पूर्णपणे पार पडणार ह्याबद्दल डॉ. अनसारी ह्यांना कांहीं काळजी उरली नाहीं. शेवटचे चार-पांच दिवस रोज अर्धा तास सूत काढण्याचें श्रम महात्माजींनीं सोडून द्यावे अशी महात्माजींना सर्व डॉक्टरांनीं विनंति केली; पण माझ्या अंगांत रतिभरहि शक्ति शिल्लक असेतों मी सूत काढणार, असे महात्माजींनीं उत्तर दिलें. प्राण असेतों सूत काढण्याचा महात्माजींचा नियम आहे आणि हें सूत काढण्याचें त्यांचें व्रत पूर्णपणें पाळलें जाऊनच बुधवारीं त्यांचा उपवास सुटेल, ह्यांत संशय नाहीं. सत्यसंकल्पाचा योगक्षेम परमेश्वर चालवितो, तेव्हां बुधवारीं उपवास सुटेपर्यंत अर्धातास सूत कातण्याच्या त्यांच्या व्रताला अडथळा होणें शक्य नाहीं. देशसेवा आपल्या हातून अधिक चांगली घडावी, ह्या हेतूनें महात्माजींनीं हा २१ दिवसांचा उपवास चालविला आहे. अन्नमय प्राण असताहि अन्न त्यांनीं वर्ज केलें आहे, आणि हा आत्मयज्ञ चालू असतांच सूत काढण्याचें व्रत त्यांनीं सोडलें नाहीं. ह्या २१ दिवसांच्या उपवासाचे चमत्कारामुळें आत्मयज्ञाला धरून सूत काढण्याची राष्ट्रसेवा परमेश्वराच्या घरीं रूजूं झालेली आहे, असें सर्वांच्या अंतःकरणांवर बिंबल्यावांचून राहणार नाहीं. उपवास म्हणजे आत्मयज्ञाचा मुख्य पाया होय. साधी राहणी उपवासामुळें अंगवळणीं पडते, आणि

* नवाकाळ, ता. ७ ऑक्टोबर १९२४

शरीराच्या, मनाच्या, व बुद्धीच्या सर्व चोंचल्याना आपोआप आळा बसतो. सर्व चोचले सोडून द्या आणि सूत काढून राष्ट्रसेवा करा, हा महात्माजींच्या उपवासाचे बुडाशीं बीजमन्त्र आहे. २१ दिवसांच्या उपवासाच्या चमत्कारामुळें ह्या मंत्रावर लोकांची श्रद्धा बसेल ह्यांत संशय नाहीं. महात्माजींच्या आत्मयज्ञाचा पाठीराखा परमेश्वर आहे, हें गेल्या दोन तीन आठवड्यांत सर्वांच्या अनुभवास आलेंच आहे. दिल्लीची एकीची परिषद म्हणजे महात्माजींच्या उपवासाला लागलेलें गोड फळ होय. परिषदेच्या वेळीं हिंदु-मुसलमानांच्या पुढाऱ्यांच्यामध्ये पुन्हा बेकी होते कीं काय अशी भीति दोन तीन प्रसंगीं वाटूं लागली होती, पण महात्माजी उपवास करीत आहेत ह्या गोष्टीकडे सर्वांचें लक्ष वेधलें जाऊन सहिष्णुतेनें व गोडीगुलाबीनें एकी घडवून आणण्याच्या संकल्पाचा जोर अखेर यशस्वी झाला. मुसलमानाकडून आता तोडलें जाणार असे परिषदेच्या वेळीं दिसताच मौ. अबुल कलम आझाद आणि महमद अली ह्यानीं मुसलमानांना आवरून धरलें, आणि हिंदुंच्याकडून फाजील ताणलें जात आहे असें आढळून येताच पं. मदन मोहन मालवीय, स्वामी श्रद्धानंद, लाला लजपतराय, आणि बाबू भगवानदास ह्यानीं आपलें सर्व वजन एकीच्या पारड्यांत टाकण्यास कसूर केली नाहीं. परिषदेमध्ये आपापल्या अंतःकरणांतील रुखरुख दोनहि पक्षानीं स्पष्टपणें बोलून दाखविली; पण प्रमुख पुढाऱ्यानीं योग्य धोरण स्वीकारल्यानें आणि एकी करण्याचा निश्चय केल्यामुळें दोनहि समाजांतील सर्व विचारी पुरुषाना संमत होणारे ठराव परिषदेला सर्वानुमतें पास करतां आले. परिषदेंतील ही एकी काहीं मुसलमानी पत्राना मान्य नाहीं, आणि ह्या एकींत अर्थ नाहीं असें काहीं हिंदूंचें म्हणणें आहे. तथापि परिषदेच्या कार्यासंबंधानें सर्व हिंदुस्थानभर वर्तमानपत्रांतून व पुढाऱ्यांच्या तोंडून जे उद्गार निघत आहेत त्यांजकडे पाहिलें असता, परिषदेच्या कार्यासंबंधानें

काहींनीं काढलेल्या शकाना गालबोटाहून अधिक महत्त्व देण्याची जरुरी नाहीं, असेंच म्हणावें लागतें. दक्षिण हिंदुस्थानपेक्षा उत्तर हिंदुस्थानाला हिंदु-मुसलमानाच्या ह्या एकीची किंमत विशेष आहे; आणि म. गाधी ह्याच्या उपवासाचा चमत्कार दिल्ली शहरातच घडून आलेला असल्यामुळे लाहोर, दिल्ली, लखनौ ह्या शहरावर हिंदु मुसलमानाच्या एकीसंबधानें आज चागला परिणाम झालेला दिसत आहे. लाहोरास चालू असलेल्या रामलीलेच्या उत्सवासबधाने हिंदु मुसलमानात बेबनाव होणार नाहीं असें सर्वाना आज पटलें असून, दिल्ली व लाहोर येथील हिंदूनीं व मुसलमानानीं मिळून भाडण तटयासबंधाने म. गाधी ह्यानाच आपण होऊन पच निवडले आहेत. दिल्लीच्या परिषदेंत पास झालेले ठराव जसजसे लोकाना नीट रीतीने समजून देण्यात येतील तसतशी लोकामधील तेढ नाहींशी होईल, ह्यांत संशय नाही "खा हळद आणि हो गोरी" असा तत्काळ परिणाम कसा दिसेल ? तथापि एकीचा पाया नीट रचला गेला आहे, ह्याविषयी आता वाद राहिलेला नाहीं. आत्मयज्ञाचा हा प्रभाव आहे. आत्मयज्ञामुळे बेकी टाळता येते, हें जसे महात्माजीच्या उपवासाने सिद्ध केलें आहे, तसेच आत्मयज्ञाच्या जोरावर राष्ट्रसेवा प्रत्येकास करता येते, हें देखील उपवासाच्या काळात सूत काढण्याचें व्रत रोज पूर्णपणें पाळून महात्माजींनीं सर्व लोकाच्या निदर्शनास आणिलें आहे. अर्धा तास सर्वांनीं रोज सूत काढलें पाहिजे, हा नियम हिंदु-मुसलमानाच्या एकीप्रमाणेंच सर्व पुढाऱ्याना स्वीकारावयास लावण्याचा महात्माजींचा उद्योग चालू आहे. प्राण असेतों मी सूत काढणार ह्या महात्माजींच्या प्रतिज्ञेला योग्य फळ लवकरच मिळाल्यावांचून राहणार नाहीं. अर्धातास सूत काढण्याच्या नियमाचा प्रसार करावयास महात्माजी लागल्यापासून बंगाल्यात व इतर ठिकाणीं चांगले परिणाम दिसू लागले आहेत. कलकत्त्यास खादी

प्रतिष्ठानाचें दुकानांत आगस्ट महिन्याची खादी विक्री पाच सहा हजारावर होती, पण सप्टेंबर महिन्यात तीच विक्री १८-२० हजारापर्यंत गेली. कलकत्त्याचें लक्ष खादीकडे अधिक लागलें असून नवरात्राच्या महोत्सवात परदेशी कापडाला यदा अत्यत तुटपुजी मागणी आली, अशी कबुली कॅपिटल पत्रानें देखील दिली आहे. सूत काढण्याच्या कामात बगाल गुजराथच्याहि पुढें जाणार कीं काय अशी चढाओढ लागली असून, गुजराथनें मागें पडता कामा नये म्हणून महात्माजींनीं गुजराथला इषारा दिला आहे. अर्धा तास सूत काढलेंच पाहिजे असा नियम ज्यावेळेला महात्माजींनी घातला, त्यावेळेला बगाल्यात हा नियम कोणीच पाळणार नाहीं अशी ह्या नियमाची हेटाळणी करण्यात आली होती. पण २१ दिवसाच्या ह्या उपवासाच्या वेळीं कलकत्ता, बारिसाल वगैरे बंगाल्यातीलच शहरानीं कडक हरताळ पाडला आणि खादीकडे विषेश लक्ष पुरविलें, हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे. २१ दिवसाच्या उपवासात शेवटीं शेवटी सर्व शक्ति नष्ट होत असतानाहि रोज अर्धातास सूत काढण्याचा निश्चय महात्माजी तडीस नेत आहेत. हा निश्चय म्हणजे मोठा पराक्रम होय. परमेश्वर पाठीराखा असल्याशिवाय असल्या कडव्या पराक्रमाचे दिवस पार पडणें शक्य नाही. उपवास म्हणजे साध्या राहणीचा आत्मयज्ञ आणि सूत काढणें म्हणजे देशसेवेच्या पराक्रमाची तालीम, असाच महात्माजींच्या सांप्रतच्या आचरणाचा अर्थ आहे. आपल्या आचरणानें आत्मयज्ञाच्या राष्ट्रसेवेचा जो धडा ह्या २१ दिवसाच्या उपवासात महात्माजीनीं राष्ट्रापुढे ठेविला आहे, तो धडा गिरविण्याचा निश्चय उद्ईक बुधवारीं महात्माजींच्या आरोग्याबद्दल परमेश्वराची प्रार्थना करीत असताना सर्व देशभक्तांकडून करण्यात येईल, असा आम्हांस पूर्ण भरंवसा वाटत आहे.

— —

# * वरवंटा फिरूं लागला



इग्लंडात कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाच्या हातीं अधिकार जाण्याच्या पूर्वीच हिंदुस्थानातील नोकरशाहीनें घाई करून बंगाल्यात वरवटा जोरानें फिरविण्यास प्रारभ केला असून ७२ पुढाऱ्याना एकदम अटकेत ठेवण्यात आलें आहे! १८१८ च्या रेग्युलेशनखालीं कलकत्ता म्युनिसिपालिटीचे चीफ ऑफिसर बाबू सुभाषचद्र बोस व आणखी १५-१६ पुढारी ह्याना कैदेंत ठेवण्यात आलें असून लाटसाहेबानीं काढलेल्या नव्या ऑर्डिनन्सच्या हुकुमाखालीं इतर पुढाऱ्याना पकडून आतापर्यंत ७२ बळी नोकरशाहीनें घेतले आहेत. कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष उद्या अधिकारारूढ झाल्यावर आणखी शेपन्नास इसमाना कैदेंत टाकण्यात येईल, असा अंदाज आहे. १८१८ च्या रेग्युलेशनखालीं कैदेंत टाकण्यात आलेल्याची चौकशीहि करावी लागत नाहीं व आरोपीनें कोणता गुन्हा केला हें खुद्द आरोपींनाहि कळविण्याची जरुरी नाहीं. १८१८ सालच्या रेग्युलेशनच्या दोरीनें तुला फासावर चढविण्यात येत आहे एवढा मत्र उच्चारला म्हणजे काम भागतें. ही असली बेबंदशाही करण्यास पुरेसा पुरावा आहे असें सर्टिफिकिट लार्ड रीडिंग ह्यानीं दिलें असून लॉर्ड रीडिंग हे इंग्लंडचे मुख्य न्यायाधीश होतें, तेव्हां त्याच्या सर्टिफिकिटानें चौकशीन काहीं न्यून उरलेलें नाहीं, असा नोकरशाहीतर्फे गवगवा करण्यात येत आहे. लाटसाहेबाचे अर्डिनन्सखालीं पकडलेल्या पन्नास साठ इसमांची स्थितीहि १८१८ च्या रेग्युलेशनखालीं कैदेंत टाकलेल्यांच्या सारखीच आहे. रौलेट ॲक्टमुळें चौकशी न करतां तुरुगात टाकण्याचे जे अधिकार सरकार घेऊं पहात होतें, तेच अधिकार सहा महिन्यांच्या

* नवाकाळ, ता. ३१ आक्टोबर १९२४

मुदतीपुरते कोणत्याहि प्रांतिक सरकारास, ऑर्डिनन्स काढून लाटसाहेबांना देतां येतात. लाटसाहेबांनीं ऑर्डिनन्स काढून असे अधिकार दिल्याबरोबर पाहिजे त्याला वारंटाशिवाय एकदम पकडून स्वतः निर्माण केलेल्या व झटपट चौकशी करणाऱ्या कोर्टांचे मार्फत पाहिजे तेवढी मोठी शिक्षा देऊन प्रांतिक सरकारांना पाहिजे तितक्या सद्गृहस्थांना मनमुराद छळतां येतें. १८१८ च्या रेग्युलेशनचीच धाकटी बहीण म्हणजे ऑर्डिनन्सची सत्ता होय. पाहिजे त्याला वारंटाशिवाय पकडावें, पुराव्याचा कायदा गुंडाळून ठेवून पाहिजे तशी झटपट व गुप्त रीतीनें चौकशी करावी आणि पाहिजे ती शिक्षा ठोठावावी, असा ऑर्डिनन्सचा वरवंटा सहा महिन्यापर्यंत बंगाल्यात फिरावयाचा आहे. ह्या झटपट कोर्टांचें काम गुपचुप चालावयाचें आहे. कोणी कोणाविरुद्ध कशा साक्षी दिल्या व काय पुरावा पुढें आला हें या कानाचें त्या कानासहि समजावयाचें नाहीं. असल्या खटल्यात आपण साक्ष दिली असतां लोक रागावतात व सूड उगवतात म्हणून साक्षीलाच कोणी पुढें येत नाहींत, अशी पोलिसाची तक्रार असल्यामुळें आरोपींना पटदिशी शिक्षा सांगण्याकरिता आणि साक्षीदारांचें व पोलिसांचें गुप्त कृत्य झाकून ठेवण्याकरितां आर्डिनन्सच्या नव्या वरवट्याची योजना आहे. कलकत्त्यातील कॉंग्रेसच्या ऑफिसमधले बहुतेक सर्व पुढारी पकडण्यांत आले असून एकटे देशबंधु दास काय ते आज त्यांच्या पक्षात तुरुंगाच्या बाहेर आहेत. देशबंधु दास ह्यांना आज पकडण्यात येणार नाहीं असें प्रसिद्ध झालें आहे. तथापि सहा महिन्यांचा हा वरवंटा त्यांच्या डोक्यावर केव्हा आदळेल ह्याचा नेम नाहीं. नोकरशाहीच्या ह्या अनन्वित अत्याचारांचें कारण काय ? कायदा व व्यवस्था राखण्याकरितां आम्हीं हे अत्याचार करीत आहोंत, असें नोकरशाही म्हणत आहे. कायदा व व्यवस्था गेल्या दोन चार महिन्यांत कोठें बिघडली होती ? गेले दोन तीन महिने बंगाल्यात

सर्व कांहीं सुरळीत चाललें आहे, मग नोकरशाहीचा ह्या वरवंटयाचा अत्याचार कशासाठीं ? आज नाहीं उद्या खून–अत्याचाराकडे लोकाचें लक्ष अधिक लागेल, कारण अरेरावी जुलूम पद्धतीचा अंगिकार करून स्वराज्याचें हक्क लोकांना देण्यास नोकरशाही टाळाटाळी करीत आहे, अशा तऱ्हेचें उद्गार प. मोतीलाल नेहरू व देशबधु दास ह्याच्या तोंडून असेंब्लीमध्ये व असेंब्लीच्या बाहेर निघाले आहेत. हे उद्गार म्हणजे कबुलीच होय असें ॲंग्लो–इडियन पत्राचें म्हणणें आहे. ह्या उद्गारात कबुली कोठे आहे ? जुलमाचा अतिरेक झाला असता व प्रजाजनाच्या हक्काकडे एकसारखें दुर्लक्ष होत गेलें असता जुलूम असह्य होऊन खुनी अत्याचाराकडे लोकाची प्रवृत्ति होते, हा सर्व देशाचा व सर्व काळातील इतिहासाचा सिद्धांत आहे. ह्या सिद्धा-ताची आठवण देण्यापलीकडे देशबधू दास किंवा प. मोतीलाल नेहरू ह्यानीं आज काहीं केलेलें नाहीं. अशी आठवण देणें म्हणजे अत्याचाराची बजबजपुरी माजली आहे म्हणून कबुली देणें कसे होईल ? महात्मा गाधी ह्याच्या नॉन व्हॉयलन्सच्या उर्फ शाततेच्या तत्त्वाला देशबधू दास ह्यानीं व त्याच्या अनुयायानीं पूर्णपणें वाहून घेतलेलें आहे. असहकारितेच्या चळवळींत पडल्यापासून देशबधु दास किंवा प. मोतीलाल नेहरू ह्यानीं शाततेचें व्रत बिलकुल सोडलेलें नाहीं. बगाल्यातील ॲर्डिनन्सचा नवा वरवटा सुरू झाल्यानतर सिमल्याहून कलकत्त्यास परत जाताना दे. बं. दास ह्यानीं साप्रतच्या अनन्वित जुलमासबधानें जे उद्गार काढले आहेत त्या उद्गारातहि शाततेची शपथ आपण व आपल्या पक्षाच्या लोकानीं घेतलेली आहे, असे देशबधु दास ह्यानीं ठासून जाहीर केलें आहे. मग ॲर्डिनन्सच्या वरवटयाची जरुरी काय ? बिन चौकशीनें साठसत्तर पुढाऱ्यांना आज कैद-खाना का दाखविण्यात येत आहे ? स्वराज्याचे हक्क जर दिले नाहींत तर अत्याचाराकडील लोकांची आजची प्रवृत्ति वाढेल, ह्या सिद्धाताला

अनुसरून भविष्यकाळची ही प्रवृत्ति हाणून पाडण्यासाठी आजचा भयंकर जुलूम नोकरशाही करीत आहे. तूं नाहीं तुझ्या बापाने पाणी गढूळ केलें असेल असें म्हणून इसापनीतींतील लांडग्यानें कोकराला खाऊन टाकलें; तशा प्रमाणें तूं नाहीं तुझा मुलगा पाणी गढूळ करील असे म्हणून बंगाल्यातील शांतताप्रिय व निरुपद्रवी कोकराना आज बळी देण्यात येत आहे! स्वराज्याच्या हक्काकरिता झगडणाऱ्या राजकीय चळवळीला दडपून टाकण्याकरिता हा वरवटा फिरत आहे. आज प्रत्यक्ष अत्याचार घडून आल्याची सबब काहीं दाखविता येण्यासारखी नाहीं. तुम्हाला स्वराज्याचे हक्क देत नाहीं ते नाहींच, पण असल्या जुलमामुळे उत्पन्न होणाऱ्या नैसर्गिक असंतोषालाहि आगाऊच आम्ही दडपून टाकतों, असें ह्या वरवट्याचें स्वरूप आहे. राजकीय चळवळ करणारा कोणताहि पक्ष असो, नेमस्ताचा पक्ष असो किंवा सरकारी बगलबच्च्याचा असो, सर्वांनाच हा वरवटा सारखा जाचक होणार आहे. विषानें भरलेल्या बाटल्या सर्वांच्या पुढे ठेवण्यात आल्या असून जबरदस्तीनें कोणाला हें विष पाजण्यात येईल ह्याचा बिलकूल नियम राहिलेला नाहीं. ह्या विषाच्या हड्या घराबाहेर फेकून देणे प्रत्येकाचें पवित्र कर्तव्यकर्म आहे. आम्ही नोकरशाहीच्या विश्वासातले, म्हणून कोणीहि ह्या वेळीं स्वस्थ बसता कामा नये. कारण विष कोणत्या वेळीं कोणाच्या अन्नात घालण्यात येईल हें कोणासहि समजणार नाहीं. सख्ख्या भावानेहि सख्ख्या भावाचा ह्या कामी विश्वास धरू नये. हें विष घरात आहेतों कोणासहि झोंप येणें शक्य नाहीं. हे विष घरातून बाहेर कसे काढावयाचें, हा सर्व हिंदुस्थानपुढें आज मुख्य प्रश्न होऊन बसला आहे. आपल्या विषारी दाताने चावा घेत ७२ सद्‌गृहस्थाना विषानें घायाळ करून, जुलमी अत्याचारांचा काळसर्प बंगाल्यात सहा महिने एकसारखा फिरावयाचा आहे. आपल्या विषारी दंशाचें

काम बंगाल्यांत चालू असताना, इतर ठिकाणीं हा ऑर्डिनन्सचा काळसर्प फिरणार नाहीं असें कोणत्याहि राजकीय संस्थेनें किंवा प्रांताने ह्या वेळीं मानतां कामा नये. ह्या नव्या वरवंटयाला तोंड देण्यासाठीं काय व्यवस्था करावी, ह्या सबंधाचा खल करण्याकरितां देशबंधू दास ह्यानीं स्वराज्य पक्षाच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलची सभा कलकत्त्यास पुढील आठवडयात भरविण्याचें ठरविलें असून, पं. मोतीलाल नेहरू हे ह्या आठवडयात महात्मा गांधी ह्याजबरोबर ऑर्डिनन्सनें उत्पन्न केलेल्या नव्या परिस्थितीचा विचार दिल्ली येथें करणार आहेत. नेमस्त, डॉ. बिझाटबाई, वगैरे सर्व पक्षाची एकी कॉंग्रेसमध्यें व्हावी म्हणून हातानें सूत काढण्याच्या शर्तीस पं. मोतीलाल नेहरू यानीं समति देण्याचें म. गाधी याजपाशीं कबूल केलें आहे. पुढाऱ्याना ह्याप्रसगीं आत्मयज्ञ पूर्वींहूनहि अधिक स्वार्थत्यागानें करावा लागेल ह्यात संशय नाहीं, पण तेवढयानें भागावयाचें नाहीं. पुढाऱ्यांना ठेंचण्याकरिताच हा वरवटा आहे. पुढारी आत्मयज्ञ स्वेच्छेनें करोत किंवा न करोत, ऑर्डिनन्सच्या बकासुरानें बळी मागितला असता कारागृहवासाच्या यातनातून सुटणें त्याना शक्य नाहीं. नोकरशाहीच्या ह्या वरवटयाच्या जुलमाला जर आळा बसावयाचा असेल, तर सामान्य लोकाच्या स्वार्थत्यागाच्या व शांततेच्या आत्मयज्ञानेंच बसणार आहे. ह्या प्रसंगीं बहुजनसमाजानें करावयाच्या स्वार्थत्यागाची दिशा महात्मा गाधी ह्याजबरोबर होणाऱ्या वाटाघाटींत या आठवडयात मुक्रर ठरल्यानतर बहुजनसमाजानें जर झपाटयानें त्या दिशेनें पावलें टाकलीं, तरच वरवंटा फिरविणाऱ्या नोकरशाहीवर योग्य परिणाम होणार आहे. तेव्हां सर्व पक्षाचे पुढारी व अनुयायी यांनीं सर्वांनीं एक होऊन, जरूर तो आत्मयज्ञ श्रद्धेनें व स्वेच्छेनें करण्यास ह्यावेळीं पुढें येणें अत्यंत जरूरीचें आहे.

---

# * त्रिमूर्तीचा खादीचा अवतार

कलकत्त्यांत दे. बं. दास ह्यांच्या घरीं स्वराज्यपक्ष व म. गांधी ह्यांजमध्यें चाललेल्या वाटाघाटींचा शेवट कॉंग्रेसमध्यें पूर्ण एकी घडवून आणण्यानें झाला आहे, ही संतोषाची गोष्ट होय. बंगाल्यातील दडपशाहीनें ही एकी तावडतोब घडून आणली, हें दडपशाहीचे उपकारच झाले आहेत. नानाप्रकारच्या जुलमानीं मनुष्य त्रासला असता परमेश्वराला मनुष्याच्या अंतःकरणावर छाप बसविण्यास संधि मिळते म्हणून म्हणतात तें खोटें नाहीं. गांजलेला मनुष्य तेव्हाच भक्त होऊं शकतो. मनुष्याची आपत्ति ही परमेश्वराची संधी आहे! लाटसाहेबानीं नवा अर्डिनन्स काढून बंगाल्यांत दडपशाहीची जर खळबळ उडवून दिली नसती, तर म. गांधी, दे. बं. दास व मोतीलाल नेहरू ह्या त्रिमूर्तींची एकी होणें फार कठिण गेलें असतें. पण आज ह्या त्रिमूर्तींची एकी झाली आहे. तिघांच्या सहीनें जें जाहीर पत्रक कलकत्त्यास प्रसिद्ध करण्यात आलें आहे, तें जाहीर पत्रक म्हणजे त्रिमूर्तींचा खादी–अवतार होय. म. गांधी व दे. बं. दास ह्यांजमध्यें कलकत्त्यास जी चर्चा झाली, त्या चर्चेचें त्रोटक स्वरूप मद्रासच्या हिंदु पत्राच्या बातमीदाराने प्रसिद्ध केलें आहे. चर्चेकरितां जमलेल्या सर्व पुढाऱ्यांची तोंडमिळवणी एका बाबींत चटदिशीं झाली. दडपशाहीला राष्ट्रानें सणसणीत उत्तर दिलें पाहिजे ह्याबद्दल सदर चर्चेंत वादच नव्हता; पण सणसणीत उत्तर म्हणजे काय? बंगालची दडपशाही सुरू होण्याबरोबर सर्व हिंदुस्थानभर चोहोंकडे सभा भरवून दडपशाहीचा पूर्ण निषेध करण्यांत आला; मुंबईच्या प्रेसिडेन्सी ॲसोसिएशननें देखील निषेध केला;

* नवाकाळ, ता. ९ नोव्हेंबर १९२४

पण निषेध करून कोठें भागतें ? असल्या निषेधाला नोकरशाही थोडीच जुमानणारी आहे ? सर्व बंगालभर हरताळ पडला, कलकत्ता शहरातील सभाना वीस–वीस हजार तीस–तीस हजार लोक लोटलें, पण दडपशाहीला आळा कसा घालावयाचा हा प्रश्न शिल्लकच राहिला. लोकांच्या अंतःकरणाची संतप्त स्थिति पाहून विलायत सरकार कांही तरी करील म्हणून म्हणावें तर कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारारूढ झाल्यानें एकीकडे आड तर दुसरीकडे विहीर अशी स्थिति झाली. हिंदुस्थानच्या नोकरशाहीच्या चुलीतील अग्नीच्या भडकणाऱ्या ज्वाळा इंग्लंडातील वैलातून निघत आहेत, अशी स्थिति दृष्टीस पडली. दडपशाहीला आळा घालण्यास प्रधानें योजण्यात यावयाच्या उपायाची चर्चा दे. बं. दास ह्यांच्या घरीं चालली असताना शेवटीं बहिष्काराशिवाय दुसरा उपाय नाहीं, असे सर्वांचें म्हणणें पडलें असे मद्रासच्या हिंदु पत्राच्या बातमीदारानें प्रसिद्ध केलें आहे. बहिष्कार घालावयाचा कसा ? बंगालच्या बंगभंगापासून आज वीस वर्षें बहिष्काराचें शस्त्र लोकांपुढें आहे. स्वदेशी व बहिष्कार ह्या जोडगोळीच्या पायींच सुरतच्या कॉंग्रेसमध्यें रणें माजलीं हें सर्वांना विश्रुत आहे. हा बहिष्कार यशस्वी होईल, अशा रीतीनें काम करण्याचा मार्ग कोणता ? हिंदुस्थान देश कापसाचा असल्यामुळें कापडावरील बहिष्कार हिंदुस्थानच्या शक्तीबाहेरचा नाहीं, पण हा बहिष्कार तरी गेल्या वीस वर्षांत कोठें सफल झाला आहे ? हा सफल न होण्याचीं कारणें जर पाहूं गेलें, तर गिरणीवाल्यानी वंगभंगाच्या वेळच्या बहिष्काराला पाठिंबा दिला नाहीं आणि त्यानंतर विलायती कापडाऐवजीं जपानी किंवा अमेरिकन कापडावर तहानभूक भागविण्याची प्रवृत्ति दिसूं लागली; अशीं कारणें बहिष्काराचें शस्त्र जाज्वल्य न होण्याचीं दृष्टीस पडत आहेत. हीं कारणें टाळावयाचीं कशीं ? कापडाचा धंदा व सूत काढण्याचा उद्योग सामान्य बहुजनसमाजाच्या हातीं गेल्याशिवाय बहिष्काराला निर्बल करणारीं

कारणें टाळता यावयाचीं नाहींत, असा गेल्या वीस वर्षांचा अनुभव आहे. सूत काढणें व कापड विणणें ह्या उद्योगाचा व बहुजन–समाजाचा एकजीव कसा करावयाचा ? शेतकरी वर्ग व सामान्य बहुजन–समाज ह्यांच्यामध्यें खादीची उत्पत्ति व स्थिति कायम कशी करावयाची ? उत्पत्ति करावयास लागलें आणि स्थितीचें आसन थोडेसें आखलें गेलें म्हणजे मॅंचेस्टरला लगेच चिमटा बसून हिंदु–मुसलमान, ब्राम्हण–ब्राम्हणेतर, अंत्यज व जातीवत हिंदु, असे नानाप्रकारचे तटे लावण्यात येत आहेत, आणि त्या तंटयाच्या पायीं बहुजनसमाजाच्या स्वतःच्या सुताच्या व स्वतःच्या कापडाच्या धंद्यांचा विनाश होत आहे. उत्पत्तीला प्रोत्साहन मिळालें पाहिजे. स्थितीची जोपासना होण्यास व लय टाळण्यास हिंदु–मुसलमानाची एकी आणि अस्पृश्यतेचें निवारण ह्या गोष्टी अत्यंत जरुरीच्या आहेत, तेव्हा ह्या बाबीसंबंधाचा म. गांधी ह्यांचा कार्यक्रम दे. बंधु दास ह्यांच्या घरीं जमलेल्या सर्व पुढाऱ्यांनीं तेव्हांच कबूल केला, ह्यात कांहीं नवल नाहीं. विलायती कापडावर बहिष्कार घालण्याऐवजी सर्व परदेशी कापडावर बहिष्कार घालण्याचा ठराव सर्वानुमतें पास होऊन, ह्या बहिष्कारासंबधानें सर्वांची एकी व्हावी म्हणून असहकारितेच्या कार्यक्रमापैकीं कोर्टावरील व इतर बहिष्कार म. गांधी ह्यानीं पूर्वी जाहीर केल्याप्रमाणें, सांप्रत अधांतरीं ठेवण्यात आले. अधांतरीं ठेविलेल्या बहिष्कारासंबधानें व्यक्तिशः कोणी आपलें आचरण बदलण्याचें कारण नाही, हें उघड आहे, पण वकिलाचा वर्ग, सावकाराचा वर्ग, कोर्टामध्ये जाणें भाग असलेल्या कुळांचा वर्ग कॉंग्रेसमध्यें राजरोसपणें सामील होण्यास कोणतीच हरकत उरलेली नाहीं. शिवाय सर्व परदेशी कापडावर बहिकार घालण्यात यावा, असें म्हटलेलें असल्यामुळें एकटया इंग्लंडच्या द्वेषाचाहि दोष हा बहिष्कारात उरलेला नाहीं. अशा स्थितींत बिझांटबाईसारख्यांना व ना. श्रीनिवास शास्त्री ह्यांच्या-

सारख्या नेमस्तांना कॉंग्रेसमध्यें सामील होण्यास तत्वतः कोणतीच हरकत उरलेली नाहीं. बहिष्काराच्या सभोंवारच्या हरकती दूर करण्यासंबंधाचा हा बंदोबस्त झाला. पण तेवढयानें बहिष्कार यशस्वी कसा होईल? घराचें सभोंवारचें अंगण म्हणजे घर नव्हे. खरी शक्ति घरांत असते, अंगणांत नसते. बगालच्या दडपशाहीला उत्तर द्यावयाचें असेल तर अंगण साफ करून दरवाजातून अंगणात येण्यास अडथळा करणाऱ्या दरवाजाच्या आडकाडया काढून टाकल्यानें काम भागणारें नाहीं. घरात शक्ति पाहिजे! परदेशी कापडावरील बहिष्कार शक्तीशिवाय यशस्वी कसा होईल? बहुजन-समाजाचें व कापडाच्या उद्योगाचें लग्न लावल्याशिवाय घरांत शक्ति केव्हांहि उत्पन्न व्हावयाची नाहीं. हातानें सूत काढण्याचा व कापड विणण्याचा धदा लोकांच्या नेहमींच्या ससाराशीं संलग्न कसा करावयाचा? सर्वांनीं खादी वापरली पाहिजे, असा निश्चय केल्याशिवाय बहुजन–समाजाच्या संसारात खादीच्या धद्याला प्रतिष्ठान मिळावयाचें नाहीं. परदेशी कापडावर बहिष्कार घालवयाचा म्हणजे खादीला प्रोत्साहन द्यावयाचें, असेच होऊन बसलें आहे. हें प्रोत्साहन कसें द्यावयाचें? कॉंग्रेसचें कामकाज करीत असताना आणि सार्वजनिक सभातून किंवा राजकीय सभातून हजर असताना कॉंग्रेसच्या सर्व सभासदानीं खादीच वापरली पाहिजे, असा नियम म. गाधी, दे. बं. दास, व प. मोतीलाल नेहरू ह्या त्रिमूर्तीनीं आपल्या जाहीर पत्रकाच्या द्वारें सर्वांना घालून दिला आहे खादी वापरण्याविषयींच्या आचारासंबंधाचा हा नियम सरकारी नोकरींत असणारांनाहि फार उपयोगी पडणारा आहे. साहेब रागावेल म्हणून ज्याना साहेबापुढें खादी वापरता येणें संसाराच्या दृष्टीने सोयीचें नाहीं, त्यानीं इतर सार्वजनिक मेळयाच्या प्रसंगीं, मग ते मेळे धार्मिक स्वरूपाचे असोत किंवा राजकीय स्वरूपाचे असोत, राष्ट्राचा पोषाक म्हणून खादीच वापरली पाहिजे, अशी त्रिमूर्तीच्या

जाहीरनाम्यात आज्ञा आहे. परदेशी कापडावर बहिष्कार घालून खादी वापरण्याचा फैलाव जसजसा अधिक होईल तसतशी खादीची उत्पत्ति अधिक होत जाणारच, हें उघड आहे. पण हातानें सूत काढणें व कापड विणणें हे धंदे बहुजन–समाजाच्या घरादारांत कायमचें आसन ठोकून बसल्याशिवाय परदेशी कापडाशीं झुंजण्याचें खरें सामर्थ्य राष्ट्रात उत्पन्न व्हावयाचें नाहीं. ह्या धंद्याचा स्वीकार स्वेच्छेनें व निश्चयानें बहुजन–समाज केव्हा करील ? शिकले सवरलेले वरचे लोक उत्साहानें सूत काढीत आहेत व खादी वापरीत आहेत, असा प्रत्यक्ष अनुभव आल्याशिवाय बहुजनसमाज ह्या धंद्याचा स्वीकार निश्चयाने करणार नाहीं. बहुजनसमाजास तसा अनुभव आणून देण्यापुरता आणि वरच्या वर्गाचा स्वार्थत्याग बहुजन–समाजाच्या अतःकरणास पटविण्याकरिता कॉंग्रेसचा सभासद होण्याची चार आण्याची शर्त काढून टाकून त्याच्या जागीं प्रत्येक सभासदानें दर महिन्याला स्वतः किंवा हस्तकाकडून काढलेलें दोन हजार यार्ड सूत कॉंग्रेसला वर्गणीदाखल दिलें पाहिजे, असा नियम बेळगावच्या कॉंग्रेसच्या वेळीं पास करून घेण्याचें म. गांधी, दे. ब. दास व प. मोतीलाल नेहरू ह्या त्रिमूर्तींनीं ठरविलें असून सर्व देशभक्तांना आपल्या जाहीर पत्रात तशी आज्ञा केली आहे. प्रत्येकानें स्वतःच हातानें सूत काढलें पाहिजे, एरव्हीं कॉंग्रेसच्या सभासदाचा आत्मयज्ञ बहुजन–समाजास पटावयाचा नाहीं असा म. गांधी ह्यांचा आग्रह आहे; पण खादीच्या चळवळीला तन-मन-धन अर्पण न करितां इतर चळवळींत प्राधान्येंकरून पडलेल्यांना बहिष्काराची खादीची चळवळ उचलून धरण्यास सोयीचें पडावें व कॉंग्रेसला पूर्ण पाठिंबा देता यावा म्हणून सूत काढण्याचा हा आत्मयज्ञ जरी स्वतः केला नाहीं तरी उपाध्यायाला सुपारी देऊन उपाध्यायाचे मार्फत हा आत्मयज्ञ करण्यास हरकत नाहीं अशा तडजोडीला म. गांधी राजी झाले, आणि ह्या उपाध्यायाच्या तडजोडीमुळें

म. गांधी, दे. बं दास, व पं. मोतीलाल नेहरू ह्या त्रिमूर्तींची एकी झाली. बंगालच्या दडपशाहीला उत्तर देता यावें म्हणून कापडावरील बहिष्काराचें शस्त्र जाज्वल्य करण्याकरितां सर्व अडचणींचा व तडजोडींचा विचार करून त्रिमूर्तींनीं आपल्या जाहीरनाम्यांत नवा खादीचा अवतार लोकापुढें ठेवला आहे. ह्या अवताराची पूजा–अर्चा व भक्ति बहुजन समाजानें अंतःकरण-पूर्वक केली असतां हा नवा अवतार नवसास पावून दडपशाहीच्या संकटातून सर्वांना सोडवून स्वराज्याचें फळ राष्ट्राच्या पदरात टाकल्यावाचून राहणार नाहीं. बेळगावच्या कॉंग्रेसच्या वेळचीं सर्व भांडणें त्रिमूर्तींच्या जाहीरनाम्यानें नाहीशीं केलीं आहेत. सर्वांची एकी उत्तमप्रकारें झाली आहे. कौन्सिलमध्यें व इतर ठिकाणीं कॉंग्रेसचा स्वतंत्र घटकावयव ह्या नात्यानें आपलें कामकाज करण्यास व फंड उभारण्यास स्वराज्य पक्षास ह्या जाहीरनाम्यानें पूर्ण मुभा दिली असून, कॉंग्रेसच्या संस्थानीं तन मन-धन अर्पण करून खादीचा अवतार सफल करण्याचे अनुष्ठान चालविलें असतांना स्वराज्य पक्षास मनोभावे मदत करण्यास कोणतीच अडचण उरलेली नाहीं. प्रत्येक संप्रदायाचा स्वतंत्रपणा कायम राखून कॉंग्रेसमध्यें सर्वांची एकी करून खादीचा अवतार यशस्वी करणारा मार्ग त्रिमूर्तींच्या जाहीरनाम्यानें आखलेला आहे. तत्त्वाचा गलबला मिटला असल्यामुळें स्वार्थत्यागपूर्वक जोरानें खादीच्या कामास लागण्याची वेळ आलेली आहे. खादीचा अवतार जर यशस्वी झाला तर एकट्या बंगाल्यात दरमहा दोन कोटींचा नवा व्यवहार सुरू होणार आहे, हें आचार्य रॉय ह्यानीं सिद्ध केलेलें आहे. सर्व हिंदुस्थानभर दरमहा पाच-दहा कोटींचा नवा व्यवहार सुरू करण्याची ज्या अवताराची शक्ति, त्या अवताराचें कार्य व्यवस्थित रीतीनें पार पाडण्यास प्रत्येक तालुक्यांत व जिल्ह्यांत किती तरी चोवीस तास राबणाऱ्या खादीच्या सेवकाची जरुरी आहे. राष्ट्रीय सभेच्या संस्थानीं हे सेवक कसे नेमावयाचे, सेवकाच्या संसाराची सोय कशी

लावावयाची व खादीचें कार्य व्यवस्थितपणें रोजच्या रोज लोकांकडून कसें पार पाडून घ्यावयाचें ह्या संबंधाची मोठी योजना तयार करण्यात म. गांधी सांप्रत गुंतले असून, बेळगावच्या कॉंग्रेसपर्यंत परदेशी कापडावरील बहिष्काराचा निश्चय अंमलात येऊन सर्व राष्ट्राला व्यापणाऱ्या राष्ट्रसेवकांच्या नव्या जाळ्याची व्यवस्था म. गांधी, दे. ब. दास व पं. मोतीलाल नेहरू ह्या त्रिमूर्तींना जोरानें सुरू करता येईल, असा अंदाज आहे. ही सेवकाची व्यवस्था सुरू झाल्यावर वर्ष दोन वर्षांच्या अवधींत खादीच्या अवताराचें दृश्य फळ लोकांच्या संसारात प्रत्यक्षपणें दृष्टीस पडल्यावांचून राहणार नाहीं. बंगालच्या दडपशाहीनें त्रिमूर्तींच्या खादीच्या अवताराचें स्वरूप लोकांपुढें ठेवून बेळगांवाच्या कॉंग्रेसमधील सर्व तंटेबखेडे टाळल्याबद्दल व बहिष्काराचें शस्त्र जाज्वल्य करण्याचा खरा मार्ग लोकाना दाखविल्याबद्दल दडपशाहीचें अभिनंदन जेवढे करावें तेवढें थोडेंच होणार आहे!

---

# * वेडयाचा चरखा



काहीं लोक म. गाधी याना वेडा समजतात. या वेडयाचा चरखा बेळगावच्या कॉंग्रेसनें आपल्या शिरावर कसा धारण केला ह्या संबधाचें आश्चर्य सदर धूर्तांना वाटत आहे. बेळगावास कॉंग्रेसच्या मंडपात चौदा-पंधरा हजार स्त्री पुरुष हजर होते, शिवाय विजयनगरची कॉंग्रेसची यात्रा एक लाख लोकांनीं तरी केली असावी असा अंदाज आहे. एवढया मोठया समुदायाला चरख्यातील वेडेपणा कसा दिसला नाहीं, ह्याबद्दल सांप्रत टीका होत आहे. लाख-दीड लाख लोकांच्या डोळ्यावर भुरळ पाडण्याची जादू म. गाधी ह्याच्या अंगीं कोणती आहे, ह्याबद्दल वादविवाद धूर्तांनीं सुरू केला आहे. म गाधी वेडा आहे म्हणजे काय? ह्या वेडयात व टीका करणाऱ्या धूर्तांत फरक कोणता आहे? बुद्धिमत्तेच्या दृष्टीनें विचार केला तर म. गाधी ह्याचे लेख टीका करणाऱ्या धूर्तांच्या लेखाहून अधिक विद्वतेचे असतात, असेंच म्हणणें भाग येतें. विद्वत्तेच्या दृष्टीनें टीका करणारे धूर्त फार कमी प्रतीचे आहेत. म. गांधी विद्वान आहे, तर मग वेडा कसा? विद्वत्तेचेंच वेड ह्याला लागलें आहे, असें ह्या धूर्तांचें म्हणणें आहे. विद्वत्ता एकांगी होऊं शकते, आणि एकाच गोष्टीचा नाद लागला असता इतर व्यवहाराची व विद्वत्तेची फारकत होते. व्यवहाराचा व म. गांधी ह्याच्या विद्वत्तेचा कांहीं संबध नाहीं, असें ह्या धूर्तांचें म्हणणें आहे. जसजसें विद्वत्तेचें शिखर गगनचुंबी होऊं लागतें तसतशी विद्वत्तेची दृष्टी आकाशातील ढगावर खिळून राहून जगांतील व्यवहार अत्यंत श्रेष्ठ विद्वानालाहि समजेनासे होतात, असा धूर्तांचा ठाम सिद्धांत आहे. म. गांधी

* नवाकाळ, ता. ४ जानेवारी १९२५

विद्वान आहेत ह्या कलमाची अशी विल्हेवाट लावल्यानंतर म. गांधी अत्यंत स्वार्थत्यागी आहेत, ह्या सद्‌गुणालाहि हे धूर्त फारशी किंमत देत नाहींत. विद्वान असून स्वार्थत्यागी झाल्यानंतर खादीच्या एका पंचावर जर म. गांधी दिवस कंठीत असले तर ते मोक्षाच्या मार्गाला अधिक लागले आहेत आणि व्यवहाराशीं त्याचा संबंध तुटला आहे असें समजा, म्हणून हे धूर्त लोकाना सांगत आहेत. मोक्षाच्या मार्गाला लागलेला साधुपुरुष ह्या नात्यानें महात्माजींची किंमत मोठी असेल, पण लोकाच्या रोजच्या संसाराच्या गरिबीचा विचार करताना ह्या वेडयाच्या चरख्याचा काय उपयोग होणार, म्हणून सवाल हे धूर्त करीत आहेत. जितका अधिक विद्वान तितका व्यवहारात अधिक निरुपयोगी, जितका अधिक स्वार्थत्यागी तितका व्यवहारात अधिक कुचकामाचा, अशी ह्या धूर्तांची विचारसरणी आहे. काही छक्केपंजे पाहिजेत, थोडी लबाडी पाहिजे, आपमतलबहि साधला पाहिजे, एरव्हीं राजकारणांतला लोकसंग्रह कसला होणार ? व्यवहारातील लोकसंग्रहाला व्यवहारातीलच धूर्त, वस्ताद व अंशतः लबाड असलेलीं माणसें पुढारी पाहिजेत, एरव्हीं व्यवहारात यश यावयाचें नाहीं, अशा तऱ्हेचा ह्या धूर्तांचा संप्रदाय आहे. ह्या संप्रदायाच्या विचारसरणीला बेळगावच्या कॉंग्रेसनें खोटें ठरविलें आहे. वेडयाचा चरखा लाख दीड लाख लोकानीं जाणून बुजून, समजून उमजून, बेळगावच्या यात्रेचे हाल सोसून स्वतःच्या शिरावर धारण केला आहे. हे लाख दीड लाख लोक आकाशातील ढगात संचार करणारे नाहींत; विद्वत्तेचे उपासक नाहींत; संसारांतील सुखःदुखें रोजच्या रोज उपभोगणारे हे सर्व लाख दीड लाख आहेत. महात्माजी एकटा वेडा असेल, पण हे दीड लाख लोक वेडे कसे झाले ? महात्माजींच्या चरख्याला पूज्य मानण्याइतके तरी वेड इतक्या संसारी व व्यवहारी लोकाना कसें लागलें ? गतानुगतिक लोक आहेत असें म्हणावें, तर महात्माजींच्या मतांशीं गेलीं दोन वर्षे झगडा करीत

असलेले स्वराज्य पक्षाचे प्रतिनिधि बेळगावच्या कॉंग्रेसमध्यें भरपूर हजर होते. ह्याहि पक्षाच्या डोळ्याला चरख्याची भुरळ कशी पडली? आमचा तितकासा भरंवसा खादीवर नाहीं पण महात्माजींच्या म्हणण्याप्रमाणें वागण्यास आपण तयार आहोत, अशी कबुली सब्जेक्टस् कमिटीमध्यें आणि भर कॉंग्रेसमध्यें स्वराज्य पक्षाच्या कित्येक पुढाऱ्यांनी एकामागून एकसारखे उठून कशी दिली? महात्माजींना सोडून आपलें कांहीं दिवस भागावयाचें नाहीं, असें स्वराज्य पक्षास वाटत असल्यामुळें स्वराज्य पक्षानें कशीबशी कबुली दिली, आणि स्वराज्य पक्ष व महात्माजींचा पक्ष एक होण्याबरोबर लाख दीड लाख लोकाना एकदम आनद होऊन त्यांनीं उत्साहानें चरख्याला नमस्कार केला, अशी बेळगांवच्या चमत्काराची मीमांसा धूर्तांनीं केली आहे. म. गाधीशिवाय आपलें काहीं दिवस भागावयाचें नाहीं असे स्वराज्य पक्षाला तरी का वाटावें? कौन्सिलातील स्वराज्य पक्षाचें कोणतें काम महात्माजींवर आज अवलंबून आहे? कौन्सिलवर माझा विश्वास नाहीं, असें महात्माजी स्पष्टपणें बेळगावासहि म्हणत असतांना महात्माजींना चिकटून राहण्याचे कारण काय? दोनहि पक्ष एक झाले आणि दोनहि पक्षांनीं मिळून कॉंग्रेसच्या ठरावानें चरखा चालविण्यास आम्हास आज्ञा दिली, ह्याबद्दल बेळगांवास जमलेल्या लाख दीड लाख लोकांच्या समाजाला एवढा आनंद का वाटावा? देव प्रसन्न झाला आणि त्यानें चरखा चालीव सांगितलें, ह्यांत संसारी मनुष्यांना उत्साहाची आणि आनंदाची गोष्ट कोणती आहे? धूर्तांच्या दृष्टीनें विचार केला असता असला हा देव तरी कसला, आणि ह्या देवानें प्रसन्न होऊन चरख्याचा वर तरी देऊन काय उपयोग, असे उद्गार बेळगावास जमलेल्या लाख दीड लाख लोकांच्या तोंडून निघावयास पाहिजे होते, पण तसे उद्गार निघाले नाहींत. बरें झालें, चरख्यासंबंधानें एकी झाली हें

चांगलें झालें, असेच उत्साहाचे उद्‌गार लोकांच्या तोंडून निघाले. बरें झालें, असे उद्‌गार साहजिक रीत्या तोंडून निघण्याइतका लोकांचा संसार कोठें नडला आहे ? आज व्यवहाराला चरख्याची तावडतोब जरुरी कोणती आहे ? मग लोकांनीं उगाच बरें झालें म्हणून कां म्हणावें ? महात्माजींना चिकटून राहणें भाग पडण्याइतकें स्वराज्य पक्षाचें आज काहींच नडलेलें नाहीं ! महात्माजींच्या विरोधालाहि न जुमानता कौन्सिलचें कामकाज आपल्या दृष्टीनें चालविण्यास स्वराज्य पक्ष आज समर्थ आहे. कॉंग्रेसची यात्रा करण्याकरिता बेळगावास जमलेल्या लाख दीड लाख यात्रेकरूंचा रोजचा संसार आज म. गांधी ह्यांच्या उपदेशावर बिलकूल अवलंबून नाहीं, जो तो आपापला संसार चालविण्यास पूर्णपणें समर्थ आहे. ह्या कामीं महात्माजींची मदत कोणास नको आहे; नेहरूंचा पुढारीपणा कोणास नको आहे. ह्या स्वतंत्र लोकांना व्यवहारात महात्माजींची काडीचीहि अपेक्षा नसताना, बरें झालें, सर्वांनीं चरखा चालवावा म्हणून कॉंग्रेसनें ठराव पास केला, बरें झालें, असे का वाटावें ? असें वाटलें ही गोष्टी खरी आहे आणि धूर्तांच्या विचारसरणीच्या कसाला लावून पाहिलें असता असें वाटण्याचा उलगडा नीट होत नाहीं. विद्वत्तेच्या व स्वार्थत्यागाच्या नादीं लागून जे व्यक्त वेड खुद्द महात्माजींना लागलें आहे, तेंच वेड अस्पष्टपणें व अव्यक्तपणें स्वराज्य पक्षाला व बेळगावास जमलेल्या राजकीय कलांच्या लाख दीड लाख संसारी लोकांना लागलेलें असल्याशिवाय म. गांधीच केवळ नव्हे तर स्वराज्य पक्षाच्या पुढाऱ्यासकट सर्व संसारी लोक एका माळेतील मण्याप्रमाणें कसे दृष्टीस पडले असते ? गेल्या पांच सहा वर्षांचा राष्ट्रीय सभेचा इतिहास जर नीट रीतीनें पाहिला तर हिंदी राजकीय चळवळीच्या हातीं काहीं तरी स्वतंत्र सॅंक्शन उर्फ हत्यार असलें पाहिजे, असें वेड लोकांच्या मनाला पक्कें लागलें आहे. ह्याबद्दल शंका रहात नाहीं हें

वेड जर नसतें तर कलकत्त्याची असहकारितेची काँग्रेस, नागपूरची काँग्रेस, अहमदाबादचीं काँग्रेस, गयेची काँग्रेस, कोकोनाडाची काँग्रेस आणि कालची बेळगांवची काँग्रेस येथें संसारी लोकांतील लाखों राजकीय यात्रेकरू कधींच दृष्टीस पडले नसते. हें वेड जर नसतें तर राजेरजवाड्याहून अधिक थाटाच्या ऐषआरामात पडलेले पं. मोतीलाल नेहरू आपली वकिली सोडून देऊन खादीचा पोषाख वापरण्यास कधींच तयार झाले नसते. हें वेड जर नसतें तर ३०–४० हजार रुपये दरमहा प्राप्तीचा आपला धंदा सोडून दे. बं. दास फकीर बनले नसते. हें वेड जर नसतें, तर हजारो सुखवस्तूंच्या डोक्यावर आज दिसत असलेली खादीची टोपी बिलकूल दिसली नसती. हें वेड जर नसतें तर बेळगावच्या विजयनगरकरिता हमालाप्रमाणें राबणारे दीड दोन हजार स्वयसेवकांचें सैन्य बेळगावास जमाच झालें नसतें. हें वेड जर नसतें तर गंगाधररावाच्या तट्टयाच्या झोपडया पहाण्याकरितां दीड लाख यात्रेकरू बेळगावास न जमता, लखनौला डॉ. पराजपे यांचें भाषण ऐकून लखनौच्या नबाबांनीं क्रोडो रुपये खर्च करून उभारलेल्या टोलेजंग इमारती पहाण्याला लोक धावले असते. म. गाधी एकटा वेडा आहे असें म्हणण्यांत अर्थ काय ? सँक्शन उर्फ हत्यार हातीं कसें येईल, ह्याची तळमळ दे. बं. दास ह्यांच्या अंतःकरणाला आज एकसारखी लागून राहिलेली आहे आणि राजकीय दृष्टया काँग्रेसकडे पहाणारा बहुजनसमाज कोणत्या हत्याराचा मार्ग सर्व पुढारी मिळून कायम ठरवितात हे समजून घेण्याच्या वेडानें व्यापलेला आहे. सर्वांच्या अत:करणाची प्रवृत्ति एकच आहे ! कांही तरी हत्यार किंवा सँक्शन आहे काय म्हणून हिंदी राष्ट्राचा अतरात्मा आंतून ओरडून विचारीत आहे. हा शब्द म. गांधी ह्यांच्या ठिकाणीं प्रत्यक्षपणें व्यक्त होत असून स्वराज्य पक्षात अर्धवट व्यक्त होत आहे; आणि बहुजनसमाजाला प्रत्यक्ष जरी हा शब्द ऐकूं येत नसला तरी अंतःकरणाच्या

तळमळीची कमी जास्त प्रमाणानें जाणीव आहे. पुढाऱ्यांना व लोकांना सँक्शन उर्फ हत्यार आज पाहिजे आहे. ही अंतरात्म्याला भासत असणारी जरुरी आहे. हिंदी राजकारणांत ही आत्म्याची तळमळ ज्यांना भासत देखील नाहीं त्यांची गणना आज धूर्तांमध्यें होत आहे. सँक्शन उर्फ हत्यार पाहिजे म्हणून बुद्धीच्या ज्या भागाला जाणीव होऊं शकते तेवढयापुरतें बुद्धीचें इंद्रियच ह्या धूर्तांना नसल्यामुळें सज्ञान झालेल्या लोकांचें वर्तन त्याना वेडेपणाचें वाटत आहे. बेळगांवच्या कॉंग्रेसनें पास केलेला चरख्याचा ठराव जर सर्व देशभक्तांनी तावडतोब अमलांत आणला तर सत्संगतीचा फायदा त्या धूर्तांना मिळून पुढील बारा महिन्यांत धूर्तांचा वर्ग निराळा राहूं शकणार नाहीं, हें सांगणें नकोच.

---

# * एका घमेंडखोराचा मृत्यु

वगभंगाच्या वेळचे हिंदुस्थानचे प्रसिद्ध व्हॉइसरॉय लॉर्ड कर्झन हे गेले शुक्रवारीं (ता. २० मार्च १९२५ रोजीं) वारले असून त्याच्या मृत्यूनें इग्लंडच्या कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षातील एक कर्ता पण अत्यंत घमेंडखोर मुत्सद्दी नाहींसा झाला आहे. हिंदुस्थानचे लाटसाहेब होण्यापूर्वी अभ्यासी, मेहनती, व विद्वान म्हणून लॉर्ड कर्झन ह्याची ख्याति होती. एशियाटिक सर्व राष्ट्रावर प्रभुत्व गाजविण्यास जर कोणी लायक असतील तर ते इंग्रजच होत, असे आपलें ठाम मत लॉर्ड कर्झन ह्यानीं इराण, अफगाणिस्थानची सरहद्द, पामीर, हिंदुस्थानची सरहद्द, व चीन येथील प्रवासासबधाच्या पुस्तकातून १८९८ सालापूर्वी १२ वर्षे एकसारखे प्रतिपादन केलेलें होतें. डौलदार व शास्त्रीय पद्धतीची भाषा, भरपूर माहिती, आणि इंग्रजाच्या कर्तृत्वाबद्दल घमेड, ह्याबद्दल लॉर्ड कर्झन ह्याच्या पुस्तकाची ख्याती झाल्यानतर कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचे त्यावेळचे म्होरके लॉर्ड सॅलिसबरी ह्यानीं आपल्या १८९५ सालच्या मत्रिमडळात लॉर्ड कर्झन ह्याना परराष्ट्रीय खात्याचे अंडर सेक्रेटरी नेमलें, आणि स्वतः लॉर्ड सॅलिसबरी हे परराष्ट्रीय मंत्री जरी होते तरी लॉर्डांच्या सभेंत त्याना बसावें लागत असल्यामुळें पार्लमेंट सभेंतील वादविवादाचा बोजा लॉर्ड कर्झन यांजवरच येऊन पडला. लॉर्ड सॅलिसबरी व लॉर्ड कर्झन ह्यान्नीं मतें ततोतत जुळत असल्यामुळें लॉर्ड कर्झन ह्याचें तीन वर्षांचें काम पाहून, १८९८ सालच्या अखेरीस लॉर्ड कर्झन ह्याची नेमणूक हिंदुस्थानच्या लाटसाहेबाच्या जागीं लॉर्ड सॅलिसबरी ह्यानीं केली. लॉर्ड सॅलिसबरी ह्याच्या मतें फ्रान्स, इटली, स्पेन, रशिया वगैरे

---

* नवाकाळ, ता. २२ मार्च १९२५

लॅटिन संस्कृतीचीं समजलीं गेलेलीं युरोपांतील राष्ट्रें आपलें डोकें वर काढ-ण्यास नालायक ठरलीं होतीं. फ्रान्स, इटली, स्पेन हीं राष्ट्रें नालायक, रशिया आवाढव्य पण कर्तृत्वहीन, आणि जगावर राज्य करण्याची खरी लायकी अँग्लो–सॅक्सन लोकांमध्यें म्हणजे जर्मनी, इंग्लड व अमेरिका एवढया तीनच राष्ट्रात, असा लॉर्ड सॅलिसबरी ह्याचा सिद्धात होता. इतराना कुचकामाचें समजण्याच्या पद्धतीमुळे इंग्लंड सर्वांत श्रेष्ठ असें जरी समजण्यात येत होतें तरी जर्मनी त्यावेळीं वर डोकें काढूं लागला होता; पण आमच्या तालमींतला पठ्ठया असें इग्लड जर्मनीला समजत असे. इंग्लंडला येऊन जाऊन काय ती भीति रशियाच्या आवाढव्य स्वरूपाची, असें त्या वेळीं मानण्यांत येत असे. रशियाची सैबेरियन आगगाडी तयार होऊन चीनच्या मँच्युरिया प्राताला रशिया गाठणार आणि अफगाणिस्थान व इराण ह्या दोन्ही मुसलमानी देशाना खाऊन टाकणार, अशी भीति इग्रजी मुत्सद्यांना त्यावेळीं वाटत असे. ह्या भीतीचें निराकरण करण्याकरिता लॉर्ड सॅलिसबरी ह्यानीं जपानशीं गट्टी केली आणि इराण, अफगाणिस्थान, पामीर वगैरे ठिकाणीं प्रवास करून हुषार ठरलेल्या व विद्वान म्हणून नांवाजलेल्या लॉर्ड कर्झनसाहेबाना हिंदुस्थानच्या बंदोबस्ताकरितां १८९८ सालीं पाठविलें. रशियाचें धूड उत्तरेकडून खाली उतरून इराणच्या मार्फत अरबी समुद्रात येऊन पडलें तर जें युद्ध उत्तर ध्रुवापासून दक्षिण ध्रुवापर्यंत एकसारखें दुमदुमत राहील तें युद्ध सुरूं केल्यावाचून इंग्लंड राहणार नाहीं, (A war that will ring from pole & pole) अशा प्रकारची धमकी इराण आखातासंबंधानें लिहिताना लॉर्ड कर्झन ह्यानीं त्यावेळी दिली होती. अफगाणिस्थाला खूष ठेवावयाचें, सरहद्दीवरील पठाणांना लांचलुचपत देऊन आपल्या सैन्यांत त्यांची भरती करावयाची; आणि रशिया मुसलमानांना खाऊन टाकणार असल्यामुळें इंग्रजांच्या बाजूचें राहून मुसलमानांनीं आपलें

कल्याण करून घेतलें पाहिजे अशी मुसलमानांची समजूत करून हिंदूंपेक्षां मुसलमानांवर राजाश्रयाच्या वांटणीच्या वेळीं विशेष मेहेरबानी दाखवावयाची, हें लॉर्ड कर्झन ह्यांच्या कारकीर्दीचें हिंदुस्थानांत मुख्य धोरण होतें. नोकरशाहीचा अधिकार निष्कंटक ठेवण्यास लॉर्ड कर्झन केव्हांहि विरुद्ध नव्हते, पण नोकरशाहीपैकीं प्रत्येक इसमानें आपापल्या कामांत दक्ष, तत्पर व मेहनती असलें पाहिजे, अशा करडया नजरेनें लॉर्ड कर्झन यांनीं नोकरशाहीचा गाडा हिंदुस्थानांत चालविला होता. लॉर्ड कर्झन ह्यांच्या कारकीर्दींत नोकरशाहीचा अजागळपणा बराच कमी झाला हें खरें आहे; पण मुसलमानांना आवडत्या बायकोप्रमाणें विशेष मेहरबानी दाखवून वागविण्याची पद्धत लॉर्ड कर्झन ह्यानी वंगभंगाच्या वेळीं हिंदुस्थानच्या राजकारणांत सुरू केली! आपण हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीचा बंदोबस्त केला, रूसो–जपानी युद्धांत रशियाचा पराभव झाल्यानंतर रशियानें इराणच्या किंवा अफगाणिस्थानच्या बाजूस बघूं देखील नये इतकी मुसलमानांची मनोवृत्ति इंग्रजाकडे ओढून घेतली, वंगभंग करून हिंदुस्थानच्या स्वराज्याच्या चळवळीला चिरडून टाकलें, आणि नोकरशाहीचीं सर्व भांडीं घासून पुसून लखलखीत करून नोकरशाहीला लायक (Efficient) बनविल्यामुळें हिंदुस्थानासंबंधानें आतां धास्ती उरली नाहीं, अशी घमेंड मारण्यास लॉर्ड कर्झन यांनीं आपली पाच सात वर्षांची कारकीर्द संपल्यानंतर बिलकूल कमी केलें नाहीं! लॉर्ड कर्झन हे मेहनती व विद्वान जसे होते तसे अत्यंत घमेंडखोरहि होते. आपल्या विद्वत्तेच्या व तत्परतेच्या घमेंडीवर लॉर्ड कर्झन इतरांना तुच्छ मानतात आणि विद्वान कर्मठ शास्त्र्याचा टेंभा मिरवितात, अशा तऱ्हेची टीका लंडन टाइम्सनें देखील लॉर्ड कर्झन यांजवर दोन तीन वेळां केलेली आहे. परराष्ट्रीय कचेरींतील घमेंडखोर पंडित अशा नांवानें संबोधून लॉर्ड कर्झन ह्यांची कित्येक वेळां अवहेलना करण्यांत येत असे; पण

लॉर्ड कर्झन ह्यांनीं आपली घमेंड अखेरपर्यंत सोडली नाहीं. पण दैवानें मात्र ह्या घमेंडीचा नखरा उतरविण्यास कसूर केली नाहीं! लॉर्ड कर्झन चीन व जपान ह्याना तुच्छ मानीत असत, आणि जपाननें रशियावर मिळविलेल्या विजयाचा परिणाम एशिया खंडावर कांहीं होणार नाहीं, अशी त्यांची अटकळ होती. वंगभंगाच्या वेळींच ही अटकळ खोटी ठरली. जपानच्या विजयामुळें नवीन राष्ट्रीय वारे हिंदुस्थानात शिरलें, आणि बहिष्काराची चळवळ इतक्या जोरानें सुरू झाली कीं, वज्रलेप ( Settled fact ) म्हणून ठरलेला वंगभंग इंग्रजी मुत्सद्यांना रद्द करावा लागला! लॉर्ड सॅलिसबरी ह्यांनीं ज्या धोरणानें परराष्ट्रीय कारस्थान आखलें होते तें धोरण १९०८ सालानंतर जर्मनीच्या वाढत्या शक्तीमुळे एकदम बदलून गेलें. रशियाच्या धुडाला शत्रु मानण्याचे ऐवजीं जर्मनीच्या आरमाराला शत्रु मानणें इंग्रज मुत्सद्यांना भाग पडलें; आणि सातवे एडवर्ड बादशहा यांनीं प्रथम फ्रान्सशीं मैत्री संपादन केल्यावर फ्रान्समार्फतची इंग्लंड, फ्रान्स व रशिया ह्यांची गट्टी एका बाजूला, आणि जर्मनी, आस्ट्रिया व इटली ह्यांची गट्टी दुसऱ्या बाजूला, असे दोन तट १९०८ सालानंतर युरोप खंडाच्या कारस्थानात स्पष्टपणें दिसूं लागले. हे नवे दोन तट होण्याबरोबर लॉर्ड सॅलिसबरी ह्यांच्या तालमींत तयार झालेल्या लॉर्ड कर्झन ह्यांच्या धोरणाला कवडीचीहि किंमत शिल्लक राहिली नाहीं. हिंदुस्थानांत वंगभग रद्द झाला; आवडत्या बायकोचे—मुसलमानांचे-चोचले नाहींसे झाले; आणि लॉर्ड मोर्ले ह्याना स्वराज्याच्या चांदोबाकडे कशाला लक्ष देतां असें म्हणत म्हणत निवडणुकीचे हक्क हिंदुस्थानास देणें इष्ट वाटलें! रशियाविरुद्ध तयारी करण्याचा काळ लॉर्ड कर्झन ह्यांच्या लाटसाहेबाच्या कारकीर्दीच्या वेळचा होता; पण १९१० सालानंतर जर्मनी-विरुद्ध तयारी करण्याचा काळ सुरू झाला. महायुद्धाची अशी तयारी चालली

असतांना, लॉर्ड कर्झन इंग्लंडांत मावळल्यासारखेच बसले होते! महायुद्ध सुरू होऊन सर्व पक्षाचें मंत्रिमंडळ स्थापण्यात आल्यानंतर कोनाकोपऱ्यात पडलेल्या लॉर्ड कर्झन ह्यांना मंत्रिमंडळात प्रथम दुय्यम दर्जाची जागा देण्यात आली; आणि महायुद्धाच्या अखेरीस बोल्शेव्हिकांचा नवा रशिया इंग्लंडच्या शत्रुस्थानीं शिल्लक राहिल्यामुळें, लॉर्ड सॅलिसबरी ह्यानीं रशियाच्या विरुद्ध स्थापलेल्या तालमींत कसरत करण्यास पटाईत बनलेले लॉर्ड कर्झन ह्यांना माजी मुख्य मंत्री मि. लॉईड जार्ज ह्यानीं इंग्लंडचे परराष्ट्रीय प्रधान नेमलें. लॉर्ड कर्झन व मि. चर्चिल ह्या दोन मुत्सद्यांनीं मिळून महायुद्धाच्या अखेरीस बुखारा, समरकंद, अफगाणिस्थान, इराण आणि सर्व टर्की हा टापू इंग्रजी पाखरुणाखालीं आणण्याचा प्रयत्न केला; पण ह्या फाजील घमेंडीच्या उद्योगात लॉर्ड कर्झन ह्यांना एकसारख्या थपडाच खाव्या लागल्या! रशियांतील बोल्शेव्हिक आपला पराभव करून घेईनात; टर्कीमध्यें गाझी केमालपाशा ह्याच्या तलवारीपुढें लॉर्ड कर्झन ह्याचें कांहीं चालेना; आणि इराणाच्या शहाला दोन कोट रुपये चैनीकरितां दिले तरी लांचलुचपतीचें बस्तान इराणात काहीं केल्या बसेना; अफगाणिस्थाननें तर लढाई पुकारून आपलें स्वातंत्र्य लॉर्ड कर्झन परराष्ट्रीय मंत्री असतांनाच स्थापून घेतलें; अशी आपल्या धोरणाची दैना झालेली पहाणें लॉर्ड कर्झन ह्यांच्या नशिबीं शेवटीं शेवटीं आलें! टर्कीच्या लासेनच्या तहाच्या वेळीं लॉर्ड कर्झन ह्यांनीं क्रोधाचा आविर्भाव आणून टर्कीच्या वकिलांना वळविण्याचा प्रयत्न आपणाकडून बराच केला; पण ह्या घमेंडखोरात आतां शक्ति उरलेली नाहीं, हें पुरतें ओळखून टर्कीनें अखेरीस लॉर्ड कर्झन ह्यांना नमतें घेणें भाग पाडलें! चीन व जपान ह्याच्यात प्राण नाहीं म्हणून पंचवीस तीस वर्षांपूर्वी बाही फिरविणाऱ्या लॉर्ड कर्झनना, मरण्याच्याअगोदर जर्मनीच्या ऐवजीं आतां जपानच्या आरमाराची भीति इंग्लंडला एशिया खंडात आहे, असें

कबूल करावें लागलें. मोरोक्कोमधील मुसलमान स्वतंत्र झालें, टर्कीचे मुसलमान युरोप खंडाची युद्धकला इतरास शिकविण्यास लायक झाले; इराणांत दुसरा केमालपाशा उत्पन्न होऊन इराणचें भय इग्लंडला अधिक वाटलें; अफगाणिस्थानानें रशिया, जर्मनी व फ्रान्स ह्या देशाशीं संधान बांधलें आणि रशिया, चीन व जपान ह्याची गट्टी होऊन हिंदुस्थानच्या जमिनीच्या सरहद्दीवरच नव्हे तर समुद्रावरहि १९०८ सालापूर्वीहून अधिक भय उभें राहिलें, असे डोळ्यानीं पाहिल्यानतर लॉर्ड कर्झन आज गेले आहेत! लॉर्ड सॅलिसबरी ह्याच्या तालमींतील अँग्लो-सॅक्सनाची बढाई देखील आतां शिल्लक राहिलेली नाहीं. फ्रान्स, इटली वगैरे लहान राष्ट्रें जर्मनीच्या पराक्रमाचा पराभव झाल्यानंतर, इग्लडातहि पराक्रमाचा दम उरला नाहीं असें समजून, भूमध्य समुद्रात आमच्या आज्ञाने वागा, असें इग्लडलाच बजावीत आहेत. लॉर्ड सॅलिसबरी ह्याच्या परराष्ट्रीय धोरणातील वरच्या घमेंडीची मूर्ति म्हणून समजले गेलेले लार्ड कर्झन त्या धोरणाची आज पक्की वाताहत झाल्यानंतर मृत्यु पावले आहेत. धोरण लयास गेलें, घमेंडीची मूर्तीहि नष्ट झाली, पण हिंदु-मुसलमानांत दुही पाडण्याची कृति तेवढी आज नोकरशाहीकडून सजीव करण्यात आली आहे! मूळ धोरणाची वाताहात झाल्यानतर त्या धोरणाला अनुसरून योजलेला सामान्य तोडगा किती दिवस उपयोगी पडणार? ह्या जुन्या तोडग्यात आतां काहीं अर्थ नाहीं, अशी स्पष्ट इषारत लॉड कर्झन ह्याचा मृत्यु हिंदुस्थानच्या नोकर-शाहीला देत नाहीं काय?



# * नीतिभ्रष्ट आणि निर्लज्ज



इंग्लंडची समाजव्यवस्था अत्यंत विस्कळित झाली असून समाजाचीं नीतिबंधनें तुटत चाललीं आहेत आणि पैशापुढें सामाजिक व कौटुंबिक नीतीची किंमत उरली नाहीं, असे सिद्ध करणारे नीतिभ्रष्टतेचे खटले इंग्लंडांत गेले आठ दहा महिने एकसारखे कोर्टापुढे येत आहेत ! बाहेरून प्रतिष्ठित व बड्या घराण्यातील संभावित बायकोचा आव आणून नवऱ्याच्या समतीनें व मदतीनें वेश्यावृत्तीनें राहणाऱ्या एका बाईच्या नादीं लागून काश्मीरच्या युवराजांनीं कोट अर्धाकोट रुपयांवर कसें पाणी सोडलें, ह्यासंबंधीच्या खटल्याची हकीगत तीनचार महिन्यापूर्वी वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झालीच आहे. हा खटला संपतो न संपतो तोंच मिसेस डेनीस्टौन हिच्या खटल्याला इग्लंडात प्रारंभ झाला आणि गेले दोन महिने ह्या नव्या खटल्यानें इंग्रजी समाजाला हालवून सोडलें. क. डेनीस्टौन ह्यांची देखणी, हुषार व नीतिभ्रष्ट बायको मिसेस डेनीस्टौन हिनें आपल्या नवऱ्याला म्हणजे क. डेनीस्टौन ह्यांना काडी मोडून दिल्यानतर नवऱ्यावर अब्रूनुकसानीची फिर्याद आणली नाहीं, तर पैशाच्या नुकसानीची भरपाई नवऱ्यानें करून द्यावी म्हणून फिर्याद आणली व लाखों रुपयाची मागणी केली ! महायुद्धात फ्रान्सच्या रणागणावर इंग्लडचे कर्ते सेनापति म्हणून नावाजलेले जु. सर जॉन कॉवन्स ह्याजबरोबर नवऱ्याला बढती मिळावी म्हणून नवऱ्याच्या संमतीनें आपण व्यभिचारसंबंध कसा केला, पुढें मोठमोठ्या लोकांशीं आपला संबध कसा आला, ह्या व्यभिचाराच्या वेळीं इंग्लंडचे प्रसिद्ध कोट्यधीश लॉर्ड कार्नार्व्हन व लेडी कॉर्नार्व्हन ह्यांनीं आपणाला

---

* नवाकाळ, ता. १६ एप्रिल १९२५

मदत कशी केली, लेडी कॉर्नार्व्हन ह्यांचीहि सेनापति सर जॉन कॉवन्स ह्यांच्याशी मैत्री असल्यामुळें लेडी कॉर्नार्व्हन ह्यांनीं पंधरा सोळा लाख रुपये खर्च करून जखमी झालेल्यांच्या शुश्रूषेकरितां इस्पितळ काढलें असतां सदर इस्पितळांत सर जॉन कॉवन्स ह्यांची भेट व्हावी म्हणून नर्सचीं कामें कशीं करण्यांत आलीं, लेडी कॉर्नार्व्हन ह्यांचें व क. डेनीस्टौन ह्यांचें सूत मिसेस डेनीस्टौन ह्यांनीं कसें जुळवून दिलें आणि लॉर्ड कॉर्नार्व्हन हे मृत्यु पावल्यानंतर लेडी कॉर्नार्व्हन ह्याचेबरोर लग्न लावण्यास क. डेनीस्टौन ह्यांना अडथळा राहूं नये म्हणून मिसेस डेनीस्टौन ह्या बाईनें कोर्टांत काडी मोडून कशी दिली, इत्यादि इंग्लंडातील अत्यंत श्रीमंत, प्रतिष्ठित व अधिकारसंपन्न वर्गातल्या घाणेरड्या कृत्याचें पेंव मिसेस डेनीस्टौनच्या खटल्यांत फुटलेलें आहे. नवराबायकोनें मिळून एकमेकांच्या सोयीनें व्यभिचार करावयाचा आणि खूप पैसे मिळवावयाचे, अशी जी हकीकत काश्मीरच्या युवराजाच्या खटल्यात दृष्टीस पडते तीच हकीकत मिसेस डेनीस्टौन खटल्यांतहि दृष्टीस पडत आहे. ह्या घाणेरड्या कृत्यांचा स्फोट झाल्यामुळें इंग्रजी समाज आंतून फार कुजलेला आहे असें मानण्याचें कारण नाहीं, म्हणून जस्टिस मॅकार्डी ह्यांनीं ह्या खटल्याचा निकाल सांगतांना शेरा मारला आहे. कोणत्याहि देशात, कोणत्याहि धर्मांत आणि कोणत्याहि समाजांत नीतिभ्रष्टता असावयाचीच. फ्रान्समधील अवाढव्य इंग्रज सेनेचे प्रख्यात सेनापति सर जॉन कॉवन्स व काश्मीरचे युवराज हे दोघेहि एका माळेचे मणी होत. ह्याबाबींत इंग्लंडनें हिंदुस्थानास हंसण्याचें कारण नाहीं किंवा हिंदुस्थाननें इंग्लंडास नांवें ठेवण्याचें कारण नाहीं. घरोघर मातीच्याच चुली आहेत! नीतिभ्रष्टता अमक्या समाजाची अधिक किंवा अमक्या समाजाची कमी, असें कोर्टांतील खटल्यावरून म्हणतां यावयाचें नाहीं, हें खरें आहे. पण काश्मीरच्या युवराजांचा खटला किंवा मिसेस

डेनीस्टौन ह्याचा खटला ह्या दोन्हीहि खटल्याचें स्वरूप सामान्य नीतिभ्रष्ट-तेहून निराळें आहे. नवरा–बायकोच्या संमतीनें व्यभिचार करण्याचीं उदाहरणें अमभर सापडतील, नाहीं असे नाहीं. इग्लंडांत प्रामुख्यानें पुढें आलेल्या सदर दोन खटल्यांत विशेष हा आहे की, सर्वांनीं मिळून चोरी केल्यानंतर चोरीच्या लुटीच्या वेळीं चोर आपापसांत भाडले असून, पैशाची वाटणी आपणाला कमी आली म्हणून निर्लज्जपणानें कोर्टाची पायरी चढण्यास ह्या चोराना बिलकूल दिक्कत वाटलेली नाहीं! चोरी करणें हें पाप तर खरेंच; पण चोरी उजेडात येईल म्हणून पर्वाहि न बाळगणें ही स्थिति अत्यंत भयंकर आहे! समाजातील व्यक्तींची स्थिति बिघडली असता लज्जा नाहींशीं होते, पण जनलज्जाहि गुंडाळून ठेवणें म्हणजे सर्व समाज बिघडला आहे असें आपण होऊन जगजाहीर करून असल्या समाजात वावरण्यास आपणास बिलकूल अडथळा येणार नाहीं, असेंच म्हणण्यासारखें आहे. काश्मीरच्या युवराजाशीं केलेल्या व्यभिचारामुळे सर्व चोराना लाखो रुपये मिळाले. ह्या चोरांना एवढयावरच संतुष्ट राहण्यास हरकत कोणती होती? पण लाखो रुपये मिळण्यावर संतुष्ट न राहून नवऱ्यानें नफ्याची वाटणी बरोबर मिळाली नाहीं म्हणून फिर्याद केली! चोराचोरांमध्येहि प्रामाणिकपणा असावा लागतो. व्यभिचार करणारानाहि बंधनें पाळावीं लागतात. पण इंग्लंडांत चोरी व व्यभिचार आज अमर्यादित झालीं आहेत. मनाचा कल व सुख घेणाऱ्या वासनांची वक्रगति इत्यादि कारणामुळे व्यभिचार व चोरी याजवर इष्टमित्रांचें पांघरूण पडूं शकतें, पण इग्लंडांत जे खटले पुढें आले आहेत, त्या खटल्यांत मनाच्या कलालाहि किंवा वक्रगतीच्या हौसेलाहि बिलकूल किंमत नसून श्रीमंती राहणीच्या चैनीपेक्षा इंग्लंडांतील श्रीमंतांना दुसरें तिसरें काहीं दिसत नाहीं, असा पैशाचा निर्लज्जपणा बाहेर आला आहे! क. डेनेस्टौन ह्यानीं मुख्य सेनापति फॉरन्स ह्याजकडे व ऑस्ट्रिया

वगैरे ठिकाणच्या राजपुत्राकडे आपल्या बायकोची सोय लावून दिली व बायकोनेंहि उलट लेडी कार्नार्व्हन ह्या कोट्यधीश सरदार घराण्यांतील बाईशीं आपल्या नवऱ्याचें जुळवून देऊन विवाहबंधनें कोर्टापुढें तोडून टाकण्यात आलीं. येथपर्यंतचा प्रकार ग्राम्य व्यभिचाराचा असला तरी व्यक्तींच्या दुर्गुणाचे व पापाचे सदराखालीं पडण्यासारखा आहे समाजाचें रक्त बिघडलें आहे असें त्यावरून अनुमान काढणें धोक्याचें होईल. पण मिसेस डेनीस्टौन ह्याची फिर्याद वरील प्रकाराच्या पुढच्या पायरीची आहे. व्यभिचार करणारे सेनापति सर जॉन कॉवन्स मरून गेले, इतर पुरुषांनींहि सोडून दिलें, आणि काडी मोडून दिलेला जुना नवरा लेडी कार्नार्व्हन ह्याच्या पैशावर श्रीमत राहणीनें रहात आहे असे पाहून लेडी कॉर्नार्व्हन ह्याजपासून मिळविलेल्या पैशातील वाटणी मला दे, कारण एकमेकानी एकमेकाच्या व्यभिचाराला मदत केली आहे, असा दावा मिसेस डेनीस्टौन ह्याचा आहे.ह्या खटल्यात प्राप्तीची अर्धी वाटणी मिसेस डेनीस्टौन ह्याना मिळाली नाहीं हें योग्यच झालें. पण इतक्या निर्लज्जपणानें व्यभिचाराच्या प्राप्तींतील वाटणी मागण्यास इग्लंडातील बड्या घराण्यात प्रतिष्ठितपणानें वावरणाऱ्या बायका पुढे येऊ शकतात, हें समाजाच्या अवनतीचें स्पष्ट लक्षण आहे ! एक वेळ पाप पुरवतें, पण पापाबरोबरचा निर्लज्जपणा राष्ट्रास अधोगतीस नेल्यावाचून कधींहि रहात नाहीं. पश्चात्तापानें पापापासून शुद्धि होते व पापाचें क्षालनहि होऊ शकतें, पण निर्लज्जपणा एकदा माजल्यावर पश्चात्तापास अवसरच राहत नाहीं. इग्लड पापी बनलें आहे इतकेंच नव्हे तर निर्लज्ज झालें आहे. आणि हा निर्लज्जपणा, केवळ पैशाची पूजाअर्चा करावयाची अशी समाजाची ठेवण बनल्यामुळें, इंग्लंडांत सर्व प्रकारें अधिकच वाढीस लागला आहे. सामाजिक बाबींत काय, धार्मिक बाबींत काय किंवा राजकीय बाबींत काय, इग्लडइतके निर्लज्ज राष्ट्र दुसरें कोणतेंहि

नाहीं. ईजिप्तसारख्या शहरावर लष्करी जबरदस्ती करतांना किंवा हिंदुस्थानातील दुर्बलांना सर्टिफिकिटाच्या वरवंट्याखालीं चिरडतांना बड्या मुत्सद्याच्या सद्सद्विवेकबुद्धींत जो निर्लज्जपणा दृष्टीस पडतो तोच निर्लज्जपणा मिसेस डेनीस्टौन किंवा काश्मीरचे युवराज ह्याच्या व्यभिचाराच्या खटल्यात दृष्टीस पडत आहे ! पतिताचा उद्धार करणारा परमेश्वर पाप्यांना सावरून धरू शकेल, पण निर्लज्जापुढें परमेश्वराचीहि मात्रा चालणारी नसून, पश्चात्तापाचा मार्ग खुंटून यमदंडाची जरुरी निर्लज्जपणाच्या वेळीं सर्वांच्या मनाला पटल्यावाचून राहत नाहीं. इंग्लंडच्या ह्या निर्लज्जपणा-पासून अलिप्त राहून इंग्रजी समाजाचें अनुकरण हिंदुस्थाननें सोडून देणें श्रेयस्कर नाहीं काय ?

---

# * मुमताज खटल्याचा निकाल

चार महिने मुंबईंत गाजत असलेल्या मुमताजच्या खटल्याचा निकाल गेले शनिवारीं लागून तिघाना फांशीची व चौघाना जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा झाली. ह्या सातहि आरोपींना दोषी ठरविण्यांत ज्यूरीनें आपलें योग्य कर्तव्यकर्म बजावलें, ह्यात संशय नाहीं. फाशीचीं शिक्षा मात्र कठोरपणाची झाली. आरोपीतर्फेच्या तिन्ही बॅरिस्टरानीं सदय दृष्टीनें शिक्षा देण्याविषयीं केलेल्या विनंतीचा जर अव्हेर झाला नसता, तर अधिक बरें झालें असतें. न्यायमूर्तीनीं ज्यूरीला उद्देशून केलेल्या भाषणांत आरोपी हे नुस्ते हस्तक असून, खरा गुन्हा इंदूरचा आहे, असे सुचविलें आहे. 'इंदूरचे महाराज' असे शब्द वापरण्याच्या ऐवजीं नुस्ता 'इदूर' हा शब्द न्यायमूर्तीनी वापरला आहे; पण 'इदूर' ह्या शब्दाचा व्यंग्यार्थ 'इंदूरचे महाराज' असाच करण्यात येईल, ह्यात संशय नाहीं. मुमताझच्या खटल्यांत विशेष हा आहे कीं, खुद्द मुमताझच्या साक्षीशिवाय ज्यानें त्यानें इंदूर दरबाराविषयीं व्यंग्यार्थानें बोलून आपलें काम भागवून घेतलें आहे. मलबारहिलवरील खून झाल्या-नंतर मुमताजनें जी माहिती पोलिसाला दिली त्या माहितीच्या आधारावर ह्या खटल्याची रचना करण्यात पोलिसानीं मोठीशी शिताफी दाखविली अशांतला भाग नाहीं. आरोपी पकडले व साक्षी पुरावा गोळा केला, ह्यात कोठेंच मोठेंसें कौशल्य दिसत नाहीं. पोलिसाला मदत करण्याचे कामीं मुंबईच्या नागरिकांची कुचराई होती, असेंहि म्हणतां येत नाहीं. तेव्हां आरोपी पकडल्याबद्दल पोलिसांची वाहवा करणें योग्य होणार नाहीं. तथापि इंदूरच्या दरबारला खटल्यांत न खेचतां व्यंग्यार्थानें खटल्याची रचना करण्यात जें

* नवाकाळ, ता. २६ मे १९२५

चातुर्य दाखविण्यांत आलें, तें चातुर्य मात्र विशेष कुशलतेनें आहे, असें म्हणणें भाग पडतें. पोलिस काय, आरोपी काय, प्रॉसिक्यूशनतर्फेचे बॅरिस्टर काय, आरोपींचे बॅरिस्टर काय किंवा न्यायमूर्ति काय, सर्वच इंदूरच्या दरबारभोंवती दुरून प्रदक्षिणा करून प्रत्यक्ष हस्तस्पर्श न होईल इतक्या बेतानें अंतरावरचा नमस्कार घालून मागें परतत आहेत, असा देखावा ह्या खटल्यात एकसारखा दिसत होता. तारेवर चालण्याप्रमाणें जपून व्यंग्यार्थानें सूचक ध्वनि करावयाचा हें काम अत्यंत नाजूक असून सर्वांनीं ह्या नाजूक कामात चागलें प्राविण्य दाखविलें आहे, ही ह्या खटल्यातील विशेष गोष्ट होय. मुमताजला इंदुरास झालेली मुलगी नर्सकडून मारविण्यांत आली म्हणून मुमताजच्या अंतःकरणांत सलत असलेलें शल्य झाकून ठेवण्याकडे मॅजिस्ट्रेटचे कोर्टांत व हायकोर्टांत कोण खटपट करण्यात आली! पण अखेरीस हें शल्य बाहेर पडलेंच. ह्या खटल्यातील कायद्याचा भाग एका बाजूस ठेवून समाजस्थितीच्या दृष्टीनें जर ह्या शल्याकडे पाहिलें, तर सर्व खटल्याच्या बुडाशीं हे शल्य आहे, असेंच दिसून येतें. अरेरावीपणानें दुसऱ्याच्या अंतःकरणाला जबरदस्तीने त्रास देण्यालाहि सीमा असते, ही गोष्ट इंदुरात विसरली गेली. आपल्या मुठींतील बटीक झाली काय किंवा पैशाच्या जोरावर गुलामाप्रमाणें राबलेली रखेली झाली काय, बायकांच्या अंतःकरणांतील मातृपणाच्या आकांक्षा राजसत्तेच्या राजवैभवाच्या शृंखलानीं बाधल्या जाऊं शकत नाहींत. अंतःकरणातील नैसर्गिक प्रवृत्तींचा जोर श्रीमतीच्या किंवा राजसत्तेच्या कृत्रिम भितीना जुमानीत नाहीं आणि एकदां अंतःकरण दुखावलें गेले म्हणजे नंदनवनासारखे ऐषआरामहि विषासारखे कडू लागतात! ह्या स्वयसिद्ध अंतःकरणाच्या जोराकडे इंदूरनें दुर्लक्ष केलें. मुमताजला पळवून नेण्याचा कट इंदूरच्या सागण्यावरून करण्यात आलेला असो, किंवा इंदूर प्रसन्न होईल म्हणून परस्पर करण्यात आलेला असो, कोणत्याहि हेतूनें हा

कट जरी करण्यांत आला असला तरी, अखेर ह्या कटाचें पर्यवस मि. बावला ह्याच्या खुनात झालेलें असल्यामुळें, खुनास खून, ह्या न्यायानें फाशीची शिक्षा न्यायनिष्ठुरतेला धरूनच आहे. पण हस्तक व दयार्द्र दृष्टि या दोन मुद्याकडे लक्ष दिलें असतां खटल्याच्या अखेरीस आरोपींच्या बॅरिस्टरानीं केलेलीं भाषणें सामान्य लोकांच्या मनाला पटल्यावाचून राहणार नाहींत. इदूरला सभाळण्यासाठीं, जर तारेवरचा नाच एकसारखा दृष्टीस पडतो, तर या खटल्यातील गुन्हेगाराना तरी इतकी कडक शिक्षा कशासाठी ? इंदूरला अस्पृश्यात ढकलण्यांत न्यायमूर्तीनीं जो नाजुकपणा दाखविला तोच नाजुकपणा शिक्षा सागावयाच्या वेळीं विलयाला जावा, हें बरोबर नाहीं. हस्तकाचा दर्जा शिक्षेच्या वाटणीच्या वेळींहि कायम रहावयास पाहिजे होता. इंग्रजी मुलखात, मुबई सारख्या शहरात मुमताजला पळवून नेऊन प्राण घेण्याचें, किंवा प्राण देण्याचें साहस करण्यास ज्या सद्यःस्थितीमुळें हे पंचवीस तीस वर्षांचे अविचारी तरुण तयार झाले, त्या सद्यःस्थितीला मात्र कोणीहि दोष देत नाहीं आणि त्या सद्यःस्थितींतून निघणाऱ्या अविचाराना तेवढें निष्ठुरतेनें वागविण्यांत येतें, हा पक्तिप्रपच नव्हे काय ? फाशीं जाणारे व काळ्या पाण्यावर जाणारे जसे हस्तक आहेत, तसें इंदूरहि हस्तकच आहे. इदूर चांगलें शिकलेंसवरलेलें आहे, इग्रजी रीतिरिवाजात तरबेज आहे, चार दोन तास गप्पागोष्टी बोलण्याची वेळ आली असतां सुसंस्कृत मनाशीं आपण बोलत आहों असा भास झाल्यावाचून रहात नाहीं ! मग असल्या सुसस्कृत मनाची प्रवृत्ति स्वतःच्या आवडत्या रखेलीचें मन मातृपदासंबधानें अत्यत दुखावून टाकण्याकडे का व्हावी ? पाहिजे त्याला पाहिजे तसे आपण राबवूं शकतों, आणि पैशाच्या व राजसत्तेच्या कारवाईला सीमा नाहीं, अशी धुंदी ह्या सुसस्कृत मनाच्या डोळ्यांवर का चढावी ? अंतःकरणांतील निसर्गदत्त सुशील प्रवृत्तीचा प्रवाह मातृपदाच्या

अभिमानाच्या प्रसंगीं वेश्यावृत्तींत वाढलेल्या मुमताजच्या अंगीं दिसावा आणि निसर्गाच्या नाजूक व सत्वशील प्रवृत्तीचा लोप इंदुरास झालेला असावा, हा परिणाम कशाचा? वेश्यांहूनहि हलकीं मनें संस्थानिकाचीं कां व्हावीं? ह्या नैतिक अधःपाताचें कारण काय? समाज—दृष्टीनें विचार करताना मुमताजच्या खटल्यांतील गुन्हेगाराना हस्तक म्हणून एका बाजूस सारून इंदूरकडे जशी दृष्टि जाते, त्याचप्रमाणें इदूरच्या अधःपाताचा विचार करतांना संस्थानिक हे इंग्रजाच्या राजकीय धोरणाचे हस्तकच आहेत असे ध्यानांत येऊन, हिंदुस्थानातील अरेरावी दडपशाहीकडे मन वळल्यावाचून रहात नाहीं. स्वतःच्या संस्थानचा पैसा व स्वतःच्या संस्थानची सत्ता ह्यामुळें उत्पन्न होणारी धुंदी संस्थानांत सावळागोंधळ घालण्यास पुरेशी होऊं शकेल; पण मुंबईसारख्या शहरात आपण पाहिजे तो सावळागोंधळ घालून यश मिळवूं असे विचार इदूरच्या हस्तकांच्या डोक्यात का घोळावे? खालसा प्रांतांतील अरेरावी दडपशाहीला मदत करणारे आधारस्तंभ आम्ही असल्यामुळें, राजकीय बाबींत सरकारी अधिकाऱ्याची अरेरावी दडपशाही जशी चालू शकते, तशीच आमचीहि दडपशाही खालसा इलाख्यातील खाजगी बाबींत कां चालूं नये, असें सस्थानिकाना वाटणें साहजिकच आहे. मोठया गुन्ह्याच्या वेळीं जर आमची मदत घेण्यांत येते, तर आमच्या धाकटया गुन्ह्यांवर पांघरूण कां घालण्यात येऊ नये, अशी संस्थानिकांच्या मनाची समजूत झाल्यास त्यांत गैरशिस्त कोणतें? मुमताजच्या खटल्यामुळें निदर्शनास आलेले सद्यःस्थितींतील दोष जर टाळावयाचे असतील तर व्यंग्यार्थाची दृष्टि इंदूरकडे लावण्यांत काहीं अर्थ नसून, खालसामधील राजकीय दडपशाहीकडे जर लावण्यांत आली तरच ह्या खटल्यापासून घ्यावयाचा बोध घेतल्यासारखें होईल. नोकरशाही व्यंग्यार्थातीत ह्या व्यंग्याकडे लक्ष पुरवील काय?

---

# * दास बाबू

देशबंधु चित्तरंजन दास ह्यांस गेल्या मंगळवारीं (ता. १६ जून १९२५ रोजीं) दार्जिलिंग येथें हृदयाच्या विकारानें एकाएकीं देवाज्ञा झाली, हें कळविण्यास आम्हास अत्यंत वाईट वाटतें. दे. बं. दास ह्यांचा जन्म १८७० सालचा असून मरणसमयीं त्यांचें वय अवघें ५५ वर्षांचें होतें. स्वराज्य पक्षाच्या व इतर पक्षाच्या राजकीय पुढाऱ्यात तरुण बांडाच्या उसळीनें काम करणारे जोरकस लढवय्ये अशी त्यांची ख्याती असून, वयानें त्यांच्या बरोबरीच्या मंडळींतहि, दिसण्यांत, हुरुपेंत, आणि दर्बांत ते सर्वांत तरुण आहेत, असेंच नेहमीं भासत असे. बुद्धीनें तरतरीत, आवेशानें भरलेले आणि काम करण्याच्या हौसेनें इतरांना नेहमीं प्रोत्साहन देणारे असे तरुणच, दास बाबू इष्टमित्राना व अनुयायांना नेहमीं दिसत असत. १९०५ सालच्या वंगभंगाच्या चळवळीचे वेळीं बंगालचा राष्ट्रीय पक्ष निर्माण करतांना राष्ट्रीय पक्षाच्या वतीचें लेखकार्यें काम बाबू अरविंद घोष ह्यांनीं 'वंदेमातरम्' ह्या पत्राच्या द्वारें केलें, बिपिन बाबूंनीं आपल्या वक्तृत्वानें राष्ट्रीय पक्षाच्या उभारणीस त्यावेळीं बंगाल्यात मदत केली, अमृतबझार पत्रिकेचे बाबू मोतीलाल घोष ह्यांनीं आपल्या नेहमींच्या पोक्त सल्लामसलतीनें राष्ट्रीय पक्षास सांवरून धरलें, आणि बॅ. चक्रवर्ती व बॅ. चित्तरंजन दास ह्या जोडीनें राष्ट्रीय पक्षाचा योगक्षेम चालविला; अशी वंगभंगाच्या चळवळीच्या वेळच्या निरनिराळ्या बंगाली पुढाऱ्यांची कीर्ति आहे. वंगभंगाच्या चळवळीला राष्ट्रीय वळण देण्याकरितां श्री शिवाजी महोत्सवाचे निमित्तानें लोकमान्य टिळक ह्यांना १९०६ सालीं कॉंग्रेसच्यापूर्वी कलक-

---

* नवाकाळ, ता. १८ जून १९२५

त्यास बोलावण्यांत आलें होतें. अमृतबझार पत्रिकेचे बाबू मोतीलाल घोष व लो. टिळक ह्याचा पूर्वीचाच निकट संबंध होता, पण १९०६ सालापासून बिपिन बाबू व दे. ब. दास ह्याचेशी त्याचा निकट संबंध जुळून आला, सुरतेच्या बखेड्यानंतर बंगाल्यात बॉबचा स्फोट झाल्यावर दे. बं. दास व बॅ. चक्रवर्ती ह्यानीं बरींच वर्षें राजकारणांतून आपलें अंग काढून घेतलें होतें; तथापि तुरुंगांत गेलेल्याच्या आप्तइष्टाना मदत करण्याचे कामीं, व इतर राष्ट्रीय उद्योग चालवणाऱ्यांकडे लक्ष देण्याचे कामीं दे. बं. दास आपल्या दरमहा तीस चाळीस हजाराच्या प्राप्तीपैकीं निम्मी अधिक रक्कम खर्चीं घालण्यास सदर काळांत कधींहि विसरले नाहींत. मंडालेहून लोकमान्य टिळक सुटून आल्यावर लखनौच्या कॉंग्रेसच्या पूर्वी बेळगावच्या प्रातिक परिषदेंत लोकमान्य टिळक ह्यानीं होमरूल लीग स्थापून कॉंग्रेसला राष्ट्रीय पक्षानें मिळावें असें ठरविल्यानतर, बंगालचे सर्व राष्ट्रीय पक्षाचे पुढारी लखनौला हजर राहिले आणि लखनौच्या बैठकीपासून नेमस्तांच्या हातातील कॉंग्रेस राष्ट्रीय पक्षाच्या हातीं गेली. १९१७ सालीं कलकत्त्यास बिझाटबाईचे अध्यक्षतेखालीं भरलेल्या कॉंग्रेसचें खरें चालकत्व दे. बं. दास ह्याजकडेच होतें. प्रातिक संपूर्ण स्वराज्यावर मॉटेग्यू-चेम्सफर्ड ह्याची तयार करण्यास घातलेली त्यावेळची योजना भागवून घ्यावी, असे बंगालच्या पुढाऱ्यांचें कलकत्त्याच्या कॉंग्रेसच्या वेळीं १९१७ सालीं मत होतें. पण लखनौ येथें कॉंग्रेसनें तयार केलेला तरजुमा हिंदु-मुसलमानाच्या संमतीनें तयार झालेला असून कलकत्त्यास लगेच एका वर्षांत त्या तरजुम्यात मुसलमानाच्या संमतीशिवाय फेरबदल करणें इष्ट नाहीं, अशी विचारसरणी बगाली पुढाऱ्यांपुढें मांडून लो. टिळक ह्यांनीं १९१७ सालीं संपूर्ण प्रातिक स्वराज्याचा प्रश्न प्रामुख्यानें पुढें येऊं दिला नाहीं. मॉटेग्यू-चेम्सफर्ड ह्याचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानंतर मुंबईस भरलेल्या स्पेशल कॉंग्रेसमध्यें

ह्या रिपोर्टातील कलमें अजिबात त्याज्यहि मानण्यांत आली नाहींत, किंवा मनोभावें स्वीकारण्यांतहि आलीं नाहींत. नेमस्तानीं सदर कलमें मनोभावें स्वीकारलीं, क्रॉनिकल वगैरे पत्रानीं त्याज्य म्हणून त्यावर शेरा मारला, पण मुंबईच्या कॉंग्रेसनें दोहोंमधला मार्ग स्वीकारून पोलिस व न्यायखातें वगळून बाकीच्या खात्यांचें प्रातिक स्वराज्य मागितलें. ही तडजोड दे. बंधु दास व लोकमान्य टिळक ह्या दोघानीं मिळून मुंबईच्या जादा कॉंग्रेसच्या वेळीं घडवून आणली. जादा कॉंग्रेसच्या पूर्वीच लोकमान्य टिळक विलायतेस जावयाचे होते, पण ऐत्यावेळीं परवानगी न मिळाल्यामुळे सिलोनहून त्यास परत यावें लागलें. मुंबईच्या जादा कॉंग्रेसच्या वेळीं बंगाली पुढाऱ्याची व आपली गाठ पुनः पडली ह्याबद्दल लोकमान्य टिळक ह्याना विशेष आनंद झाला, आणि कॉंग्रेसचें काम आटोपल्यावर दे. बं. दास, बॅ. चक्रवर्ती, पालबाबू आणि घोषबाबू ह्या चौघांना पुण्यास गायकवाड वाड्यांत दोन दिवस घालविण्यास अत्यंत आग्रहाचें आमंत्रण देण्यांत आलें. त्या प्रसंगीं पुण्यास झालेल्या बंगाली पाहुण्यांच्या भाषणांत मॉंटेग्यु–चेम्सफर्ड सुधारणांवर विशेष तुटून पडणारें जर कोणाचें भाषण झालें असेल, तर तें दासबंधूंचेंच भाषण होय. आपल्या भक्ष्यावर झडप घालून वाघ ज्याप्रमाणें नखाग्रानीं व भयंकर दाढानीं सावजाचा चेंदामेंदा करून टाकतो, त्याप्रमाणें मॉंटेग्यु–चेम्सफर्ड सुधारणांतील प्रमुख तत्त्वांचा चेंदामेंदा करून टाकण्यांत दे. बं. दास ह्याच्या वक्तृत्वाला नेहमीं हौस वाटत असे! मुंबईच्या स्पेशल कॉंग्रेसनंतर मॉंटेग्यु–चेम्सफर्ड सुधारणाचें त्याज्य स्वरूप लोकांपुढें मांडण्यास दे. बंधु दास ह्यानीं पुण्यास जो आरंभ केला त्याचा शेवट अमृतसरच्या कॉंग्रेसमध्यें मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा स्वीकारू नयेत, असें ठासून प्रतिपादण्यांत दे. बं. दास ह्याजकडून करण्यांत आला. लो. टिळक, म. गांधी वगैरेंनीं तडजोड करून

सुधारणांच्या कायद्याप्रमाणें वागावें, येवढे शब्द सुधारणा निराशाजनक ठरविणाऱ्या ठरावांत कसेबसे घातले. अमृतसरच्या कॉंग्रेसनंतर बनारस येथें भरलेल्या ऑल-इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या बैठकींत असहकारितेच्या चळवळीचा विचार करण्याकरितां स्पेशल कॉंग्रेस भरवावी किंवा कसें ह्यासंबंधाची चर्चा चालली असताना लो. टिळक तटस्थ राहिले आणि दे. बं. दास ह्यानीं कलकत्त्यास स्पेशल कॉंग्रेस भरविण्याची सूचना उचलून धरून कॉंग्रेसची व्यवस्था ठेवण्याचें अभिवचन दिलें. कलकत्त्याच्या स्पेशल कॉंग्रेसच्या वेळीं महात्मा गांधी ह्यांच्या असहकारितेच्या चळवळीविरुद्ध दे. बं. दास फारसे नव्हते, पण कॉंग्रेसनें कौन्सिलावरील बहिष्कारासकट असहकारितेचा ठराव पास करावा असेंहि त्याचें मत नव्हतें. कलकत्त्यास असहकारितेचा ठराव पास झाल्यानंतर दे. बंधु दास ह्यानीं आपली वकिली सोडून दिली आणि कौन्सिलाकरितांहि उभे राहण्याचें नाकारलें. नागपूरच्या कॉंग्रेसच्या वेळीं असहकारितेच्या ठरावाविरुद्ध बंगालच्या प्रतिनिधींनीं जावें अशी बिपिन बाबूंनीं फार खटपट केली, पण देशबंधू महात्माजींच्याच बाजूचे झाल्यामुळें देशबंधूंचा पंथ निराळा, बिपिन बाबूंचा पंथ निराळा आणि बॅ. चक्रवर्ती ह्यांचा पथ निराळा, असे तीन फांटे बंगालच्या राष्ट्रीय पक्षाला फुटले. दे. बंधु दास ह्यांच्या अलौकिक स्वार्थत्यागामुळें, राजकीय सन्याशाच्या खादीच्या पोषाखामुळें, आणि कोणतेंहि कार्य तडीस नेण्याच्या आवेशामुळें महात्माजींच्या बरोबरीची योग्यता अहमदाबादच्या कॉंग्रेसच्या वेळीं दे. बं. दास ह्यांना प्राप्त झाली. युवराजांच्या आगमनामुळें मुंबईस दंगा होऊन लाहोर, अलाहाबाद व कलकत्ता येथें स्वयसेवकांच्या हालचाली अत्यंत जोराच्या होऊं लागल्यामुळें लाला लजपतराय, पं. मोतीलाल नेहरू व दे. बं. दास ह्या तिघांनाहि हजारों स्वयसेवकांसह सरकारनें अवचित तुरुंगात टाकलें.

अहमदाबादच्या काँग्रेसच्या सुमारास मुसलमानांना वगळून हिंदु पुढाऱ्यांना तुरुंगांतून सोडण्याची तडजोडीची भाषा लॉर्ड रीडिंग यांनी सुरू केली. पण अहमदाबादच्या काँग्रेसमध्यें हिंदु-मुसलमानांत आपसांत भेद पाडणारी तडजोड महात्माजींनीं धुडकावून लावल्यामुळें अहमदाबादच्या काँग्रेसनंतर महात्माजींनाहि कैदखाना पत्करावा लागला. कैदेंतून सुटून आल्या-नंतर दे. बं. दास ह्यानीं गयेच्या काँग्रेसच्या वेळीं कौन्सिलांत प्रवेश करणारा स्वराज्य पक्ष स्वतंत्र स्थापला, आणि दिल्लीच्या स्पेशल काँग्रेसमध्यें ह्या स्वराज्य पक्षास कौन्सिलांत जाण्यास काँग्रेसकडून हरकत घेण्यांत येऊं नये अशी परवानगी मिळवून बंगालच्या कायदे-कौन्सिलातील स्वराज्य पक्षाचें पुढारी दे. बं. दास स्वतः झाले. बंगालच्या कायदेकौन्सिलांत दिवाणांच्या जागा नाकारून दिवाणांचे पगार दास बाबूंच्या पक्षानें दोन वेळां नामंजूर केले. म. गांधी सुटून आल्यानंतर बेळगांवच्या काँग्रेसपर्यंत कौन्सिलापासून दे. बं. दास ह्यानीं परावृत्त व्हावें म्हणून महात्माजींनीं आपल्याकडून शिकस्तीची खटपट केली; पण असहकारितेची चळवळ संपूर्णपणें मान्य असूनहि कौन्सिलातील टक्करीची जोड ह्या चळवळीस दिली असतां चळव-ळीला अधिक टिकाऊपणा येणारा आहे असें दे. बं. दास ह्यांचें अंतःकरण-पूर्वक मत असल्याबद्दल महात्माजींची खात्री पटून, देशबंधूंनीं कौन्सिलचें काम करावें अशी कामाची विभागणी करण्यात आली. आपल्या विषयींचा गैरसमज दूर करण्याकरितां शांततेच्या व्रताचें आश्वासन पुनः सर्वांना देऊन व लॉर्ड बर्कनहेड ह्याजबरोबर सहकार्य करण्यास हरकत नाहीं असें जाहीर करून कौन्सिलच्या कामाची निरवानिरव करण्यांत व महात्मा गांधी ह्यांचें खादीचें कलम सर्व ठिकाणीं सारखें लागू करण्याच्या उद्योगाला लागण्यात निमग्न असतानाच निर्घृण कालानें दार्जि-लिंग येथें देशबंधूंवर आकस्मित घाला घातला आणि एका अत्यंत तडफदार

निस्सीम देशभक्ताचें व संपूर्ण स्वार्थत्यागी पुरुषाचें चरित्र संपवून टाकलें! देशबंधु दास ह्याच्या मरणानें सर्व बंगाल्यावरच नव्हे तर सर्व हिंदुस्थानावर आणि हिंदु-मुसलमानाच्या एकीवर एक प्रकारचा घालाच येऊन पडला आहे. दास बाबूंचें चरित्र आठवून, त्यांच्या स्वार्थत्यागाचा कित्ता गिरवून बंगालचे पुढारी बंगालच्या व त्याबरोबरच हिंदुस्थानच्या राजकारणाला यापुढें योग्य मार्ग लावतील व देशबंधूंच्या ऋणातून बंगालला मुक्त करतील, असा भरंवसा बंगालविषयीं ह्याप्रसंगीं आम्हाला वाटत आहे.

---

# * संसारापुरती मजुरी



मुंबईंतील गिरण्यांच्या मालकांनीं शेंकडा ११॥ टक्यांनीं म्हणजे रुपयाला जवळ जवळ दोन आण्यानीं गिरण्यातील कामगाराची मजुरी कमी करण्याचा ठराव केला असल्यामुळें गिरणी कामगार सहाजिकपणेंच संतापून गेले आहेत. संप करावा तर पोटाचे अधिक हाल होणार आणि अखेरीस कमी पगारावर काम करणें भाग पडणार, अशी दैना गिरणी कामगाराची झाली आहे. गेल्या सालच्या संपामुळें शिल्लक जवळ उरलेली नाहीं; शिवाय गिरण्याच्या मालकापाशीं माल फार सांठलेला असल्यामुळें चार सहा महिने गिरण्या बंद ठेवण्यात मालकाचें नुकसान नसून गिरणी कामगाराच्या संसाराची मात्र राखरागोळी होणारी आहे! मुंबईंतील घरभाडयाचा आणि रोजच्या समारास लागणाऱ्या जिन्नसाच्या किंमतीचा जर विचार केला तर गिरणी कामगाराची हल्लींचीच मजुरी जेमतेम संसाराला पुरणारी आहे, असेंच म्हणणें भाग येतें. मग ह्या मजुरींत रुपयाला दोन आणे कमी करून कसें भागणार? मुंबईंतील गिरण्याचा माल आज खपत नसल्यामुळें त्याबद्दल गिरणी कामगाराना प्रायश्चित्त ध्यावयास लावणें केव्हांहि योग्य होणार नाहीं. गिरण्याचा माल खपत नाहीं ह्याबद्दल जर कोणाकडे दोष असेल तर तो दोष सरकारच्या किंवा गिरण्यांच्या मालकांच्या माथींच मारला पाहिजे. इंग्लंडातील कोळशाच्या खाणींच्या स्थितीसंबंधानें रिपोर्ट करण्याकरितां जशी कमिटी बसली होती, तशी कमिटी गिरण्यांच्या धंद्यासंबंधानें रिपोर्ट करण्याकरिता मुंबईस बसविण्यात आली, तर गिरणी कामगारांना कोणीहि दोष देऊ नये असा रिपोर्ट सदर कमिटीकडून झाल्या-

* नवाकाळ, ता. ३१ जुलै १९२५

वांचून रहाणार नाहीं. इंग्लंडांतील कमिटीनें कोळशाच्या खाणींतील मजुरांना हल्लीं मिळत असलेलें वेतन संसारापुरतें किंवा 'लिव्हिंग वेजीस' आहे असेंच ठरविलें असून, ह्या पगारात कमी करून चालावयाचें नाहीं, असा आपला निर्णय दिला आहे. मुंबईच्या गिरण्यांचा माल न खपण्याच्या कारणापैकीं एक कारण असें आहे कीं, चीनमध्यें व जपानमध्यें गिरण्यांचा धंदा गेल्या पांचदहा वर्षांत विशेष वाढला असून चीनच्या गिऱ्हाइकाला मुंबईच्या गिरण्या मुकल्या आहेत. चीनमध्यें व जपानमध्यें गिरण्यांचा धंदा वाढतो आहे आणि त्याचा परिणाम आपल्या खपावर झाल्यावांचून रहाणार नाहीं, ह्या गोष्टीकडे गिरण्यांच्या मालकांनीं गेल्या पांचदहा वर्षांत लक्ष कां दिलें नाहीं? हिंदुस्थान सरकारचें व गिरण्यांच्या मालकांचें असें लक्ष पुरविण्याचें काम होतें. तें काम त्यानीं बजावलें नाहीं. त्यांच्या आळसा-बद्दल व हलगर्जीपणाबद्दल गरीब मजुराचे पोटाला दर रुपयामागें आज दोन चिमटे घेण्यात येत आहेत! फ्रान्स, जर्मनी वगैरे देशांत गेल्या पांच वर्षांत नवीन कोळशाच्या खाणी सुरू करण्यांत आल्या असून, नद्यांच्या व धबधब्यांच्या पाण्याच्या शक्तीवर विजेनें कारखाने चालविण्याची प्रवृत्ति अधिक उत्पन्न झाली आहे; मोठमोठाल्या जहाजांवर इंजिनें चालविण्यास दगडी कोळशाच्या ऐवजीं रॉकेल तेलाचा उपयोग करण्यांत येत आहे; युरोप खंडांतील ह्या फेरबदलामुळें इंग्लडांतील कोळसा पूर्वीप्रमाणें खपत नाहीं, असें चौकशीच्या कमिटीचें मत असून, सांठलेल्या मालाबद्दल मजुरांना शिक्षा न करता सरकारला व मालकांना तोशीस लागली पाहिजे, असें सदर कमिटीचें म्हणणें आहे. जर्मनी व फ्रान्स येथें नवीन यंत्रें सुरू करून अधिक कोळसा जर खाणींतून काढण्यात येतो तर इंग्लंडनेंहि तसें का करू नये? नवीन यंत्रें व नवे शोध ह्यांजकडे इंग्लंडच्या खाणवाल्यांनीं व मुत्सद्यांनीं दुर्लक्ष कां करावें?

जपानी गिरण्यांत चांगलीं यंत्रें वापरतात आणि हलक्या दर्जाचा कापूस व लांब धाग्याचा कापूस ह्यांचें योग्य तऱ्हेचें मिश्रण करून हलक्या दर्जाच्या कापसाचें चांगलें कापड काढतात, ही गोष्ट जपानी माल गिरण्यांच्या बोकांडी बसून चांगला मार देईतों हिंदुस्थान सरकारच्या व गिरणीवाल्यांच्या लक्षात का येऊं नये ? आपण आळसांत निजून राहावयाचें आणि गरिबांना बळी द्यावयाचे, असला प्रकार दृष्टीस पडल्यावर इंग्लंडांत कोळशाच्या खाणी राष्ट्रीय मालकीच्या झाल्या पाहिजेत, अशी ओरड सुरू झाली आहे, त्याप्रमाणें हिंदुस्थानातील गिरण्यासारखे मोठे मोठे धंदे राष्ट्रीय मालकीचे झाले पाहिजेत, अशी चळवळ आज नाहीं उद्यां सुरू झाल्यावाचून कशी राहील ? अल्लाउद्दीन खिलजी, जाधव राजाच्या देवगिरीच्या किल्याला वेढा देईतों सिंधू नदीच्या पलिकडील मुसलमान हिंदुस्थानवर स्वाऱ्या कशा करतात ह्याची वार्ताहि महाराष्ट्राच्या कानीं नसल्यामुळें जसें अवचित महाराष्ट्रांत चार पाचशें वर्षांपूर्वी मुसलमानी राज्य सुरू झालें, तशीच स्थिति जपाननें आज मुंबईच्या गिरण्यांची केली आहे. त्यावेळच्या राजांना नवीन कालांतील निजलेले राजे असा दोष देण्याची इंग्रज लेखकांची पद्धत आहे ! पण आज महायुद्धानंतरच्या चार पाच वर्षांत पूर्वीचे गांवढळ ठरले गेलेले आळशी व चैनी राजे मुंबईतील गिरणी मालकांच्या स्वरूपानें पुन्हां जन्मास आलेले दिसत नाहींत काय ? अल्लाउद्दीन खिलजीनें अवचित आमच्या राजधानीला वेढा दिला, तरी आम्ही राजांनीं काय करावें असे म्हणणारे वेडगळ मुत्सद्दी ज्याप्रमाणें चारशेंपांचशें वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत होते, त्याप्रमाणें आज मुंबईतील गिरण्यांचे मालक जपान अवचित आमच्या बोकांडीं बसलें आहे म्हणून दीनवाणीनें ओरडत आहे ! नालायकीचें आणखी दुसरें कोणतें चिन्ह असतें ? गिरण्यांचा धंदा मुंबईच्या मागून जपानांत सुरू झाला, असें असतां जपानच्या गिरण्या हिंदुस्थानचाच कापूस वापरून

हिंदुस्थानांतील निरनिराळया बाजारांत आपला माल अधिक स्वस्त विकत आहेत! हिंदुस्थानांत सरकार आणि गिरण्यांचे मालक हे दोघेहि घोरत पडून जपाननें घर व्यापून टाकल्यानंतर गरिबांच्या पोटाला चिमटा घेऊं पहात आहेत. मुंबईतील गिरणी कामगारांच्या अंगीं आज संप करण्याचें सामर्थ्य नाहीं, तेव्हां त्यांनीं संप करून आपल्या संसाराच्या अधिक हालअपेष्टा करून घेऊं नयेत, हेंच रास्त आहे. पण परमेश्वरी प्रेरणेनें म्हणा किंवा इतर कारणानें म्हणा, जर गिरणींतील कामगारांनीं संप केला आणि बरेच महिने झगडत राहून गिरणीवाल्याच्या व सरकारच्या डोळ्यात चागलें अंजन घातलें, तर झोंपी गेलेल्या मालकाना व अधिकाऱ्याना कामावरून दूर करून एकदर हिंदी राष्ट्राचें कल्याण करण्याचें पुण्य त्याना लागणारें आहे, ह्यात संशय नाहीं. हिंदुस्थान सरकार व हिंदुस्थानातील भाडवलवाले आज इतके घोरत निजलेले आहेत कीं, मद्रास, कलकत्ता, व मुंबई ह्या बंदरांपैकीं एखादें बंदर जपानच्या आरमारानें एखाद्या रात्रीं अवचित कबजात घेतल्याची बातमी येण्याचा संभव नाहीं, असें आज मुंबईच्या गिरण्यांच्या बोकाडी बसलेल्या जपानकडे पाहिलें असतां कोणींहि म्हणूं शकणार नाहीं. संप न झाल्यानें हिंदी राष्ट्रीयत्वाकडे गिरण्याचे मालक व हिंदुस्थान सरकार अधिकच बेपर्वाईनें वागून हिंदी राष्ट्रास आपल्या हलगर्जीपणानें, आळसानें व स्वार्थानें नव्या खड्डयात पाडल्यावाचून रहाणार नाहीं! तुम्ही निजलेले आहां तेव्हा जागे व्हा, आणि जपानात किंवा चीनमध्यें राष्ट्रीय भावना ज्याप्रमाणें आज तेथील सरकार व श्रीमंत लोक नांवारूपास आणीत आहेत, त्याप्रमाणें हिंदुस्थानातहि हिंदुस्थान सरकारला राष्ट्रीय भावनांचा सन्मान करण्यास लावा, अशी जपानची चढाओढ गिरण्याच्या मालकांच्या कानीकपाळीं आज ओरडत आहे. स्वतःचा माल हिंदुस्थानच्या हिंदुस्थानांतच कसा खपवावा व त्याबद्दल

लोकांच्या अनुरोधानें वागून स्वदेशीची साधी चळवळ कशी करावी, हे ज्या गिरण्यांच्या मालकांना समजत नाहीं, ते गिरण्यांचे मालक जपानशीं टक्कर देण्यात कसचे समर्थ होणार! गिरणी-कामगार आज दुबळे आहेत असें पाहून, त्यांच्या पोटाला चिमटे घेण्याचा पराक्रम नोकरशाहीला करून दाखविण्याच्या पलीकडे गिरण्यांच्या असल्या मालकांच्या हातून होणार तरी काय!

---

# * मेलेल्यांना खाऊन जगणें



दास बाबूंचें स्मारक म्हणून सर्व हिंदुस्थानभर मोठा फंड उभारून, त्या फंडांतून खादीची चळवळ चालविण्याचा संकल्प महात्मा गांधी ह्यांनीं केला आहे. ह्या फंडाचे ट्रस्टी नेमण्यात आले असून, ह्या फंडास सर्वांनीं मदत करावी म्हणून काढलेल्या विनंति-पत्रकावर स्वराज्य पक्षाचे अध्वर्यू पं. मोतीलाल नेहरू, स्वतंत्र पक्षाचे पुढारी पं. मदन मोहन मालवीय, बंगालचे कवि रवींद्रनाथ टागोर इत्यादि लोकनायकांच्या सह्या आहेत. खादीची चळवळ महात्मा गांधी ह्यांनीं स्वतंत्रपणें करावी, त्या चळवळीच्या खर्चा-करितां महात्मा गांधींजवळ पुरेसा फंड असावा, आणि दास बाबूंचें सर्व हिंदुस्थानचें स्मारक म्हणून सदर फंड उभारण्यात यावा, ह्या संबंधानें सर्व पक्षांच्या पुढाऱ्यांचें एकमत झालें आहे. ह्या फंडाकरितां महात्मा गांधी ह्यांनीं वीस हजार रुपये गोळा केले असून, ह्या पुढील महात्माजींचे दौरे सदर फंडाकरितां निघणार, ह्यांत संशय नाहीं. दास बाबूंच्या स्मारकाकरिता निरनिराळ्या प्रांतांत फिरून प्रत्येक ठिकाणीं मोठा फंड उभारून, खादीच्या चळवळींतील स्वयंसेवकांची तरतूद लावणें, हें काम महात्माजी मुख्यत्वें-करून करणार आहेत. प्रत्येक तालुक्याला दरमहा तीस रुपयांवर रहाणारे एक दोन स्वयसेवक नेमून, त्यांच्या मार्फत तेथील खादीची चळवळ चालवावयाची, असा दास-स्मारक-फंडाचा उपयोग करून घेण्याचा महात्माजींचा उद्देश आहे. तालुक्यात काम करणाऱ्या स्वयंसेवकानें स्वतःच्या हातानें काढलेल्या सुतावर आपला उदरनिर्वाह केला पाहिजे, असें महात्माजींचें मुळींच म्हणणें नाहीं. चरखा दुरुस्त करणें, हातानें सूत काढणें, विणण्याच्या

---

* नवाकाळ, ता. ११ ऑगस्ट १९२५

कामांतील अडचणी जाणणे, इत्यादि कामांत स्वयंसेवकानें स्वतः तरबेज झाल्यावर आपल्या तालुक्यात चाललेल्या चरख्यांना सूत काढण्याच्या कामीं योग्य सल्ला देणें, कापसाचा पुरवठा करणें, आणि सूत काढणारें, विणणारें व खादी विकणारे ह्या तीनहि वर्गाची नीट तोंडमिळवणी होण्याकरितां मध्यस्थाचीं कामें करून खादीच्या चळवळीवर देखरेख ठेवणें, असलें मुख्य काम तालुक्यातील स्वयसेवकाना सागण्यांत येणार आहे. प्रत्येक तालुक्यांत जर खादीची उत्पत्ति नीट रीतीनें होऊ लागली आणि तालुक्यांतील जाडी भरडी खांदी तालुक्यातच खपून, बारीक सूत कातण्यात पटाईत झालेल्यांचा माल तेवढा इतर ठिकाणीं पाठवावयाचा अशा स्थितीला जर तालुक्यातील खादीची चळवळ जाऊन पोहोंचली, तर सर्वांची तोंडमिळवणी करणाऱ्या मध्यस्थ स्वयसेवकाचाहि निर्वाह खादीच्याच उद्योगावर चालल्यावांचून राहणार नाहीं. आज खादीची चळवळ चालू आहे, कालांतरानें ह्या चळवळीला खादीच्या उद्योगाचें स्वरूप यावयाचें आहे. उद्योगाचें स्वरूप प्राप्त झाल्यावर स्वयसेवकाना दास बाबूंच्या स्मारक फंडातून दरमहा तीस रुपयांची मदत देण्याची जरुरी रहाणार नाहीं. पण चळवळीला उद्योगाचें स्वरूप येईपर्यंत अशी मदत करणें जरुरीचें असून दास-स्मारक फंड स्वयसेवकांच्या उद्योगाकरितांच प्राधान्येंकरून काढण्यात आला आहे. ह्या फंडाला वीस हजार रुपये विनति–पत्रक काढल्याबरोबर महात्माजींनीं मिळविले, हें वाचून कांहीं ॲंग्लो–इंडियन पत्रांनीं महात्माजींची टर उडविण्यास सुरुवात केली आहे. मेलेल्याना खाऊन आपल्या चेल्याचीं पोटें भरण्याचा हा कांवा आहे, असा टीकाकाराचा मुख्य आक्षेप आहे. पण शातपणें विचार केला असता, ह्या आक्षेपांत कांहीं अर्थ नाहीं असेंच दिसून येईल. हिंदुस्थानसारख्या पतित राष्ट्राला मृतांच्या व पूर्वजांच्या स्मरणाशिवाय दुसऱ्या कोणाचा आधार आहे।

पूर्वजांचें स्मरण करून आणि आपल्या पुढाऱ्यांपैकीं नुकत्याच मेलेल्या पुढाऱ्याचें स्मारक म्हणून आपल्या चळवळींत नवजीवन उत्पन्न करावयाचें नाहीं तर दुसऱ्या कोणत्या मार्गानें जागृति करावयाची? पराधीन झालेल्या राष्ट्राचे व समाजाचे हातीं पूर्वीच्या कर्त्या, पराक्रमी व स्वतंत्र पुरुषांचें स्मरण हेंच काय तें मुख्य भांडवल असतें. ह्या भांडवलावरच मृतप्राय झालेल्या आजच्या समाजाची जागृति करावी लागते. आजच्या प्रत्यक्ष जगातील साधनें आमच्या हातीं कोणतीं आहेत? राष्ट्रातील मनुष्यबळ व द्रव्यबळ परक्याच्या मुठींत आहे. बुद्धिबलहि परक्याच्या सेवेत निमग्न आहे. प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे बुद्धिबलाच्या मुख्य मुख्य केन्द्रस्थानावर परक्याची छाप आहे. प्रसंगाप्रसंगानें व पूर्वजन्मीच्या संस्कारामुळें बुद्धीचा कांहीं कांहीं भाग स्वतन्त्र राहिलेला आहे. बुद्धीच्या ह्या स्वतन्त्र भागाला आधार कोणता? मनाचा आधार नाहीं, शरीराचा आधार नाहीं, आणि सभोंवारच्या वस्तूंचा ऊर्फ द्रव्याचाहि आधार नाहीं, मग ह्या स्वतन्त्र असलेल्या बुद्धीनें काम कसें करावें? परक्याच्या तावडींत सांपडलेल्या मनाला पूर्वजांची आठवण करून देऊन मन विसावा घेत असतांना तसल्या फावल्या वेळीं जिज्ञासा म्हणून म्हणा किंवा करमणूक म्हणून म्हणा, पूर्वजांच्या पराक्रमाकडे लक्ष देऊन आजच्या स्वतन्त्र बुद्धीची अल्प स्वल्प सेवा कर, म्हणून पराधीन मनाला शिकविणें जरुरीचें नाहीं काय? पोटापाण्याकरितां परक्याच्या अंगणांत राबणाऱ्या शरीराला पूर्वीच्या समाज-स्थितीची आठवण देऊन, आपल्या पूर्वजांचीं शरीरेंहि खादीच्याच उद्योगामुळें पराधीन झालीं नव्हतीं, असें वारंवार दृष्टोत्पत्तीस आणून दिल्याशिवाय राष्ट्रोन्नतीची मोठी चळवळ कशी करावयाची? हिंदुस्थान देश एके काळीं हातानें काढलेल्या सुताच्या जोरावर केप ऑफ गुडहोपपासून जपानपर्यंत सर्व प्रदेशाला रोजचा लागणारा कपडा पुरवीत

असे, इतकेंच नव्हे, तर युरोप खंडातील श्रीमंताची कपड्याच्या छानछुकीची हौसहि हिंदुस्थानच भागवीत असे. असलें पूर्वजाचें स्मरणच खादीच्या चळवळीचा आज मुख्य पाया नाहीं काय? मग खादीच्या चळवळीकरिता आस्था बाळगणाऱ्या आणि खेड्यापाड्याचे उद्धाराचे कामीं केंद्रस्थानीं खादीला बसविण्याची उत्कंठा धरणाऱ्या दासबाबूंचें स्मारक खादीच्या स्वयसेवकाना पोसणारे का होऊ नये? ह्यात गैर कोणते आहे? आमच्या पूर्वजानी संपादन करून ठेवलेले वैभव आमच्या हाती राहिलेलें नाहीं. दासबाबूंसारख्या पुढाऱ्याच्या मरणानंतर त्यानी उत्पन्न केलेली शक्ति ढासळून टाकण्याचा प्रयत्नहि नोकरशाही झपाट्याने करीत आहे. त्याचें स्मरण तेवढे स्वतंत्र असलेल्या बुद्धीचा योगक्षेम चालविण्यास समर्थ आहे. त्याच्या ह्या स्मरणामुळेच खादीला वाहून घेतलेले स्वयसेवक खादीचे चळवळीला प्रत्येक तालुक्यात उद्योगाच्या दृष्टीनें व्यवस्थित स्वरूप देण्यास पुढें येणार आहेत; त्याच्या ह्या स्मरणामुळेच शेतकऱ्याचा वर्ग व दीन झालेला स्त्रीसमूह हातानें सूत काढण्यास प्रवृत्त होणार आहे, त्याच्या ह्या स्मरणामुळेंच तालुक्यातील खादी तालुक्यात खपणारी आहे, त्याच्या ह्या स्मरणामुळेच बारीक सुताचें चीज श्रीमत वर्गाकडून होणारी आहे, आणि त्याच्या ह्या स्मरणामुळेच मनाने व शरीराने पराधीन झालेल्या परतु सुखवस्तू असलेल्या लोकाची अंत:करणे खादीकडे वळून खादीच्या चळवळीचे संगोपन करण्याकरिता लागणारा दास बाबूंचा स्मारक फंड महात्मा गांधी ह्याना पाहिजे तेवढा जमविता येणे शक्य आहे. ह्यात लबाडी कोठे आहे? प्रेते उकरून काढून खाण्याची हातचलाखी कोठे आहे? आजच्या स्वतंत्र बुद्धीच्या मोठ्या चळवळीला मृताविषयीच्या पूज्य भावाचें स्मरण जुपावयाचे, असा हा साधा व स्वयंसिद्ध प्रकार आहे. मनुष्यबळ, द्रव्यबळ व बुद्धिबळ स्वतःच्या मुठींत धरून आज जिवंत माणसाची हाडे जे घुसळत

आहेत, त्यानींच मेलेल्याच्या हाडानाहि स्वतःच्या अंगणातील फुलझाडांना व फळझाडाना खताकरिता घालण्याचा अट्टाहास धरणें म्हणजे मरून कचाटयातून बाहेर गेला तरी सोडणार नाहीं, असा निष्ठुरपणा दाखविण्यासारखें नाहीं काय? पूर्वजांचें स्मरण आणि मृत झालेल्या हल्लींच्या लोकनायकाचें स्मरण राष्ट्रकार्याला जुपणाऱ्या पुरुषाला प्रेतें उकरून चेल्याचें पोट भरणारा पुरुष अशा तऱ्हेचें निंदास्पद नांव ठेवणें म्हणजे कुत्सितपणाची कमाल करणें होय.

---

# * सुताची संस्था



पाटणा येथें ऑ. इ. कॉ. कमिटीच्या बैठकीचे वेळीं कॉंग्रेस स्वराज्य पक्षाच्या हवालीं करून ऑ. इ. कॉ. कमिटीच्या ठरावानेंच म. गांधी ह्यांनीं स्वतंत्र सुताची संस्था सुरू केली आहे. खादीची चळवळ आणि कॉंग्रेसचें कार्य ह्यांचा पूर्ण मिलाफ बेळगांवच्या कॉंग्रेसने केला असतांना आज विभक्त निघण्याचें कारण कोणतें? म. गांधी ह्यांना पाटणा येथील ऑ. इ. कॉ. कमिटीमध्यें खादीच्या चळवळीविषयीं अनुकूल मताधिक्य नव्हतें असें म्हणावें, तर स्वराज्य पक्षाच्या पुढाऱ्यांच्या विरुद्ध कॉंग्रेसच्या सभासदांनीं नेहमीं खादीच वापरली पाहिजे असा ठरावहि प्रथम पास करण्यास पाटणा येथील ऑ. इ. कॉ. कमिटीनें कमी केलेलें नाहीं. ऑ. इ. कॉ कमिटीनें सतत खादी वापरण्याचा ठराव पास केला असताहि म. गांधी ह्या वादांत मध्यें पडले, आणि त्यांच्या आग्रहावरून पास झालेल्या कलमाचा पुन्हा विचार होऊन स्वराज्य पक्षाच्या पुढाऱ्यांना संतुष्ट करण्याकरितां कॉंग्रेसच्या सभांच्या व समारंभाच्या वेळीं खादी वापरलीच पाहिजे आणि इतर प्रसंगीं खादी वापरली नसतांना चालेल, अशी सवलत स्वराज्य पक्षाकरितां आणि विशेषतः महाराष्ट्रांतील स्वराज्य पक्षाच्या पुढाऱ्यांकरितां देण्यात आली. मताधिक्य आपल्या बाजूला नाहीं म्हणून महात्माजींनीं माघार घेतली असें वरील प्रकारावरून म्हणतां येणें शक्य नाहीं. खादी वापरण्यासंबंधानें व खादीच्या चळवळीसंबंधानें मताधिक्याच्या जोरावर स्वराज्य पक्षाच्या सभासदांना जर नावडतें काम करावयास सांगितलें तर रोजच्या रोज कटकट उत्पन्न होऊन धड कॉंग्रेसचे काम नाहीं आणि धड खादीचें काम नाहीं असा प्रसंग येतो. तो येऊं नये म्हणून आणि दोनहि चळवळी आपापल्या

---

* नवाकाळ, ता. २६ सप्टेंबर १९२५

क्षेत्रस्थानांत निर्विघ्नपणें चालविता याव्यात म्हणून मताधिक्य आपल्या बाजूचें असताहि म. गांधी ह्यांनीं गोडीगुलाबीने सुताची संस्था स्वतंत्र करून घेतली आहे. सुताच्या संस्थेला दोन हजार यार्ड सूत पुरवून दाखला घेतला असतां कॉंग्रेसचे सभासद होता येतें आणि कॉंग्रेसच्या अनुयायांनीं कॉंग्रेसच्या समारंभाचे प्रसंगीं खादीच वापरली पाहिजे, एवढ्या दोनच गोष्टी कॉंग्रेस आणि सुताची संस्था ह्यांना एकमेकांशी संलग्न करणाऱ्या आहेत. सुताच्या नव्या संस्थेच्या हातीं कॉंग्रेसचीं सर्व खादीची बोर्डें मालमत्तेसह व देण्या-घेण्यासह देण्यात आलेली असल्यामुळे, बेळगावच्या कॉंग्रेसपासून आतापर्यंत जी खादीची चळवळ कॉंग्रेसच्या मार्फत चाललेली आहे ती चळवळ खंड पडूं न देतां सुताच्या संस्थेने पुढे चालवावयाची आहे. रोजच्या राजकीय प्रश्नांशीं खादीच्या चळवळीचा प्रत्यक्ष संबंध आतां उरलेला नसल्यामुळे केवळ आर्थिक दृष्टीनें विचार करणारालाहि सुताच्या संस्थेंत सामील होण्यास हरकत उरलेली नाही. कॉंग्रेसचीं खादीची बोर्डें आणि सर्व खादीची चळवळ ह्यांजवर देखरेख करण्याकरितां बारा सभासदांची कमिटी नेमण्यांत आली असून, ह्या कमिटीचा अधिकार पांच वर्षें कायम टिकावयाचा आहे. फंड गोळा करणें, पैसे कर्जाऊ काढणे, खादीच्या कार्याकरितां कर्जाऊ पैसे देणे, आणि खादीच्या कार्याला मदत करणाऱ्या सर्व शाळांना द्रव्याने साहाय्य करणें, इत्यादि सर्व कामें ही बारा सभासदांची कमिटी प्रांतिक कमिट्यांच्या द्वारें करणार आहे. आज खादी बोर्डांच्याजवळ सर्व हिंदुस्थानांत मिळून चारपांचशें पगारी स्वयंसेवक आहेत. दास स्मारक फंड झपाट्यानें गोळा करून चारपांचशें पगारी स्वयंसेवकांचें हल्लींचे पथक चारपांच हजारापर्यंत होईल तितक्या लवकर नेऊन पोहोंचवावयाचें, आणि ह्या कामासाठीं एक दोन वर्षांच्या अवधींत दास स्मारक फंड एक कोटीपर्यंत पोंचवावयाचा, असा निश्चय म. गांधी ह्यांनीं केलेला आहे. मुख्य बारा सभासदांच्या कमिटींत,

खादी बोर्डांत, आणि प्रांतिक कार्यकारी मंडळांत बसणाऱ्या सभासदानीं खादीच्या चळवळीचें काम आलें असतां आपलीं इतर खाजगी किंवा सार्वजनिक कामें एका बाजूस ठेवून खादीच्याच चळवळीला स्वतःस वाहून घेण्याची शपथ घेतली पाहिजे, अशी एक अट आहे. ही अट अत्यंत महत्त्वाची आहे. खादी बोर्डांत किंवा प्रांतिक आणि स्थानिक कार्यकारी मंडळांत किंवा सर्वांत श्रेष्ठ असलेल्या बारभाईच्या कमिटींत काम करूं इच्छिणाऱ्याना खाजगी कामकाजाची किंवा सार्वजनिक इतर कामाची हरकत सांगताच येण्याजोगी नाहीं. कार्यकारी सभासद म्हणजे सर्वस्वी स्वतःला खादीलाच वाहून घेणारा सभासद, असा हा अर्थ आहे. इतक्या जोमाचीं व निश्चयाचीं माणसें प्रत्येक ठिकाणीं जरूर तितकीं आपणास मिळतील, असा पूर्ण भरवसा म. गांधी ह्यांना वाटत असून अशारीतीनें सतत खादीचेंच काम करणाऱ्यांच्या हातीं सुताच्या संस्थेच्या सर्व व्यवहारांचें नियंत्रण रहाणार, हे उघड आहे. कामकाजांत टंगळमंगळ होण्याची सवडच नाहीं. जेथें तेथें तत्परता दिसून येऊन खाजगी व्यापाऱ्याची उत्तम रीतीनें चाललेली संस्था ज्याप्रमाणें टापटीपीनें, एकाग्र दृष्टीनें आणि तत्परतेनें अहर्निश काम करीत असते, त्याप्रमाणेंच सुताच्या संस्थेचे काम चाललें पाहिजे, असे धोरण महात्माजींनी आखलेलें आहे. डोळ्यांत तेल घालून बसलेल्या लोभी व्यापाऱ्यामध्यें जी तत्परता, चिकाटी व हिशोबी बाणा दृष्टीस पडतो, तोच करारीपणाहि सुताच्या संस्थेच्या अंगीं दृष्टीस पडावा, अशी महात्माजींची इच्छा आहे. कृपण व्यापारी खाजगी लोभासाठींच तत्परतेनें राबतो, सुताची संस्था देशाच्या हितासाठीं त्याच तत्परतेनें राबणार, एवढाच कायतो फरक दिसून येणार आहे. म. गांधी स्वतःला ह्या सुताच्या संस्थेच्या कार्याला वाहून घेणार असल्यामुळें आणि अहर्निश निरपेक्ष बुद्धीनें काम करण्याची व करून

घेण्याची हातोटी त्यांना चांगली साधलेली असल्यामुळें सुताच्या संस्थेच्या कोणाहि सभासदाला ते कधीहि आळशी होऊं देणारच नाहीं. ह्या संस्थेत आळसाला व आरामाला स्थळच नाहीं. कार्यकारी सभासदांनीं आपल्या खाजगी किंवा इतर सार्वजनिक कामाची केव्हाहि सबब सांगतां कामा नये. ह्या शपथेचा परिणामच वरील तऱ्हेचा आहे. ज्यांना अशा रीतीनें सर्वस्वी वाहून घ्यावयाचें नसेल त्यांनीं दुसऱ्या नंबरचे सभासद व्हावें पण कार्याचा बोजा आपल्या माथीं घेऊं नये, अशी व्यवस्था लावण्यांत आली आहे. पहिल्या प्रतीचा सभासद असो, किंवा दुसऱ्या प्रतीचा सभासद असो, खादीच्या चळवळीवर आपला पूर्ण भरंवसा असून ह्याच चळवळीनें देशाचें कल्याण होणार असल्यामुळे दररोज अर्धा तास आपण हातानें सूत काढून सुताच्या संस्थेला दरमहा एक हजार यार्ड स्वतः काढलेलें सूत देऊं, अशी लेखी कबुली द्यावयाची आहे. पहिल्या प्रतीच्या व दुसऱ्या प्रतीच्या ह्या सभासदांनीं आपापलें स्थानिक कार्यकारी मंडळ निवडावयाचें असून, ह्या मंडळाच्या मार्फत बारभाई कमिटीच्या हुकमा-प्रमाणें त्या त्या ठिकाणची खादीची चळवळ चालवावयाची आहे. पगारी स्वयंसेवक नेमणें, खेड्यापाड्यांतून खादीची उत्पत्ति करून तेथेंच खादीचा खप करणें, राष्ट्रभर खादीचें कार्य सामान्य व्यवहाराच्या दर्जाला पोहोंचवून तीनचार वर्षांच्या अवधींत कोणत्याहि फंडाच्या मदतीची जरुरी खादीच्या व्यवहाराला रहाणार नाहीं, अशी परिस्थिति निर्माण करणें, आणि खादीच्या नव्या शक्तीचा अनुभव सर्व राष्ट्राला लवकर आणून देणें ह्या उद्देशांना अनुलक्षून म. गांधी ह्यांनीं सुताच्या संस्थेला पाटणा येथे प्रारंभ केला आहे. ज्यांना पहिल्या प्रतीचे किंवा दुसऱ्या प्रतीचे सभासद होतां येण्या-सारखें नाहीं त्यांनीं दरसाल १२ रुपये वर्गणी सुताच्या संस्थेला देऊन आश्रयदाते व्हावें व खादीच्या चळवळीला मदत करावी, अशी सवड

सुताच्या संस्थेच्या रचनेंत ठेवली आहे. ज्यांना सभासद होणें किंवा आश्रयदाते होणें इष्ट वाटत नसेल पण चळवळीविषयीं ज्याच्या मनात कळकळ असेल, त्यांनीं आपल्या धार्मिक व खाजगी समारभाच्या वेळीं खादी वापरून खादीच्या बाजूचे आपण आहों असें मुद्दाम सर्वांच्या ध्यानीं आणून देण्यास आळस करू नये; कारण खादीला दिलेल्या असल्या मदतीवरच बहुजन समाजातील खादीचा फैलाव बऱ्याच अंशीं अवलबून आहे. सुशिक्षित वर्गात कळकळ, तत्परता व आस्था खादीच्या चळवळी-सबंधानें आहे असे ज्याप्रमाणें खेडयापाडयातील लोकाच्या निदर्शनास व अनुभवास येईल, त्याप्रमाणें सुताच्या सस्थेच्या खेडयापाडयातील स्वयसेवकाच्या व्यवहारास यश मिळणारे आहे. सुशिक्षितामध्ये खादीसंबधाने निदान तटाबखेडा तरी नाहीं, असे प्रत्यक्ष दृष्टीस पडण्याकरिताच आणि वाद मिटविण्याकरिताच सुताची सस्था म. गाधी ह्यानी स्वतत्र काढली असल्यामुळे, वादविवादाचा व उखाळ्यापाखाळ्याचा ससर्ग ह्या सस्थेस बाधणार नाही आणि सर्व लोक मनोभावे ह्या सस्थेला मदत करून महात्माजीचे मनोरथ होईल तितक्या जलदीने परिपूर्ण करतील, असा आम्हास भरंवसा वाटत आहे.



# * नामदार तांबे

नागपूरच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे अध्यक्ष व स्वराज्य पक्षाचे एक प्रमुख पुढारी ना. तांबे ह्यानीं नागपूर-सरकारच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलरची जागा स्वीकारली, ही गोष्ट राष्ट्रहिताच्या दृष्टीनें अत्यंत वाईट झाली आहे. ना. तांबे हुषार आहेत; कर्ते आहेत, आणि देश-कल्याणाची कळकळहि त्यांच्या अंगीं आहे, ह्यासंबंधानें वाद नाहीं. वरील गुण त्यांचे अंगीं आहेत म्हणूनच मध्यप्रांताच्या स्वराज्य पक्षाने त्यांना थोडे दिवसापूर्वीं कौन्सिलचे अध्यक्ष निवडले. देशभक्त पटेल ह्यांना ज्याप्रमाणें असेम्ब्लीचे अध्यक्ष निवडण्यात आले त्याप्रमाणे ना. तांबे ह्यांची अध्यक्षाच्या जागीं निवडणूक झाली. अध्यक्ष होणे किंवा सरकारी महत्त्वाच्या कमिटयांतून काम करणे हिंदी स्वराज्यास अत्यंत धोक्याचे आहे, असे आता ना. तांबे यांच्या वर्तनानें लोकांच्या निदर्शनास चांगलें आले आहे. असेम्ब्लीचा अध्यक्ष किंवा स्टेट-कौन्सिलचा अध्यक्ष एखाद्या गव्हर्नराच्या जागेजवळ किंवा सिमल्याच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलच्या जागेजवळ पोहोंचलेला असतो आणि ह्या मोठया सत्तेच्या नैसर्गिक उबाऱ्याजवळ बसलें असतां कोणाहि मनुष्याच्या अंगचे लोणी विरघळूं लागणें अगदीं साहजिक होतें. सरकारची ही तर भेदनीतिच आहे. मोठया आमिषाच्या परिधांत आणून सोडावयाचें आणि संसर्गानें आमिषास बळी पडण्याची वृत्ति उत्पन्न करावयाची, असे चक्र नेहमीं फिरत असतें. देशसेवा माझ्या हातून होत नाहीं असे वाटल्याबरोबर मी क्षणभरहि ह्या खुर्चीवर बसणार नाहीं, असे अध्यक्षाच्या खुर्चीवर बसल्यानंतर ना. पटेल ह्यानीं कितीहि

* नवाकाळ, ता. १५ आक्टोबर १९२५

सांगितलें तरी त्याच्या शब्दावर पूर्ण भरंवसा ठेवण्यास लोक तयार होत नाहींत. "यथा स्त्रीणा तथा वाचा साधुत्वे दुर्जनो जनः" हें भवभूतीचें वाक्य येथे बरोबर लागू पडतें. देशसेवेच्या कल्पना अध्यक्षाच्या खुर्चीवर बदलूं लागतात, विचारसरणीला नवें वळण लागते, बुद्धिभ्रंश होतो; आणि सरकारी नोकरी पत्करण्यानेंच खरी देशसेवा आपल्या हातून होणार आहे असे वाटून नोकरशाहीच्या जाळ्यात मोठा पुढारी आस्ते आस्ते सापडतो! मुबईचे एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर आज मुबईच्या कौन्सिलचे अध्यक्ष आहेत, नागपूर कौन्सिलचे अध्यक्ष ना. तांबे आज एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर झाले आहेत, स्टेट–कौन्सिलचे माजी अध्यक्ष नागपूरचे गव्हर्नर बनले आहेत, अशा ह्या प्रवाहात एखादेवेळी दे. पटेल, ह्यांना एखाद्या निरुपद्रवी प्रांताचे गव्हर्नर होता काय म्हणून पृच्छा करण्यात येणार नाही कशावरून? गव्हर्नर व्हावयाला मोठासा अनुभव लागतो, असे मुळीच नाही. कारभाराचा विशेष अनुभव नसताहि ना. तांबे आज एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर झाले नाहीत काय? सामान्य बुद्धिमत्ता आणि हजारो लोकांच्या स्वार्थत्यागाने देशाभिमानी ठरलेल्या पक्षाचा पुढारीपणा, इतकी सामग्री जवळ असली म्हणजे नोकरशाहीच्या नेत्रकटाक्षास तो मनुष्य आपोआप पात्र होतो विरुद्ध पक्षातील पुढारी फोडणें, हे राजकारणातील मुख्य अंग आहे. अमात्य राक्षस ह्यांना नंदाच्या पक्षातून फोडून स्वतःच्या पक्षात ओढून घेण्याची खटपट चाणक्यानें किती केली, हे मुद्राराक्षस वाचणारांना माहीतच आहे. पुढारी फोडण्यावर बऱ्याच गोष्टी नोकरशाहीच्या अवलंबून असतात. अमका तमका पुढारी फुटला म्हणून किंवा अमका तमका फुटला नाहीं म्हणून राज्यकारभार अधिक सुरळीत चालतो किंवा सुरळीत चालण्याचें बंद पडतें अशातला भाग मुळींच नाहीं. राज्यकारभाराला ह्या गोष्टीची जरुरी नसते. राज्यकारभार सुधारतहि नाहीं व बिघडतहि

नाहीं. पण एखाद्या मोठ्या पक्षाच्या रंगभूमीवरील प्रमुख पात्र फोडण्याचा नोकरशाईच्या राज्यकारभाराला चांगला उपयोग होतो. नोकरशाही नेहमीं भिते ती विरुद्ध पक्षाच्या विचारसरणीला भिते, आणि विचारसरणी उर्फ थॉट पुढाऱ्याच्या मार्फत सदेह व कार्यक्षम बनत असल्यामुळे विचार-सरणीचा नायक (लीडर ऑफ थॉट) फोडला असता विरुद्ध पक्षाच्या देहावर आघात करण्याचे फळ प्राप्त होतें आज ना. ताम्बे एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर होण्याच्या मोहाला बळी पडून नोकरशाहीच्या घरात शिरल्यामुळें प्रत्येकजण त्याना दोष देत आहे, ह्याचें कारण झालें तरी स्वराज्यपक्षाच्या विचारसरणीला हा काळिमा लागला आहे, हे होय. ना. ताम्बे स्वराज्य पक्षाच्या इतर पुढाऱ्याना चिकटून राहिले असते तर त्याच्या हातून व्यक्तिशः मोठीशी देशसेवा घडली असती असे मुळीच नाही. आपल्या घरातून उडून दुसऱ्याच्या घरात ना. ताम्बे शिरल्यानें मध्यप्रात देशसेवेच्या कार्याला मुकणार आहे, असे कोणीच म्हणत नाही. नागपूरचे एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर झाल्याने रोजच्या राज्यकारभारात कोणाच्या तरी उपयोगी ते पडत रहातील व सद्बुद्धीने राज्यकारभार त्यानी चालविण्यास सामान्य जनसमूहाचेंहि अल्पस्वल्प प्रत्यक्ष कल्याण त्याच्या हातून होईल, हे खरे आहे. एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर झाल्याने प्रत्यक्ष कल्याण त्याचें स्वतःचें, इष्टमित्राचे व सामान्य बहुजनसमाजाचे त्याच्या हातून जितके होण्याचा संभव आहे तितके कल्याण सरकारी नोकरीच्या बाहेर राहून घडवून आणण्याची ताकद ना. ताम्बे ह्याच्या अंगीं मुळींच नाही, हीहि गोष्ट खरी आहे. मग माफक दमाच्या पुढाऱ्याने एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर होण्यानें स्वतःचें, आप्तइष्टाचें व देशाचे प्रत्यक्ष कल्याण होईल तितके करण्यास का पुढे येऊ नये? ह्या प्रश्नाचें उत्तर असे आहे कीं, देशभक्तीच्या एका विचारसरणीशीं पुढारीपणाचें नातें जर ना. ताम्बे ह्याचें

आलें नसतें तर सरकारी नोकरींत शिरणाऱ्या इतर नोकराप्रमाणें त्यानाहि कोणी दोष दिला नसता. एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलरची जागा स्वीकारून स्वराज्य पक्षाचे पुढारी विश्वासाला लायक नाहींत आणि स्वराज्य पक्षाची विचारसरणी मोठया मोठया जागा मिळविण्याच्या पलीकडे जात नाहीं, असा जो मोठा डाग स्वराज्य पक्षाला त्यानीं लावला आहे, तो डागच राष्ट्रकार्याची हानि करणारा आहे. असली आगल्या पक्षास काळोखी लागल्यामुळेंच प. मोतीलाल नेहरू चपापले आहेत, बॅ. सेनगुप्त भाबावून गेले आहेत आणि बॅ. अभ्यंकर ह्याना अग्नीशेजारी नवमीत ठेवल्यासारखी स्थिति राष्ट्रीय पक्षाची केली कीं काय, अशी भीति वाटूं लागली आहे ! राजकारणाची सूत्रें लोकांच्या हातीं जाऊन राज्यकारभार लोकांच्या विश्वासाच्या पुढाऱ्यानी चालवावा, हें स्वराज्याचें स्वरूप आहे. हें स्वराज्य मूर्तिमत अमलात आणण्याकरिता आज बहिष्कार व असहकारिता ह्याची विचारसरणी सर्व राष्ट्रीय पक्षानें आपापल्या पोटभेदाप्रमाणें कमी जास्ती प्रमाणानें स्वीकारलेली आहे. राज्यसत्तेचीं सूत्रे हातात घेऊन देशसेवा करण्याचे सुख मोडणे आणि राज्यसत्तेच्या वैभवाबाहेर राहून शारीरिक व संसारी दुःखाना कवटाळून लोकांच्या अंगी स्वतःची शक्ति उत्पन्न करण्याच्या मार्गाला लागणें, ही बहिष्काराची व असहकारितेची निष्ठा आहे. दुःखमय तपश्चर्या भावी पिढीच्या सुखासाठींच करावयाची असते आणि राजसत्तेचा सतत त्याग करावयाचा नसतो, हे खरे आहे; पण अकालीं व्यक्तिशः सुखसेवन केल्यानें एकंदर समाजाचे व भावी पिढीचें फार नुकसान होत असते. राष्ट्रीय कार्याच्या बाजूला खरे बुद्धिवान, स्वार्थत्यागी व कर्ते पुरुष जेव्हा असतात तेव्हाच राष्ट्रीय पक्ष वरचढ होतो. आज राष्ट्रीय पक्षात सरकारी नोकराहून लायक पुरुष आहेत म्हणूनच राष्ट्रीय पक्षाच्या विचारसरणीपुढे नोकरशाही फिकी पडूं लागली आहे. पण पुढारी फुटल्यानें पारडें पालटतें. एखादा सेनानायक माझ्या

कृतीमुळें जर निर्माण करूं शकलो तर तें मोठेंच देशकार्य माझ्या हातून होईल असे मानून आज एक पुढारी कमिटींत गेला, तर आगगाडींतील तिसऱ्या वर्गाच्या उतारूपैकीं एकाचे जरी हाल कमी झाले तर मी धन्य होईन असें मानून दुसरा दुसऱ्या कमिटींत जातो, आणि तिसरा अध्यक्ष होऊन हळूच एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर बनतो! भिंतीचा एकेक दगड हलके हलके पडत जाऊन राष्ट्रीय पक्षाच्या भिंतीचा मालमसाला नोकरशाहीच्या बंगल्याला उपयोगी पडावा, अशी आज स्वराज्य पक्षाची लाछनास्पद स्थिति ना. ताबे ह्यानी करून सोडली आहे! शिस्त बिघडली ह्यात सशय नाही. पण शिस्तीकडेच नुसते पाहून स्वराज्य पक्षाचे भागावयाचे नाहीं. लोकामध्यें स्वावलबनाची शक्ति पूर्णपणे उत्पन्न होईतों अग्निपासून नवनीत दूर ठेवण्याची खबरदारी घेण्याकरिता कौन्सिलबाहेरीलच कामावर विशेष लक्ष पोहोचविणें स्वराज्य पक्षास जरुरीचे नाही काय?

---

# * कंटाळवाणा चरखा !



म. गांधी आणि सर रवींद्रनाथ टागोर ह्या दोघामध्ये हाताने सूत काढण्याच्या चळवळीसंबंधानें काव्याच्या दृष्टीचा एक वाद चालला आहे. कवि ह्या नात्याने सर रवींद्रनाथ टागोर यानीं हातानें सूत काढण्याच्या चळवळीविरुद्ध टीका केली असून, सदर टीकेला महात्माजींनीं गेल्या 'यंग इंडिया'चे अंकात उत्तर दिलें आहे. हाताने सूत काढण्याच्या चळवळीवर सर रवींद्रनाथ टागोर ह्याचा मुख्य आक्षेप असा आहे की, चरखा घेऊन हाताने सूत काढणे हें काम बुद्धीची तरतरी नाहीशी करणारे असून, ह्या उद्योगधंद्यात काव्यहि कोठे नाहीं ! बुद्धिमंदाचें कटाळवाणे काम सर्वांच्या मागे लावण्यात अर्थ कोणता ? बुद्धिमदाना श्रेष्ठत्व द्यावयाचे म्हणजे शास्त्राच्या वाढीची हानि करावयाची आणि काव्याच्या प्रसाराला अडथळा करावयाचा, इतकेंच नव्हे तर सर्वांचा ससार नीरस व कंटाळवाणा करून टाकावयाचा, असा हातानें सूत काढण्याच्या चळवळीचा परिणाम आहे. यत्राची व शास्त्राची वाढ मनुष्याच्या बुद्धीनेंच केली असून, यत्रसामग्रीनें व शास्त्रीय ज्ञानानें मनुष्याच्या बुद्धीतील अहंकारास रमविण्याकरिता पाहिजे तेवढे मोठे मैदान मिळत असतें, आणि संसारात चित्रविचित्रपणा उत्पन्न होऊन ससार काव्यमय होतो. मनुष्यानें मोठमोठीं यत्रे शोधून काढलीं आहेत आणि हीं यंत्रें पृथ्वीच्यावरून नाहीशीं होणें आता शक्य नाहीं. तेव्हां यंत्राच्याच मागें लागून आपला संसार शक्य तितका सुखाचा आणि काव्याच्या आनंदाचा करून घेणें इष्ट नाहीं काय ? कापूस पिंजत रहा,

* नवाकाळ, ता. ७ नोव्हेंबर १९२५

कापसातील घाण काढून टाक, आणि चरखा फिरवून हजार दोन हजार यार्ड सूत रोजचें काढ, ही कायमची भगभग मनुष्यानें आपल्या मागें का लावून घ्यावी ? कालच्या सारखीच चाती आज फिरणार, आजच्या सारखीच चाती उद्या फिरणार, तोच चरखा, तोच कापूस, तेंच सूत, ह्याच्यात नवीनपणा कसा उत्पन्न होणार ? नाविन्याशिवाय काव्य नाहीं, अशी स्थिति असल्यामुळे चरख्याची चळवळ नीरस ठरेल आणि अखेरीस सर्व लोक कटाळून यत्राच्या गिरण्यामागे जातील असा कवींचा अदाज आहे. मनुष्यानें यत्रे शोधून काढली तीं अहकाराच्या तृप्तीसाठीच काढलीं ह्यात सशय नाही. ही यत्रे आता नाहींशीं होन नाहीत हेहि खरे आहे. पण ह्या यंत्रामुळे मनुष्याच्या अहकाराची तृप्ति होऊन ज्या राष्ट्रानी यत्र शोधून काढण्यात पुढाकार घेतला त्या राष्ट्राचा ससार तरी सुखाचा व काव्यमय झाला आहे काय ? मास प्रॉडक्शन ऊर्फ एकाच तऱ्हेच्या नगाचे डोगराएवढे मोठे ढीग रोज उत्पन्न करणाऱ्या हल्लीच्या मोठया कारखान्यावर कोणते आक्षेप युरोपखडात घेण्यात येत आहेत ? एकच नग एकसारखा रात्रदिवस वर्षानुवर्षे काढावा लागतो, अशा मास प्रॉडक्शन-शिवाय किंवा ढिगाच्या उत्पत्तीशिवाय व्यापारातील चढाओढीस तोंडच देता येत नाही. ज्यानीं हीं प्रचड यत्रे बाधताना बुद्धि खर्च केली, त्याच्या बुद्धीला नाविन्याचे व त्याबरोबरच काव्याचेंहि सुख मिळालें हें खोटे नाहीं; ज्याच्याकडे ह्या यत्राची मालकी आली त्या भाडवलवाल्याला इतरावर सत्ता चालविण्याच्या काव्यमय आयुष्याचा लाभ होतो हें खरें आहे; पण इतराची वाट काय ? ह्या दोन इसमाचा ससार काव्यमय सुखाचा करण्याकरिता प्रत्येक गिरणींत राबणाऱ्या हजारो लोकाचा संसार आज कटाळवाणा झालेला आहे ना ? रोजचें तेंच यंत्र, तोच पट्टा, तोच कापूस आणि तोच नग, रोजच्या रोज पाहण्यात तरी सुख कोणतें ? ‘ अति परिचयादवज्ञा ’ ह्या

नात्यानें कंटाळा हा आलाच पाहिजे. रोज एका यंत्राभोंवतीं काम करणाऱ्यास नाविन्य प्राप्त होईल काय ? हातानें सूत कांतणाराला तोच कापूस जसा रोजच्या रोज डोळ्यापुढें येतो, त्याचप्रमाणें एका ठराविक यंत्राचा दांडा हातीं धरून बारा बारा तास काम करणारांना कंटाळा येतो. तोच रस्ता, तीच माणसें, तीच इमारत आणि तोच दांडा ! कैदखान्यांतील कंटाळवाण्या क्रमाची छाया प्रत्येक कारखान्यावर नेहमीं पडलेली असते. कारखाना लहान असो वा मोठा असो, यंत्रें बदलण्याची पाळी क्वचित्‌च येते. शेतांतील खत एका ठिकाणचें काढून दुसऱ्या ठिकाणीं टाकणारा हमाल काय, किंवा नियमितपणें शहर साफ करणारा भंगी काय, ह्याच्या कामातील कंटाळवाणा भाग जरतारी रेशमी कापडाचे गठ्ठे रोजच्या रोज गिरणीच्या बाहेर नेणाऱ्या किंवा टांकसाळींतील रुपयाच्या थैल्या रोजच्या रोज डोक्यावर उचलून तिजोरीच्या पेटीकडे पोहोंचविणाऱ्या हमालाच्या कंटाळवाण्याहून निराळा कोठें आहे ? सर्वच कामे कंटाळा उत्पन्न करितात. यंत्राचें नाविन्य प्रथम कांहीं दिवस असतें. पुढे कंटाळा येतो, इतकेच नव्हे तर यंत्राबरोबर स्वत: बारा बारा तास गरगर फिरणारा मनुष्य स्वतः निर्जीव यंत्रच बनून मनाचा प्रफुल्लितपणा व बुद्धीची तरतरी ह्या दोनहि सुखांना त्याला आंचवावें लागते ! तेलाचा घाणा एकसारखा फिरविणारा बैल होण्याचे पुरवलें, पण छापखान्यातील यंत्राकरिता रोजच्या रोज मजकूर पुरविण्याचा बोजा नको, अशी यंत्रामुळें निरुत्साहाची कंटाळवाणी स्थिति उत्पन्न होते. तेंच तेच काम रोज करावयाचें हा न्याय कोठला ? रोजचा एक व्यवसाय एकाच पद्धतीने चालवावयाचा, हें मनुष्याच्या स्वतंत्र बुद्धीला केव्हांहि खपणारे नाहीं. ' सततमपि स्वेच्छा दृश्यो नवोनव एष यः ' अशी नाविन्याची वाण यंत्रें मुळींच भरून काढीत नाहींत. यंत्राभोंवती सतत राबणारांना [illegible] त्याबरोबरच स्वत:च्या उद्योगाचा तिटकारा जितका येऊ शकतो तितका

तिटकारा दुसऱ्या कोणत्याहि पदार्थाचा येऊ शकत नाही. गरीब स्थितीत असलेल्या मनुष्याला रोज ठराविक वेळी नुसती भाकर खाण्याचा कटाळा येतो. भाकरी भात खा, भाकरी खा, भात खा, असें आयुष्य साठ साठ सत्तर सत्तर वर्षे एकसारखे ढकलण्यापेक्षा गर्भावस्थेतून बाहेर पडण्याबरोबर काही मुले मरतात ते अधिक बरे नव्हे काय ? पण करावयाचें काय ? कटाळा सोसण्यासहि मनुष्य तयार असतो. काव्य नसले तरी मनुष्य जीवत रहातो. दु:ख आणि कटाळा ह्याच्याशी झगडण्यातच आपले दीर्घायुष्य जावे असा बाणा मनुष्यात उत्पन्न होतो. तसे नसते तर आत्महत्येमुळे मानवी प्राणी केव्हाच पृथ्वीतलावरून नाहीसा झाला असता. आज युरोप खडात यंत्रामुळे संसार सुखाचा न होता सोशॅलिस्ट, बोल्शेव्हिक व भांडवलवाले एकमेकांच्या नरडीचा घोट घेण्यास प्रवृत्त झालेले आहेत ! धंद्यात वैचित्र्य असावे, कामात वैचित्र्य असावे, व संसारात नाविन्य उत्पन्न व्हावे, ही इच्छा वाईट नाही, पण करावयाचे काय ? तेच हातपाय व तेच नाकडोळे घेऊन आयुष्याचीं साठ सत्तर वर्षे काढावी लागतात ! लहानपणीं हातापायाचे काही दिवस कौतुक वाटते, तरुणपणी नाकाडोळ्याना काही दिवस महत्त्व प्राप्त होते, पण इतर सर्व दिवस शरीराच्या ठराविक घाणीशी झगडत काढावे लागतात. ज्या राष्ट्राला अशा प्रकारच्या ठराविक आणि आखलेल्या मार्गाने जाण्याचा अभ्यास करताना कटाळा येत नाही, तेच राष्ट्र नाविन्याचा व काव्याचा आस्वाद घेण्यास लायक होते. नित्यकर्माची हेळसांड केली असता सृष्टिक्रमाप्रमाणे उत्पन्न होणारे नाविन्य उपभोगताच येत नाहीं. अणुरेणूंपर्यंत सृष्टि निरनिराळी आहे, पण रोजचा क्रम सर्वांचा एकच आहे. विभक्त असलेल्या मण्यामध्ये सूत जसे गोवलें जावें त्याप्रमाणें रोजचा नित्यक्रम सर्व भिन्नभिन्न व्यवहारात एकसारखा गोंवला गेलेला आहे. ह्या नित्यक्रमाला मनुष्य कंटाळतो, हें बुद्धीच्या तरतरीचें लक्षण

नसून बुद्धिमांद्याचेच लक्षण होय, असे सर्व तत्त्ववेत्याचें मत आहे. यम नियमाला कटाळून चालत नाही. यमनियमाला कटाळले असता आसनच डळमळीत होते, आणि बुद्धीच्या प्रसन्नतेचे सुख कधीहि प्राप्त होत नाहीं. सत्कार्यानें बुद्धि प्रसन्न होते, इतर कशानेहि प्रसन्न होत नाही. राष्ट्रा-राष्ट्रामधील व्यापारी चढाओढीत एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्राचें रक्त-शोषण करण्याची पद्धत जर बंद पडावयाची असेल तर प्रत्येक राष्ट्रात रावापासून रकापर्यंत प्रत्येकानें रोज राष्ट्राच्या उदरपोषणाचा व राष्ट्राच्या कपडयालत्त्याचा धंदा राष्ट्रातच नीट चालावा म्हणून अर्धी घटका पाव घटका नित्यकर्म म्हणून राबण्यास तयार झालेच पाहिजे. ही तयारी दृष्टीस पडल्याशिवाय रक्तशोषणाचे काम बंद पडावयाचे नाही. यंत्र अमर होवो, निरनिराळ्या उद्योगाना लाखो फाटे फुटून नाविन्य उत्पन्न होवो, पण ह्या सर्वाची जोपासना नीट होण्यास हिंदुस्थानसारख्या देशास हाताने थोडा वेळ तरी सूत काढण्याचा रोजचा अभ्यास करून सत्कार्याचा प्रसाद त्या अभ्यासात सद्बुद्धीने घातल्याशिवाय आज गत्यतर नाहीं.



# * नवे संभाजी

प. मोतीलाल नेहरू ह्यांच्या विरुद्ध नोकरशाहीवाल्या पोटभेदाचें बंड पुकारताना बॅ. जयकर ह्यांनीं पुण्यास जयकर–केळकर ह्या जोडीला शिवाजी सभाजी म्हणवून घेतलें! बॅ. जयकर हे नवे शिवाजी असून रा. केळकर हे नवे सभाजी आहेत. ह्या नव्या किताबाची वाटणी करताना बॅ. जयकर स्वतः शिवाजी झाले आहेत, हें त्यांच्या नेहमींच्या वकिली बाण्याला जरी धरून असले तरी सभाजीचा किताब त्यानी भलत्यालाच दिला असे त्याचें त्यानाहि वाटणे शक्य नाहीं. शिवाजी आणि सभाजी अशी नावें वापरण्या-ऐवजी कलुषा आणि सभाजी अशीं नावें वापरलीं असतीं तर बरे झालें असतें. अंगठीवरील खड्यासारखें व्यवहार्य राज्य असावे, सर्व हिंदुस्थानच्या उलाढालींत पडूं नये, आणि स्वतःच्या चैनीपलीकडे पाहू नये, असाच पोक्त व व्यवहार्य सल्ला कलुषानें सभाजीस दिलेला होता व जयकर ह्यांचा नोकऱ्या मिळविण्याचा सल्लाहि वरील तऱ्हेचाच आहे. दे. केळकर सभाजी-प्रमाणें देशभक्त असून महाराष्ट्राला दिल्लीच्या वरवंट्याखालीं चिरडून टाकण्यास सभाजीप्रमाणेंच कारणीभूत होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. शिवाजीच्यासारख्या दास बाबूंच्या पक्षास त्यानीं सोडून दिलें आहे, लालजींचा सल्ला त्याना रुचला नाहीं, म. गांधी ह्याना भिंतींत गाडून टाकण्याचा प्रयत्न चालूच आहे, आणि प. मोतीलाल नेहरू ह्यांच्याविरुद्ध तर उघड-पणें लढाई पुकारण्यात आली आहे! अशा स्थितींत कलुषा–सभाजी ह्या जोडीचा नवा अवतार आज महाराष्ट्रात झाला आहे असें म्हणण्यास हरकत कोणती? जयकर-केळकर स्वतःस शिवाजी-सभाजी म्हणवून घेतोत,

---

* नवाकाळ, ता. १४ नोव्हेंबर १९२५

किंवा इतर लोक त्यांना कलुषा-संभाजी बनवोत, ऐतिहासिक उपमांच्या नादीं सांप्रतच्या चर्चेंत फार लागणें इष्ट नाहीं. असल्या उपमा नेहमीं चुकीच्या असतात. एकमेकांची वाहवा करताना किंवा दूषणें देताना असल्या उपमांचा उपयोग होतो, हें खरें आहे. पण श्रीशिवाजी महाराजा-सारख्या ऐतिहासिक विभूतींचें मात्र निष्कारण हसे होतें! जयकर-केळकर ह्या जोडीनें बडाचें निशाण उभारल्यामुळें अॅग्लो-इडियन वर्तमानपत्रें आज खूष झालीं आहेत आणि मुंबईचा टाइम्स ह्या बडाचें एकसारखें समर्थन करीत आहे. आपल्या कृत्याचा काय परिणाम होत आहे ह्याचा विचार दे. केळकर व बॅ. जयकर ह्यानीं वेळींच करणें जरुरीचें नाहीं काय? दे. पटेल ह्यानीं असेंब्लीचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याबरोबर विरुद्ध पक्षास आम्ही आपल्या गोटात ओढण्यास प्रारभ केला म्हणून नोकरशाहीला आनद झाला आहे. आज इग्लडचे मुख्य मत्री मि. बाल्डविन हेहि हिंदु-स्थानासबधानें बोलताना आता काळजी करण्याचें कारण उरले नाहीं असेंच म्हणत आहेत. जयकर-केळकर ह्याच्या बंडाची बातमी ऐकून, खुशाल झोपी जाण्याचे दिवस आता आले असें नोकरशाहीला वाटल्यावाचून कसें राहील? म. गांधी ह्याच्या चार पाच वर्षाच्या चळवळीनें सर्व घाण केली, असा जयकर-केळकर ह्या जोडीचा मुख्य आरोप आहे. महात्माजींच्या असहकारितेच्या तत्त्वाला अनुसरून कौन्सिलांत टक्कर देण्याचें ध्येय स्वराज्य पक्षानें स्वीकारल्यामुळें मोठमोठ्या जागाचें सुख उपभोगणें दोनतीन वर्षें नाहक लांबणीवर पडलें, अशी नव्या संभाजीच्या कंपूची तक्रार आहे. म. गाधी ह्याच्या असहकारितेच्या चळवळीमुळें स्वराज्य चारपाच वर्षांतहि मिळालें नाहीं, हें खरें आहे; पण बिनदगदगीच्या आणि उपभोगाच्या कलुषाच्या ध्येयामुळें म. गांधी ह्याच्या चळवळीच्या वेळची लोकाची ताकदहि आज नाहींशी झाली आहे. सीरियामध्यें फ्रेंच सरकार अरबाचा

अमानुष छळ करीत आहे. ह्या छळाच्या वेळीं हिंदुस्थाननें काही तरी हालचाल करावी व अरबाना हस्ते परहस्तें मदत पोहोचवावी, अशी हकीम अजमलखान ह्याची इच्छा आहे. ही इच्छा नुसती असून काय करावयाचें? जुलूम प्रत्यक्ष दिसत आहे, पण प्रतिकार कसा करावयाचा? टर्कीवर ओढवलेल्या प्रसगाच्या वेळी हिंदु-मुसलमान एक होते, आणि असहकारितेच्या तत्त्वानीं सर्वांची अतःकरणे भरून गेली होती. त्यावेळच्या चळवळींत सामर्थ्य होते. चळवळ करून महात्माजीनी हे सामर्थ्य उत्पन्न केले होते. युवराजाच्या दौऱ्यावर घालण्यात आलेल्या बहिष्काराच्या स्वरूपाने हे सामर्थ्य प्रकट झाले. हिंदुस्थानात चाललेल्या चळवळीकडे पाहिले असता तुर्कांशीं मिळते घेणेच योग्य होय, असे उद्‌गार काढणें फ्रेंच मुत्सद्यानाहि त्यावेळी भाग पडले होते. सर्वांच्या निदर्शनास हे सामर्थ्य आल्यामुळे टर्कीबरोबर लढाई पुकारण्यात अर्थ नाही, असे इंग्लडच्या लोकाना वाटून त्यावेळींच मुख्य मत्री मि. लॉईड जॉर्ज ह्याना अधिकारावरून इग्लंडच्या लोकानीं काढूनहि टाकलें! हिदुस्थानातील चळवळीने त्यावेळीं वरील प्रकारे टर्कीला अशतः तरी मदत केली, पण आज स्थिति काय आहे! नव्या सभाजीनीं महात्माजीना कॉंग्रेसमधून हाकून लावण्यात जय मिळविला आहे! राजाश्रयाच्या वाटणींवर लक्ष ठेवण्याचे व्रत स्वीकारण्यात आल्यामुळे हिंदु व मुसलमान, ब्राम्हण व ब्राम्हणेतर, स्वराजिस्ट आणि नोकरीवाले असे नानाप्रकारचे भेद उत्पन्न होऊन सामर्थ्य कोठेंच उरलेलें नाहीं! तीनचार वर्षापूर्वीचें सामर्थ्य पार नाहींसे करून दुबळेपणा सर्वांच्या गळयात बांधण्याचें काम तडीस नेण्याकरिता जयकर-केळकर ह्या जोडीनें बंडाचे निशाण उघडपणें उभारलें आहे. अशा दुहीच्या आणि बडाच्या वेळी हिंदुस्थानांतील लोकमताचा उपयोग अमानुष छळांत सापडलेल्या अरबाना काय होणार? दुबळेपणा अरबाच्या उपयोगीं पडणार नाहीं, इतकेच

नव्हे तर ह्या दुबळेपणाच्या दुहीमुळे बरें झालें, मुसलमानांची चागली खोड मोडली अशा तऱ्हेचे उद्गार लखनौच्या कॉंग्रेसच्या वेळीं हिंदु–मुसलमानाची एकी करणाऱ्या लो. टिळकाच्या काहीं अनुयायाकडून आज निघत आहेत. संभाजीची कारकीर्द म्हणतात ती हीच! दुबळेपणा आणि फाटाफूट चोहोंकडे माजून राहिली आहे. स्वराज्य पक्षात शिस्तीचें महत्त्व अतिशय म्हणून दे. ब. दास नेहमी म्हणत असत पण आज बेबदशाहीची बडाळी स्वराज्य पक्षाइतकी दुसऱ्या ठिकाणीं सापडणे शक्य नाहीं, असे म्हणण्याचे दिवस पुन्हा आले आहेत. राष्ट्रातील हा दुबळेपणा व फाटाफूट पाहून म. गाधी ह्यानी हकीम अजमलखान ह्याच्या इच्छेला मान दिला नाही आणि राष्ट्रसघाकडे हिंदुस्थानच्या कॉंग्रेसच्या मार्फत अरबाची गाऱ्हाणी माडण्याचे नाकारले हे यथायोग्यच झाले. सामर्थ्य नाहीं तर उगीच वळवळ करून काय उपयोग? सामर्थ्य उत्पन्न होईल अशी आता चळवळ केली पाहिजे. राजाश्रयाच्या पिंडावर डोळा ठेवण्याची वळवळ चळवळीच्या पायरीला कधीहि चढावयाची नाही. सांप्रतच्या फाटाफुटीस एका बाजूस सारून नवे सामर्थ्य उत्पन्न करावयाचे असेल तर खादीच्याच चळवळीकडे वळणें भाग आहे, असे महात्माजीनी हकीम अजमलखान ह्याना स्पष्टपणे कळविलें आहे. नव्या संभाजीच्या काळ्या छायेत सापडलेल्या लोकानी संकटातून मुक्त होण्याकरिता खादीची चळवळ करावयाची नाहीं तर दुसरी कोणती देशसेवा करावयाची?

---

# * कॉँग्रेस आणि उष्ट्यांतील रस

पं. मोतीलाल नेहरू ह्यांचा लढाईच्या कार्यक्रमाचा ठराव कानपूर कॉंग्रेसपुढें गेल्या सोमवारीं वादविवादाकरिता आला असतांना, नेमस्ताकडून त्या ठरावास जसा विरोध ह्यापुढें कॉंग्रेसच्या बाहेर करण्यांत येईल त्या प्रमाणें कॉंग्रेसच्या मंडपातहि बॅ. जयकर वगैरे नोकरीवाल्या पक्षाकडूनहि विरोध करण्यात आला. ह्या ठरावास कॉंग्रेसमध्यें विरोध करावा इतकें धारिष्टय सब्जेक्ट कमिटीच्या वादविवादाच्या वेळीं बॅ. जयकर ह्यांच्या अगीं नव्हतें, पण आयत्या वेळीं पं. मदन मोहन मालवीय काशीहून आल्यामुळें आणि त्यानीं विरोधाचें काम आपल्या शिरावर घेतल्यामुळें नोकरीवाल्या पक्षाच्या विरोधास कॉंग्रेसच्या मंडपात वाचा फुटली, अशा तऱ्हेचा खुलासा ह्या विरोधासंबंधी बॅ. अभ्यंकर ह्यानीं आपल्या भाषणात केला आहे. असहकारितेच्या चळवळीपासूनच पं. मदन मोहन मालवीय हे, जरा जपून वागा, घाई नको, कौन्सिलांतून निघेल तेवढें पदरात घ्या, असे म्हणत आहेत. कौन्सिलात व असेंब्लींत जरूर तेव्हां विरोध करावा, नाहीं तर सहकार्य करावें, असें गोखले-मेथा ह्यांचेंच व्रत पं. मदन मोहन मालवीय ह्यानीं गेलीं चारपाच वर्षें एकसारखें स्वीकारलें आहे. प्रामाणिक-पणानें विरोध करण्यास व प्रसंग विशेषीं बजेट फेटाळून देण्याचा पुढाकारहि घेण्यास पं. मदन मोहन मालवीय ह्यानीं कसूर केली नाहीं, हेंहि खरें आहे. असहकारितेच्या तत्त्वाबद्दल त्यांना अभिमान आहे, पण हीं तत्वें अमलांत येऊं शकतील असे त्याना वाटत नाहीं. कौन्सिलांत शिरून टक्कर देण्याचा मार्गहि पंडितजींना पसंत नाहीं. गयेच्या कॉंग्रेसपूर्वी कलकत्त्यास भरलेल्या ऑ. इं. कॉं. कमिटीच्या बैठकींत पं. मदन मोहन मालवीय ह्यांनीं वरील

* नवाकाळ, ता. ३० डिसेंबर १९२५

प्रकारचींच मतें बोलून दाखविलीं होतीं आणि स्वराज्य पक्षाच्या टक्करीच्या मार्गास विरोध केला होता. गयेच्या कॉंग्रेसच्या वेळीं स्वराज्य पक्षात ते सामील झाले नाहींत व कानपूरच्या कॉंग्रेसमध्यें गेल्या सोमवारीं जी प्रामाणिक नेमस्ताची विचारसरणी कॉंग्रेसपुढे माडली तीच विचारसरणी त्यानीं गया कॉंग्रेसच्या वेळीं कॉंग्रेसपुढे माडली होती. ह्या विचारसरणीला कॉंग्रेसच्या किंवा स्वराज्य पक्षाच्या कार्यक्रमात स्थळ नाही असे पाहून गेलीं दोन वर्षें कॉंग्रेसच्या मंडपात त्यानीं भाषणहि केलें नाही, आणि यदाहि कानपूरच्या कॉंग्रेसला हजर राहण्याचा त्याना विचार नव्हता. पण नोकरीवाला पक्ष पुढे आला आहे असे पाहून ते आयत्या वेळी पुढे आले, आणि मला दुजोरा देणारे कोणीतरी यदा आहेत ह्याबद्दल त्यानी सतोष व्यक्त केला! लो. टिळक जर असते तर त्यानीं नोकरीवाल्या पक्षासच उचलून धरलें असतें आणि प्रामाणिकपणाचा विरोध करीत असताना नोकरशाहीच्या घरातील शक्य तेवढा रस चाखून धष्टपुष्ट होण्यास हरकत घेतली नसती, हाच नोकरीवाल्या पक्षाचा मुख्य मुद्दा पं. मदन मोहन मालवीय ह्यानीं कानपूरच्या कॉंग्रेसपुढे ठेवला आणि ह्या मुद्यास बॅ. जयकर ह्यानीं उचलून धरलें. लो. टिळक ह्याच्या नावाची अशा प्रकारें नालस्ती करण्यात यावी ह्याबद्दल बॅ. अभ्यंकर ह्याना खेद प्रदर्शित करावा लागला. लो. टिळक ह्याच्या हयातींत जे दहा मैलाच्या अतरावरहि लो. टिळक ह्याच्या जवळ उभे राहू शकले नाहींत त्यानींच आता लो. टिळक ह्याच्या नावाचे धिंडवडे काढावे ह्याबद्दल जोरदार भाषेत बॅ. अभ्यकर ह्यानी निषेध प्रदर्शित केला. उष्टयातहि रस असतो आणि तो रस भुकेलेल्याना उपयोगी पडतो, ह्याबद्दल वाद नाहीं. जगात दारिद्य व गरिबी जोंपर्यंत आहे तोंपर्यंत उष्टयाचें हे असलें माहात्म्य कायम रहावयाचेंच! दुःखमय ससारात उष्टयाच्या दैव-दुर्विलासाला व्यवहार्य मानणें सर्व गरिबांच्या कपाळी केव्हाना केव्हां तरी येतेंच; पण व्यक्तीच्या किंवा राष्ट्राच्या अभ्युदयाचा हा मार्ग आहे म्हणून

उपदेश करणें आणि लो. टिळक ह्याच्या नावानें उष्टयाचा झेंडा उभारणें म्हणजे लो. टिळक ह्याच्या स्वावलबनाच्या व्रताचें हसें करणें होय ! नोकरशाहीच्या उष्टयातील थेंब ना थेंब जोरजोरानें चघळून गिळला पाहिजे, असे बॅ. जयकर ह्याचे कानपूर कॉंग्रेसमधील भाषणाचें तात्पर्य आहे ! थेंब ना थेंब कसा गिळावा ? नोकरशाहीचें उष्टेमाष्टे गरीब हिंदी लोकाना मोह पाडण्याइतके जरी असले तरी त्यात रस बिलकूल न ठेवण्याची खबरदारी नोकरशाही नेहमी घेत असते, हे विसरता कामा नये. उसातील रस पिण्याकरिता नोकरशाही राज्य करीत आहे. उसाचा प्रत्येक करवा नोकरशाही चावून खाते आणि फेकून दिलेल्या चोयटयात काहीं रस शिल्लक ठेवीत नाहीं. ह्या फेकून दिलेल्या चोयटयातहि वाळलेले साखरेचे कण कोठें कोठे असतात आणि ते सर्व कण मोठया शिताफीनें व कष्टानें आपण का शोधून काढूं नयत, असे नोकरीवाल्या पक्षाचे म्हणणें आहे. नोकरशाही खात असताना नोकर म्हणून आपण अगदी तोंडाजवळ बसावे म्हणजे ओलसर तरी चोयटया आपल्या मुखात पडतील व तितके कष्ट वाचतील, असा महत्त्वाचा फायदा लोकापुढें साप्रत ठेवण्यात आला आहे. मॉटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणाच्या चोयटयातून जेवढे साखरेचे कण बाहेर काढता येण्यासारखे आहेत तितके काढण्याचा प्रयत्न कसोशीनें अद्याप झालेला नाहीं आणि एक्स्लॉयटेशनचें किंवा रसशोषणाचें कार्य ह्या बाबींत अधिक जोरानें करण्यास पुष्कळ वाव आहे, असे सर मोरोपत जोशी ह्यानीं कलकत्ता येथें भरलेल्या नेमस्ताच्या परिषदेंत नुकतेच बोलून दाखविलें असून, ह्या रसशोषणाच्या किंवा उष्टयाच्या झेंड्याभोवतीं सर्वांनीं जमावें असें आमंत्रण नोकरीवाल्या पक्षाला नेमस्ताच्या परिषदेनें दिलें आहे. प्रामाणिक नेमस्त म्हणवून घेण्यास माझी हरकत नाहीं, अशा तऱ्हेचे उद्गार प. मदन मोहन मालवीय ह्यानीं कानपूर कॉंग्रेसमध्यें काढले आहेत. तेव्हां नोकरीवाला

पक्ष अधिकाऱ्याच्या ओठाजवळ टपत बसून उष्ट्यातील रसाचा प्रत्येक थेंब ताजाच्या–ताजा गिळण्याकरिता स्वतः नेमस्त म्हणवून घेण्यास ह्या पुढे काकू करणार नाही, अशीं चिन्हे दिसत आहेत! स्वतःचीं मते संभाळून राष्ट्रीय सभेच्या लढाऊ कार्यक्रमास हरएक प्रकारें मदत करण्यास म. गांधी तयार असल्यामुळें असहकारितावादी व स्वराज्यपक्ष ह्यांचा मिलाफ होऊन, नेमस्त व नोकरीवालापक्ष ह्यांच्या उष्ट्याच्या झेंड्याविरुद्ध कॉंग्रेसला ह्यापुढें झगडावे लागेल ह्यात संशय नाहीं. उष्टेमाष्टे का स्वावलंबन, असा प्रश्न राष्ट्रापुढे आहे. उष्ट्यातील रसाचें महत्त्व गरिबाना असते, ह्या दुर्दैवी व्यवहाराकडे लक्ष देऊन स्वराज्य मिळणें शक्य नाहीं. मॉटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणात पै पैसा तरी रस आहे किंवा कसे, हा वाद राष्ट्रापुढे नाहीं. वसाहतीच्या धर्तीचें स्वराज्य हे सर्वांत कमी दर्जाचें व नेमस्तानींहि पसंत केलेले ध्येय दोनचार वर्षांच्या अवधींत प्रत्यक्ष अमलात येण्यास राष्ट्रानें कोणता स्वार्थत्याग केला पाहिजे, आणि कोणता कार्यक्रम स्वीकारला पाहिजे, हा मुख्य प्रश्न आहे. ज्याच्या घरात सर्पणहि नाहीं अशा गरीब लोकाना नोकरशाहीच्या गुऱ्हाळाची चिपाडे सर्पणास उपयोगी पडतील हे खरे आहे, पण आपल्या गुऱ्हाळास ह्या चिपाडाच्या सर्पणाचा उपयोग करून, पुन्हा नोकरानीं आसपासच्या लोकाची बाभळ तोडून दमदार सर्पण नोकरशाहीला द्यावे अशा धर्तीनें राबवून घेणारीं नोकरशाही आहे, हे विसरता कामा नये. अशा स्थितींत स्वार्थत्यागाच्या व स्वावलंबनाच्या लढाऊ कार्यक्रमाशिवाय तड लागणें मुळींच शक्य नाही. ही परिस्थिति ओळखून चिपाडातील रसाच्या थेंबाचा नाद कानपूर कॉंग्रेसनें बिलकूल धरला नाहीं, ह्याबद्दल कानपूरच्या कॉंग्रेसचें जेवढे अभिनंदन करावें तेवढें थोडेच होणार आहे.

— —

# * होळकर गादी सोडणार



इदूरची गादी श्रीमत सरकार तुकोजीराव होळकर एक दोन दिवसांत सोडणार अशी बातमी प्रसिद्ध झाली आहे. इंग्लंडचे प्रसिद्ध बॅ. सर सायमन ह्यांना दहा हजार पौंड म्हणजे सव्वा दीड लाख रुपये अगाऊ बयाणा देऊन खटला चालविण्यास बोलावण्यात आलें होते, सर तेज बहादुर सप्रू किंवा लॉर्ड सिंह ह्यांच्यासारखे नामांकित कायदेपंडित कायद्याचा सल्ला देण्यास तयार होते, महाराजाचा मुमताज–प्रकरणाशीं प्रत्यक्ष काहीं संबंध नाहीं अशा प्रकारच्या चाळीस पन्नास जबान्या इदूरच्या अधिकाऱ्यांकडून टिपून घेण्यात आल्या होत्या, दिवाण नरसिंगराव खटल्याची व्यवस्था स्वतः पाहाणार होते, व सर साहेब सबनीस इंदूरच्या दिवाणाचें काम पाहणार होते, इतकी सर्व तयारी झाल्यावर महाराजांनीं स्वतः राजीनामा देण्याचें ठरविलें, ही गोष्ट राजकारणाच्या दृष्टीनें वाईट झाली, ह्यांत संशय नाहीं! महाराजाचा राजीनामा दोन तऱ्हेचा आहे, असे म्हणतात. दोन वर्षेपर्यंत महाराजांनीं अज्ञातवासास इंग्लंडांत रहावें, लष्कर व पोलिस ह्यांजवर युरोपियन ऑफिसर नेमण्यात यावे, मुमताजच्या प्रकरणामुळें ब्रिटिश प्रजाजनांचें जें नुकसान झालें असेल तें भरून देण्यात यावें आणि सरकारनें पसंत केलेल्या कौन्सिलच्या मार्फत राज्यकारभार चालविण्यात यावा; अशा अटींचें राजीनाम्याचें एक स्वरूप होतें. महाराजांनीं राजीनामा अजिबात द्यावा आणि युवराज वयांत येईतों सरकारला योग्य वाटेल त्या रीतीनें राज्यकारभार चालविण्यांत यावा, असे राजीनाम्याचें दुसरें स्वरूप आहे. गादीचा राजीनामा तरी द्या, नाहीं तर चौकशीला तरी उभे रहा, असें

* नवाकाळ, ता. २६ फेब्रुवारी १९२६

हिंदुस्थान सरकारनें सांगितलें असतांना अर्धवट राजीनाम्यास महाराज तयार झाल्यावर सरळ राजीनाम्याशिवाय हिंदुस्थान सरकार तरी कसें महाराजांना सोडणार? चौकशीला उभे रहावयाचें नाहीं तर सरळ व संपूर्ण राजीनाम्याच्या थरावरच गोष्ट जाणार ह्यांत शंका नाहीं. नाभाच्या महाराजानीं जसा राजीनामा दिला तसाच राजीनामा देण्याची पाळी होळकर सरकारवर आज आली आहे. दिवाण नरसिंगराव नाभाहून इंदूरास आले आणि इंदूरासहि राजीनाम्याचीच गोष्ट घडून आली! होळकर सरकारच्या राजीनाम्याच्या अगोदर दिवाण नरसिंगराव ह्यानीं आपल्या जागेचा राजीनामा दिला आहे असें म्हणतात. नाभाचा राजीनामा व होळकर सरकारचा राजीनामा ह्या दोन गोष्टींमध्यें होळकर सरकारच्या राजीनाम्यासंबंधानें हिंदुस्थान सरकार मात्र उघड्या न्यायाचें चहातें म्हणून त्यांतल्या त्यांत नांवलौकिक मिळवणार ही ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट होय! होळकर सरकारास उघड्या चौकशीची संधी दिली असतांना ती टाळण्यांत आल्यामुळें इतर कोणा संस्थानिकास गुपचूप स्थानभ्रष्ट करण्यांत आल्यास हिंदुस्थान सरकारास ह्यापुढें नैतिक दृष्ट्या दोष लावतां येणार नाहीं, असा होळकर सरकारच्या राजीनाम्याचा परिणाम होणार आहे. होळकर सरकारची चौकशी करण्याकरिता हिंदुस्थान सरकारनें जें कमिशन नेमलें आहे, त्या कमिशनमध्यें दोन मोठीं व्यंगें आहेत. होळकर सरकारच्या बरोबरीच्या नुसत्या संस्थानिकाकडून चौकशी व्हावयास पाहिजे होती; चौकशीचें तसे स्वरूप नसल्यामुळें होळकर सरकारास न्याय मिळाला नाहीं असें चौकशीच्या वेळीं म्हणतां आलें असतें; तेव्हा बरोबरीच्या संस्थानिकांपुढें चौकशीकरितां पुढें उभे रहाण्याचा संस्थानिकाचा जन्मसिद्ध हक्क नष्ट होण्यास होळकर सरकारचा राजीनामा कारणीभूत होणार आहे! संस्थानिक दुबळे व पराक्रमशून्य

झाले आहेत, ह्यांत संशय नाही. परंतु दुबळ्यांना देण्याचा न्याय निराळा व सशक्तांना देण्याचा न्याय निराळा, असा पंक्तिप्रपंच हिंदुस्थान सरकारला करतां येत नाहीं. केवळ संस्थानिकाचें कमिशन नसल्यामुळें आपणास न्याय मिळणार नाहीं अशी भीति होळकर सरकारास वाटणें साहजिक आहे. पण राजीनामा द्या किंवा चौकशीला तरी पुढें या असें आव्हान झालें असतां नैतिक दृष्टया आपणाकडे बोल नाहीं हें सिद्ध करण्याकरितां चौकशीला तोंड देणेंच संस्थानिकाच्या हक्कासंबधानें अधिक उचित होय. होळकर सरकारचे व इंग्रज सरकारचे तहनामे असल्या चौकशीच्या विरुद्ध आहेत. पण तहनाम्यांतील हक्कावर अवलंबून रहाण्याची ताकद संस्थानिकामध्यें आहे कोठें ? रेसिडेंटची खुशामत करणारा एक बडा श्रीमंत ह्या पलीकडे संस्थानिकांना दर्जाच राहिलेला नाहीं. पावलो पावलीं रोजच्या व्यवहारांत जर ताटाखालचें माजर होऊन रहावयाचें तर बड्या चौकशीच्या वेळीं तहनाम्यांतील अटींना तरी कोण पुसणार ? चौकशी झाली तरी पदच्युत होणार आणि न झाली तरी पदच्युत होणार, हें खरें आहे. हा शक्तीचा प्रश्न आहे, न्यायाचा नव्हे. तथापि नैतिक दृष्टया विचार केला असतां आपल्याजवळचा सर्व पुरावा प्रसिद्ध करण्याचा मार्ग स्वीकारणें अधिक श्रेयस्कर होय. महाराजांनीं तसा मार्ग स्वीकारला नाहीं ह्यामुळें सर्व संस्थानिकांना ह्यापुढें अधिक त्रास झाल्यावाचून रहाणार नाहीं. इंग्लंडांत दोन वर्षें महाराज जाऊन राहिले तर तेथें काश्मीरच्या सांप्रतच्या महाराजासारखीं प्रकरणें उद्भवणार नाहींत म्हणून कशावरून ? अशीं नावें सर्व संस्थानिकांना ठेवण्यास होळकर सरकारच्या राजीनाम्यानंतर लोक कमी करणार नाहींत ! होळकर सरकारनीं राजीनामा दिल्यानंतर कौन्सिलचे दिवाण सर सबनीस झाले काय किंवा इंदूरच्या पोलिस खात्यावर एखादा युरोपियन नेमला गेला काय,

राज्यकारभाराच्या असल्या नेमणुकींना महत्त्व नाहीं. काहीं युरोपियनाची मनधरणी करावयाची व इतर बाबतींत पाहिजे तसे वागावयाचें ह्याचा अखेर परिणाम काय होतो हें होळकर सरकारच्या सांप्रतच्या प्रकरणावरून संस्थानिकानीं चागले शिकण्यासारखें आहे. तहनाम्यातील अट व संस्थानिकाचा दर्जा म्हणजे केवळ भ्रमाचा भोपळा होय! ह्या अटींना व ह्या दर्जाना कस्पटाप्रमाणें मानण्याची ताकद हिंदुस्थानच्या नोकरशाहींत आहे आणि जर वाकडे पाऊल पडले तर खरपूस प्रायश्चित्त देण्यास नोकरशाही कमी करणारी नाहीं, हेंहि होळकर सरकारच्या राजीनाम्यावरून सिद्ध होणारें आहे. अशा प्रसंगीं दिवाण नरसिंगराव ह्याचाहि उपयोग होत नाहीं किंवा दिवाण सर साहेब सबनीस ह्यांचेंहि औषध लागू पडत नाहीं. आपला रुपया बदबद वाजत चालला आहे आणि खोटा म्हणून चोहोंकडे गवगवा झाला आहे असे अनुभवास आल्यावर, स्वतःची सुधारणा करून घेण्याकडे व स्वतःस खरा रुपया बनविण्याकडे संस्थानिकांनीं अधिक लक्ष पोचविणें जरुरीचें नाहीं काय?

---

# * छातीवरचें दडपण



राष्ट्रीय सभेच्या आज्ञेप्रमाणें स्वराज्य पक्षाचें चाळीस सभासद असेंब्लींतून उठून गेल्यानतर दे. पटेल ह्यानीं केलेल्या भाषणामुळें आपल्या छातीवर दडपण पडलें, असे सरकारतर्फे सर मुडिमन ह्यानीं बोलून दाखविलें. दडपण पडण्याचें कारण काय? चाळीस सभासद उठून गेले म्हणून सरकार थोडीच पर्वा करीत आहे? अशा रीतीनें उठून जाणें म्हणजे स्वतःस हास्यास्पद बनविणें, असे नोकरशाहीचें मत आहे. स्वराज्यपक्ष उठून गेला आणि राष्ट्रात स्वराज्य पक्षानें मोठी चळवळ केली म्हणून सरकारास भीति मुळींच नाहीं! असहकारितेची मोठी चळवळ शिखरास पोहोंचली असताना त्या चळवळीला ज्या नोकरशाहीनें भीक घातली नाहीं, ती नोकरशाही उद्या थोडीच भीक घालणार आहे! स्वराज्यपक्ष उठून गेला म्हणून सर मुडिमन ह्याच्या छातीवर दडपण पडलें नाहीं. पटेल साहेब अध्यक्ष ह्या नात्यानें सरकारतर्फें पुढें येणाऱ्या मंजुरींना वादग्रस्त म्हणून असेंब्लीचें कामकाज वारवार तहकूब ठेवतात कीं काय ह्या भीतीचें दडपण पडलें. दे. पटेल ह्यानीं गेल्या सोमवारीं असेंब्लींत केलेल्या भाषणात दोन महत्त्वाचे मुद्दे आहेत. पहिला मुद्दा असा आहे कीं, स्वराज्यपक्ष उठून गेल्यानें असेंब्लीचें लोकमताचें निदर्शक स्वरूप नष्ट झालें आहे. हा मुद्दा म्हणजे स्वराज्यपक्षाच्या उठून जाण्याच्या वर्तनावर अध्यक्षानीं केलेली टीका होय. अध्यक्षाच्या मतें उठून जाण्याचा अर्थ काय होतो हें जाहीर करण्यापलिकडे पहिल्या मुद्यास महत्त्व नाहीं, असा भाषणात दे. पटेल ह्यानीं आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. नोकरशाहीला हा अभिप्राय सम्मत असो वा नसो, सर्व हिंदी राष्ट्राचें मत दे. पटेल ह्याच्याप्रमाणेंच ह्या

---

* नवाकाळ, तारीख ११ मार्च १९२६

अभिप्रायासंबंधानें आहे, ह्यात संशय नाहीं. उठून गेलेले चाळीस सभासद म्हणजे लोकमताचे निदर्शक ह्या नात्यानें असेंब्लीचा खरा जीव होय. हा जीव निघून गेल्यानंतर असेंब्ली प्रेतवत् होते किंवा विधवेच्या स्थितीप्रत जाते, असे म्हणण्यास कोणती हरकत? प. मोतीलाल नेहरू ह्याचें असेंब्लींतील अनुयायी म्हणजे अधिकारारूढ असलेला पक्षच होय, अशा प्रकारचा आपला अभिप्राय थोडे दिवसापूर्वी असेंब्लीतील एका युरोपियन सभासदानें दिला होता, हें सर्वांना माहीत आहेच. पार्लमेंटरी पद्धत जर खरोखर हिंदुस्थानात सुरू झाली असती तर प. मोतीलाल नेहरू ह्याचेंच मंत्रिमंडळ असेंब्लींत सरकारी खुर्च्यांवर बसून, प. मोतीलाल नेहरू ह्याच्याच मंत्रिमंडळाला सरकार म्हणून संबोधण्यात आले असतें. पार्लमेंटरी पद्धत अंशतःहि सुरू झालेली नसून साप्रतची असेंब्ली म्हणजे जबाबदार राज्यपद्धतीचा एक फार्स असल्यामुळे असेंब्लीतून उठून जाण्याचा प्रसंग पं. मोतीलाल नेहरू ह्याजवर आज आला आहे. पण लोकनियुक्त सभासदाच्या शक्तीकडे लक्ष दिले असता असेंब्लीचे खरे मालक आज पं. मोतीलाल नेहरू ह्याचा पक्षच आहे असे म्हणण्यास हरकत नाही. कायदा तसें बोलत नसेल, पण न्याय तसे बोलत आहे! दे. पटेल ह्यानीं कायद्याच्या भाषेच्या दृष्टीनें योग्य शब्द वापरले नसले तरी न्यायाच्या दृष्टीनें खरे शब्द वापरले आहेत, ह्यात संशय नाही. अरेरावी राज्यपद्धतींत कायदा व न्याय ह्याजमध्यें नेहमीं अंतर असतेच. हें अंतर प्रसंगामुळे विसरून न्यायाची भाषा एकदम सुरू होते. स्वाभाविक जोरानें न्यायाचे शब्द आपोआप बाहेर पडतात आणि न्यायाच्या वतीचा बहुजनसमाज कालांतरानें होऊन कायदा बदलत असतो. प्रसंग असल्या गोष्टींना जबाबदार असतो. प्रसंगाची छाप दे. पटेल ह्यांजवर पडून न्यायाचे शब्द आपोआप त्यांच्या तोंडून बाहेर पडले. हे न्यायाचे शब्द ऐकून आणि तेहि असेंब्लींत अध्यक्षाच्या तोंडून ऐकून नोकरशाही चपापून जाणें अगदीं साहजिक

होतें आणि सर मुडिमन ह्यांच्या छातीवर दे. पटेल ह्यांच्या शब्दांचें दडपण चांगलें पडलें. कायद्याच्या दृष्टीनें विचार केला असतां असेंब्लींतील स्वतंत्र पक्षाचे व इतर पक्षाचे लोकनियुक्त सभासद जोंपर्यंत आपल्या खुर्च्यांवर बसलेले आहेत तोंपर्यंत कायद्यानें लोकमताचें निदर्शक समजलें जाणारें असेंब्लीचें स्वरूप कायद्याच्या भाषेंत नष्ट होत नाहीं. असेंब्ली न्यायाच्या दृष्टीनें विधवा झाली असली तरी कायद्याच्या दृष्टीनें सौभाग्यवतीच आहे, आणि मूल-बाळ झालें असता तें बेकायदेशीर ठरणार नाहीं, असा मुडिमन वगैरे मंडळींचा अभिप्राय आहे! आम्ही नांवाचे लोकनियुक्त नसलों तरी कायदेशीर लोकनियुक्त आहोंत आणि आमचें हें कायदेशीर नातें तुम्हीं कसें काढून घेता, अशा तऱ्हेचा वितंडवाद दे. पटेल ह्यांजबरोबर काहीं लोकनियुक्त व इतर सभासदांनीं सोमवारी सायंकाळीं त्यांच्या घरीं जाऊन केला. आपण न्यायाच्या दृष्टीनें बोलत होतों, कायद्याच्या दृष्टीनें बोलत नव्हतों, तेव्हा तुमचा कायदेशीर हक्क चुकीचा नाहीं; अशा तऱ्हेचें आश्वासन दे. पटेल ह्यांनीं खाजगी बैठकींत दिलें; आणि मंगळवारीं असेंब्लीला सुरवात करतांना असेंब्लीचें लोकनियुक्त स्वरूप नष्ट झालें नसलें तरी बऱ्याच अंशानें नाहीसें झालें आहे, असा आपल्या भाषणाचा खुलासा अध्यक्षाकडून करण्यांत आला. आपल्या कायदेशीर हक्कांच्या विरुद्ध अध्यक्षांचा अभिप्राय आहे म्हणून अध्यक्षांवर निंदाव्यंजक ठराव नोकरशाहीच्या प्रेरणेनें आणण्याचा बेत होता, पण ह्या खुलाशामुळें तो बेत फसला! निंदाव्यंजक ठराव पुढें आला असता असेंब्लीची बैठक तहकूब करण्यास जर दे. पटेल प्रवृत्त झाले असते तर सर मुडियम व सर शिवस्वामी अय्यर ह्यांनीं अध्यक्षांच्या खुर्चीपर्यंत धावत जाऊन अध्यक्षांना दोन्ही हातांनीं पकडून तसेंच डांबून ठेवून, अध्यक्षांच्या देखत निंदाव्यंजक ठराव पास करून घेतला असता आणि निंदाव्यंजक ठरावाच्या आधारानें अध्यक्षपदावरून दे. पटेल ह्यांना हांकून देण्यांत आलें

असतें, असा तऱ्हेचा अंतःस्थ व्यूह रचला गेला होता अशी बातमी मुंबईच्या टाइम्सच्या दिल्लीच्या बातमीदाराचे पत्रांत दिसून येत आहे! इंग्लंडांत पार्लमेंट सभेंत राजाच्या बाजूचा अध्यक्ष असतांना अध्यक्षाला खुर्चीवर पकडून ठेवून लोकांनीं आपले ठराव पास करून घेतल्याचीं उदाहरणें आहेत. लोकांच्या बतीचा अध्यक्ष असतांना सरकारनें अध्यक्षाला खुर्चीवर दोरीनें बांधून ठेवून आपले ठराव पास करून घेण्याचा दिव्य देखावा हिंदुस्थानच्या पार्लमेंट सभेंत गेल्या मंगळवारीं दृष्टीस पडावयाचा होता; पण दे. पटेल ह्यांनीं आपलें मत न सोडतां कायदेशीर भाषाच वापरण्यास सुरवात केल्यामुळें नोकरशाहीची ती लीला दृष्टीस पडली नाहीं! असेंब्ली निःसत्व झाली हा आपला अभिप्राय दे. पटेल ह्यांनीं कायद्याची भाषा वापरतांनाहि सोडलेला नाहीं, ही संतोषाची गोष्ट होय. असेंब्ली निःसत्व किंवा विधवा झाली असताना सरकारनें आपण होऊन असेंब्ली मोडून नव्या निवडणुकीस सुरवात केली पाहिजे, अशी इग्लंडच्या पार्लमेंटरी पद्धतीची वहिवाट आहे. ह्या वहिवाटीकडे सोमवारच्या आपल्या भाषणांत दे. पटेल ह्यांनीं सरकारचें लक्ष वेधलें, पण तसें कांहीं करण्यास नोकरशाही आज बिलकुल तयार नाहीं. असेंब्लीचे खरे मालक घरांतून निघून गेल्यानंतर जर मुलें बाळें झालीं तर तीं कायदेशीर होतील किंवा कसें ह्या संबंधाचाहि आपला अभिप्राय अध्यक्ष ह्या नात्यानें सोमवारच्या भाषणांत दे. पटेल ह्यांनीं व्यक्त केला आहे. प्रत्यक्ष तशी गोष्ट घडून येईतों एखाद्या विधवेसहि आगाऊ नावें ठेवणें शिष्टसंप्रदायास धरून नसल्यामुळें तसा अभिप्राय व्यक्त करण्यांत आपण थोडी घाई केली, ही गोष्ट दे. पटेल ह्यांनीं मंगळवारच्या भाषणांत कबूल केली असल्यामुळें सर मुडिमन ह्यांच्या छातीवरील दडपण आतां बरेंच हलकें झालें आहे! पण दे. पटेल ह्यांनीं आपलें मत बिलकुल सोडलेलें नसल्यामुळें तसाच प्रसंग आल्यास दे. पटेल व सर मुडिमन ह्यांचा खटका पुनः उडाल्यावांचून कसा राहील?

# * पहारेकऱ्याला हजार रुपये !

कलकत्त्यातील दंग्यासंबधानें लिहितांना ॲंग्लो-इंडियन पत्रानीं असें प्रसिद्ध केले आहे की, दोन चार तास घरावर पहारा करण्याकरिता किंवा घराच्या मालकाला सुरक्षित ठिकाणी नेऊन पोहोंचविण्याकरिता हजार हजार रुपये कलकत्त्याच्या काही श्रीमंतानी युरोपियनाना देऊ केले व काहींनीं असे हजार रुपये मिळविलेहि ! लुटालूट करणाऱ्या बदमाषाची धाड घरावर आली असता टेलिफोन करून ओळखीच्या एका युरोपियनाला पहाऱ्यासाठीं बोलवावे आणि हजारो रुपये द्यावे असे घडून आल्याचीं उदाहरणें आहेत. ज्याच्या घरात लाखो रुपयाची इस्टेट साठलेली आहे त्यानीं लुटालूट होणार अशी भीति वाटल्याबरोबर हजारों रुपये दोन चार तासाच्या नोकरीसाठीं द्यावेत ह्यात काहीं नवल नाही. प्राणावर बेतली असतां हजारों रुपयांना कोण विचारतो ? युरोपियन पहारेकऱ्याची अशी मागणी करण्यात आल्यामुळें ॲंग्लो-इंडियन पत्रे असे म्हणत आहेत कीं, उद्या जरी स्वराज्य हिंदु लोकांना देऊन टाकले तरी दोनतीन तासाच्या पहाऱ्यासाठी हजारो रुपये युरोपियनाना हिंदुस्थानात कमावता येण्यासारखे असल्यामुळे स्वराज्यात इंग्रजाची चंगळच उडणार आहे ! युरोपियनाची जर अशी चंगळ उडणारी आहे, तर देऊन टाकीनात एकदा स्वराज्य, उगीच उशीर कशाला ? स्वराज्य लांबणीवर टाकून इंग्रजानीं आपलें पैशाचें नुकसान का करून घ्यावें ? क्लाइव्हसाहेबाच्या वेळेपासून हत्यारबंद इंग्रजाला हजारो रुपये चारण्यास हिंदुस्थानांतील श्रीमंतानीं कमी केलें नाहीं. हे हजारो रुपये हत्यारबंद इंग्रज पहारेकऱ्याला पूर्वी का देण्यात आले आणि आजहि का देण्यांत येत आहेत ? इंग्रजी

---

* नवाकाळ, ता. १३ एप्रिल १९२६

लढवय्याहून हिंदी लढवय्या कमी शूर असतो अशांतला भाग मुळींच नाहीं. इंग्रजाहून अधिक शूर असलेले कितीतरी लढवय्ये कलकत्याच्या हिंदी लोकात आज सापडतील. पण त्यापैकीं कोणासहि हजारो रुपये तास दोन तासाला कमविणारा पहारेकरी अशी किंमत स्वप्नीं मिळत नाहीं. मग इंग्रजाना ही किंमत कोठून आली ? बाजारभाव त्यांचा असा कसा वाढला ? ह्या प्रश्नाचें उत्तर असे आहे कीं, इंग्रजांच्या नीतीला, इंग्रजांच्या स्वभावाला किंवा इंग्रजांच्या मर्दुमकीला ही किंमत देण्यात येत नसून, इंग्रजांच्या हातीत असलेल्या हत्याराला व त्या हत्यारामुळें बसलेल्या दराऱ्याला ही किंमत देण्यात येत आहे. फ्रेंचांच्या डुप्लेसाहेबाच्या वेळीं किंवा इंग्रजांच्या क्लाइव्ह साहेबाच्या वेळीं छोटया युरोपियन लष्कराला जो मान मिळत होता तो मान युरोपियन बंदुकीमुळें आणि गोळीबाराच्या लढाईच्या डावपेचामुळें मिळत होता. अत्यंत शूरपणानें व जिवावर उदार होऊन युरोपियनांच्या बंदुकीच्या माऱ्यावर तुटून पडणारे शूर लढवय्ये त्यावेळीं हिंदुस्थानात कमी नव्हते. पण बंदुकीच्या गोळीबाराच्या लढाईचा नवा अनुभव हिंदी लष्कराला येऊन हा हा म्हणता शेंकडो लोक दुरून मारतां येतात असा भयंकर गवगवा चोहोंकडे झाला, आणि त्यामुळें इंग्रजी लष्कराचा दरारा बसला. हें हत्याराचें बळ होय, केवळ मनगटाचें शौर्य नव्हे ! हत्यारबंद युरोपियन पहारेकऱ्यांना पूर्वी फार मागणी होती आणि राजेरजवाडे त्यांच्या मदतीकरितां लाखो रुपये देतहि असत मदतीकरितां लाखो रुपये घेऊन आपल्या छोटया लष्कराच्या बंदुकीतील गोळीचा दरारा चोहोंकडे बसवावयाचा आणि अखेरीस ज्याला मदत केली त्यालाच खाऊन टाकून आपलें राज्य स्थापावयाचें, असा इंग्रजी राज्याचा इतिहास आहे. शस्त्रास्त्रांची आणि यांत्रिक ज्ञानाची ही करामत आहे ! कलकत्यास जर दंग्याच्या वेळीं मूळच्या किंमतीहून पांचपटीनें किंवा दसपटीनें अधिक किंमतीनें मशीनगन्स इंग्रजांनी

विकल्या असत्या तर युरोपियन पहारेकऱ्याना जेवढ्या मागण्या कलकत्त्यास दंग्याच्या वेळीं आल्या त्याच्याहून शेकडो पटीनें अधिक मागण्या मशिनगन्सना व काडतुसांच्या माळांना आल्या असत्या. यांत्रिक कलेचा व शस्त्रास्त्रांचा हा प्रभाव आहे, माणुसकीबद्दलच्या आदराचा हा प्रभाव नव्हे! इंग्रजाना हिंदुस्थानांत जशीं शस्त्रास्त्रें वापरण्याची परवानगी आहे तशीं शस्त्रास्त्रें वापरण्याची परवानगी हिंदूंना व मुसलमानाना मिळूं द्या आणि इंग्रजाना ज्याप्रमाणें शस्त्रास्त्रांचा पुरवठा एकसारखा होऊं शकतो त्याप्रमाणें हिंदी लोकांच्या ताब्यातले भरपूर शस्त्रास्त्रांचे कारखाने हिंदुस्थानांत सुरू होऊं द्या, मग क्षणाच्या पहाऱ्याकरिता कोण कोणास हजारों रुपये देऊन बोलावतो हे तेव्हां अनुभवास आल्यावाचून रहाणार नाहीं. हिंदी राष्ट्र जर अशा रीतीनें सशस्त्र झालें आणि यांत्रिक कलेत जर निष्णात ठरलें तर हिंदु-मुसलमानांत एखाद दुसरी लढाई होईल हें खरें आहे. पण तशा प्रसंगातून एकदा पार पडून गेल्यानंतर किरकोळ तक्रारीमुळें मोठ्या शहरात हिंदु-मुसलमानांच्या दंग्याच्या मिषानें बदमाष चार पांच दिवस एकसारखी लुटालूट करीत आहेत असा देखावा मुळींच दृष्टीस पडणार नाहीं. अंतःस्थ व्यवस्था हिंदु-मुसलमानांच्या पुढाऱ्यांना आपण होऊन नीट लावावी लागेल आणि तशी व्यवस्था फारसा त्रास न होतां आपोआप लागेलहि. परचक्राचेंहि भय मग हिंदुस्थानास रहाणार नाहीं. परचक्रापासून संरक्षण करण्याकरितां साठसत्तर कोट रुपयांचा मलिदा चारून जो युरोपियन पहारेकरी आज हिंदुस्थानास आपल्या दरवाजावर ठेवावा लागत आहे त्याच्याऐवजी दहावीस कोट रुपयांच्या खर्चांत हिंदी राष्ट्र स्वतःचें संरक्षण करूं शकेल; इतकेंच नव्हे तर फ्रान्सच्या लष्करी शक्तीचा जो दरारा आज सर्व युरोप खंडाला वाटत आहे तोच दरारा हिंदी राष्ट्राच्या लष्करी शक्तीचा सर्व

आशिया खंडाला दरसालच्या वीस पंचवीस कोट रुपयांच्या खर्चानें घाटल्यावांचून रहाणार नाहीं. स्वराज्य म्हणजे कौन्सिलांत व्याख्यानें देण्याचा परवाना नव्हे, अंतःस्थ शांततेकरितां व परचक्रापासून संरक्षण करण्याकरितां शस्त्रास्त्राची निपज करून व्यवस्थेशीर रीतीनें राष्ट्रातील शूर तरुणांना तसल्या राष्ट्रसेवेला जुंपणें होय ! हा परवाना जर मिळाला तर आपापसांत डोकीं फोडून इंग्रजाचा धावा करीत तासाला हजार रुपये देतों पण तुम्हीं या, असें म्हणण्याची पाळी हिंदुस्थानावर येईल ही कल्पनाच चुकीची आहे. तुर्कासंबंधानें असेंच भाकीत करण्यात आलें होतें. पण पहिल्यांदा कोठून तरी एकदां भरपूर शस्त्रास्त्राचा पुरवठा झाल्यावर इंग्रजाच्या मदतीशिवाय आज तुर्कांना शस्त्रास्त्राचे कारखाने काढता येतात, अंतःस्थ बंडाळी मोडतां येतें, आणि युरोप खंडाच्या कारस्थानावरहि आपलें वजन पाडतां येतें, असा अनुभव आलेला आहे. शस्त्रास्त्रांविषयीं अज्ञान असलेल्या, निःशस्त्र केलेल्या आणि शस्त्रास्त्रांचा पुरवठा काडीचाहि होऊं नये म्हणून अत्यंत दक्षतेनें एकतऱ्हेच्या कोंडवाड्यात कोंडून ठेवण्यांत आलेल्या लोकानीं, बदमाषाच्या लुटालुटीची लाट उसळली असतां आपल्या पहाऱ्याकरितां हजारो रुपये हत्यारबंद इंग्रजांना देऊं केलें तर त्यावरून स्वराज्याची नालायकी कशी सिद्ध होते ?



# * शर्यतीचा जुगार

इंग्लंडचे फडणीस मि. चर्चिल ह्यांनी शर्यतीच्या जुगारातील देवघेवीवर शेंकडा ५ टक्के कर बसविण्याचें ठरविल्यामुळे इंग्लंडांत शर्यतीच्या जुगारासंबंधानें कडाक्याचा वादविवाद सुरू झाला आहे. दारू आणि शर्यतीचा जुगार हीं दोन भयंकर व्यसनें इंग्रजांच्या हाडींमांशीं खिळलेलीं आहेत. व्यापारांत, उद्योगधंद्यांत, व राजकीय बाबतींत पराक्रमी म्हणवून घेण्याची महत्त्वाकांक्षा जर इंग्रजी राष्ट्रांत नसती तर ह्या दोन व्यसनांनीं इंग्रजांच्या घरादाराची राखरांगोळी केव्हांच केली असती. पराक्रमाच्या हौसेनें राष्ट्र ज्यावेळीं पुढें पाऊल टाकीत असतें त्यावेळीं असल्या व्यसनांना कर्त्या पुरुषांत एक प्रकारचा आळा बसलेला असतो, पण पराक्रमाला वाव नसला म्हणजे हीं व्यसनें उरावर बसून राष्ट्राचा चक्काचूर होण्यास कारणीभूत होत असतात! इंग्लंडचा पराक्रम सांप्रत आटत चालला आहे आणि उद्योगधंद्याच्या फैलावाला अडथळा आला आहे, अशा स्थितींत हीं व्यसनें इंग्लंडला चांगलीं जाचक झाल्यावाचून रहाणार नाहींत. पराक्रमाच्या वेळीं ह्या व्यसनांचा फैलाव इंग्रजांनीं जगभर केला असून जिंकलेल्या राष्ट्रांना तर इंग्रजांचीं हीं व्यसनें अत्यंत त्रासदायक झालीं आहेत. इंग्रजांच्या हाडींमांशीं हीं व्यसनें खिळून राहिलेलीं असल्यामुळें राष्ट्राच्या जिवाला मारून टाकणारें कांहीं विष ह्या व्यसनांत आहे असें इंग्रजांना मुळींच वाटत नाहीं. दारू पिणें व जुगार खेळणें ह्यांत कांहीं कमीपणा आहे असें इंग्रजांचें मतच नाहीं. शर्यतीचा जुगार काय किंवा इतर कोणत्याहि वस्तूंसंबंधाचा जुगार काय, जुगार येथून तेथून एकच. पत्त्याच्या डावांतील

* नवाकाळ, ता. १ मे १९२६

जुगार, गणिताचा जुगार, फाशांचा जुगार, सट्ट्याच्या भावाचा जुगार, कोणत्या वेळीं कोठें किती पाऊस पडतो त्यासंबंधाचा जुगार, सर्व जुगारांचे कार्य व परिणाम एकच असतात. एकदम पैसे मिळविणें किंवा घालविणें जुगारामुळें होत असल्यामुळें, [illegible] उद्योगांत पैसे मिळविण्या-साठीं जी तरतरी मनुष्याच्या अंगांत उत्पन्न होते आणि ज्या तरतरीमुळें उद्योग सुखद वाटतो ती तरतरी [illegible] जुगारांत एकदम एकवटली गेल्यामुळें जुगाराच्या वेळीं बेहोषपणा उत्पन्न होऊन तरतरीचें सुख बेहोष-पणानें उपभोगावयास मिळतें. दारूच्या व्यसनांतहि असेंच आहे. शरीर व मन आरोग्याच्या व प्रफुल्लतेच्या स्थितींत असतांना जी सुखाची लहर उपभोगावयास मिळते त्याच लहरीचा पण [illegible] सुख दारू-बाजास थोडा वेळ दारूच्या एका पेल्यानें प्राप्त होतें. ज्यांचें शरीरसामर्थ्य आपल्यापाशीं नाहीं आणि बुद्धिपुष्टीचा जो स्वाभाविक आनंद आपल्या-पाशीं नाहीं, त्या सर्वांचा खोटा आभास दारूमुळें उत्पन्न होऊन सर्व सम-र्थतेच्या आनंदांत दारूबाज थोडा वेळ तरी निमग्न होऊन जातो. संसार दुःखमय व कष्टाचा असल्यामुळें खरा आनंद मिळत नसणारांना खोट्या सुखाच्या भजनीं लागणें सोईचें पडतें. हें बेहोष व बेफिकीर वृत्तीचें सुख घेण्याकडे दुःखीकष्टी समाजाची प्रवृत्ति साहजिक असते. पण असलें व्यसन राष्ट्रास लागलें असतां त्याच्या सुखाला राष्ट्र कायमचें मुकतें! इंग्लंडच्या पराक्रमामुळें स्वतः इंग्रजांना सध्या सुखाला कायमचें मुकण्याचीं दुःखें आज तितकीं भोगावीं लागत नाहींत हें खरें आहे, पण त्यांच्या पराक्रमानें जिंकलेल्या लोकांच्या बोकांडीं मात्र हीं दुःखें कायमचीं बसलेलीं आहेत! जुगाराकडे असलेल्या दुःखीकष्टी साहजिक प्रवृत्तीला शर्यतीच्या जुगारानें हिंदुस्थानांत अधिक मोहक बनविलें आहे. राज्यकर्त्यांचें व्यसन म्हणून हिंदी लोकांच्या दृष्टीनें त्या व्यसनाला [illegible] ची [illegible]स-

देख होण्याला, साहेबाच्या व्यसनात आम्ही सामील आहों म्हणून मिरविण्याला, आणि साहेबाची सुधारणा आमच्यात आली आहे म्हणून धन्यता मानण्याला हे व्यसन चांगले उपयोगी पडते! गंजिफाच्या किंवा फाशाच्या जुगाराऐवजी शर्यतीच्या जुगारात साहेबाच्या सान्निध्यामुळे प्रतिष्ठितपणा वाटतो. शिवाय बड्या समुदायाने ह्या जुगारात एकाच वेळीं पडण्यास सवि मिळत असल्यामुळे समुदायाच्या बेहोष वृत्तीचीहि भर व्यक्तीच्या बेहोष वृत्तींत पडत असते. पराक्रमी व उद्योगी पुरुषाला बेहोष वृत्तीची तरतरी अल्प अंशाने उपभोगिली असता तितकीशी त्रासदायक होत नाहीं. किंबहुना साहसी वृत्तीला असल्या तरतरींचे लहान सहान वळसेच उपयोगी पडतात असे ह्या जुगाराचे समर्थन करण्यात येते. पण तरतरीची एकदा लालूच लागल्यावर त्या नादात मनुष्य निमग्न होऊन त्याच्या संसाराची राखरांगोळी होते ह्यात संशय नाहीं! शर्यतीच्या जुगारावर किंवा दारूवर जकात बसवून ह्या व्यसनांना आळा घालण्याचा प्रयत्न जर सरकारनें केला तर त्याबद्दल सरकारास पाठिंबाच विचारी लोकांनीं दिला पाहिजे. पण इंग्लंडात आज तशी स्थिति नाहीं. कॉन्झर्व्हेटिव पक्षाचे मंत्रिमंडळ व्यसनाला आळा घालण्याच्या सद्धेतूने शर्यतीच्या जुगारावर कर बसवीत आहे असे मुळीच नाहीं. पैसे गोळा करण्याचे एक साधन एवढ्याच दृष्टीनें ह्या कराकडे मि. चर्चिल पहात आहेत. पण करामुळें जुगाराला थोडासा आळा बसल्यावाचून रहाणार नाहीं. हा लहानसा अडथळा इंग्रजांना आज सोसवत नाहीं. पार्लमेंट सभेतील कित्येक कॉन्झर्व्हेटिव पक्षाचे प्रतिनिधी, सर्व लिबरल पक्ष, सर्व मजूर पक्ष आणि इंग्लंडचें बरेच लोकमत शर्यतीच्या जुगारावरील कराच्या विरुद्ध गेले आहे. इंग्रजाच्या कुटुंबातील एका पवित्र भावनेला सरकार कोण धक्का देणार अशा तऱ्हेची टीका ह्या करावर करण्यात येत आहे. घोड्याची निपज चांगली व्हावी ह्या भावनेला धरून ह्या जुगाराची

उत्पत्ति झाला हें खरें आहे पण अत्यंत वाईट जुगाराचें स्वरूप आता ह्याला प्राप्त झालें आहे. पवित्र भावनेऐवजी छानछुकीचा भपका मात्र ह्या जुगाराच्या सभोंवती कायमचा बसला आहे. पण इंग्लंडातले गरीब व श्रीमंत सर्वच लोक ह्या जुगाराला आयुष्याच्या शतकृत्यांतील एक कृत्य असे समजत असतात. दारूला परमेश्वराचा प्रसाद समजण्यासारखाच हाहि जुगाराचा हट्ट आहे! दारूवर जबर जकात बसविली असता किंवा मद्यपानाचा प्रतिबंध अमलांत आणला असतां लोक चोरून दारू अधिक पिऊं लागतील अशी तक्रार हिंदुस्थानांत ज्याप्रमाणे नोकरशाही करीत असते, त्याचप्रमाणेच शर्यतीच्या जुगारावरील कराविरुद्धहि आज तक्रार करण्यांत येत आहे. शर्यतीच्या मैदानावरील देवघेवीवर जर तुम्ही कर बसवला तर मैदानाजवळच्या रस्त्यावर उभे राहून लोक शर्यतीला अनुसरून आपापसांत जुगार खेळूं लागतील आणि जुगाराच्या व्यसनांत खोट्या लपडावाची भर पडेल, अशा तऱ्हेची टीका माजी मुख्य मंत्री मि. लॉईड जॉर्ज ह्यांनी केली आहे. हिंदुस्थानांतील मद्यपानप्रतिबंधक चळवळीविरुद्ध जेवढे आक्षेप सरकारकडून घेण्यांत येतात, तेवढे सर्व आक्षेप मि. चर्चिल ह्यांच्या कराविरुद्ध इंग्लंडांत घेण्यांत येत आहेत. व्यसनाधीन लोकांचे हे आक्षेप आहेत आणि खरा अर्थ ह्या आक्षेपांत कांही नाही, असे इंग्लंडचें मंत्रिमंडळ सिद्ध केल्यावांचून रहाणार नाही. इंग्लंडच्या मंत्रिमंडळाला जी विचारसरणी आतां पटूं लागली आहे, त्याच विचारसरणीचा योग्य सन्मान करून हिंदुस्थानांतील नोकरशाहीनें दारूच्या व शर्यतीतील जुगाराच्या व्यसनाचें उच्चाटण हिंदुस्थानांतून करणें जरुरीचें नाही काय?

---

# * इंग्लंडची सद्दी संपली



कोळशाच्या खाणीतील तट्यामुळे इंग्लंडात सार्वत्रिक संप सुरू झाला असून, कोळशाच्या खाणींबरोबरच आगगाड्या, मोटारी, वर्तमानपत्रें, वगैरे सर्व कारखानें बंद पडले आहेत. जे कारखाने चालू आहेत, तेथील नोकरांना कारखाना गाठण्यासाठीं सात आठ मैल पायीं चालावें लागत आहे ह्यामुळे कारखाना उघडा असला तरी कामकाज कांहीं होत नाहीं. सार्वत्रिक संपाचें संकट इंग्लंडवर ओढवल्यामुळे इंग्लंडची सद्दी संपली असून इंग्रजी साम्राज्याच्या शेवटास आतां प्रारंभ झाला आहे, अशा बढाईचे उद्गार फ्रेंच वर्तमानपत्रांनीं ह्या प्रसंगीं काढले आहेत! स्वतःच्या मनातील इच्छेला अनुसरून फ्रेंच वर्तमानपत्रें टीका करीत आहेत, हें उघड होय. इंग्लंडची सद्दी संपावी व इंग्रजी साम्राज्य विलयास जावें अशी इच्छा फ्रान्स, इटली वगैरे देशांची असणे अगदी साहजिक आहे. आपल्या मनाच्या चष्म्याला अनुसरून बाहेरचा रंग मनुष्याला दिसत असतो. तेव्हां फ्रान्सला साम्प्रतच्या संपात इंग्लंडचा विनाश दिसावा, ह्यांत कांहीं नवल नाहीं. अमेरिकन वर्तमानपत्रें फ्रान्सच्या दृष्टीनें ह्या संपाकडे पहात नाहींत. इंग्रजी साम्राज्याचा विनाशकाल जवळ आला आहे, असें ह्या संपामुळे त्यांना वाटत नाहीं. तथापि इंग्लंडच्या बुद्धीनें इंग्लंडला ह्यावेळीं धोका दिला, आणि इंग्लंडची अक्कल चकली, असें अमेरिकेचें म्हणणें आहे. एखाद्या लहान किंवा मोठ्या लढाईला तोंड देऊन त्या आपत्तीतूनहि बाहेर पडण्याची शक्ति इंग्रजी साम्राज्यात आज आहे, ह्यांत संशय नाहीं. पण इंग्लंडची बुद्धि चकल्यामुळे मोठ्या लढाईची टेंच

* नवाकाळ, ता. ६ मे १९२६

लागल्यासारखें आज इंग्लंडला झालें आहे! ह्या रूपानें नाहीं त्या रूपानें तरी इंग्लंडचें दुखणें बाहेर पडावयाचेंच होतें. पण यादवीच्या रूपानें हा स्फोट झालेला असल्यामुळे सर्प मोडून स्थिरस्थावर झाल्यावरहि ह्या दुखण्याचे अनिष्ट परिणाम इंग्लंडला फार दिवस भोगावें लागतील, ह्यांत संशय नाहीं. महायुद्धामुळें पैशाचा चुराडा होऊन जर्मनीला दिवाळें काढावें लागलें, फ्रान्सलाहि पैशाच्या टंचाईच्या भोवऱ्यांत गरगर फिरावें लागलें; इटलीमध्यें लढवय्या पक्षाच्या जबरदस्तीमुळें मजुरांचीं बंडें बंद पडलीं; इंग्लंडनें इतके दिवस अब्रूनें काढले, पण इतर राष्ट्रांप्रमाणें इंग्लंडनेंहि आज आपली अब्रू गमावली आहे! महायुद्धाच्या अखेरीस इंग्लंडनें जर जबाबदारीनें तुर्की साम्राज्य खाऊन टाकलें असतें आणि माजी मुख्य मंत्री मि. लॉईड जॉर्ज ह्यांना टर्कीच्या लढाईंत शेपन्नास कोट रुपये उधळण्यास जर परवानगी दिली असती तर परक्याच्या घरांत स्वतःच्या बेकारांना जेवूं घालण्याची व्यवस्था इंग्लंडला करतां आली असती. कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षानें मि. लॉईड जॉर्ज ह्यांना घोड्यावरून खालीं ओढलें, पण कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारारूढ होण्याबरोबर उद्योगधंद्याच्या खालावलेल्या स्थितीशीं कशी टक्कर द्यावयाची हा प्रश्न कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षापुढे आला आणि मि. बाल्डविन ह्यांना बावरल्यासारखें होऊन सुसरक्षित व्यापाराचें तत्त्व मि. बाल्डविन ह्यांनीं मान्य केलें. त्याबरोबर पुन्हा दुसरी निवडणूक होऊन मजुरांचा पक्ष एक वर्षभर अधिकारारूढ झाला. मजुरांचा पक्ष सोशॅलिस्ट मताकडे वळत आहे आणि रशियाशीं स्नेह संपादन करून इंग्लंडच्या व्यापाराला नवें कुरण उत्पन्न करीत आहे, असें पाहून कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षानें पुन्हां निवडणुकीचा प्रसंग आणला आणि मि. बाल्डविन पुन्हां मुख्य मंत्री झाले. रशियाला वाळींत टाकावयाचें, चीनमध्येंहि रशियाशीं झुंजत रहावयाचें, आणि युरोपखंडांत सर्वांना

रशियावर बहिष्कार घालवयास लावून रशियाची खोड मोडावयाची, ह्या धोरणानें कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष वागूं लागल्यानें युरोपखंड स्थिरस्थावर होईना आणि इंग्रजी व्यापाराची सोय लागेना अशी स्थिति प्राप्त झाली! इंग्लंडला दरसाल ३० कोट पौंड म्हणजे साडेचार अब्ज रुपये अन्नसामग्रीकरितां परदेशांना द्यावे लागतात. साडेचार अब्ज रुपये इंग्लंड कसे देतें? परदेशांत इंग्लंडनें गुंतविलेलें भांडवल, इंग्लंडनें गुंतवलेल्या भांडवलावरील व्याज, सदर भांडवलाच्या कारखान्यांतील इंग्रजी नोकरांचीं पेन्शनें व शिल्लक, परदेशींच्या राज्यकारभारांतील इंग्रजी नोकरांची पेन्शनें व शिल्लक, इंग्रजी जहाजांकडून जगभर होत असलेल्या व्यापाराच्या ने-आणींतील इंग्रजांचा फायदा व शिल्लक, ह्या रूपानें अन्नसामग्रीचा मोबदला देण्यांत येतोच, पण त्याशिवाय दगडी कोळसा, लोखंड, पोलाद, आगगाड्यांचीं यंत्रें, जहाजें, सूत व कापड ह्या मालाच्या रूपानें अन्नसामग्रीचा मोबदला देण्यांत येऊन इंग्लंडला फायदा चांगला मिळतो. पण दगडी कोळसा, लोखंड व पोलाद व त्याबरोबर सूत व कापड ह्या जिनसांसंबंधानें परदेशच्या मालाशीं इंग्लंडला आज टक्कर देववत नाहीं. त्यामुळें अन्नसामग्रीकरितां साडेचार अब्ज रुपये दरसाल कसे भरावयाचे, ह्याची काळजी इंग्लंडला लागली आहे. इंग्लंडच्या दगडी कोळशाच्या खाणींतून पंचवीस कोट टन दगडी कोळसा दरसाल बाहेर पडतो. ह्यांपैकीं तीन चतुर्थांश माल इंग्लंडातच खपतो, बाकीच्या एक चतुर्थांश मालाला युरोपखंडांत गिऱ्हाईक नसल्यामुळें खाणींतील मजुरांना पोटभर मजुरी देण्याचें सामर्थ्य इंग्लंडच्या कारखान्यांचे अंगीं राहिलेलें नाहीं. इंग्लंडच्या दगडी कोळशाच्या खाणींची ही स्थिति पाहिली असतां इंग्लंडच्या शरीराला कोठें तरी मोठा रोग झालेला आहे असें म्हणणें भाग पडतें! इंग्लंडांत चांगलें पीक उत्पन्न होण्यासारख्या व पाण्याचा पुरवठा असलेल्या जमिनी ओसाड पडाव्यात आणि इंग्लंडनें

साडेचार अब्ज रुपयाची अन्नसामग्री परदेशात खरेदी करावी हा न्याय तरी कोठला ? इग्लडच्या दगडी कोळशाच्या खाणींचे इतके निरनिराळे विभाग आहेत कीं, एकदर पधराशें बोर्डातील निरनिराळे सूत्रचालक ह्या खाणींच्या बोकाडीं बसले आहेत असे म्हणतात ! हिंदुस्थानातील शेतीचे जसे ल्हान-सहान विभाग पडले आहेत तसे इग्लडच्या खाणींचे पधराशे विभाग आहेत. परदेशी मालाशीं टक्कर देण्यास असले विभाग मोडून खाणीचे मोठमोठे गट बनविल्याशिवाय व यत्रांत दुरुस्ती केल्याशिवाय सोय नाही, अशी इग्लंडच्या खाणीची नाडीपरीक्षा करण्यात आली आहे. ह्या नाडी-परीक्षेच्या रिपोर्टाला पुढें यावयास एक वर्ष लागले आणि एका वर्षात पंधरा कोट रुपयाची मदत सरकारी तिजोरीला करावी लागली. मोठे गट पाडून नवीं यत्रें आणून तरी मजुराना पोटभर मजुरी मिळेलच अशी खात्री कोणास वाटत नसल्यामुळे मजुरानीं मजुरी कमी घ्यावी असे टुमणें मजुराच्या मागे लावण्यात आलें, आणि शेवटीं सार्वत्रिक सपाचा प्रसंग ओढवला ! मजुराची मजुरी कमी करण्याचा हट्ट कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचा आहे. मजुरी कमी केल्याशिवाय शेतकीसबधानें आपलें बस्तान कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षास नीट बसविता येत नाहीं. टर्कीचें राज्य घशांत टाकून जें बस्तान बसविण्याचा मि. लॉइड जॉर्ज ह्याचा हेतु होता तेंच बस्तान बसविण्याचा हेतु मजुराच्या मजुरीवर हल्ला चढविण्यात कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचा आहे. तुर्की लढाईसारखीच ही लढाई आहे. मि. लॉईड जार्ज ह्यानीं तुर्की लढाई सुरू केली असती, तर इग्रजाची सद्दी संपली, असे फ्रान्स किंवा इटली ह्याना वाटलें नसतें. पण यादवीच्या स्वरूपाची साप्रतची लढाई असल्यामुळे आता इग्लडची सद्दी सपली, असे इग्लडच्या प्रतिस्पर्ध्यास वाटल्यास त्याबद्दल त्यास दोष कसा देता येईल ?

---

# * टिळक आणि प्रतियोगी सहकारिता

देशोद्धारे प्रवीण टिळक–सुचरित
ध्यायते तद्वरेण्यम् ।
उद्दीप्त राष्ट्रभक्त्या जनपदहृदय
यस्य कारानिवासैः ॥
बद्धाकांक्षः स्वराज्ये परिणतवचसा
भारतो यस्य जातः ।
हश्यो गीतारहस्ये विमलयतु
गुरुर्नो धियो लोकमान्यः ॥

काँग्रेसच्याविरुद्ध नोकरीवाल्या पक्षानें जे निशाण उभारलें आहे त्या निशाणाच्या बुडाशीं रिस्पॉन्सिव्ह कोऑपरेशन किंवा प्रतियोगी सहकारिता हें तत्त्व प्रमुख आहे, लो. टिळक ह्यांनीं अमृतसरच्या काँग्रेसला जात असता वाटेत बादशहाना तार करून प्रतियोगी सहकारितेचें तत्त्व पुढे आणलें आणि त्या तत्त्वाला धरूनच आजचा नोकरीवाल्याचा कार्यक्रम आखलेला आहे आणि लो. टिळक जर हयात असते तर त्यानी हाच कार्यक्रम आज उचलला असता असे नोकरीवाल्या पक्षाचें म्हणणे आहे! लो. टिळक हयात असते तर काय झाले असतें हा वाद घालीत बसण्यात हशील नाहीं. प्रसंगानुसार राजकीय परिस्थिति जसजशी बदलते तसतसे राजकारणहि बदलत जातें. तथापि राजकारण बदलत असतांना मुख्य तत्त्वाकडे दुर्लक्ष केल्याने मोठी हानि होते! लो. टिळक ह्याच्यासारख्या विभूतीच्या पुण्यतिथीच्या किंवा जयंतीच्या समारंभाचे वेळीं प्रमुख राजकीय

---

* नवाकाळ, ता. ३१ जुलई १९२६

तत्त्वें त्यांच्या चरित्रांत कशी गोवलेली आहेत आणि त्यापासून प्रोत्साहन आपण कसे घ्यावे एवढेच त्यांच्या अनुयायांनी पहावयाचें असते. लो. टिळक ह्यांच्या चरित्राकडे पाहिले असता म. मा गांधी यांच्या असहकारितेचाच मार्ग आजच्या घटकेसहि यांना पसंत पडला असता यांत संशय रहात नाही. कारण आरंभापासून इतीपर्यंत त्यांचे चरित्रच असहकारितेनें भरलेलें आहे, तथापि लो. टिळक आज म. गांधींच्या बाजूचे झाले असते किंवा दे. केळकर ह्यांच्या बाजूचे झाले असते हा वाद एका दृष्टीनें आज गौण समजला जात आहे. तेव्हा तो वाद एका बाजूला ठेवून रिस्पॉन्सिव्ह कॉऑपरेशन उर्फ प्रतियोगी सहकारिता आणि कॉंग्रेसचें धोरण ह्यासंबंधाने त्यांची मते इंग्लंडातून आल्यापासून म्हणजे डिसेंबर–जानेवारी १९१९–२० पासून जून १९२० अखेरपर्यंत कोणती होती हे केसरीमधील त्यांच्याच लेखावरून व भाषणावरून त्यांच्या जयंतीच्या व पुण्यतिथीच्या निमित्ताने वाचकांपुढे ठेवण्याचे योजले आहे. अमृतसरच्या कॉंग्रेसहून परत आल्यानंतर लो टिळक ह्यांनी ता. १९ माहे जानेवारी १९२० च्या केसरीचे अंकांत "कॉंग्रेसचा तिहेरी लढा" आणि "बादशहास टिळकांची तार आणि तिचे तारवटलेले टीकाकार" असे दोन लेख प्रसिद्ध केले आहेत. जून १९२० अखेरपर्यंत रा. खाडिलकर केसरीचे संपादक होते आणि त्यावेळी लो. टिळकांनी स्वतः रिस्पॉन्सिव्ह कॉऑपरेशन उर्फ प्रतियोगी सहकारिता आणि अमृतसरच्या कॉंग्रेसचे धोरण ह्यासंबधाने स्वतः लेख लिहून व केसरीत प्रसिद्ध झालेली भाषणे नीट तपासून लो. टिळक यांनी आपल्या मताचा उहापोह केलेला आहे. प्रतियोगी सहकारिता हा शब्द बॅ. बॅपटिस्टा ह्यांनीं प्रथम कसा सुचविला व होमरूल स्पेशलमध्ये हजर असलेल्या बॅ. बॅपटिस्टा, दे. केळकर, रा. ब. चिंतामणराव वैद्य, दे. गंगाधरराव देशपांडे वगैरे पुढाऱ्यांनी बादशहास पाठविलेल्या तारेस

समति कशी दिली इत्यादि गोष्टी सागून लो. टिळक ह्यानीं रिस्पॉन्सिव्ह को-ऑपरेशन उर्फ प्रतियोगी सहकारिता ह्याचा अर्थ स्वतः येणेंप्रमाणें दिला आहे. "Responsive (प्रतियोगी) हा शब्द सहकारितेला प्रायः लावीत नाहींत हे खरे, पण त्याच कारणामुळें प्रस्तुतच्या तारेतील ह्या शब्दाकडे टीकाकाराचें विशेष लक्ष जावयास पाहिजे होते. बादशहाच्या जाहीरनाम्यात सहकारित्वाचा उपदेश नोकरशाही आणि प्रजा या दोघासहि केला होता. टिळकाच्या मते प्रजेस हा उपदेश करणे जरूर नव्हते. कारण प्रजेच्या कल्याणाच्या गोष्टीत प्रजेने आपण होऊन कधी अडथळा आणला नाही किंबहुना आणणेंहि शक्य नाहीं. आजपर्यंत जो अडथळा आणि विरोध झाला तो सर्व नोकरशाहीचा. ही नोकरशाही जर सहकारिता करावयास तयार असेल व करील तर त्याला प्रतियोगित्वाच्या नात्याने म्हणजे जबाबाला प्रतिजबाब म्हणून लोकहि सहकारिता दाखविण्यास तयार आहे असे बादशाहास आश्वासन द्या, असा टिळकाच्या ह्या तारेचा अर्थ होता. पण एवढया खोल पाण्यात शिरावें कोणी ? आपल्याप्रमाणे टिळकहि अविचारी आणि घाईनें काम करणारे असतील अशा समजुतीनें टीकाकार टिळकावर तुटून पडले आहेत. पण मूळ पायाच जेथे खोटा तेथें टीका तरी कशी खरी ठरणार ?.. सहकारिता नेहमींच दोहों बाजूंकडे सापेक्ष असते. त्यातून जी गोष्ट प्रजेच्या कल्याणाची तींत सहकारिता करा हें प्रजेस सागावयासच नको. स्वतःच्या कल्याणास आडकाठी घालणारा मनुष्य पशु समजला पाहिजे. म्हणून सहकारित्वाचा उपदेश प्रजेस करणें योग्य नव्हतें. या कामात आजपर्यंत जर कोणी आडकाठी घातलेली असली तर ती नोकरशाहीनें. यासाठीं बादशहाच्या आज्ञेबरहुकूम सहकारिता करण्याची नोकरशाहीची तयारी असल्यास लोकहि आपल्या बाजूने सहकारिता करण्यास तयार आहेतच, नसल्यास मात्र विरोध करावा लागेल; असा टिळकाच्या तारेचा खरा मथि-

तार्थ आहे आणि ह्याच अर्थाचे शब्द जर कॉंग्रेसच्या ठरावात पहिल्यापासूनच योजण्यात आले असते तर मग त्यास कोणी विरोध केला नसता. पण हे तत्त्व पंडितजीनी आपल्या भाषणात जरी कबूल केलें होते तरी त्यानीं पुढे आणलेल्या ठरावांत "सहकारिता" येवढाच नुसता शब्द वापरला असल्यामुळे वाद माजला. आणि अखेरीस सहकारितेच्या स्वरूपाबद्दल कांहीच न बोलता नव्या ॲक्टान्वये आपल्या उन्नतीसाठीं काम करा (Work) येवढ्यावरच अखेर तडजोड करण्यात आली. पण मुंबई अगर पुणे येथे आपापल्या खोलींत सर्वज्ञत्वाच्या घमेंडीत वावरणाऱ्या लोकाना ही गोष्ट कशी कळावी?" नोकरशाहीने प्रथम सहकारिता केली पाहिजे आणि मग लोकानी सहकारिता करावयाची असे लो. टिळक ह्याचें स्पष्ट मत होतें, ह्याबद्दल वरील उतारे वाचणाराना बिलकूल संशय रहाणार नाहीं. बादशहानीं आपल्या नोकराना सहकारिता करण्यास उपदेश केला आणि राजकीय कैद्यांना सोडून दिले ह्या संबंधाची लो. टिळक ह्याची तार असून, स्वराज्याच्या दृष्टीनें मॉटेग्यू चेम्सफर्ड सुधारणाचा कायदा म्हणजे नोकरशाहीची सहकारिता असे लो. टिळक बिलकूल मानीत नव्हते. फरिदपूरच्या प्रांतिक परिषदेमध्ये कै. देशबंधु दास ह्यानी नोकरशाहीने प्रथम सहकारिता करावी मग आम्हीहि सहकारिता करू म्हणून जे तत्त्व जाहीर केले आणि ज्या तत्त्वाला धरून बंगालच्या कौन्सिलात दिवाणाच्या पगाराला मंजुरी देण्यास दे. बंधु दास ह्यानी पुन्हा नाकारले, तेच तत्त्व लोकमान्य टिळक ह्यानी वरील उताऱ्यात विशद करून ठेविले आहे. मॉटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणा म्हणजे नोकरशाहीनें प्रथम सहकारितेच्या मार्गाने पुढे केलेला हात, असे दे. बंधु दास ह्याच्याप्रमाणेंच लो. टिळक हेहि मानीत नव्हते. अमृतसरच्या कॉंग्रेसमध्ये जो लढा पडला होता तो ह्याच मुद्यासंबधानें पडला होता. सदर लढा "कॉंग्रेसचा तिहेरी लढा" ह्या मथळ्याखालीं

लो. टिळक ह्यांनी स्वतः लिहिलेल्या लेखात स्पष्टपणें मांडला आहे. अमृतसरच्या कॉंग्रेसमध्ये नेमस्तांनी भाग घेतला नाही. कलकत्त्यास त्यावेळी त्यांनी आपली निराळी परिषद भरविली. मॉटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणा म्हणजेच सरकारच्या रिस्पॉन्सिव्ह ऊर्फ सहकारिता असे समजून रिस्पॉन्सिव्ह को–ऑपरेशन सरकाराशी करता यावे म्हणून नेमस्तांनीं कॉंग्रेसमधून फुटून कलकत्त्यास स्वतंत्र परिषद भरविली. तथापि नेमस्तांशीं सगनमत करून "विझाटबार्ड व त्यांचे बड्डे कल्याण" ह्यांनी नेमस्तांच्या तर्फेचा ठराव कॉंग्रेसपुढे मांडला! प. मदन मोहन व म. गांधी ह्यांच्याहि मनात त्यावेळीं मॉटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणा म्हणजे सरकारनें पुढे केलेला हात असेच होते, आणि त्या समजुतीला अनुसरून लो. टिळक व देशबंधु ह्यांच्या पक्षास प. मदन मोहन विरोध करीत होते. मॉटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणांचा कायदा पास झाला तरी नोकरशाहीला एकसारखा विरोध करून कौन्सिलात व कौन्सिलाबाहेर टक्कर देण्याची आपली चळवळ कॉंग्रेसने बंद पाडता कामा नये व असली टक्करीची चळवळ चालविली असता साम्राज्यांतर्गत संपूर्ण स्वराज्य आपणास दहा वर्षांच्या आत प्राप्त होईल अशी रोखठोक तत्त्वे कॉंग्रेसपुढे व लोकांपुढे मांडून लो. टिळक व दे. बं. दास ह्या दोघांनी त्यावेळी राष्ट्रीय पक्षाचा झेंडा उभारला होता. आज तुम्ही टक्करीची चळवळ जर सोडून दिलीत, तर दहा वर्षांच्या आत संपूर्ण स्वराज्य तुम्हास मिळावयाचे नाही, इतकेच नव्हे तर सुधारणांचा दुसरा हप्ता दहा वर्षांचा पुढेहि यावयाचा नाही, हा लो. टिळक ह्यांचा युक्तिवाद म. गांधी व प. मदन मोहन मालवीय ह्यांना पटून मॉटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणा म्हणजे सरकारचा सहकारितेचा हात नव्हे आणि त्यासंबंधानें प्रतियोगी सहकारितेचे तत्त्व लागू करण्याचीहि जरुरी नाही असे अखेरीस अमृतसरच्या कॉंग्रेसमध्यें ठरले. प्रतियोगी सहकारितेचे तत्त्व

मॉटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणाना लागू करणारे बिझाटबाईचे व पं. मदन मोहन मालवीयाचें ठराव होते म्हणून त्यास कसून विरोध करणें काँग्रेसमध्यें भाग पडलें, असा स्पष्ट खुलासा लो. टिळक ह्यानीं आपल्या लेखात केलेला आहे. ह्यावरून प्रतियोगी सहकारितेच्या तत्त्वाची कास धरून नेमस्ताप्रमाणें किंवा बिझाटबाईच्या म्हणण्याप्रमाणें दिवाणाच्या जागा स्वीकारणें लो. टिळक ह्याना केव्हाहि समंत नव्हतें असेच सिद्ध होत आहे. दे. केळकर आज ज्या मताचा पुरस्कार करीत आहेत तीं मतें अमृतसरच्या काँग्रेसच्या वेळीं बिझाटबाई व नेमस्त पक्ष ह्यांचीं होतीं. ही मतें हाणून पाडण्यासाठीं अमृतसरच्या काँग्रेसच्या वेळीं लो. टिळक, दे. ब. दास ह्यानी अत्यत परिश्रम करून काँग्रेसमध्ये विजय मिळविला. ह्या विजयामुळें अमृतसरच्या काँग्रेसनतर जून अखेरीस आजारी पडेपर्यंत म्हणजे बनारसची ऑ. इ. कॉं. कमिटी होऊन जाईपर्यंत लो. टिळक बिझाट पक्ष व नेमस्त पक्ष ह्याजवर एकसारखे तुटून पडत होते. नोकरशाहीशीं सहकारिता करू नये म्हणून व मॉटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणा म्हणजे नोकरशाहीपुढे केलेला हात असें समजण्यात येऊं नये म्हणून, लो. टिळक ह्यानी शरीर अस्वस्थ असताहि जे एकसारखे परिश्रम केले त्या परिश्रमाना धाब्यावर बसवून देशभक्त केळकर आज बिझाटबाई व नेमस्ताना मिळाले आहेत!

---

# * कंगालखाना आणि खादी



लोकमान्य टिळक ह्यांच्या पुण्यतिथीच्या समारंभास उद्देशून म. गांधी ह्यांनीं महाराष्ट्रास पाठविलेला संदेश फार महत्त्वाचा आहे. स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि स्वराज्य मी मिळवीनच, ह्या महामंत्राचा उपदेश लो. टिळक ह्यांनीं महाराष्ट्रास व सर्व हिंदुस्थानास केला आहे. ध्येयाची जाणीव व ध्येय गाठण्याचा निश्चय, ह्या दोन भागांचा समावेश लो. टिळक ह्यांच्या महामंत्रांत झालेला आहे. आपल्या लोकांवर लो. टिळक ह्यांचा विश्वास फार होता. इतरांनीं कांहीं म्हटलें तरी आपले लोक स्वराज्य चालविण्यास पात्र आहेत, अशी लो. टिळक ह्यांची खात्री होती. स्वराज्य चालवावयास जरूर ते मनुष्यबळ, जरूर तेवढें द्रव्यबळ व लायक बुद्धिबळ हिंदुस्थानापाशीं आहे, ह्या विषयीं लो. टिळक ह्यांना बिलकूल संशय वाटत नव्हता. मुसलमान काय किंवा हिंदु काय दोघांच्याहि अंगीं ऑर्गनायझिंग पॉवर उर्फ संघशक्ति आहे. इतिहासांत हे त्यांनीं सिद्ध करून दाखविलें आहे. दिल्लीपासून दक्षिणेंत व दक्षिणेतून दिल्लीस त्यांनीं लाखों सैन्य नेलें आहे व आणलें आहे. संघशक्तीशिवाय ह्या गोष्टी होऊं शकत नाहींत. व्यापारी धोरणाचें द्रव्यबळ व यांत्रिक शक्तीची लढाई, ह्या दोन बाबींच्या आधारामुळें इंग्रजांचें बस्तान हिंदुस्थानांत बसलें, पण ह्या दोनहि बाबी अशा आहेत कीं स्वराज्याची संधी मिळाली असतांना एकदोन पिढयांच्या अवकाशांत या दोनहि बाबींसंबंधाचें वैगुण्य हिंदी पुढाऱ्यांस सहज काढून टाकतां येण्यासारखें आहे. कॉंग्रेसच्या राजकीय चळवळीच्या संस्थांवर दृढ विश्वास ठेवून स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण ह्यांची कास धरली

---

* नवाकाळ, ता. ४ आगस्ट १९२६

असता, स्वराज्य मिळण्याचा निश्चय सफल झाल्यावाचून राहणार नाहीं, असा लो. टिळक याचा कार्यक्रम होता. स्वदेशी व बहिष्कार ह्या दोन चळवळीचा उपयोग इंग्रजाच्या व्यापारी धोरणास व यांत्रिक शक्तीस तोंड देणारी नवी शक्ति उत्पन्न करण्याकडे लो. टिळक करीत असत. लो. टिळक ह्याच्या मार्गानें चळवळ केली असता राष्ट्र जागे होऊ शकते व इंग्रजाच्या शक्तीचा पाया डळमळूं लागतो, तसा अनुभव म. गांधी ह्याच्या असहकारितेच्या चळवळीच्या वेळी सर्वांना आला पण स्वदेशीची चळवळ काय, बहिष्काराची चळवळ काय किंवा असहकारितेची चळवळ काय, हरएक प्रकारची चळवळ मोठ्या लष्कराप्रमाणें पोटावरच चालत असते. पोटावर चालल्याशिवाय जोराचे धिमे पाऊल पुढें पडत नाहीं. पायाला चालावयास लावणारी शक्ति पोटात आहे. ऑर्गनायझिंग पॉवर किंवा संघशक्ति केवढीहि मोठी असली तरी पोटावर चालता येईनासे झालें म्हणजे पाय लटपटूं लागतात आणि जगातील अत्यंत संघटित व शूर लष्करालाहि माघार खावी लागते, हें महायुद्धातील जर्मनीच्या पराभवाने सर्वांच्या निदर्शनास चांगलें आणलें आहे! राष्ट्रीय सभेची शक्ति पोटावर कशी चालू शकेल, हा राष्ट्रापुढें आज मुख्य प्रश्न आहे. हिंदुस्थानातील मोठ्या कंगालखान्याच्या पोटापाण्याच्या प्रश्नाशीं जर राष्ट्रीय सभेची चळवळ संलग्न झाली नाहीं, तर दोन चार वर्षांच्या तडफेशिवाय अधिक महत्त्वाचे हत्यार राष्ट्रीय सभेच्या हातीं कधीहि दिसणार नाहीं. दोन चार वर्षांची तडफ इंग्रजी मुत्सद्दी जिरवूं शकतात, असा राजकीय चळवळीचा गेल्या वीस पंचवीस वर्षांचा इतिहास आहे. ह्या दिशेनें दोन चार वर्षांची तडफ दाखवावी आणि तडफ बंद होऊं लागली म्हणजे थोडा वेळ स्वस्थ बसून पुन्हा दुसरी संधि साधून अवचित निराळ्याच दिशेनें तडफेची लाट उसळावी, असा क्रम राजकीय चळवळींत एकसारखा दिसत आहे. तडफेचा किंवा लढ्याचा

काळ असा बदलावयाचाच. काळहि बदलावा लागतो व स्थानहि बदलावे लागतें, व तसें करताना सेनानायकाची चतुराई दिसून येते. काळ व स्थान बदलावाच लागतो. सेनानायकाची अक्कल तेथें चालूं शकत नाहीं युद्धाची सामग्री व पोटावर चालण्याची राष्ट्राची शक्ति ह्या दोन गोष्टींचा बदोबस्त मुत्सद्यानीं करावा लागतो, आणि तसा बदोबस्त झाला नसल्यास सेनानायकाचे तेज फिके पडतें! ' स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे ' ह्याची जाणीव राष्ट्राला होऊ लागली आहे. प्रत्येक तडफेच्यावेळीं ह्या जाणिवेचा पसारा अधिकाधिक वाढत गेला आहे. गोरगरिबापर्यंत ही जाणीव पसरवून इग्रजाच्या बरोबरीचे आम्ही आहोंत असे बहुजन समाजासहि म. गाधी ह्यानीं पटविले आहे. स्वराज्याची इच्छा गोरगरिबानाहि उत्पन्न झाली आहे. पण ते स्वराज्य मी मिळवीनच, हा निश्चय बहुजन समाजाचे दृष्टीस पडत नाहीं! असा निश्चय करण्यास बुद्धिमत्तेमुळें बहुजनसमाज असमर्थ आहे, अशांतला भाग मुळींच नाहीं. बुद्धीनें समजतें पण निश्चय करून त्याप्रमाणें वागणें होत नाहीं. ह्याचें कारण हिंदुस्थानदेश बडा कगालखाना झाला असून, गोरगरिबाना आपल्या पोटावर राष्ट्राची सघशक्ति वाहून नेताना किंवा राष्ट्राकरिता पोटावर चालताना अत्यत कठीण पडते, हे होय! शरीर रोजच्या रोज एकवेळेलाहि नीट रीतीनें पोसणें ज्याच्या पोटाला संकटाचें असतें त्याच्या हातून स्वतःच्या शरिराकरिता नव्हे तर राष्ट्राच्या शरिराकरिता पोटावर चालणें कसे शक्य होईल? राष्ट्रकल्याणाकरिता पोटावर चालण्याची कसरत सर्व राष्ट्राला राष्ट्रीयसभेनें शिकविणें आज भाग आहे. स्वराज्याच्या मार्गानें चाललें असताना, राष्ट्र पोटावर चालूं शकेल अशी युक्ति अमलात आणल्याशिवाय, एखाद दुसऱ्या तडफेशिवाय स्वराज्यदृष्टीनें इष्टफल राष्ट्रीय सभेला दाखविता यावयाचें नाहीं. स्वदेशी व बहिष्कार ह्या लो. टिळक ह्याच्या चळवळींतूनच खादीची चळवळ म. गाधी ह्यानीं

काढली असून, स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे, ह्या महामंत्राची पूर्तता खादीच्या मार्फत मी स्वराज्य मिळविणारच, ह्या उत्तरार्धानें म. गांधी करीत आहेत. खादीची चळवळ गोरगरिबांना पोटावर चालण्यास कशी शिकवते व गोरगरिबांमध्यें स्वाभिमान उत्पन्न होण्यास ह्या चळवळीचा फायदा किती होतो, हे बंगाल्यात सर पी. सी. रॉय, बिहार प्रांतात बाबू राजेंद्रप्रसाद, कर्नाटकात दे. गंगाधरराव देशपांडे व मद्रासचे बाजूला दे. राजगोपाळाचारियर ह्यांनीं खादीच्या चळवळीला गेल्या चार सहा महिन्यात दिलेल्या संघटित स्वरूपावरून सहज लक्षात येणारे आहे. गोरगरिबांना राष्ट्रीयसभेच्या स्वराज्याशीं व लो. टिळक ह्यांच्या महामंत्राशीं संलग्न करता येते, हें चारपांच प्रांतात प्रत्यक्ष कृतीनें वरील पुढाऱ्यांनीं सिद्ध केले आहे. प्रयोगाच्या अवस्थेतून खादी आज बाहेर पडली आहे व प्रत्यक्ष काम कोणत्या स्थितीत किती होऊं शकतें हें कोणास महाराष्ट्रात पहावयाचें असल्यास बेळगांवास दे. गंगाधरराव देशपांडे ह्यांना भेटलें असता त्याचें कार्य डोळ्यांनीं पाहून सर्व शंका दूर होणाऱ्या आहेत. खादीच्या चळवळीवर कानपूरच्या राष्ट्रीय सभेची पूर्ण श्रद्धा असल्यामुळें कानपूरच्या राष्ट्रीय सभेला धरून चाललेल्या निवडणुकींच्या चळवळींतहि खादी प्राधान्येंकरून दिसावी, हें सहाजिक आहे. खादीची चळवळ शेतकऱ्यात व खेड्यापाड्यात यशस्वी होऊं शकते, ह्यात संशय नाहीं. शहरांतल्या लोकांनीं खादी वापरण्याचा जर निश्चय केला तर राष्ट्रीय सभेच्या ह्यापुढील एखाद्या तडफेच्या लाटेच्या प्रसंगीं पोटावर चालण्याची कला राष्ट्रास साध्य होऊन, राष्ट्रीय सभेच्या स्वराज्यासंबंधाची ह्यापुढील लाट यशाला नेऊन पोंचविण्याइतकी दमदार ठरणार नाहीं काय ?

---

# * दरिद्र नारायण



हिंदु-मुसलमानांच्या ऐक्यासंबंधानें लाला लजपतराय व कॉंग्रेस पुढारी प. मोतीलाल नेहरू ह्यांजमधील तंटयांत पडून महात्माजींनीं निवडणुकीच्या वेळीं ज्ञाति-द्वेषास आळा घालावा म्हणून महात्माजींना केलेल्या विनंतीस महात्माजींचें उत्तर आम्ही कालच्या अंकांत प्रसिद्ध केलेंच आहे. येत्या निवडणुकीच्या वेळीं ज्ञातिद्वेषाची छाप निवडणुकीवर पडणार असें सर्वांचें भाकीत आहे. नोकरशाहीला हें पाहिजेच आहे. ज्ञाति-विषयक मतदारांचे संघ मोडून टाकल्याशिवाय ही आपत्ति टळणार नाहीं. ज्ञाति-विषयक मतदारांचे संघ ज्यावेळीं मॉटेग्यू-चेम्सफर्ड कायद्यांत शिरले, त्याचवेळीं ह्या आपत्तीस सुरवात झाली. असहकारितेची चळवळ जोंपर्यंत जोरावर होती, तोंपर्यंत ह्या आपत्तीचें स्वरूप पूर्णपणें लोकांच्या समोर आलें नाहीं, पण त्या चळवळीचा जोर कमी होण्याबरोबर नोकरशाहीनें गेल्या तीन वर्षांत ह्या आपत्तीस चांगलें पोसलें असून, निवडणुकीच्या वेळीं ह्या आपत्तीचा पगडा किती बसतो, ह्यासंबंधानें पुष्कळांना चिंता उत्पन्न झाली आहे. मुसलमानांनीं ज्ञाति-विषयक भांडणाचा पूर्ण फायदा घ्यावा, असें पंजाबांत व बंगाल्यांत ठरविलें असून लाला लजपतराय वगैरे हिंदूंचे पुढारी ज्ञाति-विषयक तंटयांना पुढें करून त्याच जोरावर निवडणुकी लढूं पहात आहेत. स्वराज्याचा झेंडा लाला लजपतराय ह्यांनीं आजन्म हातीं धरलेला आहे, तेव्हां ते स्वराज्याविषयीं उदासीन आहेत असें महात्माजी म्हणूं शकत नाहींत. स्वराज्य लवकर मिळणार असें मुसलमानांनाहि वाटत असल्यामुळें आपल्या वाटणीला स्वराज्याचे जेवढे फायदे येतील तेवढे

---

* नवाकाळ, ता. १० सप्टेंबर १९२६

फायदे पदरांत पाडून घेण्याची मुसलमानाची धडपड आहे. ब्राह्मण ब्राह्मणेतराच्या वादात हाच मुद्दा आहे. राजाश्रयाची वाटणी कशी करावयाची, ह्या धोरणानें हे सर्व वाद चाललेले आहेत. हे वाद बरेच विकोपास गेले असल्यामुळे महात्माजींना स्वतःच्या मध्यस्थीचा काहीं उपयोग होईल असें वाटत नाहीं. हिंदूंनीं हा वाद सोडून द्यावा तर त्याच्याकडे दुर्बलतेचा दोष येतो. दुर्बलता स्वीकारण्यापेक्षा लढण्याची तालीम करणें काहीं वाईट नाहीं, असे महात्माजींचें मत आहे मुसलमानाना व ब्राह्मणेतराना स्वराज्य नको आहे असे नाहीं. पण राजाश्रयाचा फायदा आज पाहिजे आहे. काँग्रेस राजाश्रयाच्या फायद्याकडे पूर्ण दुर्लक्ष करण्यास लोकाना शिकवीत असून, पं. मोतीलाल नेहरू ह्याचें व कानपूरच्या काँग्रेसचें धोरण हिंदु-मुसलमानाच्या वादामुळें एका बाजूस पडतें कीं काय, अशी भीति काहींना वाटत आहे. ही भीति निराधार आहे असे नाहीं, पण ह्या भीतीमुळे साम्प्रतच्या लढयात आपण स्वतः पडावें, असे महात्माजींना वाटत नाहीं. जातिद्वेषाचें भाडण त्याना नको आहे. जातिविशिष्ट अभ्युदय स्वराज्याची पायरी होय, असें समजून त्या दृष्टीनें काम करणे इष्ट नाही असे त्याचे स्पष्ट मत आहे. शिवाय त्याच्या स्वभावासहि हें काम बिलकूल मानवणारें नाहीं. तेव्हा हिंदु–मुसलमानाच्या तट्यात मन न घालण्याची आपली साम्प्रतची प्रवृत्ति सोडून देण्यास ते तयार नाहीत. भाडण मिटवा असे सागण्यापेक्षा भाडण विकोपास गेलें असता काहीं दिवस मध्यस्थी न करणें हेंच योग्य होय. स्वराज्याची इच्छा जसजशी बळावत जाईल तसतशी असल्या भाडण्याचीहि प्रवृत्ति कमी झाल्यावाचून रहाणार नाहीं. आश्रमाच्या कामाकरता व प्रकृतीच्या स्वास्थ्याकरतां महात्माजींनीं आपले दौरे बंद ठेवले आहेत. हे दौरे पुन्हा निघाल्यानंतरहि हिंदु–मुसलमानाच्या तेढीसबधानें महात्माजी उद्योग करणार आहेत,

अशांतला भाग मुळींच नाहीं. तो प्रश्न मुळीं त्यांनीं स्वतःच्या चळवळींतून गाळून टाकला आहे. अस्पृश्यता–निवारण, राष्ट्रीय शिक्षण व खादी एवढ्यासंबंधाच्याच चळवळी त्यांनी आपल्याकडे घेतल्या असून, कॉंग्रेसच्या चळवळीचा पुढारीपणा स्वराज्य पक्षाकडेच त्यांनीं दिला आहे. पं. मोतीलाल नेहरू व कॉंग्रेसचे इतर पुढारी कौन्सिलात व कौन्सिलाचे बाहेर स्वराज्यासंबंधानें जे काम करीत आहेत, ते महात्माजींना नापसंत नाहीं. कौन्सिलात काम करण्याची त्याची स्वतःची इच्छा नाही आणि कौन्सिलाच्या द्वारें स्वराज्य मिळेल अशी त्याची श्रद्धाहि नाही. बहुजन समाजात वास करीत असलेला दरिद्र–नारायण जर खादीच्या आराधनेमुळें प्रसन्न झाला तर परदेशी कापडावरील बहिष्काराची तयारी झाली अशी महात्माजींची निष्ठा आहे. खादीची उत्पत्ती व खादीची विक्री ह्याच्या-संबंधाचीं कामे आता व्यवस्थितपणें होऊं लागलीं असून, हें काम सावपणानें होत असलें तरी मजबूत आणि टिकाऊ स्वरूपाचें होत आहे, असा महात्माजींचा अनुभव आहे. खादीची उत्पत्तीहि वाढली आहे आणि विक्रीहि वाढली आहे. व्यवस्था आणि पद्धत उत्पत्तीला व विक्रीला लागली असल्यामुळें मोठ्या प्रमाणावर पूर्वीपेक्षा चांगली खादी निघत आहे. बहुजनसमाज दरिद्री आहे आणि दारिद्र्यातच स्वतःचा उद्धार करून घेण्याची जी शक्ति परमेश्वरानें ठेवली आहे ती शक्ति दरिद्री लोकांनीं आत्मयज्ञानें जर जागी केली तर दरिद्री लोकातच परमेश्वराचें आसन येऊन पडल्यावाचून रहात नाहीं. दारिद्र्याचा महिमाच असा आहे. स्वतःचीं दुःखें स्वतःच निवारण करून घेण्याचें सामर्थ्य दारिद्र्यात आहे. ह्या सामर्थ्यास दरिद्र-नारायण असे म्हणतात. ह्या दरिद्र–नारायणाची आराधना महात्माजींनीं आरंभली असून, आणखी दोन महिन्यानंतर विश्रांतीचा काळ संपल्यावर ह्या दरिद्र–नारायणाचे आराधनेकरता दौरे किंवा

निरनिराळ्या यात्रांचे प्रवास महात्माजी करणार आहेत. बहुजन समाज हिंदु-मुसलमानाच्या दग्यापासून किंवा ज्ञातिद्वेषापासून अलिप्त आहे. बहुजन समाजांतील दरिद्र-नारायण खादीच्या बाजूचा आहे. कॉंग्रेसचा पक्ष निवडणुकींत आज गुग असला तरी उद्या ह्या दरिद्र-नारायणाचीच सेवा करणें कॉंग्रेसच्या पक्षाला भाग आहे. स्वराज्याची जमीन जसजशी अधिक वाढत जाईल तसतशी दरिद्र-नारायणाची सेवा हितकर वाटूं लागेल, आणि ज्ञातिवैषम्य एका बाजूस टाकण्याची प्रवृत्ति दिसूं लागेल, ह्यांत संशय नाही. आज ना. शास्त्री ह्यांच्यासारखे नेमस्तहि युरोपियनाचे ज्ञातिविषयक मतदार संघ काढून टाका म्हणजे मुसलमानहि ज्ञातिविषयक मतदार संघ काढून टाकण्यास तयार होतील, असे जोराने प्रतिपादन करूं लागले आहेत. दरिद्र-नारायण जसाजसा जागा होत जाईल तसतसे पुढाऱ्यांनाहि ज्ञाति-विषयक प्रश्नाकडे दुर्लक्ष करणें महत्त्वाचें वाटूं लागेल हें उघड आहे. खादीच्या मार्फत दरिद्र-नारायणाची उपासना करणारानीं हिंदु-मुसलमानाच्या तेढीस फाजील महत्त्व देऊं नये आणि ह्या तेढीमुळे सर्वच घर कोसळतें कीं काय अशा भीतीने गांगरून न जाता निवडणुकीच्या वेळीं खादीला अनुकूल असलेल्या कॉंग्रेसच्याच पक्षास आपलीं मतें देण्यास तयार व्हावे, हाच सांप्रतच्या ज्ञाति-द्वेषाच्या प्रसगीं खऱ्या देशभक्तीचा मार्ग आहे.



# * साम्राज्य आणि हिंदुस्थान

इंग्रजी साम्राज्यातील प्रमुख वसाहतींना साम्राज्य परिषदेमध्यें बरोबरीचा दर्जा देऊन व परराष्ट्रांत आपले वकील नेमण्याची परवानगी देऊन इंग्लंडनें आपल्या साम्राज्याची वाटणी निरनिराळ्या भाऊबंदांत आज करून टाकली आहे. गोडीगुलाबीनें अशी वाटणी केल्यामुळें एकमेक एकमेकांच्या मदतीस संकट-समयीं आणि नेहमींच्या व्यवहारांत पुढें येतील अशी इंग्रज मुत्सद्यांची अटकळ आहे या अटकळीसंबंधानें अमेरिका व फ्रान्स येथें निरनिराळीं मतें प्रसिद्ध झालीं आहेत गोडीगुलाबीच्या ह्या विभक्तपणामुळें इंग्लंडची शक्ति वाढेल असें अमेरिकेंतील कांहीं पत्रांचें म्हणणें आहे. गोडीगुलाबीच्या ह्या विभक्तपणाकडे पाहिलें असतां अमेरिकेला देखील इंग्रजी साम्राज्याचा घटकावयव समजण्यास हरकत नाहीं, अशी कांहींची टीका आहे. महायुद्धाच्या वेळीं अमेरिकेनें इंग्लंडला मदत केली. अमेरिका जर इंग्लंडच्या वतीनें महायुद्धांत पडली नसती तर महायुद्धाचा निकाल इंग्लंडच्या विरुद्धच झाला असता. इंग्लंडच्या सर्व दोस्तांना अमेरिकेनें जर भले मोठें कर्ज दिलें नसतें तर जर्मनीची सरशी रणांगणावर खात्रीनें झाली असती. अमेरिकेनें इंग्लंडला एवढी मोठी मदत कां केली? इंग्रजी भाषा, इंग्रजी संस्कृति आणि इंग्रजी रक्त ह्या बंधनांनीं अमेरिका इंग्लंडशीं जखडली गेलेली आहे. इंग्रजी भाषा, इंग्रजी संस्कृती व इंग्रजी रक्त याजवर जेव्हां जेव्हां संकट येईल, तेव्हां तेव्हां अमेरिका इंग्लंडच्या मदतीस धांवल्यावाचून रहाणार नाहीं. इंग्रजी संस्कृतीच्या दृष्टीनें विचार केला असतां आज अमेरिका, इंग्लंड व इंग्लंडच्या वसाहती इतके देश मिळून इंग्रजी साम्राज्य होय असें म्हणणें भाग पडतें,

---

* नवाकाळ, ता. २४ नोव्हेंबर १९२६

आणि हे भलें मोठे इंग्रजी साम्राज्य फ्रान्स, जर्मनी, इटली वगैरे युरोपियन राष्ट्रांच्या सामान्य संस्कृतीला आशियाटिक राष्ट्राविरुद्ध उचलून धरणारें असल्यामुळें युरोपियन राष्ट्रें इंग्रजी साम्राज्याला आशिया खंडांत व इतर ठिकाणीं धोका आणूं इच्छित नाहींत. युरोपियनांची संस्कृति व इंग्रजांची संस्कृती असे दोन विभाग स्वतंत्र असून, महायुद्धामुळे इंग्रजी संस्कृति आज जगांत मुख्य झाली आहे. ह्या इंग्रजी संस्कृतीच्या दृष्टीनें इंग्रजी मुत्सद्दी स्वतःच्या साम्राज्याकडे पहात असल्यामुळे, स्वतःच्या वसाहतींना बरोबरीचा दर्जा देण्यास आणि अमेरिकेच्या कक्षेत कांही वसाहती फिरू लागल्यास त्यांना अडथळा न करण्यास तयार झाले आहेत. अमेरिका बंड करून इंग्रजी साम्राज्यांतून फुटून गेली तरी अखेरीस महायुद्धाच्या वेळीं उपयोगी पडली, असा इंग्रजी मुत्सद्यांना अनुभव आलेला आहे. मग बरोबरीचा दर्जा देण्याचें नाकारून वसाहतींना तरी नाखूष कां करा, अशी इंग्रजी मुत्सद्यांची विचार-सरणी आहे. अमेरिकेच्या महायुद्धांतील मदतीने इंग्रजी संस्कृतीचा जो प्रभाव एकदम दृष्टीस पडतो, तो प्रभाव म्हणजे इंग्रजी साम्राज्याची नेहमींची शक्ति नव्हे आणि त्या प्रभावाला अनुसरून जर वसाहतींचा विभक्तपणा मान्य करण्यांत आला तर इंग्रजी साम्राज्य केवळ शब्दांत शिल्लक रहातें, अशी फ्रेंच पत्राची टीका आहे. लंडन शहर महायुद्धापूर्वी जगाच्या सावकाराचें माहेरघर होतें. आज महायुद्धानंतर जगाची सावकारी अमेरिकेकडे गेली आहे, तथापि वसाहती व हिंदुस्थान ह्यांना पुरण्याइतकी सावकारी लंडनांत अद्याप शिल्लक आहे. संपामुळे, उद्योगधंद्यांतील पिच्छेहाटी-मुळे आणि वसाहतींच्या वाढत्या संपत्तीमुळे लंडन शहरची सावकारी जसजशी नष्ट होत जाईल, तसतशी व्यवहारांतील वसाहतींवरील इंग्लंडची छाप नाहिशीं होईल, असें फ्रेंच पत्राचें म्हणणें आहे. वसाहतींची सावकारी इंग्लंडकडे आहे व इंग्लंडची सावकारी अमेरिकेकडे आहे.

इंग्लंडकडे असलेली वसाहतींची सावकारी हलके हलके अमेरिकेकडे जाईल आणि मग हल्लींच्या एकोप्यांचें इंग्रजी साम्राज्य दृष्टीस पडणार नाहीं, असा फ्रेंच पत्राचा कयास आहे. इंग्रजी पैसा, इंग्रजी संस्कृति व इंग्रजी साम्राज्य, ह्याची स्थिति वरील प्रकारची असल्यामुळे हिंदुस्थानकडे पहाण्याचा इंग्लंडचा दृष्टिकोनहि आपोआप बदलला आहे. महायुद्धाच्या वेळीं अमेरिकेच्या हातीं इंग्लंडची सावकारीच तेवढी होती असे नव्हे तर लष्करी शेंडीहि अमेरिकेच्या हाती गेली होती. इंग्रजी संस्कृतीचा पुढारीपणा आज अमेरिकेकडे अप्रत्यक्षपणे आहे, पण महायुद्धाच्यावेळीं तो प्रत्यक्षपणें होता. जबाबदार राज्यपद्धतीच्याविरुद्ध जर्मनी आहे असे म्हणून अमेरिका महायुद्धात सामील झाली इंग्रजांच्या ह्या प्रौढीला कमीपणा येऊ नये म्हणून हिंदुस्थानात मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणाच्या स्वरूपानें जबाबदार राज्यपद्धतीचें नासकें कुसके बीज पेरण्यात आलें! आज अमेरिका युरोप-खंडाच्या भानगडीपासून अलग झालेली असल्यामुळे अमेरिकेकडे इंग्रजी संस्कृतीचा पुढारीपणा उरलेला नाहीं. अर्थात् जबाबदार राज्यपद्धतीची उभारणी व जोपासना हिंदुस्थानात करण्याचें तितकेसे प्रयोजन इंग्लंडला राहिलेले नाहीं. साम्राज्य परिषदेनें वसाहतींचा दर्जा देताना हिंदुस्थानच्या वाटणीला मॉंटेग्यू-चेम्सफर्ड कायद्यातील बंधनाशिवाय दुसरें काहींहि देण्यात आलेले नाहीं! वसाहतींची सावकारी इंग्लंडकडे जरी आज असली तरी वसाहतींत मजुरांच्या पक्षाचीं मतें विशेष जोरानें पोसलीं जात असल्यामुळें इंग्लंडची सावकारी वसाहतींपेक्षा हिंदुस्थानकडे अधिक लोभी नजर टाकील, ह्यात संशय नाहीं. इंग्रजी साम्राज्यात इंग्लंडचें महत्त्व जसजसे कमी होत जाईल, तसतसे सावकार ह्या नात्यानें इंग्लंड हिंदुस्थानच्या बोकांडी अधिक बसेल हें सांगणें नकोच! तेव्हा वसाहतींचा विभक्तपणा सावकारीच्या दृष्टीनें हिंदुस्थानास जाचक ठरल्यावाचून रहाणार नाहीं. इंग्लंडच्या

भांडवलशाहीचा मोठा बोजा हिंदुस्थानच्या डोक्यावर येऊन बसणारा आहे! लष्करी व आरमारी दृष्टीनें विचार केला असताहि वसाहतींना विभक्तपणा हिंदुस्थानचें रक्तशोषण अधिक केल्यावाचून रहाणार नाहीं, असेंच म्हणणें भाग पडतें. संकटसमयीं अमेरिकेप्रमाणें वसाहती इंग्लंडच्या उपयोगीं विभक्तपणामुळे विशेष पडतील, ही गोष्ट खरी आहे; पण इंग्लडच्या जिवावर बेतेल त्यावेळचा हा उपयोग आहे. जिवावर बेतण्याच्या अगोदरच्या व्यवहारांत वसाहतींच्या विभक्तपणामुळे तलवार उगारण्याची इंग्लडची शक्ति कमी झालेली आहे. हुकमतशीर तलवार उगारण्याची शक्ति हिंदुस्थानच्या पैशानें वाढवून व ती हिंदुस्थानची शक्ति एकट्या इंग्लडच्या मनगटांत साठवून वसाहतींच्या विभक्तपणामुळें आलेला कमजोरपणा इंग्लडला भरून काढणे भाग आहे. वसाहती विभक्त झाल्या ह्यामुळे हिंदुस्थानच्या बोकांडी इंग्लडची सावकारी अधिक जोरानें बसून हिंदुस्थानच्या कपाळचें आरमारी व लष्करी दास्य अधिक दृढ होणारें आहे. अशा स्थितींत मॉटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणाच्या स्वरूपाचें जबाबदार राज्यपद्धतीचें अधुक चिन्ह तेवढें कायम ठेवून, स्वराज्याच्या भरीव हक्कासंबंधानें इंग्लडनें हिंदुस्थानची फसवणूक करूं नये तर काय करावे!

---

# * एकी आणि कॉंग्रेस



संयुक्त प्रांताच्या प्रांतिक परिषदेला संदेश पाठवितांना म. गांधी ह्यांनीं खादीशिवाय स्वराज्य मिळणार नाहीं अशा तऱ्हेचे उद्गार काढले आहेत; पं. मोतीलाल नेहरू ह्यांनीं सदर परिषदेला कॉंग्रेसचा पक्ष हिंदुस्थानभर कौन्सिलांत व असेंब्लींत पूर्वीइतकाच सबळ असून गेल्या तीन वर्षांच्याच टक्करी पुन: असेंब्लींत दृष्टीस पडतील, असें कळविलें आहे; आणि पं. मदन मोहन मालवीय ह्यांनीं सर्वांची एकी व्हावी असा आशीर्वाद परिषदेला दिला आहे. गोहत्तीच्या कॉंग्रेसपुढें वरील तीनहि प्रकारचीं मतें प्राधान्ये-करून येतील ह्यांत संशय नाहीं. म. गांधी हे ता. २४ डिसेंबर रोजीं गोहत्तीस जाऊन पोहोंचणार आहेत. महाराष्ट्रांतील नोकरीवाला पक्ष गोहत्तीच्या कॉंग्रेसमध्यें फारशी लुडबुड करील अशीं चिन्हें दिसत नाहींत. नागपुरांत असेंब्लीकरतां डॉ. मुंजे निवडून आले असले तरी त्यांचें सहकार्याचें मत मध्यप्रांताच्या निवडून आलेल्या सभासदांनीं जबलपूरच्या खलबतांत नष्ट केलें असून, दिवाणाच्या जागा कोणी स्वीकाराव्या ह्या संबंधानें डॉ. मुंजे ह्यांच्या मताला बिलकूल किंमत उरलेली नाहीं. डॉ. मुंजे म्हणतील तो दिवाण होईल अशी तीन वर्षांपूर्वीची स्थिति होती, आज दिल्लीच्या असेंब्लींत मी जाऊन पडलों आणि नागपुरांतील दिवाणगिऱ्या स्वीकारण्यासंबंधींच्या बदनामीपासून मी वांचलों, असें म्हणण्याची पाळी डॉ. मुंजे ह्यांजवर आली आहे! वऱ्हाडांत दे. अणे ह्यांच्या चार पैशांतला एक पैसा कसाबसा शिल्लक राहिला आहे आणि नोकरीवाल्याची किंमत पैशांनीं न मोजतां पैनीं मोजणें भाग पडलें आहे. मुंबईस नोकरीवाल्यांना

---

* नवाकाळ, ता. १२ डिसेंबर १९२६

दिवाण किंवा अध्यक्ष ह्यापैकीं एखादी जागा मिळविण्याकरिता बॅ. जयकर ह्याची झोळी हातात घेऊन भिक्षादेही करावी लागत आहे! बालेकिल्ल्यांत मताधिक्याच्या जोरावर शिरण्याच्या गप्पा पार विलयास गेल्या असल्यामुळें गोहत्तीस महाराष्ट्रातील नोकरीवाले आपल्या वतीनें बोलण्याची सुपारी ठाकुरद्वारच्या भिक्षुकाचे हातीं देऊन स्वस्थ बसतील ह्यांत संशय नाहीं! लाला लजपतराय ह्यांनीं कॉंग्रेसच्याहि संस्था पाहिजेत आणि महासभेच्याहि संस्था पाहिजेत असें म्हणण्यास प्रारंभ केला असून, आपसातील दुही होईल तितक्या लवकर मिटविली पाहिजे, असें आपलें मत लालाजींनीं पंजाबात प्रसिद्ध केलें आहे. अर्ल विंटरटन हिंवाळ्यात हिंदुस्थानात यावयास निघाले असल्यामुळे नाताळच्या सुट्टींत हिंदुस्थानात येऊन पोहोंचल्याबरोबर त्याच्या कानावर कॉंग्रेसमधील एकीच्या बातम्या प्रथम धडकल्या पाहिजेत असें म्हणणारा एक पक्ष पुढें आला आहे. कॉंग्रेसमध्ये एकी कशी व्हावयाची? आम्ही नोकरीवाले आहोंत असे कॉंग्रेसनें जाहीर केल्यानें अर्ल विंटरटन आणि कॉन्झर्व्हेटिव पक्ष ह्यांजवर कोणता परिणाम होईल? अर्ल विंटरटन हिंदुस्थानात येत आहेत ते हिंदी स्वराज्याच्या काळजीमुळें येत आहेत अशातला भाग मुळींच नाहीं. हिंदुस्थानात इंग्रजी माल अधिक कसा खपेल आणि नव्या आरमाराकरिता व नव्या विमानाकरिता हिंदुस्थानच्या तिजोरींतील पैसे सिंगापूरच्या रोखानें कसे खर्च करता येतील, ही मुख्य काळजी अर्ल विंटरटन ह्याना लागली आहे. ह्या काळजीच्या पायीं स्वराज्याचे काहीं हक्क हिंदुस्थानास नवे कमिशन लवकर पाठवून देण्यास कॉन्झर्व्हेटिव पक्ष कसा तयार होईल? ठिकठिकाणच्या कौन्सिलातील व असेंब्लींतील जमाखर्चाचे खर्डे बिनबोभाट पास होऊन कौन्सिलांतील व असेंब्लींतील आमदारानीं करासबंधानें देशभर असंतोष पसरविण्याची चळवळ केली नाहीं म्हणजे नोकरशाहीचें काम भागत असतें. असेंब्लींतील टक्करीमुळें

नोकरशाहीला पैशाची तूट पडते असे बिलकूल नाहीं. बजेट फेटाळलें तरी सर्टिफिकिटाच्या जोरावर पाहिजे तो खर्च पाहिजे त्या ठिकाणीं मजूर करून घेता येतो. टक्करीचा उपयोग खर्च तोडण्याच्या कामी होत नाही, तर लोकात जागृति उत्पन्न करण्याच्या कामीं होतो. टक्करीचा असा उपयोग करून बहिष्कार व खादी ह्याची चळवळ राष्ट्रात जोरानें होऊं नये अशी नेमस्ताची इच्छा आहे आणि त्याच इच्छेला महाराष्ट्रांतील नोकरीवाला पक्ष बळी पडला आहे. बहिष्कार व खादी ह्याची चळवळ पसरूं नयें अशा धोरणाने जर कॉंग्रेसमध्ये एकी झाली तर स्वराज्याचें पाऊल त्या एकीमुळें बिलकूल पुढें न पडता अर्ल विंटरटन ह्याना आयते फावणारें आहे. कॉंग्रेसमध्यें एकी होऊन जर गेल्या तीन वर्षांप्रमाणेच नव्या कराना अडथळा करण्यात आला व बजेट फेटाळून देण्यात आलें तर तसल्या टक्करींच्या आघाताचा प्रत्याघात लोकाच्या मनावर होणारा असल्यामुळे बहिष्कार आणि खादी ह्याची चळवळ करणाराना टक्करीमुळें प्रोत्साहन मिळणारें आहे. पानगलच्या संप्रदायावर विसंबून राहून खादीची, स्वराज्याची व कॉंग्रेसची चळवळ हाणून पाडता येईल हा जो नोकरशाहीला इतक्या दिवस भ्रम होता, त्या भ्रमाचा भोपळा मद्रासनें फोडला आहे, मुसलमानावर विसंबून राहून हिंदूंना ठेचण्याचेंहि धोरण अगलट आल्याशिवाय रहाणार नाहीं असे एशिया खडाची परिस्थिति नोकरशाहीला बजावीत आहे; अशा स्थितींत कॉंग्रेसनें एकी करून दिवाणगिऱ्याच्या स्वीकारण्याचें साफ नाकारून कौन्सिलांत व असेंब्लींत जोरकस विरोध जर सुरू केला तर कौन्सिल-बाहेरची बहिष्काराची व खादीची चळवळ झपाट्यानें पुढें सरसावल्या-वाचून रहाणार नाहीं. पानगलच्या संप्रदायाचा फोलपणा आणि मुसल-मानाची एशिया खडातील नवी जागृति ह्याचा योग्य परिणाम नोकरशाहीच्या मनावर होत असतांना कौन्सिलातील विरोधाचे आणि कौन्सिलाबाहेरच्या

खादीच्या चळवळीचे जोराचे धाव अर्ले विंटरदन ह्याच्या मतावर घालणें फार जरुरीचें आहे. ह्या धोरणानें स्वराज्याचें कल्याण होणार आहे. हें धोरण उचलून धरताना लाला लजपतराय किंवा प. मदन मोहन मालवीय कॉंग्रेसच्या विरुद्ध जातील असातला भाग नाहीं. म. गांधी ह्यांना हें धोरण नापसंत होणारें नाहीं. महाराष्ट्रांतील नोकरीवाले कॉंग्रेसच्या ह्या असल्या एकीला विरोध करतील काय?



# * स्वामी श्रद्धानंद

स्वामी श्रद्धानद ह्याच्या दिल्ली येथे झालेल्या आकस्मित व अत्यंत खेदजनक खुनामुळे सर्व हिंदुस्थान विस्मयचकित व दुःखीकष्टी झाल्यावाचून रहाणार नाहीं. हिंदु-मुसलमानाच्या ऐक्याचा विचार केला असता एखाद्या मोठया दग्याहूनहि ह्या खुनाचे फार अनिष्ट परिणाम होतील असे म्हणणे भाग पडते. मोठया दग्यास सुरवात झाल्यावर दग्यात होणारी प्राणहानि लढाईच्या स्वरूपाची असते आणि तसल्या लढाईचें वारें निघून गेल्यानतर त्या प्राणहानीकडे कोणाचेहि लक्ष वेधून रहात नाहीं. पण स्वामी श्रद्धानद ह्याच्या खुनासारख्या अत्यंत हिडीस अत्याचारानी सर्व समाजाच्या मनाला झालेल्या जखमा भरून येण्यास फार वेळ लागतो. स्वामी श्रद्धानंद हे सन्यागातले मोठे साधुपुरुष होते व मुसलमानाचेहि पुढारी "बहादूर पुरुष" ह्या नात्याचा स्वामीजींचा गौरव करण्यास मागे पुढे पहात नसत. कलकत्त्याच्या दग्यानतर हिंदु-मुसलमानातील दगे शांत झाले होतें, आणि दिल्लीत सुद्धा मुसलमान बाईला किंवा हिंदु बाईला पळवून नेण्याच्या आरोपावरून एकमेकावर फिर्यादी चालवण्यापलीकडे हिंदु-मुसलमानाच्या वैमनस्यास अलीकडे जोर उरलेला नव्हता. अशा स्थितींत स्वामी श्रद्धानद ह्याचा झालेला हिडिस खून, रतापाचें कोणतेंहि कारण नसताना स्वामीजींना मारून उलट पक्षाला एकदम कमजोर करण्याच्याच नीच हेतूनें झाला असला पाहिजे असे म्हणणें भाग पडतें. निवडणुकीच्या संबधानें मनोविकार चिडलेले असताना तसल्या त्रस्त स्थितींत एखाद्या मुसलमान माथेफिरूनें हा खून केला, असें

* नवाकाळ, ता. २५ डिसेंबर १९२६

म्हणावें तर निवडणुकींत स्वामी श्रद्धानद ह्यानीं प्रमुखपणा मुळींच घेतला नव्हता, इतकेंच नव्हे तर हिंदुमहासभेच्या तर्फे उमेदवार उभे करण्यात काहीं हशील नाहीं असा आपला स्पष्ट सिद्धात स्वामीजीनीं निवडणुकीच्या पूर्वी जाहीर केला होता. निवडणुकीच्या काळात स्वामी श्रद्धानद सदरच्या सिद्धाताला सोडून केसभरहि वागले नाहींत हें ध्यानात ठेवण्याजोगे आहे. काहीं मुसलमान पुढाऱ्याशीं स्वामी श्रद्धानद ह्याचा स्नेह चागल्यातला होता व डॉ. अनसारी ह्याजवर त्याचा पूर्ण विश्वासहि होता. नव्हेंबर अखेर-पासून स्वामीजी न्युमोनियानें व इन्फ्लुएझानें अथरुणावर पडूत होते. खोलींतल्या खोलीतहि हालण्याचालण्याची त्याना शक्ति नव्हती, आणि डॉ. अनसारी ह्याच्या औषधोपचारामुळेच खुनापूर्वी चार पाच दिवस त्याचा ताप थांबला होता. १९२३ सालापासून म्हणजे मलकानाच्या शुद्धिप्रकरणापासून मुसलमानाचा समाज निष्कारण स्वामीजींकडे वाईट दृष्टीनें पाहू लागला. खिलाफतीच्या चळवळीच्या वेळीं व सत्याग्रहाच्या वेळीं स्वामी श्रद्धानद ह्याजवर मुसलमानाचा इतका मोठा विश्वास होता कीं, दिल्लीच्या चादणी चौकात पाच पाच दहा दहा हजार हिंदूंबरोबर पाच पाच दहा दहा हजार मुसलमानहि त्याच्या मागोमाग चालण्यास नेहमीं हजर असत. दिल्लीच्या जुन्या मशिदीत राष्ट्रीय प्रश्नासबधानें मुसलमानाना उपदेश करण्याचा मान एकवेळीं मुसलमानानीं स्वामी श्रद्धानद ह्याना दिला होता, हें विसरता कामा नये. दिल्ली येथील म. गाधी ह्याच्या मोठया उपवासाचे वेळीं हिंदु–मुसलमानात तडजोडीची जी परिषद भरली होती, त्या परिषदेमध्येहि हिंदु–मुसलमानाची एकी घडून यावी म्हणून स्वामी श्रद्धानद ह्यानीं प्रामुख्यानें भाग घेतला होता. शुद्धि व सघटन ह्यासबधाने स्वामी श्रद्धानद ह्याचे विचार केव्हाहि सकुचित नव्हते. एखाद्या हिंदूचा मुसलमान जर करता येतो तर मुसलमानाचा हिंदूहि करता आला पाहिजे;

आणि तसा कोणी हिंदु झाला असता किंवा एखाद्याजवळून नेलेल्या व नाइलाजाने मुसलमान झालेल्या एखाद्या बाईस पुन्हा हिंदु केलें असता मुसलमानानी वृथा रागावण्याचे कारण नाही, असे स्वामी श्रद्धानद ह्याचें म्हणणें होते. पजाबात व दिल्ली–लखनौकडे गोपाची चाल फार कडक आहे. गरीब व अनाथ बाईस मुसलमानानीं पळवून नेलें असता तिचा पत्ता कोणासहि न लागून तिला मुसलमानी धर्म स्वीकारण्याच्याशिवाय गत्यतर रहात नाहीं. असल्या गरीब अबलाना पुन्हा शुद्ध करून घेतलें पाहिजे, असा स्वामी श्रद्धानद ह्याचा आग्रह होता आणि असल्या फसवणुकीची बातमी कानीं पडल्याबरोबर बाईचा पत्ता लावून तिला शुद्ध करून घेण्याच्या कामीं स्वामीजी केव्हाहि आळस करीत नसत. ह्यामुळें त्याचें दिल्लीचे घर म्हणजे पळवून नेऊन मुसलमान करण्यांत आलेल्या बायाबापड्याच्या आप्तइष्टानीं करावयाच्या तक्रारींची चावडीच होऊन बसलें होतें. अनाथाची हाक ऐकण्याची साधुवृत्ति अगात पूर्णपणें मुरल्यामुळेंच स्वामीजींचा खून होऊन आपल्या जिवाचाहि बळी स्वतःच्या आवडत्या चळवळीसाठीं त्याना द्यावा लागला, ह्यात सशय नाहीं. आपला अंत अशा रीतीनें होईल असें स्वामी श्रद्धानद ह्याना मलकाना शुद्धीची चळवळ जोरावर असताना एक दोन वेळा वाटलें होतें. तशा धमकीचीं पत्रें त्याना गेलीं होतीं. पण अलिकडे तो काळ निघून गेला अशीच सर्वांची समजूत होती. आर्य समाज, हरिद्वारचे गुरुकुल, सत्याग्रह व शिखाचें गुरुकाबाग प्रकरण, ह्या प्रसगाना स्वामी श्रद्धानद ह्यानीं आपलें सर्वस्व अर्पण केलें होतें आणि आता त्यांचा खून झाल्यामुळें त्यानीं अगीकृत कार्याला पूर्णाहुती दिली असे म्हणण्यास हरकत नाहीं. डॉ. अनसारी, म. हंसराज आणि दिवाण चमणलाल ह्यानी सर्व हिदु–मुसलमानाना ह्या हिडीस खुनाचे प्रसंगी शात वृत्तीनें रहाण्याचा उपदेश केला आहे आणि तो उपदेश पंजाब व संयुक्तप्रात

येथें सर्वतोपरी मानण्यात येईल असा आम्हास भरवसा वाटत आहे. आपण काय करीत आहों व कोणत्या भलत्या दिशेनें जात आहों ह्या संबंधाचे योग्य विचार जर मुसलमानी समाजात ह्या खुनामुळें जागृत झाले, तर खुनी इममाच्या पिस्तुलाला स्वामी श्रद्धानंद ह्यांच्या जिवाची पडलेली आहुती निष्फळ झाली असें होणार नाहीं. खुद्द अफगाणिस्थानातलेहि मुसलमान हिंदु आमचे वडीलबंधु होत व पूर्वी आम्ही हिंदूच होतो, असे म्हणूं लागले असून हिंदूंना उद्देशून 'काफर' हा शब्द आजकाल ते वापरत नाहींत. गोहत्या व मशिदीपुढे वाद्ये वाजविणे ह्या दोनहि बाबींत हिंदुस्थानातील मुसलमान चूक करीत आहेत, असेच अफगाणिस्थानच्या सुशिक्षित मुसलमानाचें मत आहे. आपल्या चुकीचें हिडीस स्वरूप डोळ्यापुढे नीट प्रत्यक्ष उभें राहिल्याशिवाय मनुष्याला सुविचार सुचत नाहींत. हिंदुस्थानातील सुशिक्षित मुसलमानाना अफगाणिस्थानच्या नव्या सुशिक्षिताची दृष्टि नाही असे नाहीं. मुसलमानाच्या खालच्या समाजापुढे आपलें काहीं चालत नाहीं म्हणून गप्प बसणारे सुशिक्षित मुसलमान पुढारी स्वामी श्रद्धानंद ह्यांच्या खुनानंतर गप्प बसणे जर सोडून देतील तर स्वामी श्रद्धानंद ह्यांचा अत्यंत खेदजनक अंतकाळहि राष्ट्राच्या उपयोगी पडला, असे ठरणार नाहीं काय ?



# * कॉंग्रेस व खादीचे नोकर

गोहत्ती कॉंग्रेसच्या मंडपात खादीचा व कॉंग्रेसचा संबंध तोडण्याचा प्रयत्न काहींनीं केला, पण त्या प्रयत्नास मुळीच यश आलें नाहीं. कौन्सिल व असेंब्ली ह्यांच्या बाहेरची चळवळ आणि कौन्सिलांच्या आतील चळवळ ह्यांचा निकट संबंध असला पाहिजे, आणि हा संबंध खादी वापरण्यानें राहू शकतो असे गौहत्तीच्या कॉंग्रेसने ठरविलें असून, कॉंग्रेसच्या हरएक प्रकारच्या सभेच्या वेळीं कॉंग्रेसच्या सभासदांनीं खादीच वापरली पाहिजे असा ठराव झाला आहे. कॉंग्रेसच्या जिल्हा कमिटया, तालुका कमिटया, व प्रांतिक कमिटया किंवा ऑ. इ. कॉ. कमिटी, ह्या सर्व कमिटयांचे सभासद होण्यास व अधिकारी होण्यास खादी वापरण्याची शर्त पाळली पाहिजे आणि ह्या कमिटयांच्या निवडणुकीसाठीं खादी न वापरणारास उभे राहतां यावयाचें नाहीं, असे कॉंग्रेसनें ठरविलें असून कॉंग्रेसच्या रचनेंत सदर तऱ्हेचा नियम घालण्यांत आला आहे. हा नियम अमलात येण्याकरितां हरएक प्रकारचे पोटनियम करून सदर नियमाची अमलबजावणी बरोबर होते किंवा नाहीं हें पहाण्याचें काम वर्किंग कमिटीकडे सोंपविण्यात आलें आहे. जे कोणी खादी वापरीत नाहींत आणि खादीची हेटाळणी नेहमीं करीत असतात, त्यांना ह्यापुढें प्रांतिक कमिटयांचे सभासद व अधिकारी होतां येणार नाहीं, हें उघड आहे. कॉंग्रेसचा जनतेशीं संबंध खादीच्या मार्फतच यावयाचा असल्यामुळें वरील प्रकारचे निर्बंध कॉंग्रेसनें यंदा घातले, ही संतोषाची गोष्ट होय. खादीसंबंधानें मनोभावे कॉंग्रेसला मदत करणाऱ्यांच्या हातीं कॉंग्रेस कमिटीच्या अधिकाराचीं सूत्रे ह्यापुढे जातील आणि

* नवाकाळ, ता. ३० डिसेंबर १९२६

खादीसंबंधानें मोठया जोमाची चळवळ पुढील सालीं राष्ट्रभर सुरू होईल, ह्यात संशय नाहीं. खादीकार्याचा गेल्यासालचा अहवाल प्रसिद्ध झाला असून जोमानें चळवळ केली असतां खादीचा प्रचार केवढया मोठया प्रमाणावर एकदोन वर्षांच्या अवधींत होणार आहे हे सदर अहवालावरून कोणाच्याहि ध्यानात आल्यावाचून रहाणार नाहीं. हजारो गोरगरीब स्त्रियांच्या संसाराला खादीमुळें आज चांगली मदत मिळत आहे. गरीब शेतकऱ्यांच्या संसाराशीं खादीची चळवळ जखडून टाकणे शक्य आहे, असा गेल्या साली पूर्णपणें अनुभव आला आहे. जानेवारीपासून म. गांधी खादीच्या कार्याकरितां चोहोंकडे दौरे काढणार असून खादीच्या ॲसोसिएशननें खादीचे नोकर प्रत्येक जिल्ह्यात ठेवण्याची व्यवस्था केली आहे. खादीचे आजच शेकडों नोकर आहेत. ह्यात कित्येक बी. ए., एम्. ए. झालेले सुशिक्षित असून अल्पवेतनावर देशसेवा करीत आहेत. सोळा वर्षें वयानें झालेल्या व हिशेबाची सामान्य माहिती असलेल्या कोणाहि सद्वर्तनाच्या मनुष्यास खादीचा नोकर होता येतें, खादीसंबधानें ज्यांना कांही माहिती नाहीं, अशानीं तीन वर्षें दरमहा बारा रुपयांची स्कॉलरशीप घेऊन आपल्य जिल्ह्यातील खादीच्या अधिकाऱ्याच्या हाताखाली सहा महिने, साबरमतीच्या आश्रमात खादीसंबधाने हरएक प्रकारचें ज्ञान मिळविण्यासाठीं दोन वर्षे, आणि पुन्हा आपल्या जिल्ह्याच्या अधिकाऱ्याच्या हाताखालीं सहा महिने काढावयाचे असून, पुढें पाहिजे तर खादीची नोकरी त्यांनीं करावी, असा निर्बंध स्कालरशिप घेणारावर घालण्यात आला आहे. खादीच्या शिक्षणासंबधाने आज जे प्रविण आहेत त्यांना त्यांच्या लायकीप्रमाणें स्कॉलरशिपच्या तीन वर्षांपैकीं सर्व वर्षें किंवा कांहीं काळ माफ करण्यात येणार आहे. खादीचें शिक्षण पुरें झालें आहे असें सर्टिफिकेट मिळाल्यानंतर प्रारंभी दरमहा रुपये तीस व पुढें पन्नास

रुपयापर्यंत वाढ, अशी खादीच्या नोकराच्या पगाराची सांप्रत व्यवस्था लावण्यात आली आहे. आज खादीचे नोकर शेकडयानीं मोजता येण्यासारखे आहेत. पण दोन तीन वर्षांच्या अवधींत हे नोकर हजारानी मोजले जावेत अशी खादीची मोठी चळवळ करण्याचा महात्माजींनीं सकल्प केला आहे. हिंदी राष्ट्रात लाखो काय, क्रोडो चरखे फिरत रहाणें शक्य आहे आणि हजारों देशभक्ताना खादीचें काम मनोभावें करीत असताना खादीच्या प्रचड उद्योगापासून अल्पसतोषाच्या उपजीविकेचीं साधनें मिळणेहि शक्य आहे. राष्ट्राची मनोवृत्ति खादीकडे नेहमीं ओढून घेणें, खादीमुळे व्यवहारांत आपोआप दिसून येणाऱ्या परकीय कापडावरील बहिष्कारास उचलून धरणें, स्वत:च्या उपजीविकेला जरुरी नसताहि स्वतः हातानें सूत काढून व खादी नेहमी वापरून खादीविषयींचे योग्य उदाहरण आप्तइष्टाना घालून देणें, सर्व गरीब शेतकऱ्याच्या घरात चरखा चालविण्यास लावून बहुजन समाजात खादीच्या खपाबरोबरच राष्ट्रीय जागृति उत्पन्न करणें, आणि खादीच्या ह्या प्रचड उद्योगाचें व व्यापाराचे सर्व काम दक्षतेनें पाहून आपणास मिळणाऱ्या अल्प वेतनावर सतुष्ट रहाणें, इत्यादि अत्यत महत्त्वाचीं कामें खादीच्या नोकराकडून पार पडावयाचीं आहेत. ही खादीची नोकरी म्हणजे राष्ट्राची सेवा होय खादीचा व्यवहार नफ्यावर नजर ठेवून चालणेंच शक्य नाहीं. लोकानीं द्यावयाच्या वर्गणीवर हा व्यवहार चालणारा असल्यामुळें देशभक्तीनें अल्प वेतनावर सेवा करण्यासच सर्वांनीं पुढें आलें पाहिजे. पाच सात इयत्ता इंग्रजी शिक्षण मिळविणाराना प्रारंभ जो पगार हल्ली मिळू शकतो त्या पगाराच्या मानानें खादीचा नोकराचा प्रारंभाचा तीस रुपये पगार बिलकूल कमी नाहीं. आपल्या अगच्या तरतरीतपणावर व हुषारीवर विसबून राहून मोठ्या पगाराच्या जागेपर्यंत आपण वाढूं अशी जी सामान्य नोकराना हाव असते, ती हाव मात्र खादीच्या नोकरीत सफल होणार नाहीं;

तथापि खेड्यापाड्यातील सर्व लोकांच्या संसाराशीं निकट संबंध येऊन देशसेवेमुळे सर्वांकडून भलें म्हणून घेण्याची संधी खादीच्या नोकरींत जितकी मिळणारी आहे तितकी दुसऱ्या कोणत्याहि सेवेत मिळणारी नसल्यामुळें तरतरीत बुद्धीचे व चांगल्या जोमाचे भरपूर सुशिक्षित तरुण म. गांधी ह्यांच्या खादीच्या सेवेला मिळतील ह्यांत संशय नाहीं. गोहत्तीच्या कॉंग्रेसनें म. गांधी ह्यांच्या अपेक्षेप्रमाणें खादीच्या चळवळीला भरपूर पाठिंबा दिला आहे; म. गांधी स्वतः आपली योजना अमलांत आणण्याकरतां चोंहाकडे फिरणार आहेत; खादीच्या असोशिएशननें ह्या कामाची व्यवहाराच्या दृष्टीची योजना चांगल्यारीतीनें आखली आहे, तेव्हां खादीच्या कार्याला मनुष्यबळ व द्रव्यबळ ह्या दोनहि दृष्टीनें भरपूर मदत लोकांकडून झाल्याशिवाय कशी राहील?

---

# * नवी दिल्ली

गेल्या मंगळवारीं लाटसाहेब लॉर्ड आर्विन ह्यांच्या हस्ते नव्या दिल्लींतील नवा कौन्सिलहॉल उघडण्याचा समारंभ मोठ्या थाटानें साजरा करण्यात आला. नव्या कौन्सिलहॉलची इमारत अद्याप पुरी व्हावयाची आहे व तिसरा मजला वर चढावयाचा आहे. ह्या इमारतीचा खर्च काम पूर्ण झाल्यावर एक कोटीहून अधिक होईल असा अंदाज आहे. कौन्सिलहॉलच्या इमारतींत संस्थानिकाचें मंडळ, स्टेट कौन्सिल व असेंब्ली ह्या तीन संस्थांची सोय केलेली असून, प्रेक्षणीय स्थळ ह्या नात्याने इमारतीची सजावट चांगली झालेली आहे. राजधानीचें नवें शहर म्हणून नव्या दिल्लींत ज्या नव्या इमारती उभारल्या जात आहेत, त्या अद्याप पुऱ्या झालेल्या नाहीत. तथापि नव्या दिल्लीच्या कामकाजास गेल्या मंगळवारपासून सुरवात झाली असे म्हणण्यास हरकत नाहीं. ह्या समारंभाचे प्रसंगीं बादशहाचा खास संदेश लाट साहेबांनीं वाचून दाखविला. न्याय व शहाणपणा नव्या कौन्सिलहॉलमध्यें कायमचा नांदो, असा आशीर्वाद बादशहानी नव्या कौन्सिलहॉलला दिला आहे. नवी दिल्ली म्हणजे हिंदुस्थानातील इंग्रजी साम्राज्याचे कायमचें टिकणारे स्मारकचिन्ह होय, अशा तऱ्हेचे उद्गार लाटसाहेब लॉर्ड आर्विन ह्यांनीं काढले आहेत. हिंदुस्थानांत आजपर्यंत वैभवशाली साम्राज्ये कित्येक होऊन गेलीं. त्या सर्व साम्राज्यांनीं दगडामातीचें आपले स्मारक मागें ठेवलेच आहे. नवी दिल्ली म्हणजे इंग्रजी सत्तेचा तशाच प्रकारचा एक उद्योग होय. दगड आणि माती मनुष्यापेक्षां व राजघराण्यापेक्षां अधिक टिकाऊ आहे. तेव्हां स्मारकाच्या वेळीं दगड व

* नवाकाळ, ता २० जानेवारी १९२७

माती ह्यांचा आश्रय मनुष्यानें घेणें अगदीं साहजिक आहे. पूर्वीच्या बादशहानीं व राजघराण्यानीं आपली कीर्ति दगडातील कलाकौशल्याच्या रूपानें मागे ठेवली आहे आणि ह्या पूर्वीच्या कीर्तीलाहि लोपवून टाकणारी नवी दिल्ली निर्माण करण्याचें काम इंग्रजानीं चालवलें आहे. पधरा वर्षांपूर्वी नव्या दिल्लीच्या पायाचा दगड बादशहानी स्वतः बसवला आणि आज नव्या दिल्लींतील एक महत्त्वाची इमारत उघडण्याचा समारभ पार पडला. नव्या दिल्लींतील लाटसाहेबाच्या राजवाडा पूर्णपणे तयार होण्यास आणखी कांहीं काळ लागेल. वीस वर्षे दगड-मातींत क्रोडो रुपये घालवल्यानतर हे इंग्रजी सत्तेचें स्मारक तयार व्हावयाचें आहे! स्मारक तयार होण्याची वेळ आली म्हणजे कर्त्या पुरुषाना वृद्धावस्था प्राप्त झाली असे मानण्यास हरकत नाहीं. इंग्रजी सत्ता हिंदुस्थानात आज वृद्ध व परिपक्व स्थितींत आहे. इतरानीं आपलीं जीं स्मारकें पूर्वी केलीं आणि नव्या दिल्लीचें आज जे नवें स्मारक तयार होत आहे, त्यातला फरक लाटसाहेबानीं असा दाखविला आहे कीं, लोकनियुक्त सभासदासाठीं दिवाणखाने पूर्वीच्या स्मारकात बिलकूल नसून लोकनियुक्त राजसत्तेचे गोंडस व सुदर बाह्य चिन्ह नव्या कौन्सिल-हॉलच्या रूपानें इंग्रजानीच प्रथम सुरू केलें आहे. लोकाचा दिवाणखाना व खाजगी दिवाणखाना अशा तऱ्हेच्या इमारती दिल्लीच्या मुसलमान बादशहाच्या कारकीर्दीत होत्या, नाहीं असे नाहीं, पण लोकानीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींची सस्था इंग्रजानीच प्रथम हिंदुस्थानात सुरू केलेली आहे. जबाबदार राज्यपद्धतीला सुरवात इंग्रजानींच प्रथम केलेली असल्यामुळे नव्या दिल्लींतील कौन्सिलहॉलची इमारत प्रथम उघडण्यात आली, ह्याबद्दल लाट आर्विन ह्याना एक प्रकारची धन्यता वाटत आहे. नव्या कौन्सिलहॉलमध्यें असेंब्लीच्याच शेजारी सस्थानिकांची संस्था असून, हिंदुस्थानातील बड्या श्रीमताचे कौन्सिल ऑफ स्टेटहि आहे. इंग्लडांत

लोकांच्या प्रतिनिधींच्या छातीवर लॉर्डांची सभा बसलेली आहे, पण हिंदुस्थानात असेंब्लीच्या डोक्यावर कौन्सिल ऑफ स्टेट असून, ह्या कौन्सिल ऑफ स्टेटच्याहि डोक्यावर राजेरजवाड्यांचें नरेंद्र मंडळ आहे. असेंब्लींतील लोकांच्या प्रतिनिधींच्या हातीं खरी सत्ता देण्याचा विचार नोकरशाहीच्या मनात नाहीं, हें नव्या कौन्सिलच्या इमारतीच्या रचनेवरून कोणाचेहि ध्यानीं आल्यावाचून रहाणार नाहीं. मुत्सद्दी येतात जातात; कर्ते पुरुष जगतात व मरतात, आणि राजघराण्याची परंपरा वैभवास पोंचल्यावर नामशेषहि होते; पण इमारतीचें बाह्यचिन्ह वैभवाच्या व मृत्यूच्या ह्या सर्व उलाढालींना पुरून उरतें. बाह्य चिन्हावरून पार्लमेंटरी संस्थांची किंवा जबाबदार राज्यपद्धतीची कोणती दिशा इंग्रजानीं हिंदुस्थानात आखली होती, ह्याचें अनुमान कालान्तरानें करण्याचा जर प्रसंग आला तर स्वतःची प्रतिष्ठा, त्याच्या खालीं राजेरजवाड्यांची महति, त्याच्याहि खालीं श्रीमंतांचा डामडौल आणि शेवटी तळाला पार्लमेंटरी संस्थांचें अधुक चिन्ह, असे अनुमान भावी इतिहासकारांना काढणें भाग पडेल, ह्यात संशय नाहीं. मॉटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणांच्या रिपोर्टांत पार्लमेंटरी संस्थांच्या दृष्टीनें दिल्ली फार दूर आहे, असे उद्गार काढले आहेत, तेच उद्गार आजहि जशाच्या तसे खरे असून नव्या दिल्लीच्या कौन्सिलहॉलच्या इमारतीकडे पाहिलें असता जबाबदार राज्यपद्धतीची दिल्ली अद्याप फार दूर आहे, असेंच म्हणणें भाग पडतें! सुधारणांच्या दुसऱ्या हप्त्याच्या वेळीं संस्थानिकांच्या मार्फत मॉटेग्यू चेम्सफर्ड सुधारणांची पिच्छेहाट कशी करावी ह्याचा विचार सांप्रत चालू आहे आणि स्वामी श्रद्धानंद ह्यांच्या खुनामुळें राजाश्रयाच्या बाबींत न्याय व शहाणपण सत्ताधाऱ्यांत उरलेलें नाहीं असे लोक बोलत आहेत, अशा वेळीं नव्या दिल्लीतील कौन्सिलहॉलची नवी इमारत उघडली जात असतांना लोकांत उत्साह कोठून दृष्टीस पडणार!

---

# * नव्या चीनचें दैवत

नव्या चीनचें दैवत सन्यत्सेन असून १९२३ सालपासून राष्ट्रीय पक्षाची वाढ चीनमध्यें कशी झाली आणि रशियातील बोल्शेव्हिकांनी चीनच्या नव्या पक्षाला कशी मदत केली, त्यासंबंधाची माहिती अमेरिकन लेखक मि. रूटस् यानीं 'एशिया' मासिकाच्या फेब्रुवारी महिन्याच्या अंकांत प्रसिद्ध केली आहे. चीनमध्ये लोकशाही स्थापन करण्याकरिता सन्यत्सेन यानीं जिवापाड मेहनत केली, आणि १५ वर्षांपूर्वी चीनचें बादशाही मँचू घराणे उलथून पाडून चीनमध्ये रिपब्लिक स्थापलें व स्वतः त्या रिपब्लिकचे अध्यक्ष झाले. सन्यत्सेन ह्यांना अध्यक्ष या नात्यानें चीनची नवी घटना अमलांत आणण्यास फुरसतच मिळाली नाहीं. पुन्हां राज्यक्रांति झाली आणि पेकिंग येथून सन्यतसेन यांना पळून जावे लागलें. त्यानंतर चीनच्या कँटनच्या प्रांतांत त्यानीं नवे रिपब्लिक स्थापन केलें. पण प्रजासत्ताक पद्धतीचीं तत्त्वे चीनमध्ये रूढ झालेलीं नसल्यामुळे कँटन येथेहि वारंवार त्यांच्या योजनेला अडथळा येऊं लागला. गरिबांचा कैवारी, निरपेक्ष बुद्धीनें राष्ट्राची सेवा करणारा आणि अत्यंत स्वार्थत्यागी सत्पुरुष या दृष्टीची त्यांची महति सर्व चीनभर झाली खरी, पण स्वतःच्या कँटन प्रांतांतच श्रीमंत व्यापारी, बडे जमीनदार व प्रसिद्ध सेनानायक यांजकडून त्यांना अडथळा होऊं लागला. सामान्य बहुजनसमाजाचें पाठबळ मिळावें तितकें त्यांना मिळेना व आपल्याच प्रांतांतील बड्या धेंडापुढे त्याचें चालेना! अडचणीच्या वेळीं १९२३ सालीं शांघाय येथें कांहीं काळ घालवीत असतांना सन्यत्सेन यांची व बोल्शेव्हिक बोरोडिन यांची गांठ पडली, व दोघांचा स्नेह जमला. बोरोडिन

---

* नवाकाळ, ता. १३ फेब्रुवारी १९२७

याच्यामार्फत, सैबिरियात रशियाचें जे लढाऊ सामान पडले होतें त्या सामानाची मदत सन्यतसेन याना झाली आणि बोरोडिन व त्याचे सहकारी इतर पन्नास साठ बोल्शेव्हिक याना बरोबर घेऊन सन्यतसेन कँटनला शांघायहून परत गेले. लोकशाहीच्या नुसत्या तत्त्वामुळे बहुजनसमाजाचा पाठिंबा मिळत नाही असे पाहून सोशॅलिझमच्या म्हणजे ट्रेड युनियनच्या तऱ्हेवर स्थापलेल्या मजुरांच्या व शेतकऱ्यांच्या संघांची युक्ती सन्यतसेन ह्यांनी आपल्या मताला दिली, आणि १९२३ साली तीन तत्त्वांचा आपला संप्रदाय स्थापन केला. नॅशनॅलिझम ऊर्फ राष्ट्रीयबाणा, डेमॉक्रसी उर्फ लोकशाही आणि सोशियालिझम उर्फ राबणारांचे संघ, अशी सन्यतसेन यांच्या संप्रदायाचीं तीन मुख्य अंगें आहेत. रशियाचें एम्. बोरोडिन व पन्नास साठ बोल्शेव्हिक हस्तक याजकडे मजुरांचे व शेतकऱ्यांचे संघ स्थापण्याची चळवळ देण्यात आली आणि सन्यतसेन ह्यांच्या संप्रदायाची शपथ घेणाऱ्या चिनी लोकांचा राष्ट्रीय पक्ष निर्माण करण्यात आला. या पक्षाच्या ठिकठिकाणीं संस्था स्थापण्यात येऊन त्या संघामार्फत आलेल्या प्रतिनिधींची सहामाही कॉंग्रेस भरविण्याची वहिवाट १९२३ सालानंतर सन्यतसेन ह्यांनी पाडली, आणि या कॉंग्रेसनें निवडलेल्या छोट्या कमिटीच्या हातीं राष्ट्रीय पक्षाचें धोरण जाऊन वर्किंग कमिटीच्या हाती राष्ट्रीय पक्षाची सत्ता गेली. दक्षिण चीनमध्ये सनदशीर व पद्धतशीर निवडून आलेल्या प्रतिनिधींचे पार्लमेंट नाहीं सन्यतसेन यांच्या संप्रदायाच्या सहामाही कॉंग्रेसने ढोबळ मानानें पसंत केलेल्या वर्किंग कमिटीच्या ऊर्फ बारभाईच्या हातांत सर्व सत्ता आहे. सन्यतसेन यांचा संप्रदाय बहुजन समाजांत पसरविण्याचें काम रशियातील बोल्शेव्हिकांच्या पद्धतीवर चालले असून लष्करी अमलदार शिकविण्याचें कामहि रशियाचे प्रोफेसर्स करीत आहेत. प्रत्यक्ष पैशाची किंवा सैन्याची मदत रशियन सरकारकडून होत

नाही, असे मि. रूटस् याचें म्हणणे आहे. बोल्शेव्हिकांची राज्यपद्धति चीनमध्ये रूढ होणारी नसून मजुराचे व शेतकऱ्याचे संघ स्थापून मजुराना व शेतकऱ्याना आपल्या श्रमाचा मोबदला अधिक मिळवून देण्यापलीकडे बोल्शेव्हिक मताचा उपयोग साप्रत चीनमध्ये काहीं होत नाहीं. मास्को येथें सन्यत्सेन युनिव्हर्सिटी स्थापली गेली असून नव्या संप्रदायाचे चार-पाचशे विद्यार्थी लष्करी व शास्त्रीय तऱ्हेचें नवे शिक्षण घेत आहेत. दरसाल येथे चारपाचशे नवे विद्यार्थी शिक्षण घ्यावयास जात असून १९२७–२८ सालीं तीन वर्षे शिक्षण घेतलेल्या विद्यार्थ्यांची तुकडी राष्ट्रीय सेनेकरिता चीनमध्ये परत जाईल, असा अदाज आहे. रशियाची मदत चीनला जी होते, त्या मदतीचे स्वरूप वरील प्रकारचे आहे कँटनच्या लष्करी कालेजमध्यें विद्यार्थी घेताना सन्यत्सेनच्या संप्रदायाची शपथ विद्यार्थ्यास घ्यावी लागते आणि नव्या राष्ट्रीय सैन्यातील सैनिकाना या संप्रदायाचीं तत्त्वे नीट समजावून देऊन सदर तत्त्वाप्रमाणे त्याचे वर्तन बनतें किंवा कसे याजवर कायमची नजर ठेवण्यात येते. सत्ता व पैसा ज्याना पाहिजे असेल त्यानी या शाळेत किंवा कॉलेजात येऊ नये, अशा प्रकारच्या मोठमोठया पाटया सर्व लष्करी शाळावर व कॉलेजावर लावून ठेवलेल्या आहेत. गरिबाना त्याच्या श्रमाचा मोबदला न देता कोणीहि श्रीमत होता कामा नये, हे सन्यत्सेन याच्या संप्रदायातील डेमॉक्रसीचे आणि सोशीआलिझमचें मुख्य तत्त्व आहे. या तत्त्वाला धरून मजुराचे ऊर्फ शेतकऱ्याचे संघ स्थापण्यात येत असल्यामुळे बहुजनसमाजाचा पाठिंबा सन्यत्सेन याच्या संप्रदायाला पूर्णपणें मिळत आहे. परकी लोकाची कोणत्याहि प्रकारची व्यापारी अगर राजकीय सत्ता आपल्यावर नको, हें तत्त्व म्हणजेच चीनचा राष्ट्रीय बाणा होय. या बाण्यामुळें सुशिक्षिताचा व सामान्य श्रीमंत लोकाचा मोठा समुदाय सन्यत्सेन याच्या संप्रदायाला मिळाला

आहे. राष्ट्रीयबाणा म्हणजे परकीयांचा बहिष्कार, मजुरांचें संघ म्हणजे गरिबांचें रक्तशोषण करणाऱ्या पद्धतींना घालण्यात आलेला आळा आणि लोकशाही या तीनच मुख्य आधारस्तंभांवर सन्यतसेन याच्या संप्रदायाची सत्ता उभारली असून बोल्शेव्हिक तत्त्वाकडे चीनच्या राष्ट्रीय पक्षानें अद्याप लक्ष पुरविलेलेंच नाहीं. सन्यतसेन हे वारल्यानंतर कँटन व शांघाय येथे मजुरांच्या तर्फे चिनी विद्यार्थ्यांची मोठी चळवळ चालली असता १९२५ सालीं इंग्रजी बंदुकांनीं चिनी विद्यार्थ्यांवर गोळ्या झाडल्या व शेकडों चिनी विद्यार्थ्यांचें रक्त चिनी भूमीवर सांडण्यांत आलें. लष्करी दृष्ट्या आपण दुबळे आहोत असे पाहून इंग्रजांविरुद्ध कडकडीत बहिष्कार घालण्याची चळवळ सन्यतसेन याच्या संप्रदायानें सुरू केली आणि दोन तीन वर्षे कडकडीत बहिष्कार घालून इंग्रजी व्यापाऱ्यांना मेटाकुटीस आणण्याचें श्रेय संपादन केले. बहिष्काराचे जगी अस्त्र पेलण्याइतकी शक्ति चिनी राष्ट्रांत आहे, असा अनुभव येण्याबरोबर राष्ट्रीय पक्षाची सत्ता हां हां म्हणता चोहोंकडे पसरली, आणि सन्यतसेन याची मूर्ति नव्या चीनचें दैवत बनून दर सोमवारीं सन्यतसेन याच्या तसबिरीची आराधना चीनमध्ये चोहोंकडे सुरू झाली. आजकाल सन्यतसेन याना अवतारी पुरुष मानण्यात येत असून, मजूर, शेतकरी, सुशिक्षित व श्रीमंत लोक त्याच्या संप्रदायाचे सभासद झाले आहेत. राष्ट्राकरिता व राष्ट्रीय भावनेकरिता लढणारें राष्ट्रीय सैन्य असून परकयाची व्यापारी किंवा राजकीय सत्ता आपल्या देशांत नको, म्हणून जो तो बहिष्काराच्या चळवळींत सामील होत आहे. बहिष्काराचें अस्त्र तुमच्या तोफांहून अधिक किंमतीचें आहे असें मि. चेन इंग्रजांना बजावीत असून, उत्तरेकडील चांगसोलिन याचें भाडोत्री लष्कर राष्ट्रीय भावनेच्या लष्करापुढें मेल्यासारखेंच आहे, अशी गर्वोक्ति एम्. बारोडिन यांच्या तोंडून निघत आहे. बोल्शे-

व्हिकाच्या हातीं चीनचें भविष्य गेलें नसून सन्यतसेन याच्या संप्रदायाशीं वागताना जर इंग्लंडनें नमतें घेतलें तर त्यांत चीनचें व इंग्लंडचें कल्याण आहे, असा सल्ला मि. रूट्स यानीं इंग्लडला दिला असून, नव्या चीनच्या नव्या संघटनेपुढे युरोपियनाचें काहीं चालणार नाहीं, असे अमेरिकेचें मत बनत चाललें आहे.

---

# * शिवाजी आणि सह्याद्रि



श्रीशिवाजी महाराजांचा तीनशे वर्षांचा जन्मोत्सव ता. १ मे पासून ता. १० मेपर्यंत साजरा करण्याचे काम बॅ. जयकर यांच्या अध्यक्षतेखालीं उत्सव-कमिटीने मोठ्या नेटाने सुरू केलें आहे आणि उत्सवासंबधाने कोणत्याहि प्रकारचा मतभेद महाराष्ट्रात उरला नसून महाराजाच्या जन्माचा ता. ३ मे हा दिवस सर्व हिंदुस्थानांत मोठ्या समारंभाने पाळला जाणार आहे, ही संतोषाची गोष्ट होय. परमेश्वराची मेहेरबानी म्हणून श्रीशिवाजी महाराजासारख्या मोठ्या विभूति परमेश्वरी कार्याकरिता जन्मास येत असतात. महाराष्ट्रांत असली विभूति तीनशे वर्षांपूर्वी जन्मास आली आणि हिंदुधर्माच्या संरक्षणाचे पवित्र कार्य तडीस नेणाऱ्या महाराष्ट्रधर्माची उभारणी व जोपासना योग्य प्रकारे महाराष्ट्रात होऊन हिंदुधर्मावरील मोठे संकट टळलें, ह्याबद्दल महाराष्ट्रास विशेष अभिमान वाटणे अगदीं साहजिक आहे. गोब्राह्मणप्रतिपालक श्रीशिवाजी महाराज ह्यांच्या कारकीर्दीवर टीका करणाऱ्या श्रीयुत जदुनाथ सरकार ह्यांच्यासारख्या लेखकांनीं असे म्हटलें आहे कीं, धार्मिक वेडाचे अवडंबर महाराष्ट्रात माजविण्याचें काम तेवढें महाराजांनीं केलें, पण आधुनिक तऱ्हेच्या राष्ट्रीय विचारांच्या पायावर महाराष्ट्राच्या नव्या राज्याची उभारणी श्रीशिवाजी महाराजांना करिता आली नाहीं, हा विभूति या नात्यानें महाराजाच्या चरित्रात मोठा दोष आहे. आजच्या राष्ट्रीय भावनांच्या विचारसरणीनें श्रीशिवाजी महाराजाच्या चरित्राकडे पहाणें म्हणजे मोठी चुकी करणें होय. श्रीशिवाजी महाराजाचा काळच असा होता कीं, श्रीशिवाजी महाराज जन्मास आले नसते तर औरंगजेब

---

* नवाकाळ, ता. २८ एप्रिल १९२७

बादशहाच्या जंगी लष्करी वरवटयाखालीं हिंदुधर्माचा पक्का चुगडा होऊन गेला असता. स्मार्त व भागवत या दोन मताच्या उभारणीने व सचलनाने दक्षिणेतील श्रीशंकराचार्य व श्रीरामानुजाचार्य वगैरे तत्त्ववेत्त्याच्या विचार-सरणीवर, हिंदुधर्माची वैदिक काळची परंपरा कायम राखून सनातन हिंदुधर्माचा विजय सर्व हिंदुस्थानभर एकेकाळीं झाला होता, पण मुसलमानाच्या स्वाऱ्यामुळें व राज्यामुळे सनातन हिंदुधर्मावर मोठे संकट ओढवलें व अवरंगजेब बादशहाच्या वेळीं हा धर्म सपशेल बुडतो कीं काय, अशी भीति उत्पन्न झाली. विजयनगरचे राज्य विजापूरच्या मुसलमानानीं बुडविल्यामुळे दक्षिणेकडील तत्त्वज्ञान्याचे दिवस सपले असे सर्वांना वाटूं लागले, आणि उत्तर हिंदुस्थानात तर अवरंगजेब बादशहाचा वरवटा जोराने फिरूं लागला! श्रीशिवाजी महाराजाचे वडील शहाजी राजे कर्तृत्वात, पराक्रमात व वैभवात दक्षिणेतील हिंदूंत सर्वांत उच्च पदास चढलेले होते. त्याच्या लायकीचा व दर्जाचा हिंदु सरदार त्याच्या वेळीं कोणीहि नव्हता. मुसलमानातील अंतस्थ कलहाचा पूर्ण फायदा घेऊन, रणभूमीवरील स्वत:च्या पराक्रमानें दक्षिणेतील मुसलमानी राज्याचे ते आधारस्तंभ बनले होते, पण मुसलमानी संस्कृतीशी व दरबाराशी त्याचा इतका निकट संबंध आला होता की, ती संस्कृति व ते दरबार सोडून देऊन, त्या संस्कृतीच्या व दरबाराच्या बाहेर पडून गोब्राह्मण प्रतिपालक आपण होऊ शकूं, व हिंदुधर्माचे सरक्षण करणारे राज्य आपण स्थापूं शकूं, हा विचार त्याच्या स्वप्नातहि शिवला नाही. ते बुद्धिमान नव्हते असे नाही, ते पराक्रमी नव्हते असे नाहीं, ते साहसी नव्हते असे नाही, किंवा हिंदु धर्मावर त्याची भक्ति नव्हती असेहि नाही! पण मुसलमानी दरबारातील उलाढालीत त्याची बुद्धि अहर्निश गुंगून राहिल्याने, मुसलमानी दरबाराच्या तऱ्हेनेच व स्वरूपानेच विचार करण्याची सवय त्याना इतकी लागून गेली होती की, विचार

करण्याची दुसरी एखादी पद्धत आहे हें त्याच्या बुद्धीला श्रीशिवाजी महाराजाच्या अभ्युदयानंतर देखील केव्हांहि पटले नाहीं. फाजील संघटनाचा हा परिणाम आहे. इंग्रजी साम्राज्याच्या स्वरूपाला धरूनच विचार करण्याची सवय कित्येक नामांकित विद्वानांना जशी लागलेली आहे, तशातलाच हा प्रकार होय. हा संसर्ग–दोष आहे. दुसऱ्याच्या विचारसरणीच्या चाकोरींतून एकसारखें फिरत राहिल्यानें त्या विचारसरणीलाच मनुष्याची बुद्धि बळी पडते आणि बुद्धीच्या ह्या दास्यामुळे स्वतंत्र शक्ति निर्माण करण्याचें कार्य बुद्धिमान व पराक्रमी पुरुषाच्या हातून केव्हांहि घडून येत नाही! श्रीशिवाजी महाराज ह्यांचा जन्म शिवनेरी येथें झाला व सह्याद्रीला धरूनच त्यांना नेहमीं वावरावें लागलें ही श्रीशिवाजी महाराजांवर परमेश्वरी कृपाच होय. सह्याद्री पर्वत त्यावेळीं सर्व राजसत्तेच्या दृष्टीनें टाकाऊ समजला जात होता. समाजाशीं फारसा संपर्क नको अशा वैतागानें गांजलेल्या पोळलेल्या श्रीज्ञानेश्वर महाराजांसारख्या साधुसंतांचें निवासस्थान सह्याद्री पर्वत श्रीशिवाजी महाराजांच्या वेळीं शेकडों वर्षें होऊन बसला होता. महाराष्ट्राच्या विद्वत्तेचें व धार्मिक सामर्थ्याचें केंद्रस्थान त्यावेळीं गोदावरीचा किनारा असताहि पुणें, सातारा ह्या जिल्ह्यांतील सह्याद्रीच्या खोऱ्यांत राहून काम करणें श्रीसमर्थ रामदास स्वामी व श्रीतुकाराम महाराज ह्यांच्यासारख्या साधुसंतांना इष्ट वाटलें होतें. रूढ झालेल्या विचारसरणीच्या संपर्कापासून अलिप्त राहिल्याशिवाय नवीन संप्रदाय केव्हांहि जन्मास येत नसतो! राजसत्तेनें व रूढ विचारसरणीनें टाकाऊ समजलेली भूमीच नवीन विचारसरणीची व संप्रदायाची जोपासना करीत असते. श्रीशहाजी राजे ह्यांच्यावरील संकटानें व घरगुती इतर कारणांमुळें सह्याद्रीच्या टापूंत श्रीशिवाजी महाराजांना व मातोश्री जिजाबाईंना एक तऱ्हेनें टाकून देण्यांत आलें होतें आणि त्यांची ही मुसलमानी दरबारपासून अलिप्त स्थिति ( Detached Position ) त्यांच्या

अगच्या धार्मिक श्रद्धेस चेतविण्यास व परमेश्वरी कृपा सपादन करून साहसी कृत्यास प्रवृत्त करण्यास ब-याच अशीं कारणीभूत झाली, ह्यात सशय नाहीं. दक्षिणेतील मुसलमानी राज्यें व दिल्लीची बादशाही त्या दोघानाहि सह्याद्रीचा फारसा उपयोग होत नव्हता. सर्वात कमी दर्जाचे ठिकाण असे सह्याद्रीला समजण्यात येत असे. ह्या सह्याद्रीच्या अलिप्त स्थितींत महाराज जन्मास आले व वाढले. परमेश्वराची कृपा आपणावर आहे, अशा प्रकारचा धार्मिक संचार महाराजाना होण्याइतकी महाराजाची श्रद्धा परिपक्व झाली. कोणत्याहि गोष्टीबद्दलची श्रद्धा उत्पन्न झाल्याशिवाय पराक्रमाला चेतविणारा परमेश्वरी संचार ( Inspiration ) उत्पन्न होत नसतो! धार्मिक बाब वगळून इतर दृष्टीनी मोठया विभूतीकडे पाहिलें असता परमेश्वरी सचाराचा पाठिंबा त्या विभूतींच्या चरित्रास फारच महत्त्वाचा असतो, असेच दिसून येतें. तर्क कुंठित झाल्यावर श्रद्धेवर व असल्या सचारावर अवलबून रहाणे मोठ मोठयाना भाग पडतें. रूढ विचारसरणी व तर्क ज्या ठिकाणीं कुंठित होतो व पुढील मार्ग सुचत नाहीं, त्या ठिकाणीं मार्गदर्शक होऊन आपल्या राष्ट्राला जे वैभवाला चढवितात, ते परमेश्वरी संचारावर पूर्ण विश्वास ठेवणारेच असतात श्रीशिवाजी महाराज ह्याचा हा असला विश्वास पूर्व वयातच दृढ झालेला होता. मुसलमानी दरबारात व कौन्सिलात बसण्याची शहाजी राजे ह्यानी सवय श्रीशिवाजी महाराजाना बिलकूल लागलेली नव्हती. सह्याद्रीनें त्याना ह्या सवयीपासून अलिप्त ठेवलें होतें. त्यामुळें परमेश्वरी कृपेचा जो अनुभव शहाजी राजे ह्याना आला नाहीं तो शिवाजी महाराजाना आला, परमेश्वरी सचाराचें जे तेज शहाजी राजे ह्याना दिसलें नाही, तें तेज शिवाजी महाराजाच्या डोळ्यापुढे नेहमीं खेळूं लागलें, शहाजी राजाच्या बुद्धीला जीं कामे अत्यत अवघड म्हणून त्याज्य वाटलीं, तीच कामे आपल्या पराक्रमाच्या आटोक्यात आहेत, असे महाराजाच्या बुद्धीला सहज पटलें !

सह्याद्रीचा टापू टाकाऊ ठरलेला असल्यानें, पूर्ववयातील महाराजांच्या पराक्रमाकडे व साहसाकडे मोठमोठया मुसलमानी दरबारांचें लक्षच गेलें नाहीं. सह्याद्रीनें महाराजांच्या पराक्रमावर इतरांची पापी नजर लागणार नाही असा बंदोबस्त केला; आणि ज्यावेळीं महाराजांचा पराक्रम सह्याद्रीला पुरून बाहेर पडूं लागला, त्यावेळी पापी नजरेला थोपवून धरण्याइतकी शक्ति व मसलत महाराजांच्या राजकारणात उत्पन्न झाल्यानें महाराजांपुढे कोणाचेंच काहीं चाललें नाहीं. परमेश्वरी सचाराचा अनुभव घेण्याइतकी महाराजांच्या श्रद्धेची परिपक्क स्थिति हा महाराजांच्या चरित्रात दोष नसून, हिंदु धर्माचा सरक्षक या नात्यानें बलवत्तर सद्गुणच महाराजांच्या चरित्रात समजला पाहिजे, यात सशय नाही. महाराजांच्या अगी हा गुण जर नसता आणि ह्या गुणास वाढीस लावण्याचें सामर्थ्य जर सह्याद्रीच्या त्यावेळच्या अलिप्त स्थितीमुळे उत्पन्न झालें नसते, तर अवरगजेबच्या बादशाहीला जेरीस आणणारा सह्याद्रीच्या आश्रयाखालील महाराष्ट्र दृष्टीस पडला नसता. तीनशे वर्षांपूर्वी हिंदुधर्मावरील संकटाच्या वेळीं अत्यत धार्मिक श्रद्धेचाच पराक्रमी पुरुष जन्मास यावयास पाहिजे होता. हल्लींच्या राष्ट्रीय विचाराचा तो काळ नव्हता आणि धार्मिक बाब एका बाजला ठेवून निव्वळ राष्ट्रीय विचाराना उचलून धरणें त्यावेळीं शक्यहि नव्हतें. त्यावेळीं जरूर नव्हते व शक्य नव्हते असले विचार महाराजानीं आपल्या राजसत्तेने रूढ केले नाहींत म्हणून श्रीशिवाजी महाराजाना व त्यांच्या सह्याद्रीला दोष लावण्यात अर्थ कोणता?

---

# * शिवाजी आणि कोकणपट्टी

श्रीशिवाजी महाराज ह्यांना सह्याद्री पर्वताने शिवनेरी किल्ल्यांत जन्म दिला इतकेंच नव्हे, तर हिंदुधर्माची स्थापना करूं पहाणारा पराक्रमी पुरुष ह्या नात्यानें सुरक्षित घरहि सह्याद्री पर्वतानें बांधून दिलें. सह्याद्रीच्या सावलींतील देशावरचा भाग आणि समुद्रकिनाऱ्यावरची कोंकण पट्टी हा टापू मुळींच सुपीक नाहीं. गोवा आणि वसई ह्या दोन मुलखाच्या आसपासच्या टापूंत जहाजांना उपयोगीं पडणारें चांगलें लाकूड निर्माण होतें. ह्या लाकडाच्या संपत्तीशिवाय दुसरी संपत्ति सह्याद्री पर्वतांत नाहीं. हें दारिद्र्यच सह्याद्री पर्वताला एकप्रकारें स्वतंत्र ठेवण्यास, आधुनिक यांत्रिक युगाच्या पूर्वी कारणीभूत झालेलें आहे. सह्याद्रीचे स्वाभाविक किल्ले हस्तगत करणें मोठमोठ्या सैन्याला त्या वेळीं अत्यंत कठीण जात होतें, आणि इतकेंहि करून दरिद्री मुलखावर व दरिद्री लोकांवर स्वतःचा पैसा खर्च करून सत्ता गाजविण्यापलीकडे दुसरा कांहीं लाभ होत नव्हता. साधल्यास राज्य करावें न साधल्यास सह्याद्रीला मोकळें सोडावें, असें सर्व राज्यकर्त्यांचें धोरण सह्याद्रीसंबंधानें होतें. पोर्तुगीज लोकांनीं शेंकडों वर्षें कोंकणपट्टीवर राज्य केलें, पण सह्याद्री ओलांडून देशावर जाण्याची महत्त्वाकांक्षा धरली नाहीं. आफ्रिकेच्या केप-ऑफ-गुडहोपपासून चीनच्या लगतच्या सिंगापूरच्या ठाण्यापर्यंत आरबी समुद्र, हिंदीमहासागर व बंगालचा उपसागर ह्या समुद्रांत संचार करणाऱ्या सर्व जहाजांवर डोईपट्टी बसवून व कोंकणपट्टींत समुद्राजवळच्या टापूंत ख्रिस्ती धर्माशिवाय इतर धर्मांना अनुसरून खाजगी घरांतूनहि परमेश्वराची पूजाअर्चा बंद पाडून,

* नवाकाळ, ता. २९ एप्रिल १९२७

पोर्तुगीज लोकांनीं कोकणपट्टीवर मोठ्या दिमाखानें राज्य केलें; पण सह्याद्रीनें पोर्तुगीज लोकांच्या महत्त्वाकांक्षेला व कर्तृत्वाला आळा घातला आणि देशावर पोर्तुगीजाचें सकट जाऊं दिलें नाहीं. पोर्तुगीजाच्या ह्या आमदानींत कोकणपट्टींत समुद्राजवळ रहाणारे सर्व हिंदु, देशावर रहाणाऱ्या हिंदूंच्या दृष्टीने बाटगे आणि आजकाल विलायतेला राहून आलेल्या हिंदूंप्रमाणें साहजिकपणेंच धर्महीन समजले जात होते. पोर्तुगीज लोकांची कोकणपट्टीवरील ही सत्ता अत्यंत करडी होती पण शिवाजी महाराजाच्या जन्माच्या वेळीं पोर्तुगीज लोकांचा अमल ढासळलेला होता. युरोपखंडात कॅथॉलिक-प्रॉटेस्टंट ह्यांच्यामधील युद्धाचा शेवट होऊन धार्मिक जुलमाच्या फंदात पडावयाचें नाही आणि सर्व राष्ट्रानीं व्यापारी उद्योगधंद्यात व कारखान्यात अधिक लक्ष घालावयाचें, असे तहनाम्यात नमूद करण्यात आले. कित्येक पिढ्या सदर तहनाम्यातील धोरणाचा अमल करण्यात गेल्या, आणि आरबी समुद्रातील पोर्तुगालची अग्रपूजा नष्ट होऊन डच, फ्रेंच, इंग्रज, आरब व हबशी ह्या सर्वांचीं जहाजें आरबी समुद्रात हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर सारखेपणानें व स्वतंत्र रीतीने व्यापार करू लागलीं. सतराव्या शतकाचे प्रारंभीं कोकणपट्टीचा समुद्र खुला झाला, पाहिजे ते जहाज कोकणपट्टीच्या बंदराला येऊ लागलें, आणि पाहिजे तो व्यापार करू लागलें. गोवा, दाभोळ आणि वसईची खाडी हीं व्यापाराचीं केंद्रस्थानें व मोठीं नामांकित बंदरें होतीं. कर्नाटकचा व्यापार गोव्याचे मार्फत चाले, अहमदनगर, विजापूर वगैरे टापूंचा व्यापार चिपळूणच्या खाडीवरील दाभोळ बंदराच्या मार्फत चाले; पण देशावरील मुसलमानांच्या उलाढालीमुळें आणि पोर्तुगालच्या सत्तेखालील कोकणपट्टीवर धार्मिक दृष्टीनें देशावरील हिंदूंनीं बहिष्कार घातलेला असल्यामुळें कोकणपट्टीच्या व्यापाराला श्रीशिवाजी महाराजाचे वेळीं महत्त्वच राहिलें नाहीं. काठेवाडचा किनारा

आणि गुजराथच्या किनाऱ्यावरील सुरतचें बंदर हा टापू त्यावेळीं व्यापाराच्या दृष्टीनें फार महत्त्वाचा होता. ह्यामुळे कोकणपट्टीच्या किनाऱ्यावर कोणतें जहाज कसें लागतें, ह्याकडे कोणाचेंच लक्ष नव्हतें. कोकणपट्टीचा व्यापार धनधान्याचा त्यावेळीं नसून, हत्याराची विक्री करण्याची मोठी बाजारपेठ कोकणपट्टी होऊन बसली होती. विजापूरकराहून किंवा दिल्लीच्या मोंगल बादशहाहून अधिक सरस व लांब तलवारी आणि लांब पल्ल्याच्या बंदुका ह्यांचा मुबलक पुरवठा त्यावेळी कोकणपट्टी करूं शकत असे आणि हत्याराच्या ह्या बाजारपेठेचा पूर्ण उपयोग करून घेण्यास श्रीशिवाजी महाराजांनी बिलकूल कसूर केली नाही परक्याच्या हत्यारावर अवलंबून रहाण्याचें महाराष्ट्रानें सतराव्या शतकाच्या आरंभी जे धोरण स्वीकारलें तें धोरण एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत अव्याहत अमलांत राहिलें. इंग्रजांविरुद्ध फ्रेंचांनीं हत्यारें पुरवावींत, फ्रेंचांविरुद्ध इंग्रजांनीं हत्यारें पुरवावींत, असा क्रम एकसारखा दोनशे वर्षें चालू होता! फ्रान्समध्यें मोठी राज्यक्रांति होऊन हिंदुस्थानांतील फ्रेंचांची मनें निराश व खट्टू होईपर्यंत आणि समुद्राची सत्ता इंग्रजांच्या हातीं पूर्णपणे जाईपर्यंत फ्रेंचांनीं महाराष्ट्रास हत्यारें पुरविण्यास व लष्करी कवाईत शिकवण्यास कमी केलें नाहीं फ्रेंच राज्यक्रांति झाल्यावर शिंद्यांच्या लष्करांतील फ्रेंच सरदारांनी हातपाय गाळले आणि इंग्रजांची चळती कबूल करून महाराष्ट्राला सोडून दिलें. १७९५ सालच्या खर्ड्याच्या लढाईपर्यंत महाराष्ट्राच्या लष्करी चळवळींत कमीपणा आला नाही, पण फ्रेंचांची राज्यक्रांति झाल्यानंतर एकट्या इंग्लंडशिवाय हिंदुस्थानशी संबंध ठेवणारें दुसरें प्रमुख राष्ट्र युरोपखंडांत नाहींसें झाल्यामुळें इंग्रजांच्या हत्याराच्याच ओंजळीनें महाराष्ट्रास पाणी प्यावें लागलें आणि सर्व घर क्रमाक्रमानेंच इंग्रजांच्या कबजांत गेलें! एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं युरोपखंड व हिंदुस्थान ह्यांच्या संबंधांत इंग्रजांच्या अग्रपूजेची जी नवी परिस्थिति उत्पन्न झाली ती श्रीशिवाजी

महाराजांच्या जन्माचे वेळीं हिंदुस्थानात बिलकूल नव्हती. कोंकणपट्टी हत्याराच्या खुल्या व्यापाराची बाजारपेठ होऊन बसली होती आणि हत्याराच्या ह्या बाजारपेठेचा महिमा दोनशे वर्षे एकसारखा चालला होता. श्रीशिवाजी महाराजांच्या जन्माच्या वेळीं ह्या हत्याराच्या बाजारपेठेचें स्वरूप देशावरील मुत्सद्याच्या लक्षात आलेले नव्हते. बाजारपेठेला प्रारंभ झाला होता आणि देशावरील मुत्सद्याचा निकट संबंध असल्या बाजारपेठेशीं आलेला नव्हता. श्रीशिवाजी महाराजांच्या कुशाग्र बुद्धीने अर्धवट झाकलेल्या व अर्धवट उमलूं लागलेल्या मुग्धावस्थेतील ह्या पेठेचा पूर्ण फायदा घेतला आणि मराठ्याचें लष्कर रणांगणावर पुढे ज्या योगाने विशेष कार्यक्षम ठरले त्या योगाचें धोरण श्री शिवाजी महाराजांनीं एकदम अमलात आणलें. सह्याद्रीनें किल्ल्याचे सुसरक्षित घर महाराजाना दिले, कोंकणपट्टीच्या समुद्राने निरनिराळ्या तऱ्हेच्या हत्याराची रत्नें आपण होऊन महाराजांच्या चरणी अर्पण केली, सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यात रहाणाऱ्या साधुसंतानीं धर्माकरिता मरण्याची प्रवृत्ति सह्याद्रीच्या टापूंत उत्पन्न केली, आणि महाराजाच्या वीरवृत्तीने, साहसी स्वभावाने, कुशाग्रबुद्धीने आणि परमेश्वरी संचारापर्यंतची मजल गाठलेल्या धर्मनिष्ठेनें कोंकणपट्टीतील रायगडच्या किल्ल्यात हिंदुधर्माचें संरक्षण करणाऱ्या राज्यसत्तेची स्थापना करून महाराष्ट्रास कृतार्थ केलें; हत्याराचा पुरवठा होण्याइतकी परराष्ट्रीय उलाढालींची झुंज आपल्या परड्यापर्यंत परमेश्वरानें आणून सोडल्यावर आणि शत्रूची दृष्ट लागणार नाही अशा घरात बसविल्यावर परमेश्वराच्या कृपेतल्या विभूतीला, टाकाऊ भूमींतून, तुच्छ मानलेल्या जनसमूहातून, आणि निराशेच्या वातावरणातून परमेश्वरी कार्य तडीस नेणारी नवी शक्ति निर्माण करता येते. श्रीशिवाजी महाराजांनीं हेंच कार्य रायगडला महत्त्व देऊन केलें आणि शहाजीराजे ह्यांच्या स्वप्नींहि जें आलें नाहीं तें प्रत्यक्ष करून दाखविलें!

———

# * शिवाजी आणि मुसलमान

गोब्राम्हणप्रतिपालक ही विजयानगरच्या हिंदु राजघराण्याची पदवी श्रीशिवाजी महाराज ह्यानी घेतली होती आणि त्या पदवीला अनुसरून परमेश्वरी कार्य त्यानी तडीसहि नेलें. तथापि मुसलमानांचा द्वेष त्यांच्या चरित्रात बिलकूल दृष्टीस पडत नाहीं. हिंदूंचे स्वतंत्र राज्य महाराजानीं स्थापलें खरे, पण विजापूरचे राज्य बुडविण्याची द्वेषबुद्धि मनात धरली नाहीं. हिंदुधर्मावर खरे संकट दक्षिणेतील मुसलमानी राज्यामुळे उत्पन्न झालेले नसून औरंगजेब बादशहासारख्या धर्मवेड्या मुसलमानाकडून उत्तरेस हे संकट उत्पन्न झालें आहे आणि ह्या कामीं दिल्लीचा बंदोबस्त प्रथम केला पाहिजे, असेंच महाराजाचें वर्तन होते. सतराव्या शतकाच्या प्रारंभीं युरोप खंडात धार्मिक लढायाच्या आठवणीना व त्या संबंधाच्या कारस्थानाना मुळींच महत्त्व राहिलेले नव्हते. व्यापारी पद्धतीचें व कारखानदारीचें नवे ध्येय युरोपखंडापुढे त्यावेळीं होतें. भूमध्य समुद्राच्या काठच्या मुसलमानातहि धार्मिक कर्तव्यनिष्ठा दृष्टीस पडत असली तरी जबरदस्तीनें इतराना मुसलमान करण्याचे धार्मिक वेड त्यावेळीं उरलेले नव्हतें. आरबस्थानची किंवा भूमध्य समुद्राच्या काठची मुसलमानी संस्कृति उत्तरेकडील मोगलाची नव्हे, हे ध्यानात ठेवलें पाहिजे. औरंगजेबाचें वेड त्यावेळीं इतर मुसलमानी प्रदेशात बिलकूल नव्हते. आज हिंदुस्थानाबाहेर मुसलमानी वेड नाही. पण पंजाबच्या बाजूला ते वेड शिल्लक आहे. ह्यामुळे हिंदुस्थानातील मुसलमान आणि टर्की व आफगाणिस्थान येथील मुसलमान ह्यांच्या धार्मिक धोरणात आज जमीनअस्मानाचे अंतर आहे. तशाच तऱ्हेची

---

* नवाकाळ, ता. ३० एप्रिल १९२७

स्थिति ईजिप्त, ॲबिसीनिया व तांबड्या समुद्राकाठचा मुसलमानी प्रदेश ह्याच्या धार्मिक दृष्टीत सतराव्या शतकाच्या प्रारंभी उत्पन्न झाली होती. आरबी समुद्रातून कोंकण पट्टीवर जे मुसलमान त्यावेळी उतरत होते, ते ऐहिक वैभवाच्या लालुचीने साहस कर्मास प्रवृत्त झालेले होते, धार्मिक वेडेपणाची दृष्टी त्यांच्या अंगी नव्हती. युरोपखंडाची आज जशीं एकी नाहीं तशी त्यावेळीं मुसलमानाची एकी नव्हती. आज जर्मन इंग्रजाच्या विरुद्ध जाऊं शकतो, फ्रेंच लोक जर्मनीचा द्वेष करूं शकतात, आणि रशियातले बोल्शेव्हिक तर सर्व युरोपियनाचे वैभव उलथे पालथे झाले तरी बिलकूल पर्वा करीत नाहींत. आरबी समुद्रात येणाऱ्या महाराजाच्या वेळच्या युरोपियनाची व मुसलमानाची दृष्टि केवळ व्यापारी स्वरूपाची होती, आणि त्यातल्यात्यात हबशी व आरबी व्यापाऱ्याचे समुद्रावर युरोपियनाच्या पुढे त्यावेळी चालत नव्हते. ह्यामुळे स्वतःचे घोडे पुढे ढकलण्याकरिता आजकालच्या रशियातील बोल्शेव्हिकाप्रमाणे धर्म व राष्ट्र याजकडे दुर्लक्ष करून पाहिजे त्यास पाहिजे ती मदत करण्यास आरबी व हबशी मुसलमान तयार झाले होते. राजकारणातील धार्मिक धोरण एका बाजूस पडून व्यापारी धोरण पुढे आले होते. युरोपखंडाच्या पालटलेल्या ह्या परिस्थितींत तांबड्या समुद्राच्या काठचे मुसलमान व्यापारी बाबींतहि आजकालच्या बोल्शेव्हिकाप्रमाणें ना मंत्र ना तंत्र अशा धर्तीच्या स्वतंत्र स्वरूपाचे होते. कोंकणपट्टींत असल्या मुसलमानाचा शेजार महाराजाना सहाजिकपणें त्यावेळीं मिळाला. बोल्शेव्हिकाची आज अफगाणिस्थानात जी स्थिती आहे ती स्थिती कोंकणपट्टींत आरबी समुद्रामार्फत व्यापार करणाऱ्या मुसलमानाची सतराव्या शतकाच्या प्रारंभीं होती. हा शेजार शहाजी राजे ह्याना लाभला नाहीं, हा शेजार रजपूत सरदाराना मिळाला नाहीं, हा शेजार फक्त सह्याद्रीपर्वताच्या उदरीं जाऊन पडलेल्या श्रीशिवाजी महाराजाना मिळाला. ह्यामुळे केवळ

मुसलमान एवढयाचकरतां द्वेष करण्याची किंवा मुसलमानांवर गैरविश्वास करण्याची प्रवृत्ति महाराजांच्या अंगीं बिलकूल दिसून आली नाहीं. आज बोल्शेव्हिक अफगाणिस्थानच्या अमीरसाहेबांच्या पदरीं विमानी खात्याचे प्रमुख म्हणून जसे नोकरीस आहेत आणि त्यांच्यावर जसा अमीरसाहेबांचा पूर्ण विश्वास आहे, तशीच स्थिती आरबी समुद्रातून कोंकणपट्टींत उतरलेल्या मुसलमानांसंबंधानें श्रीशिवाजी महाराजांची होती. तलवारी, बंदुका व तोफा ह्यांच्या संबंधाच्या कामगिरींत मुसलमानावर श्रीशिवाजी महाराजांनीं पूर्ण विश्वास टाकला होता. हें धोरण पुढें इतकें बळावत गेलें कीं, खुद्द पानिपतच्या लढाईंत तोफखान्याची व्यवस्था मुसलमानी सरदाराच्या हातीं होती, इतकेंच नव्हे तर रणभूमीवर आपली कामगिरी योग्य रीतीनें बजावण्यास मुसलमानाच्या हातांतील त्या तोफखान्यानें बिलकूल कमी केलें नाहीं. शहाजी राजे ह्यांनीं दक्षिणेंतील एका मुसलमानी राज्याविरुद्ध दुसऱ्या मुसलमानी राज्याचें कसें संरक्षण करावयाचें ह्या मसलतींत प्राविण्य मिळविलें. शहाजी राजे ह्यांचे सद्‌गुण श्रीशिवाजी महाराजांत तंतोतंत उतरले होते, पण दृष्टी मात्र निराळी होती. हिंदूंचें स्वतंत्र राज्य पाहिजे, हिंदूंना उपयोगी पडणाऱ्या मुसलमानांची काळजी बरोबरीच्या नात्यानें घेऊन दक्षिणेंतील मुसलमानाचीं राज्यें न बुडवतां औरंगजेबाला ताळ्यावर आणावयाचें, हें ध्येय महाराजांनीं डोळ्यांपुढें ठेवलें होतें. ह्या ध्येयामुळें मराठयांच्या साम्राज्याच्या वेळीं प्रसंगाप्रसंगानें दिल्लीचें कारस्थान मुख्य झालें. अगात ताकद असतांहि हैदराबादचें निजामचें घराणें अजिबात बुडविण्याची बुद्धि खडर्याच्या लढाईंत निजामाला कैद केला असतांहि कोणीहि धरली नाहीं; आणि इराणच्या नादीरशहाची स्वारी दिल्लीवर झाली असताना परदेशच्या मुसलमानापासून दिल्लीच्या मुसलमानांचें संरक्षण करण्याचें अगत्य मराठयांच्या लष्कराला तेव्हांच पटलें! मुसलमानांसंबंधाच्या

ह्या उदार व व्यापक धोरणाचा पाया श्रीशिवाजी महाराजांनीं स्वतःच्या वर्तनानें स्वतःच्या कारकीर्दीतच रचून टाकला. धर्मवेडेपणानें हिंदुधर्माची पायमल्ली करण्याची ज्या मुसलमानांना जरुरी वाटत नव्हती त्या मुसलमानाना हाताशीं धरण्यास, त्याच्या लायकीप्रमाणे त्याना मोठ्या नोकऱ्या देण्यास, व हिंदूंशीं योग्य रीतीने वागणाऱ्या दक्षिणेतील मुसलमानी राज्याचा हिंदूंचें स्वराज्य स्थापल्यानतर स्नेह सपादन करण्यास महाराजांनीं बिलकुल कसूर केली नाहीं. परमेश्वरी सत्ताराचा अनुभव घेण्याइतकी धर्मनिष्ठा महाराजात होती हें खरें, पण त्याबरोबरच आकुंचित दृष्टि न ठेवता शें दोनशें वर्षे महाराष्ट्रास उपयोगी पडणारें धोरण आखून व त्याचा पाया मजबूत करून, मुसलमानी प्रजेला, मुसलमानाच्या बायकाना, मुसलमानाच्या मशिदींना आणि स्नेही ठरलेल्या मुसलमानी राजाना यत्किंचित्‌हि तोशीस न लागेल असले व्यापक धोरण अमलात आणण्याइतका परमेश्वरी वरदहस्त महाराजाच्या मस्तकावर होता ह्यात तिळमात्र सशय नाहीं. जे मुसलमान धर्मवेडेपणा एका बाजूस ठेवून महाराजाशीं स्नेहवृत्तीनें वागले त्याचें कल्याण दख्खनमध्ये शें दोनशे वर्षे होईल इतक्या व्यापक प्रेमळपणाने महाराज त्याच्याशीं वागण्यास तयार झाले. हिंदुस्थानच्या हितसबधाकडे लक्ष देऊन स्नेहबुद्धीने वागणाऱ्या युरोपियन व्यापाऱ्यांचें हिंदी स्वराज्यात यत्किंचित्‌हि नुकसान होणार नाहीं, अशी ऐतिहासिक खातरजमा जर कोणास पाहिजे असेल तर श्रीशिवाजी महाराज व मुसलमान ह्याच्यामधील संबंधाकडे त्यानीं अवश्य पहावे अशी आमची शिफारस आहे. धार्मिक बलात्काराविरुद्ध श्रीशिवाजी महाराज होते, मुसलमानाच्या विरुद्ध श्रीशिवाजी महाराज नव्हते. आज धार्मिक बलात्काराचे दिवस नाहींत, व्यापारी रक्तशोषणाचे दिवस आहेत. पण एका परिस्थितीचा न्याय ध्येयातील फरक संभाळून दुसऱ्या परिस्थितीस लागू पडणारा आहे. महाराष्ट्रातील धर्मबुद्धि साधुसंतानीं परमेश्वरी स्वरूपास

ओळखून जागृत केलेली होती, दुसऱ्याच्या द्वेषाच्या पायावर ही धर्मबुद्धि उभी राहिलेली नव्हती. स्वतः झीज सोसावयाची, स्वतः काबाडकष्ट करावयाचे आणि आपला संसार आपण संभाळून फावल्या वेळात तालीम करून एक प्रकारच्या युरोप खंडातील कॉन्सक्रिप्शनच्या किंवा सर्वांना लष्करी काम करावयास भाग पाडणाऱ्या कायद्याप्रमाणें घरचें खाऊन, घरचा घोडा घेऊन, घरची तरवार कमरेस लटकावून, व घरचा भाला हातात घेऊन लष्करी नोकरी करावयाची ही आत्मयज्ञाची प्रवृत्ति साधुसंताच्या शिकवणुकीमुळे महाराष्ट्रात उत्पन्न झाली होती. ह्या स्थितीचा फायदा शहाजी राजे ह्यानी थोडासा घेतला, जिजाबाई व दादोजी कोंडदेव ह्यानीं ह्या स्थितीला अंशतः देहधारी उर्फ ऑर्गनाइज्ड बनविले, महाराजानीं ह्या लष्करी देहाची जोपासना केली, आणि पुढें हा देह वाढीस लागून दक्षिणेंत कावेरी नदीपासून उत्तरेस गंगा—यमुनेपर्यंत महाराष्टातील शेतकऱ्याच्या सैन्याचा दरारा चोहोंकडे बसला. रजपूत सरदाराना जें दिसूं शकलें नाही तें महाराजाना सह्याद्रीच्या शिखरावर बसून स्वच्छ दिसलें, शहाजी राजे ह्याना जे समजले नाहीं ते कोंकणपट्टीतील परक्याच्या हत्याराच्या बाजारामुळे श्री शिवाजी महाराजाना स्वच्छपणे समजलें, आणि परमेश्वरी कृपाप्रसादाच्या महाराजाच्या बुद्धीला पुढील शे दोनशे वर्षांचा काल एकदम आकलन करणें मुळींच कठीण झाले नाहीं! तीनशे वर्षांपूर्वीची स्थिति आज नाहीं, पण इतिहासाची पुनरावृत्ति होते ह्या न्यायानें पूर्वीचेच काहीं काही प्रसंग नव्या स्वरूपात आज पुढे येत आहेत. व्यापारी रक्तशोषणाच्या युरोपियन धोरणाची ताकद महायुद्धाने कंबरडे मोडल्यामुळें आज फार कमी झाली आहे आणि व्यापारी धोरणाशीं सोशालिस्टिक मताचें संमिश्रण करणें युरोपातील राष्ट्राना जरुरीचें होऊन बसल्यामुळें, धार्मिक वेडेपणाचा नव्हे, आर्थिक रक्तशोषणाचा नव्हे व साम्राज्यसत्तेचाहि नव्हे असा नवा

संप्रदाय इंग्रजी मुत्सद्यानाहि इष्ट वाटूं लागला आहे. तीनशें वर्षांपूर्वीचें राजकारस्थान जरी निराळें असलें तरी महाराजांचें चरित्र इतकें उज्ज्वल व मार्गदर्शक आहे कीं, नव्या परिस्थितींतहि महाराजांचें चरित्र आठवून, महाराजांचे सद्गुण गाऊन, आणि पडताळ्याकरिता महाराजांचें वर्तन डोळ्यांपुढें ठेवून, आजकालच्या हिंदुस्थानास स्वतःचा फायदा करून घेणें मुळींच कठीण नाहीं.

——

# * ओडवायर आणि डायर



जनरल ओडवायर मृत्यु पावले ह्या गोष्टीचा उपयोग सर मायकेल ओडवायर हे स्वतःच्या अरेरावी व क्रूर मताच्या प्रचारार्थ साप्रत करून घेत आहेत. पजाबातील लष्करी कायद्याच्या वेळीं सर मायकेल ओडवायर याच्या प्रोत्साहनाने जो अत्यत क्रूरपणाचा व अपमानास्पद जुलूम पजाबवर करण्यात आला, त्या जुलमाबद्दल डायर ह्याच्याप्रमाणेच ओडवायरसाहेबहि शिक्षेस पात्र आहेत. जनरल डायर याजवर ठपका ठेवण्यात आला आणि ओडवायर-साहेब हिंदुस्थानातून तसेच निसटून गेले. जनरल डायर याच्या मृत्यूचा फायदा घेऊन त्या वेळचें आपले निष्ठुर अरेरावी धोरण योग्य होतें, असे म्हणण्यास ओडवायरसाहेब आता पुनः पुढे आले आहेत. मृत्यूच्या वेळी मेलेल्या मनुष्याच्या चरित्राकडे सर्वजण सहाजिकपणेच दयार्द्र दृष्टीनें पहात असतात. होऊन गेलेल्या गोष्टीची आठवण झाली तरी जुना बागुल-बोवा पुनः उभा करण्याची खटपट कोणीहि करीत नाहीं. उलट मृत्यूमुळे होऊन गेलेल्या गोष्टीवर पांघरूण घालण्याचाच शिष्टाचार आहे. जनरल डायर याच्या मृत्यूमुळे जालियनवाला बागेच्या कत्तलीकडे सहानुभूतीनें पाहण्यात येणार असे पाहून, ओडवायरसाहेबानीं ह्या धादलींत आपलें अरेरावी धोरणहि स्वच्छ धुवून काढण्याचा उद्योग आरंभिला आहे. उलटया काळजाशिवाय असलें कृत्य कोणीहि करू शकणार नाहीं! ओडवायरसाहेबाची पजाबातील कारकीर्द उलटया काळजाची होती, ह्याविषयीं कोणास शंका असल्यास ओडवायरसाहेबाच्या सांप्रतच्या उद्गाराकडे त्यानीं अवश्य लक्ष पुरवावे, अशी आमची शिफारस आहे. ओडवायरसाहेब म्हणतात, पंजाबात

---

* नवाकाळ, ता. २७ जुलई १९२७

त्यावेळीं खरोखरच बड होणार होते आणि हें बड जर कोणी थांबविलें असेल तर ते जालियनवाला बागेमधील जनरल डायर यानीं केलेल्या कत्तलीनेच थांबविलें ह्यांत संशय नाही. अशी बहादुरकी गाजविल्याबद्दल जनरल डायर ह्यांना मोठें बक्षीस मिळालें पाहिजे होतें, पण हंटर कमिशननें त्यांना दोषी ठरविलें आणि हिंदुस्थान सरकारनें व मॉंटेग्यूसाहेबांच्या लिबरल पक्षानें त्यांची मानहानि केली, हा विलक्षण अन्याय झाला असें ओडवायर-साहेबांचें मत असून, ह्या अन्यायामुळें झुरणीस लागून डायरसाहेब मृत्यु पावले, असा ओडवायरसाहेबांचा अभिप्राय प्रसिद्ध झाला आहे. चोराच्या उलट्या बोंबा म्हणून म्हणतात त्या ह्याच! डायरसाहेब मृत्यु पावल्या-बरोबर लिबरल पक्षाच्या धोरणाला डायरसाहेब बळी पडले आणि मॉंटेग्यू साहेबांसारख्या मुत्सद्यांनीं डायरसाहेबांचा हा खूनच एक तऱ्हेनें केला, अशा धर्तीची भाषा वापरण्यास ओडवायरसाहेब आज तयार झाले आहेत. ओडवायरसाहेबांच्या ह्या अभिप्रायास पुष्टी देण्याकरितां डॉक्टरचींहि मतें प्रसिद्ध झाली आहेत. जनरल डायर यांना औषधपाणी करणाऱ्या डॉक्टरांचें असें म्हणणें आहे कीं, आपणावर ठपका ठेवला गेला ह्या गोष्टीमुळें जनरल डायर यांच्या मनाला जो धक्का बसला त्या धक्क्यातून रोग उत्पन्न झाला, आणि धक्क्याचा जोर नेहमी कायम राहिल्यामुळें रोगावर औषधपाणी कांहीं केल्या चाललें नाहीं! जनरल डायर जालियनवाला बागेच्या कत्तलीचें समर्थन नेहमीं करीत असत आणि लाखो वेळा जरी आपणावर असा प्रसंग आला तरी अशीच कत्तल आपण लाखों वेळा करण्यास चुकणार नाहीं, असें ठासून सांगून आपला कत्तलीचा पुण्यमार्ग इष्टमित्रांच्या मनावर ठसवीत असत, असेंहि जनरल डायर यांच्या मृत्यूच्या वेळीं जाहीर करण्यांत आलें आहे. राक्षसी दहशतीचा व कत्तलीचा उपाय हिंदुस्थानास जरुरीचा आहे आणि तसला उपाय अमलांत आणल्याबद्दल कोणासहि पाप लागणारें

नसून उलट पुण्यच लागणारे आहे, असे जनरल डायर यांच्या नावानें ओरडून, ओडवायरसाहेब व त्यांचे इष्टमित्र जनरल डायरच्या मृत्यूचें खापर लिबरल पक्षाच्या माथी मारीत आहेत! राक्षसी कत्तलीचा मार्ग म्हणजे पुण्यमार्ग होय, हें मॉटेग्यूसाहेबाच्या वेळीं पार्लमेंट सभेला पटले नाहीं. पार्लमेंट सभेनें त्यावेळी अमृतसरच्या कत्तलीला दोषच दिला व मॉटेग्यूसाहेब व चर्चिलसाहेब ह्या दोघानी डायरसाहेबाची निर्भत्सनाच केली, पण लॉर्डाच्या सभेनें ओडवायरसाहेबाच्या संप्रदायाला उचलून धरलें, आणि पार्लमेंट सभेतहि कॉन्झर्व्हेटिव पक्षातर्फे सर विल्यम हिक्स, सांप्रतच्या मंत्रिमंडळाचे होम सेक्रेटरी, यानीं हिंदुस्थानातील सिव्हिल सर्व्हंट व युरोपियन ह्यांच्या समाजापैकी शेकडा ऐंशी नव्वद लोक जनरल डायर याना शाबास म्हणणारे आहेत, असे लिबरल पक्षाला बजावण्यास कमी केले नाही. आज पार्लमेंट सभेत लिबरल पक्ष मृतप्राय आहे, मजुराच्या पक्षाचेहि काहीं चालत नाहीं, अशी संधी साधून डायरसाहेबाविषयी पूर्ण सहानुभूति चोहोकडे उत्पन्न करण्याचा प्रयत्न ओडवायरसाहेब करीत आहेत. बंडाची ती वेळ होती आणि बंडाच्या वेळी अशीच कत्तल करून दहशत बसवावी लागते, हें ओडवायरसाहेब व डायरसाहेब यांच्या संप्रदायाचें ब्रीदवाक्य आहे. इंग्रजाविरुद्ध आज हिंदुस्थानात कोण बंड करू शकतो? प्रजेला निःशस्त्र करण्यात येऊन शे–सवाशे वर्षे उलटून गेलीं आहेत, प्रजाजनाचे बंड होणें शक्यच नाही. काहीं हिंदी लष्करी पलटणी फिरल्या तरी बंड करण्यास कोणीहि शहाणा तयार व्हावयाचा नाहीं. तलवारींची किंवा भाल्याची लढाई उरलेली नाहीं. बंदुकानाहि बंड करिता यावयाचे नाहीं. तोफखाना व विमानें आजकाल बंड करू शकतील. इतरांचे बंड होणार आहे असे म्हणणें म्हणजे बंडाची नुसती थट्टा करणे होय. बंडच होण्याचा जेथे संभव नाहीं तेथे बंड हाणून पाडण्याकरिता दहशत बसण्यासाठीं

कत्तल केली, असे म्हणण्यात अर्थ कोणता? लोक अरेरावी सत्तेच्या विरुद्ध गेले असता माथेफिरू बनून आपल्या लहरीपणानें लोकांचा छळ करण्याची पाशवी वृत्ति जालियनवाला बागेच्या कत्तलींत पूर्ण भरलेली आहे. कॉन्झर्व्हेटिव पक्ष सांप्रत अधिकारारूढ आहे. तेव्हां जनरल डायर ह्याच्या मृत्यूचा उपयोग स्वतःच्या तोंडास लागलेली काळोखी धुवून काढण्याकडे करून टाकू या, असे आडेवायर संप्रदायानें आज कितीहि मनात आणलें तरी ओडवायरसाहेबाना अमेरिका, फ्रान्स वगैरे सर्व जगातील विचारी पुरुषांच्या डोळ्यात धूळ कशी टाकता येईल?

---

# * अफगाणिस्थानचे अमीर



हिंदुस्थानचे लाटसाहेब लॉर्ड अर्विन ता. ११ डिसेंबर रोजीं सकाळीं मुंबईस येणार असून, एक आठवडा त्याचा मुक्काम मुंबईत होणार आहे. ता. १४ डिसेंबर रोजी सकाळीं अफगाणिस्थानचे अमीरसाहेब युरोपच्या प्रवासास जाण्याकरिता मुंबईस यावयाचे आहेत व तीन दिवस अमीर साहेबाचा मुक्काम मुंबईस होणार आहे. अमीरसाहेबाचें स्वागत चांगल्या रीतीनें व्हावे आणि खाजगी संभाषणाचा योग बरेच वेळा येऊन कित्येक राजकीय बाबींचा खल नीट करिता यावा, म्हणून लाटसाहेबांनीं आपला मुक्काम मुंबईस चार दिवस अधिक ठेविला आहे. अमीरसाहेब रावळपिंडी–दिल्लीच्या मार्गाने मुंबईस येणार नसून केट्टा–कराचीच्या मार्गाने मुंबईस येणार आहेत. पंजाब–दिल्लीच्या मार्गाने मुंबईस आले असते तर हिंदुस्थानचा बराच महात्त्वाचा भाग त्यांच्या दृष्टिपथातून गेला असता; पण प्रवासाच्या घाईमुळे म्हणा किंवा इतर कारणामुळे म्हणा, हिंदुस्थानात फार दिवस काढणे अमीरसाहेबांना आवडत नाहीं असे दिसतें. युरोपखंडातील प्रवास संपवून अमीरसाहेब पुन्हा हिंदुस्थानात येऊन अफगाणिस्थानात जाणार नसून, रशियाची राजधानी मॉस्को येथून निघून रशियाच्या आगगाडीनें बुखारा–समरकंद मार्गानें काबुलास परत जाणार आहेत. ज्या मार्गानें ते अफगाणिस्थानात परत जाणार आहेत त्याच मार्गाने युरोपखंडाकडे जावयास निघाले असते तरी प्रवासाच्या दृष्टीने त्यांना तें अधिक सोयीचें झालें असतें. पण प्रवासाच्या वेळी हिंदुस्थानालाहि थोडासा मान द्यावा आणि समुद्रावरील पर्यटनाची व आरमारी शक्तीची प्रत्यक्ष माहिती मिळावी, म्हणून मुंबईस

* नवाकाळ, ता. २५ नोव्हेंबर १९२७

येऊन युरोपमध्ये जाण्याचा द्राविडी प्राणायाम अमीरसाहेब करीत आहेत. मुंबईहून निघाल्यावर प्रथम ईजिप्तला भेट देऊन नंतर इटलीमध्ये जाण्याचा अमीरसाहेबांचा विचार आहे. टर्कीला भेट देऊन फ्रान्स, इंग्लंड, जर्मनी व रशिया येथील प्रवास आटोपून अमीरसाहेब अफगाणिस्थानाकडे परतणार आहेत. अफगाणिस्थानचे अमीरसाहेब आता पूर्णपणें स्वतंत्र आहेत, आणि पारिस व बर्लिन येथें विद्यार्थ्यांना पाठवून नवीन तऱ्हेचें स्वरूप अफगाणिस्थानला देण्याचा उपक्रम अफगाणिस्थानांत सुरू झाला आहे. सेनानायक, मुत्सद्दी व तरुण दरबारी वारंवार युरोपखंडांत पाठवून राज्यकारभाराला नवें वळण देण्याचें काम अफगाणिस्थानांत झपाट्यानें सुरू झालें असल्यानें कांहीं गोष्टी स्वतः डोळ्यांनीं पहाव्या व कांहीं गोष्टींचा खल युरोपखंडांतील मुत्सद्यांशीं स्वतः करावा, असें नव्या जोमाच्या ह्या अमीरसाहेबांना वाटणें अगदी साहजिक आहे. जर्मन, फ्रेंच, इटालियन व इंग्लिश अशा चारहि देशांचे कर्तबगार पुरुष अफगाणिस्थानांत निरनिराळ्या नोकरीवर असून रशियन लोकांचा तर इंग्रजांच्या दृष्टीनें एक तऱ्हेचा सुळसुळाटच अफगाणिस्थानांत झालेला आहे. रशियांतले बोल्शेव्हिक आणि हिंदुस्थानांतील इंग्रजी सत्ता ह्यांच्या कैचींत अफगाणिस्थान सांपडलें असून सांप्रतच्या अमीरसाहेबांचें मत कोणत्या बाजूला झुकतें, ही गोष्ट इंग्लंडच्या परराष्ट्रीय उलाढालींत आज महत्त्वाची होऊन बसली आहे. इंग्लंडला तरी रशियाशीं लढावें लागेल किंवा रशियाला तरी इंग्लंडबरोबर कुरापत काढावी लागेल, एरव्हीं पुढील पांच दहा वर्षें जाणार नाहींत, अशी इंग्लंड व रशिया ह्या दोन राष्ट्रांमधील संबंधाची नाजुक स्थिति झाली आहे. रशियाच्या झार साहेबांच्या वेळींहि रशिया व इंग्लंड ह्या दोन राष्ट्रांना अफगाणि-स्थानच्या बाजूला लढल्यावाचून गत्यंतर नाहीं, अशी स्थिति होती. जर्मनीच्या महत्त्वाकांक्षेमुळें इंग्लंड व रशिया यांची दोस्ती महायुद्धाच्या

पूर्वी झाली, पण आता बोल्शेव्हिकांच्या कारकीर्दीत रशिया व इंग्लड यांचें पूर्वीचे वैर पुन्हा सुरू झाले असून अफगाणिस्थानच्या कारस्थानाला विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे. अफगाणिस्थानाला आता स्वातंत्र्य मिळाले आहे, अमीरसाहेबानी अफगाणिस्थानला पूर्वीच्या झोपेतून जागा करून ताजातवाना करण्याचा विडा उचलला आहे, अफगाणिस्थान हळूहळू युरोपियन राष्ट्रांच्या दृष्टीनेहि लष्करी शक्ति बनत चालले आहे, आणि पाचदहा वर्षांच्या अवधीत अफगाणिस्थानच्या लष्करी शक्तीला स्वतःचें घर अपुरे होऊन घराबाहेर ती शक्ति वाहू लागण्याचा संभव आहे. इराण व अफगाणिस्थान ह्यांच्या सरहद्दीला धरून आपली आगगाडी आरबी समुद्राला बंदर आब्बास येथे आणून पोहोचविण्याचा रशियाचा इरादा जसा फार पूर्वीपासून आहे, तसा अफगाणिस्थानचाहि इरादा बलुचिस्थानच्या मार्गानें समुद्र गाठण्याचा फार पूर्वीपासून आहे. आरबी-समुद्र आगगाडीने गाठला म्हणजे रशियाची तहानभूक भागणारी आहे, आणि त्या आगगाडीत अफगाणिस्थानला वाटा मिळाला असता अफगाणिस्थान-लाहि सध्यापुरते कृतकृत्य वाटणारे आहे. इराणच्या नव्या शहावर बोल्शे-विकांनीं कुरघोडी केली असून, इंग्रजापेक्षा बोल्शेव्हिकांकडे इराणचा कल सध्या अधिक आहे. व्यापारी आगगाड्या व राजकीय बंदरें आणि विमानाचे मार्ग ह्यांचें महत्त्व जर युरोपखंडाच्या प्रवासात अमीरसाहेबांच्या मनावर विशेष बिंबलें, तर पुढील चारपाच वर्षांत अफगाणिस्थानात आगगाड्या धावूं लागून रशियाच्या आगगाड्यांचें जाळे व पंजाबातील आगगाड्यांचें जाळे ह्यांना एकमेकांशी संलग्न करण्याचे काम अफगाणि-स्थानची आगगाडी केल्यावाचून रहाणार नाही. इतर जगापासून अलिप्त राहून स्वतःच्या घरट्यात स्वतःला कोंडून ठेवण्याचें धोरण सांप्रतच्या अमीरसाहेबानी सोडून दिले आहे. जगाच्या प्रवाहात उडी घेऊन आपलें

महत्त्व वाढविण्याचें नवें धोरण अफगाणिस्थानच्या दरबारनें स्वीकारलें आहे, ह्या विषयीं आता बिलकूल शंका नाहीं. अमीरसाहेब स्वतः युरोपखंडाच्या प्रवासास जात आहेत, हें नव्या धोरणाचेंच द्योतक होय. स्वतःच्या घरट्यातच स्वतःच कोंडून ठेवून इतर जगास अफगाणिस्थाननें तोंड दाखविलें नाहीं तर तें बरें, अशी इंग्लडची आजपर्यंतची राजनीति आहे; पण महायुद्धानें अफगाणिस्थानास जागें केलें असून सांप्रतच्या अमीरसाहेबांना तर स्वतःच्या देशाच्या ऊर्जितावस्थेची तळमळ रात्रंदिवस लागून राहिली आहे. अफगाणिस्थान निद्रावस्थेंत पुन्हा जाणें शक्य नाही, आणि रशियातील बोल्शेव्हिकांचा अफगाणिस्थानच्या उत्तरेस, पश्चिमेस व खुद्द अफगाणिस्थानात चाललेला सुळसुळाट अफगाणिस्थानला झोंप येऊं देणार नाहीं. इराण ज्याप्रमाणें मॉस्कोच्या बोल्शेव्हिकांच्या नादीं लागले आहे. त्याप्रमाणें काबूलचे अमीरसाहेबहि बोल्शेव्हिकांचे तंत्रानें वागूं लागतात कीं काय, अशी भीति इंग्लंडला वाटणे साहजिक आहे. इंग्लंडच्या मैत्रींत अफगाणिस्थानचें अधिक हित आहे असे अमीरसाहेबांच्या मनाला पटावें म्हणून, हिंदुस्थानात असताना काय किंवा इंग्लडांत असताना काय अमीरसाहेबांचें स्वागत मोठ्या थाटानें केल्यावाचून इंग्रजी मुत्सद्दी कसे राहतील ?



# * अफगाणिस्थान व जर्मन विमानें

अमीर अमानुल्लाखान यांच्या इंग्लंडच्या दौऱ्यातील बादशाही पाहुण-चाराचे तीन दिवस गेल्या शुक्रवारीं संपले असून, एप्रिलआरंभापर्यंत खाजगी नात्यानें इंग्लंडच्या कारखान्यांचीं निरनिराळी केंद्रस्थानें अमीरसाहेब पहाणार आहेत. एप्रिलच्या प्रारंभीं इंग्लंडच्या बलाढ्य आरमाराचा प्रमुख ताडा अमीरसाहेबांना दाखविण्यांत आल्यावर रशियातील दौऱ्याकरतां अमीरसाहेब मास्कोकडे जाणार आहेत. इंग्लंडांतील स्वागत बादशाही थाटाचें झालें, पण कोणत्याहि मेजवानीचेवेळीं महत्त्वाचें भाषण कोणीच केलें नाहीं इंग्लंडचा व अफगाणिस्थानचा सांप्रतचा स्नेहसंबंध असाच पुढें टिकून स्नेहबुद्धीनें दोनहि राष्ट्रें एकमेकांस मदत करोत, अशा तऱ्हेच्या आशीर्वादापलीकडे महत्त्वाचे उद्गार मेजवान्यांचेवेळीं निघाले नाहींत. परराष्ट्रीय मंत्री सर ऑस्टिन चेंबरलेन यांच्या मेजवानीचेवेळीं अफगाणिस्थान व हिंदुस्थान ह्यांच्यामधील संबंधाविषयीं कांहीं तरी बोलण्यांत येईल असें वाटत होतें, पण ह्या मेजवानीचेवेळीं भाषणेंच टाळण्यांत आलीं! ईजिप्त, अरबस्तान, इराण वगैरे मुसलमानी राष्ट्रांसंबंधानें कुरकुर सुरू असतांना अफगाणिस्थानासंबंधानें विशेष कांहीं न बोलणेंच बरें, असें इंग्रजी मुत्सद्यांना वाटलें असल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं. रशिया व अफगाणिस्थान ह्यांचे संबंध, हिंदुस्थान व सरहद्दीवरील स्वतंत्र पठाण ह्यांचे संबंध, आणि इटली, फ्रान्स व जर्मनी येथें अफगाणिस्थान अमीराविषयीं दाखविण्यांत आलेली स्नेहबुद्धि, ह्या सर्व गोष्टी इंग्लंडच्या परराष्ट्रीय कारस्थानांत इतक्या नाजुक स्वरूपाच्या आहेत कीं, त्या संबंधानें बोलतांना इंग्लंडच्या परराष्ट्रीय मंत्र्यांना गोंधळल्यावांचून गत्यंतर नाहीं. अमीरसाहेबांपुढें गोंधळ घालण्यापेक्षां

---

* नवाकाळ, ता. १८ मार्च १९२८

भाषण करण्याचे टाळणेच सर ऑस्टिन चेम्बरलेन याना योग्य वाटणें साहजिक आहे. मेजवानीच्याप्रसगीं एकमेकाच्या शुभचिंतनासाठी दारू पिण्याचा प्रसग आला असताना कुराणाच्या आज्ञेला अनुसरून दारू पिण्याचे टाळून पाण्याचा पेला ओठाला लावण्याचा प्रघात अमीर अमानुल्लाखान यानीं इटली, फ्रान्स, जर्मनीप्रमाणे इग्लडातहि कायम ठेवला, हे अमीरसाहेबाना भूषणावह आहे. इटली व फ्रान्स येथील स्वागत थाटाचे व कौतुकाचे झालें आहे, जर्मनीच्या स्वागतात थाटमाट कमी होता, पण अतःकरणाचा उमाळा अधिक होता, बादशाही वैभवाला साजेसे इग्लडचे स्वागत झालें, पण मौनव्रतामुळे अतःकरणाचा मिलाफ दिसून आला नाहीं. जर्मनींत प्रेसिडेट हिंडेन्बुर्ग यानी दिलेल्या मेजवानीचेवेळीं जर्मन मुत्सद्दी अफगाणिस्थानाकडे साफ अतःकरणाच्या स्वच्छ नजरेने पहात आहेत असे सर्वाच्या अनुभवास आले. जर्मनीने एक विमान अफगाणिस्थानास नजर केलें असून अफगाणिस्थानातील विमानाच्या वाढीस व विमानाच्या व्यवहारास जर्मनीकडून चागली मदत होईल, अशा प्रकारची सदिच्छा जर्मनीच्या सर्व वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाली आहे. यात्रिक बाबतीत जर्मनीनें मिळविलेलें ज्ञान व जर्मनीचा अनुभव अफगाणिस्थानच्या पदरात टाकण्यास जर्मन राष्ट्र तयार आहे, अशा तऱ्हेचे आश्वासन प्रे. हिंडेन्बुर्ग यानीं अमीर अमानुल्लाखान याना सरकारी मेजवानीचे वेळी दिले. विमानाच्या यात्रिक ज्ञानात जर्मन राष्ट्र आज सर्वाच्या पुढे आहे. रशियातील व्यापारी विमानाचा व्यवहार जर्मन कपनीकडेच असून सदर कपनीची विमाने इराणात तेहरानपर्यंत आणि तास्कदच्या मार्गानें अफगाणिस्थानात काबूलपर्यंत साप्रत येरझारा घालीत असतात, हे प्रसिद्धच आहे. विमानाच्या मार्गानें बर्लिन व काबूल ह्याचा सबध रशियामार्फत आज आलेला आहे. जर्मनीनें अमीर अमानुल्लाखान याना बर्लिन येथे आपल्या विमानाची करामत मुख्यतः दाखविली, आणि यात्रिक विद्येस मोकळ्या अतःकरणानें

अफगाणिस्थानास मदत करण्याचे वचन दिले. यांत्रिक ज्ञानाचे व यांत्रिक शक्तीचे जर्मनीचे वचन फोल नाही, हे अमीरसाहेबाना पटावे म्हणून जर्मनीचे व्हाईस चॅन्सलर राष्ट्रीय पक्षाचे प्रमुख हर हर्गट यानी अफगाणिस्थानविषयी जर्मनीचे अंतःकरण का कळवळते ह्याचा खुलासा अमीरसाहेबाशी केला. स्वतःच्या बचावासाठीं व स्वातंत्र्यासाठी एकसारखी धडपड अफगाणिस्थाननें केली आहे व त्यापुढेहि अफगाणिस्थानला करावी लागणार आहे, जर्मनीला देखील असल्या धडपडीसाठीं श्रम करावे लागत आहेत. जर्मनी व अफगाणिस्थान ह्या दोनहि राष्ट्रांवरील पूर्वीचे व पुढचे संकट एकाच स्वरूपाचें असल्यामुळे जर्मन लोकांचे अंतःकरण अफगाणकडे आपोआप वळते असे हर हर्गट याचे म्हणणे आहे. अफगाणिस्थानच्या संकटाविषयी इंग्लंडला हर हर्गट यानी टोला मारला, आणि अशा प्रकारचा टोला मारणे मुत्सद्दीपणास शोभेसे नाही, असे सोशालिस्ट पक्षाच्या व्हालवर्ड पक्षाचे मत आहे. पूर्वी बोअर वॉरच्या प्रसंगी प्रे. क्रूगर याना सहानुभूतीची तार पाठवून कैसरसाहेबानी जी चूक केली, तीच चूक अफगाणिस्थानच्या अमीरसाहेबाशीं बोलताना हर हर्गट यानी केली आहे, असा जर्मनीतील सोशालिस्ट पत्राचा अभिप्राय आहे. दक्षिण आफ्रिकेचे प्रे. क्रूगर याना पूर्वीच्या कैसरसाहेबानी चिथवून सोडलें, पण लढाईच्या वेळीं बोअर लोकाना जर्मनीकडून काहीच मदत झाली नाही. इंग्लंडचे संकट आज अफगाणिस्थानला आहे असे पर्यायाने अमीरसाहेबाना सुचवून आणि इंग्लंडनेच जर्मनीचें आरमार नाहीसे करून जर्मनीला दारिद्र्याच्या खड्डयात पाडलें आहे अशा तऱ्हेचे उद्गार काढून, अफगाणिस्थानाविषयी जर्मनीची कळकळ खऱ्या अंतःकरणाची आहे, असे हर हर्गट यानी अमीर अमानुल्लाखान याना पटविले आहे हे खरें; पण तसाच प्रसंग आल्यास जर्मनी कोणती मदत अफगाणिस्थानास करू शकणार असा प्रश्न जर्मनींतील सोशॅलिस्टांनीं सर्वांपुढे ठेविला असून भलतेच काहीं

तरी बरळण्याबद्दल हर हर्गट याना दोष दिला आहे. हर हर्गट हे व्हाईस चॅन्सेलर अहेत. बर्लिनचे मुख्य चॅन्सेलर आजारी होते व परराष्ट्रीय मंत्री परदेशी गेले होते, ह्यामुळे मुख्य मंत्री व परराष्ट्र मंत्री ह्याच्याकरिता हर्गट याना व्हाईस चॅन्सेलर ह्या नात्यानें मुत्सद्दीपणाच्या दोन गोष्टी अमीर अमानुल्ला याजपाशीं बोलाव्या लागल्या व त्या दोन गोष्टी त्यानी वरील प्रकारे बोलून दाखविल्या, हे चागले झाले नाही, अशी जर्मनींतील सोशॅलिस्ट पक्षाची टीका आहे. समुद्रावर काहीच शक्ति नसल्यामुळे बोअर युद्धाच्या वेळीं त्यावेळच्या कैसरचे बोल फोल ठरले, पण अफगाणिस्थान व जर्मनी ह्याच्यामध्ये विमानाचा नवा संबंध आजकाल उत्पन्न झाला असून तो संबंध तोडणें रशियाशिवाय दुसऱ्या कोणाचेहि हातीं नसल्यामुळे इंग्लडची तितकीशी पर्वा हर हर्गट याना वाटत नसल्यास त्यात काही आश्चर्य नाहीं. पण इंग्लडला चिमटा घेणारे उद्गार अमीर अमानुल्लाखान याजपाशीं बोलून दाखविणे व तशा उद्गाराना वर्तमानपत्रातून प्रसिद्धि देणें हे मुत्सद्दीपणाचें लक्षण नव्हे, ह्यात संशय नाहीं. जर्मनीने अंतःकरणपूर्वक मदत केल्यास विमानाच्या बाबीत आणि लष्करी यांत्रिक विद्येत अफगाणिस्थानचे स्वरूप हा हा म्हणता बदलून जाईल हे खरे आहे, पण इंग्लडचें संकट तुम्हाला आहे म्हणून आम्ही अंतःकरणपूर्वक मदत करितों असे बोलून आपले हृदय उघडे केलें असल्याचें प्रसिद्ध करणें, ह्याला शहाणपणा कोण म्हणेल? हर हर्गट ह्यानी आपलें बोलणे प्रसिद्ध करण्यात चूक केली असली, तरी प्रे. हिंडेन्बूर्ग यानीं जर्मन राष्ट्रातर्फे एक विमान अमीरसाहेबाना देऊन यांत्रिक अनुभवाचे व ज्ञानाचें जे उदक अफगाणिस्थानच्या हातावर सोडलें, त्या उदकाबद्दल अफगाणिस्थानचे लोक जर्मनीविषयी सदोदीत कृतज्ञता बुद्धि दाखविल्यावाचून कसे रहातील?

---

# सरकार उलथलें जाईल काय ?

बारडोलीच्या वाढलेल्या शेतसाऱ्याची पुनः चौकशी करावी अशी अगदीं अल्प मागणी बारडोलीच्या शेतकऱ्याची आहे, पण ही मागणी मान्य केली असता मुंबईसरकार उलथून पडेल, अशी भीति मुंबईच्या 'टाईम्स'ला वाटत आहे आणि त्यामुळे अखेरपर्यंत आपल्या स्वतःच्या शेतकऱ्यांशीं सरकारनें टक्कर द्यावी, असे मुंबईच्या 'टाईम्स'चें म्हणणें आहे. चौकशीकरिता बिनसरकारी तज्ज्ञांची किंवा सरकारी लोकांची कमिटी नेमली असता सरकार कसे उलथलें जाईल, हेंच आम्हास समजत नाही. मुंबईच्या सरकारास उलथून पाडावे असा निर्णय या कामीं कोणती कमिटी देणार आहे? कमिटीनें तसा निर्णय दिला तर सदर निर्णय अमलात कोण आणणार आहे? सरकार उलथून पाडण्याची भीति फुकाची आहे. सरकार घसरून पडत नाहीं, उलथें पालथें होत नाहीं, किंवा एखाद्या शिपायाच्या पगारांतील दिडकीहि कमी होणारी नाही. बारडोली तालुक्याच्या चौकशीकरिता नवी कमिटी न नेमतां सरकारनें आपण होऊन जरी वाढलेला सारा आज एकदम रद्द केला तरी देखील सरकारच्या उलटापालटीची भीति नाहीं. वाढलेल्या साऱ्याचे रुपये नाहींसे होण्यानें सरकारचें एखादें अंग अर्धांगवायूसारखें व्याकूळ होईल, अशातलाहि प्रकार नाहीं. बॅकबेच्या जुगारांत क्रोडो रुपये गमविण्यास समर्थ असलेलें सरकार बार्डोलीच्या वाढलेल्या साऱ्यावर थोडेंच अवलंबून आहे ! पैशाच्या दृष्टीनें सरकार जरी उलथें पालथें झाले नाहीं तरी सरकारच्या शहाणपणाची एकदा नाचक्की झाली म्हणजे सरकार उलथून पडतें असे सरकारतर्फेचें

---

* नवाकाळ, ता. १४ जून १९२८

म्हणणें आहे. कमिटी नेमण्यानें सरकारच्या शहाणपणाची नाचक्की होते असे जर म्हटले तर हिंदुस्थानात व इंग्लंडात निरनिराळ्या प्रश्नाची चौकशी करण्याकरिता काय कमी कमिट्या नेमल्या जात आहेत? कमिटी नेमून वाईट गोष्टी चव्हाठ्यावर आल्या असता सरकारास त्या वाईट गोष्टी अधिक त्रासदायक होतात हे खरे, पण करट आतल्याआत जिरू न देता सडलेला भाग बाहेर पडणें हाच शहाणपणाचा खरा मार्ग होय. इंग्लंडातले पोलिस लष्कराप्रमाणे अरेरावी बाण्याचे बनले आहेत आणि भल्या लोकाची व चागल्या स्त्रियाची अब्रु मलिन करण्यास मागेपुढे पहात नाहींत, अशा प्रकारचा गवगवा झाल्यामुळे साप्रतच्या कॉन्झर्व्हेटिव पक्षानें पोलिसाच्या वर्तनाची चौकशी करण्याकरिता विरुद्ध पक्षाच्या संमतीनें चौकशी कमिटी नेमली नाहीं काय? पोलिसनें अपराध काही केला नाहीं असें पोलिसांचें म्हणणें पार्लमेंट सभेपुढे माडत असताना उघड उघड होणाऱ्या चौकशीस गृहमत्री मि. जॉईन्सन हिक्स यानी नुकतीच मान्यता दिलेली आहे ना? सरकारी अधिकाऱ्याच्या कृत्याची उघड उघड चौकशी व्हावी असा गवगवा झाला असताना गवगव्याला अनुसरून चौकशीची कमिटी नेमणें हें शहाणपणाचेंच लक्षण होय म्हणून मि. हिक्स याची पाठ कॉन्झर्व्हेटिव पक्षाच्या पत्रानींहि थोपटली आहे. कमिटी नेमण्यास संमति दिल्यानें कॉन्झर्व्हेटिव पक्ष उलथून पडेल असा अभिप्राय कोणीहि प्रसिद्ध केलेला नाहीं. करट वाहू दिलें हे कॉन्झर्व्हेटिव पक्षानें चांगलें केले, असें इंग्लडांत सर्वांचे मत पडलेलें आहे. असल्या प्रसगी स्वतंत्र कमिटीची चौकशीकरितां स्थापना केली असतां वाईट होतें असे उद्गार कोणीच काढलेले नाहींत जो कॉन्झर्व्हेटिव पक्ष इंग्लंडात साप्रत अधिकारारूढ आहे त्या कॉन्झर्व्हेटिव पक्षातीलच मुंबईचे साप्रतचे गव्हर्नर आहेत. मग त्यानीं चौकशी कमिटी नेमण्यात कमीपणा का मानावा? विलायतेंत जे

शहाणपणाचें ठरतें तें हिंदुस्थानांत शहाणपणाचें का ठरू नये? सरकारच्या हाताखालील अधिकाऱ्यांची इज्जत ही बाब विलायतेस फार महत्त्वाची समजली जात नाही; हिंदुस्थानात मात्र बार्डोलीच्या कुरणात सोडलेल्या पठाणांपासून कमिशनरसाहेबांपर्यंत सर्वांच्या इज्जतीला डोक्यावर घेऊन नाचण्याचा प्रघात सरकारने पाडला आहे. या अमल्या इज्जतीसाठी चौकशीची कमिटी नेमण्यास सरकार तयार नाही, असे लोकांचें म्हणणें आहे. मुंबईचा 'टाईम्स' म्हणतो, तसे नाहीं. अधिकाऱ्यांच्या इज्जतीचा हा प्रश्न नसून सरकार उलथून पडेल कीं काय, अशी भीति असल्यामुळे सरकारला अखेरपर्यंत आपल्याच प्रजाजनाशीं झुजणे भाग आहे, असा मुंबईच्या 'टाईम्स' चा लोकांना टोमणा आहे. चौकशी कमिटी नेमली असता सरकारनें आपलें स्वतःचे काम दुसऱ्यास सांगितल्यासारखे होतें, आणि जें सरकार आपलें काम स्वतः करीत नाहीं, ते सरकार सरकार या नावालाहि योग्य नाहीं असें गव्हर्नर साहेबाचे मत आहे. चौकशी-कमिटी नेमली असता सरकार स्वतः आपले कामकाज करीत नाही असे कसे ठरते? चौकशीची कमिटी नेमली जावयाची ती सरकारकडूनच नेमली जावी अशीच लोकांची मागणी आहे. चौकशीच्या वेळीं सरकारनें कामकाज करावयाचे म्हणजे काय करावयाचे? गव्हर्नर साहेब व त्याचे एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर्स इतके मिळून मुंबईचें सरकार बनते. या सरकारने चौकशीची कमिटी नेमावी अशी जी लोकांची मागणी आहे, त्या मागणीला अनुसरून जर चौकशीची कमिटी नेमली गेली तर त्यात सरकारच्या फंक्शनला उर्फ कर्तृत्वाला कोठे प्रेतकळा येते? बारडोलींत दे. वल्लभभाई पटेल यानीं स्वतःची एखादी कमिटी नेमली आणि त्या कमिटीचा निर्णय निमुटपणें अमलात आणण्याची पाळी जर सरकारवर आली, तर मुंबईसरकारच्या फंक्शन करण्याच्या ताकतीवर मृत्यूची छाया पडल्यावांचून

राहणार नाहीं हे खरे आहे. कमिटी सरकारनेंच नेमली पाहिजे, असें लोकांचें मागणें आहे; कमिटीला लोकानीं नेमून त्या कमिटीचे हुकूम सरकारनें पाळले पाहिजेत असे मागणें नाहीं. मागणी मागण्याचा हक्क लोकाचा आहे, ती मागणी ऐकण्याचें फंक्शन किंवा कर्तव्य सरकारचें आहे. मागणी ऐकल्यानें सरकार स्वतःचें काम सोडून देतें, अशातला भाग मुळींच नाहीं. किंबहुना सरकारच्या वरिष्ठ दर्जाच्या ज्या कामगिऱ्या समजल्या जातात त्या जबाबदारीच्या कामगिऱ्यामुळे लोक क्षुब्ध झाले असताना लोकाची मागणी न्यायाची आहे किंवा कसे हे ठरविण्याकरिता योग्यवेळीं कमिटी नेमून लोकाचा क्षोभ शांत करणें ही कामगिरी राज्यकर्त्यांच्या फंक्शनच्या किंवा कर्तव्याच्या शिरोभागीं ठेवण्यात येत असते. बारडोली तालुक्यातील चळवळीमुळें सरकारचे अधिकार स्वतःच्या हातीं घेण्यास शेतकरी प्रवृत्त झाले आहेत, आणि सरकारचे अधिकार इतराच्याहातीं गेले असतां राज्यक्रांति होऊन मुंबईसरकार नष्ट होणारें आहे, असे म्हणणें म्हणजे गरीब शेतकऱ्याना नाहक चिरडण्यासाठीं एक थोतांड पुढे करणें होय! बारडोलीच्या शेतकऱ्याची चळवळ यशस्वी झाली तर काय होणार आहे? वाढलेला शेतसारा रद्द होईल एवढेच फळ शेतकऱ्याच्या पदरीं पडणार आहे ना? जुलमाचा प्रतिकार करण्याचा एक मार्ग सापडल्यासारखें सर्व हिंदुस्थानाला वाटेल हें खरें आहे, पण तसे वाटलें म्हणून शहाण्या सरकारला वाईट वाटण्याचें कारण काय? जुलूम होऊ न देण्याची खबरदारी घेतली म्हणजे सरकारच्या कामकाजाला कोठें अडथळा येणार आहे? जुलूम करणें हें जोंपर्यंत सरकारचें फंक्शन किंवा कर्तव्यकर्म नाहीं तोंपर्यंत सिव्हिल डिसओबिडियन्स किंवा सविनय कायदेभंग सरकारच्या सरकारीपणाला केव्हाहि अडथळा करू शकणार नाहीं. अमुक गोष्ट जुलमाची आहे हें सरकारच्या प्रत्यक्ष अनुभवास आणून देण्याचें काम सविनय-

कायदेभंगाचें आहे. वाढलेल्या साऱ्यासाठीं आपल्या जमिनीच्या मालकीवर तिलांजुलि देण्यास जेथें शेतकऱ्याचीं मनें तयार होतात तेथें जुलूम होत आहे असे सरकारनें मानणें जरुरीचें नाहीं काय ? शेतकऱ्याना प्राणाहूनहि अधिक प्रिय स्वतःचीं शेतें असतात. प्राण वेचण्यास जेथें शेतकरी सत्याग्रहामुळें तयार होतात तेथें सरकारच्या बाजुला न्याय कोठून असणार ? न्यायनीतीला अनुसरून प्रजाजनाची जोपासना करणें याहून निराळें फक्शन किंवा कर्तव्य जगातील कोणत्याहि सरकारास नाहीं. हें कर्तव्य सोडून पठाणांच्या इज्जतीस सरकार उराशीं कवटाळून धरू लागलें असताना सत्याग्रहाच्या चळवळींत पोळले जाणाऱ्या शेतकऱ्यांच्या मदतीस धावून जाण्याशिवाय दुसरा मार्ग देशभक्ताना कोणता आहे ?



# * चीनचें नवें स्वरूप



पेकिंग आणि टिन्स्टीन ही दोनहि बंदरें चिनी राष्ट्रीय पक्षाच्या हातीं पडलेली असल्यामुळे सर्व चीनभर राष्ट्रीय पक्षाचे निशाण आता फडकूं लागलें आहे. राष्ट्रीय पक्षाची सत्ता अद्याप कायमच्या स्वरूपाची झाली नाही, हें खरें आहे, तथापि कांहीं महिन्यांच्या अवधींत हे काम तडीस जाईल ह्यांत संशय नाहीं. राष्ट्रीय पक्षाची सत्ता अबाधित झाल्यानंतर चीनला कोणतें स्वरूप येईल, ह्यासंबंधाची चर्चा सांप्रत चीनमध्यें सुरू आहे. पेकिंग व टिन्स्टीन ह्या दोनहि टापूंत थोडे दिवसांत पूर्णपणें शांतता नांदूं लागल्यावर राष्ट्रीय पक्षाकडून चीनच्या स्वराज्याचा खर्डा तयार करण्याकरितां एक परिषद बोलविण्यांत येईल, असें प्रसिद्ध झालें आहे. सन्यत्सेन यांनीं मॅंच्यूचें बादशाही घराणें काढून टाकून चीनचें रिपब्लिक ऊर्फ प्रजासत्ताक राज्य स्थापलें त्यावेळीं चीनच्या नव्या राज्याचें स्वरूप आखलें गेलें असलें तरी आज त्या गोष्टीला बरींच वर्षे होऊन गेलीं आहेत. सन्यत्सेन यांचें रिपब्लिक टिकलें नाहीं. प्राण वाचविण्याकरितां त्यांना पेकिंग येथून पळून जावें लागलें, आणि त्यांच्यामागे सेनानायकांच्या घराण्याच्या हातीं चीनची सत्ता जाऊन रिपब्लिकचें नांव तेवढें शिल्लक राहिलें. जपानांतून कॅंटन येथें परत येऊन सन्यत्सेन यांनीं कॅंटन प्रांताची सुभेदारी आपणाकडे घेतली, व लष्कर बाळगणाऱ्या सुभेदारांच्या हातून चिनी राष्ट्राची सुटका कशी करावयाची ह्या नव्या उद्योगास आरंभ केला. चीनमध्यें सत्ताधारी झालेला हल्लींचा राष्ट्रीय पक्ष सन्यत्सेन यांनीं कॅंटन येथें स्थापला व बोल्शेव्हिकांच्या सहाय्यानें राष्ट्रीय पक्षाचें नवें सैन्य उभारण्यास प्रारंभ

* नवाकाळ, ता. १७ जून १९२८

केला. राष्ट्रीय पक्षाची नवी घडी बसते न बसते तों सन्यतसेन याना मृत्युमुखीं पडावें लागलें. सन्यतसेन याच्या मृत्युमुळे लष्करी सुभेदाराचीच सत्ता चीनमध्ये कायम होते कीं काय आणि चीनचे तुकडे कायमचे पडतात कीं काय, अशी भीति वाटूं लागली असताना चँग-कै-शेक वगैरे सन्यतसेनच्या चेल्यानीं सन्यतसेन याचा सप्रदाय जोरानें पुढे चालविला; आणि यागत्सी नदीवर चाल करून हँकौ, नानकिंग व शांघाय हीं शहरे घेऊन राष्ट्रीय पक्षाचा नावलौकिक प्रस्थापित केला. तेव्हापासून चीनकडे सर्व जगाचे लक्ष लागले. यागत्सी नदी घेतल्यानतर पेकिंग, टिन्स्टीन वगैरे शहरे घेऊन राष्ट्रीय पक्षाचें निशाण सर्व चीनभर फडकावण्यास राष्ट्रीय पक्षास दोन वर्षे लागली. लष्करी सुभेदाराच्या आपापसातील लढायाचा काल चीनमध्ये आता सपला आहे. ह्यापुढे चीनचे स्वरूप पालटावयाचें आहे. गेल्या तीन चार वर्षांतील लढायाच्या अनुभवाला अनुसरून चीनची नवी राज्यघटना तयार करण्यात येईल, ह्यात सशय नाही. राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यानाच एके ठिकाणी बोलावण्यात येऊन राष्ट्रीय पक्षाच्या मताचा छाप ज्या असेंब्लीवर पक्का उमटलेला दृष्टीस पडेल अशाच असेंब्लीच्या हाती राज्यसूत्रे जातील, हें उघड आहे. निवडणुकीची अशी पद्धत अमलात येईल कीं, राष्ट्रीय पक्षाच्या साप्रतच्या पुढाऱ्याना असेंब्लीचे पुरस्कर्ते म्हणून राज्यकारभार हाकण्यास फारशी अडचण येणार नाही. मतदाराच्या मतानीं आजचा राष्ट्रीय पक्ष निवडून आलेला नाहीं, तथापि ह्याच राष्ट्रीय पक्षास हरकत रहाणार नाही, अशीच निवडणुकीची व मतदानाची पद्धत सुरू होईल ह्यात शका नाहीं. वर्ष सहा महिन्यात कॉन्स्टिट्युअट असेंब्लीच्यामार्फत चीनचें पार्लमेंट बोलावण्यात आलें तरी चीनच्या राष्ट्रीय पक्षाची साप्रतचीच विचारसरणी सत्ताधारी राहील हे उघड आहे. गेल्या दोन चार वर्षांच्या लढायात

लष्कर बाळगणाऱ्या लहान मोठ्या ज्या सुभेदारांनीं आपले वजन राष्ट्रीय पक्षाच्या पारड्यांत टाकलें त्या सुभेदाराची कीर्ति व थोरवी कायम ठेवणें राष्ट्रीय पक्षास भाग आहे. अशा दृष्टीनें विचार केला असता चीनचें नवे स्वरूप अमेरिकेच्या लोकशाहीसारखें होईल, असें म्हणवत नाहीं. राष्ट्रीय पक्षांतील बड्या घराण्याचें दडपण अगतः तरी चीनच्या नव्या लोकशाहीवर पडल्यावाचून रहाणार नाही. हिंदुस्थानाहूनहि चीनचें राष्ट्र लोकसंख्येच्या व क्षेत्रफळाच्या मानानें अधिक मोठें असल्यामुळें भाषा, धार्मिक संप्रदाय, हवापाणी, इत्यादि कारणांनी चीनची वाटणी दहा पांच प्रांतांत करणें भाग आहे. ह्या प्रांतांना प्रांतिक स्वराज्य देऊन नानकिंग येथील सरकारला मध्यवर्ती सरकार बनविण्याचा राष्ट्रीय पक्षाचा संकल्प आहे. प्रांतिक कौन्सिलें व मध्यवर्ती पार्लमेंट ह्यांच्या हातीं सर्व सत्ता जावयाची आहे, ही नवी रचना करितांना अमेरिकेच्या संयुक्त संस्थानाचें उदाहरण चीनचे मुत्सद्दी आपल्या डोळ्यापुढें ठेवतील, असा अदाज आहे. अमेरिकेंत शिकून आलेल्या चिनी विद्वानांचा विशेष भरणा आज चीनच्या राष्ट्रीय पक्षांत आहे शिवाय अमेरिकन मिशनऱ्यांनी चीनच्या शिक्षणास चांगली मदत केली आहे. चीनच्या राष्ट्रीय पक्षासंबंधानें अमेरिकेनें गेल्या दोन तीन वर्षांत जी सहानुभूति दाखविली ती सहानुभूति राष्ट्रीय पक्षाच्या मार्गांतील अडथळे दूर करण्यास चीनला फार उपयोगी पडली आहे. यांगत्सी नदीच्या जवळ ज्यावेळीं राष्ट्रीय पक्ष गेला त्यावेळीं इंग्लंडनें उग्र स्वरूप दाखविलें, पण अमेरिकेमुळें तें उग्र स्वरूप आपोआप मऊ झालें! पेकिंगवरील चढाईच्यावेळीं जपानला इतर राष्ट्राहून अधिक हक्क मागण्याची परवानगी मिळणार नाहीं असें अमेरिकेनें दटावल्यामुळें जपानला उग्र स्वरूपावर पांघरूण घालावें लागलें. नवीन स्वरूपांतील चीनच्या सरकारास पाहिजे तितकें कर्ज देण्यास अमेरिका आज समर्थ आहे, इतकेंच

नव्हे तर एक प्रकारें उत्सुक आहे. जपानपासून किंवा इंग्लडपासून जर चीननें कर्ज घेतलें तर चीनचें राष्ट्रीयत्व जपानच्या किंवा इग्लंडच्या हातीं कबजेगहाण पडण्याचा संभव आहे. तशी भीति अमेरिकेच्या कर्जाची नाहीं. कबजेगहाण घेऊन राजसत्ता स्थापण्याची हाव अमेरिकेला नाहीं. आपला व्यापार नीट चालला म्हणजे पुरे आहे, अशी अमेरिकेची आज स्थिति आहे. मध्यवर्ती सरकार स्थापल्यानंतर ठिकठिकाणच्या सुभेदारांचें व राष्ट्रीय पक्षाचें आजचें खडें सैन्य कमी करून कालवे, रस्ते, आगगाड्या, खाणी वगैरे राष्ट्रीय उद्योग मोठ्या प्रमाणावर चालविण्याच्या कामीं सदर मनुष्यबलाचा उपयोग करावयाचा, असे राष्ट्रीय पक्षानें ठरविलें आहे. मोठमोठ्या नद्यांमध्ये चालणाऱ्या गनबोटस, लहानसे आरमार, व भरपूर विमाने ह्याचा नवीन तऱ्हेचा पुरवठा मध्यवर्ती सरकारजवळ असल्याशिवाय मध्यवर्ती सरकारची सत्ता परराष्ट्रीय व्यापाऱ्यांचें जरूर तेवढे संरक्षण करण्याइतकी समर्थ होणार नाहीं. परक्याचे सैन्य व परक्याची सत्ता आपल्या भूमीवर नको, आणि परकी लोकासाठीं परक्यांचे कायदे व परक्याचे मॅजिस्ट्रेटहि चीनमध्ये नकोत असा राष्ट्रीय पक्षाचा मुख्य बाणा आहे. आज टर्की ज्याप्रमाणे परकी व्यापाऱ्याना वागवीत आहे, त्याचप्रमाणे परकी लोकाना चीनमध्यें वागविण्याचा राष्ट्रीय पक्षाचा सकल्प आहे. ह्या सकल्पाला अनुसरून परराष्ट्रांशीं नवे तह करण्याचें बोलणें राष्ट्रीय पक्षाकडून लवकर सुरू होईल; पण चीनमध्ये नव्या स्वरूपाची राज्यघटना अमलात येऊन निवडणुकीनंतर सदर घटनेला अनुसरून नवे मध्यवर्ती सरकार अधिकारारूढ होईतों अमेरिका, जपान, इग्लड वगैरे राष्ट्रें आपलें सैन्य काढून घेण्यास व आपले व्यापारी चीनच्या कायद्याच्या हवाली करण्यास राजी होतील, असे चिन्ह दिसत नाहीं. राज्यसत्तेला नवे स्वरूप देताना आणि नव्या

सरकारास समर्थ बनविताना अमेरिकेच्या कलाकडे लक्ष देणें आज चीनच्या राष्ट्रीय पक्षास भाग आहे. अमेरिकेच्या सहाय्यानें जर नवें स्वरूप देण्यात आले व नवे बल उत्पन्न करण्यात आले तर अमेरिका आपण होऊन आपले आरमार व सैन्य चीनच्या भूमींतून काढून घेतल्यावाचून रहाणार नाहीं, आणि मग अमेरिकेचेंच उदाहरण जपान व इंग्लंड याना गिरवावे लागेल, हे उघड आहे. अशा स्थितीत चीनच्या नव्या स्वरूपावर अमेरिकेची छाप पडल्यावाचून कशी राहील ?

---

# * शेतकऱ्यांचें बंड

बारडोली तालुक्यातील स्थिति स्वत. डोळ्यानीं पाहून त्याप्रमाणें आपला अभिप्राय प्रसिद्ध करण्याकरिता मुंबईच्या ' टाईम्स 'नें पाठविलेल्या खास बातमीदारानें गेल्या मंगळवारच्या अंकात एक लेख लिहिला आहे. बारडोली तालुक्यात सरकारी यंत्र बंद पडले असून शेतकऱ्यानी बंड उभारलें आहे, अशा अर्थाचे मथळे या लेखावर घालण्यात आले आहेत. सरकारी नोकराचे बारडोली तालुक्यात कोठेच काही चालत नसून दे. वल्लभभाई पटेल याच्या २५० स्वयंसेवकाचें राज्य बारडोलींत सुरू आहे, असे सदर बातमीदारानें जाहीर केलें आहे. सरकारचे ३५० सशस्त्र पोलिस बारडोली तालुक्यात आहेत हे खरें, पण त्याची अशी स्थिति आहे कीं, त्यांना शिधा-सामग्री विकत घ्यावयाची असल्यास बाजारभावाहून दडादाखल २५ टक्के अधिक किंमत दिल्याशिवाय कोणताहि माल मिळूं शकत नाहीं. बारडोली तालुक्यातील ८० हजार लोकाची जूट वरील स्वरूपाची करण्यात आली आहे. कमिशनरला किंवा कलेक्टरला मोटार गाडी पाहिजे असली तर दे. वल्लभभाई पटेल याचा परवाना पर्वानगीने काढावा लागतो, येरव्ही कोठेच काहीं जुळत नाहीं प्रत्येक सरकारी नोकर स्वयंसेवकाच्या नजरेखालीं बारडोली तालुक्यात फिरू शकतो. स्वयसेवकाची नजर सोडून प्रवास करता येणेंच शक्य नाही. गाडी मिळत नाही, बैल मिळत नाही, वाटाड्या मिळत नाही, बोचके उचलणारा मिळत नाही, पाणी प्यावयास मिळत नाही, किंवा चहाचा पेलाहि मिळत नाहीं, सरकार म्हणून काही आहे याची जाणीवहि बारडोली तालुक्यात कोठें राहिली नाहीं. सरकारची इभ्रत पूर्णपणें गेलेली

* नवाकाळ, ता. ४ जुलै १९२८

आहे. लंगडा आंधळा कुत्राहि सरकारला विचारीत नाहीं. सरकारी कामकाज अशा रीतीनें बंद पडलें असून सरकारच्या नाड्या वहाणेंच संपले आहे. हातपाय थंड पडले आहेत; कलेक्टर किंवा कमिशनर तालुक्यात गेले असताना छातीचे ठोके थोडेसे ऐकूं येतात, आणि नाकाला सूत लावल्यानंतर सरकार जिवंत आहे असा भास होतो, पण नाडी कोठेंहि चालत नाहीं आणि प्रत्यक्ष शुद्धि उरलेली नाहीं, असा मुंबईच्या ' टाईम्स'च्या बातमीदाराचा अनुभव आहे. आमचें ठीक चालले आहे, आणि बरेच लोक सारा देत आहेत अशी जी फुशारकी सरकारी अधिकाऱ्याकडून मारण्यात येते त्यांत काहीं अर्थ उरलेला नाहीं, अशी स्पष्ट कबुली देणारा मुंबईच्या ' टाईम्स 'चा हा लेख आहे. बारडोली तालुक्यातील शेतकऱ्यांच्या जुटीसंबंधानें हा लेख वाचल्यानंतर काहीं संदेह रहात नाहीं. ही जूट दे. वल्लभभाई पटेलांच्या २५० स्वयंसेवकांनीं घडवून आणिलेली आहे. या २५० स्वयंसेवकांपैकीं सुमारें शंभर स्वयंसेवक बारडोलीच्या मुख्याश्रमांत रहातात व या मुख्याश्रमांत बसूनच दे. वल्लभभाई पटेल व त्यांचे हस्तक बारडोलीच्या राज्यकारभाराचीं सूत्रें चालवितात. या आश्रमाला बारडोलीचें सोव्हिएट किंवा बोल्शेव्हिकांचें राज्य, असे नांव मुंबईच्या टाइम्सच्या बातमीदारानें दिलें आहे. या बोल्शेव्हिक सरकारचा रोजचा खर्च ७०० रुपयांहून अधिक आहे. शंभर स्वयंसेवक व येतील जातील ते पाहुणे यांच्या जेवण्याखाण्याची सोय बोल्शेव्हिक सरकारकडून करण्यात येते व मुंबईच्या ' टाईम्स 'च्या बातमीदारालाहि या बोल्शेव्हिकांचाच पाहुणचार घेणें भाग पडलें होतें. सरकारी नोकर असो, किंवा मुंबईच्या ' टाईम्स 'चा बातमीदार असो, पाहुण्याची सोय पाहण्यात बोल्शेव्हिकांकडून आळस होत नाहीं. २५० स्वयंसेवक आपलीं उष्टीं काढतात, ताटें घासतात, आणि गरिबाचें अन्न खाऊन हरेक प्रकारचे काबाडकष्ट करतात. या स्वयंसेवकांची शिस्त अत्यंत

वाखाणण्यासारखी असून सर्वांशींच ते विनयानें वागतात. सोव्हिएट सरकारच्या मुख्य कचेरींत असलेले शंभर स्वयसेवक निरनिराळ्या कामगिरीवर रोज बाहेर पाठविण्यात येतात. बाकीचे दीडशें स्वयसेवक बारडोली तालुक्यात निरनिराळ्या दहा बारा आश्रमात व दहा बारा नव्या चौक्यात ठेवण्यात आले आहेत. त्या सर्वांचें वागणें उत्तम प्रकारचें आहे; अधिकाऱ्यांशीं किंवा कोणाशीहि विनय सोडून कोणी वागत नाहीं, पाहुण्याचा आदरसत्कार करण्यात येतो, पण तत्त्वाची बाब आली असता तुरुगात जाण्यापर्यंत प्रत्येकाची तयारी असते. हे २५० स्वयसेवक गुजराथ विद्यापीठ, म. गांधींचा आश्रम, गुजराथ, काठेवाड, मध्यप्रात व मुबई येथून बार्डोलीस गेलेले आहेत, आणि दे. पटेल त्याचे अध्वर्यु झाले असून बोल्शेव्हिक तत्त्वे अमलात आणण्याचा प्रयोग बारडोलीस चालला आहे. मुबईच्या 'टाईम्स' च्या बातमीदाराचे असे म्हणणें आहे की, शेतकऱ्याच्या गरिबीमुळे वाढलेला सारा देण्यास ते तयार नाहींत असे मुळींच नसून, सरकारला मृतप्राय करण्याच्या उद्देशाने बोल्शेव्हिकाचें सोव्हिएट स्थापण्याकरिता बारडोलींतील शेतकऱ्यानीं बड उभारलें आहे. बारडोलींतील शेतकरी गुजराथेंतच नव्हे तर सर्व मुबई इलाख्यात सर्वांत सुसपन्न आहेत आणि ह्या श्रीमतीमुळे त्यानी सारा न देण्याचें बड केलें आहे. इतके दिवस त्यानी व्यवस्थेनें झुज चालविली आहे यावरून त्याच्यापाशीं पैसा आहे हे उघड होय, असा सदर लेखकाचा कोटिक्रम आहे. मुबईच्या गिरण्यातील कामगारानी सांप्रतचा संप ज्या अर्थी दोन तीन महिने चालविला आहे त्याअर्थी त्याच्याजवळ पैशाची ऊब असली पाहिजे, म्हणून द्रव्यसहाय्य करण्याची जरुरी नाहीं; अशा धर्तीचे जे आक्षेप ॲंग्लो-इडियन पत्रातून दृष्टीस पडतात तेच आक्षेप बारडोली संबधानें आता प्रसिद्ध झाले आहेत. बार्डोलीची लोकसख्या ८० हजार

असून त्यात १७ हजार खातेदार आहेत. या १७ हजार खातेदारांपैकीं एक हजाराहून अधिक खातेदाराची प्रत्येकी दीड दोन एकरच जमीन स्वतःच्या मालकीची आहे. या असल्या प्रजेला श्रीमंत प्रजा म्हणून कसे म्हणावयाचे? बारडोलीत काही नामांकित सावकार आहेत ही गोष्ट खरी, पण ही सावकारी जमिनीच्या धंद्यासंबंधाची नसून मुंबईस मिळविलेल्या पैशामुळे आहे. बारडोलीचे बरेच लोक आफ्रिकेत जाऊन उपजीविका करतात, आणि तेथे मिळविलेले पैसे बारडोलीत जमिनी खरेदी करण्यात व घरे बांधण्यात खर्च करितात. हे उत्पन्न बाहेरच्या उद्योगाचें आहे, बारडोलीच्या शेतीशी त्याचा काही संबंध नाही. जमिनीची किंमत शेतीच्या धंद्याला अनुसरून वाढलेली नसून परदेशां मिळविलेले पैसे जमिनींत घातल्यामुळे वाढलेली आहे. कोकणपट्टीतील जेथील लोक आफ्रिकेत जातात, तेथील जमिनीच्या तुकड्याची किंमत शेतीच्या धंद्याच्या दृष्टीपेक्षा फार वाढलेली आहे. परठिकाणी किंवा परदेशी जाऊन श्रम करावयाचे व साचलेली पुंजी घरीं घेऊन येऊन पूर्वजांच्या घरातच किंवा घराजवळच आपला देह ठेवावयाचा, ही जी स्वतःच्या जमिनीसंबंधाची आसक्ति हिंदी लोकांत दिसून येतें त्या आसक्तीमुळे जमिनीच्या किंमती कांहीं ठिकाणीं वाढलेल्या आहेत. जन्मभूमि-वात्सल्य हा एकप्रकारचा दोष केव्हा केव्हा होतो. या दोषामुळे कोकणात किंवा बारडोली तालुक्यात पाहिजे तसा शेतसारा वाढवून परदेशी केलेल्या श्रमाचे पैसे लुबाडून घेण्यास सरकारास सोयीचें झाले आहे. यालाच एक्स्प्लॉयटेशन किंवा नागवणूक असे म्हणतात. असले एक्स्प्लॉयटेशन किंवा नागवणूक चालली असताना हताश व दुबळ्या लोकांनीं सत्याग्रह करून आपला बचाव केला पाहिजे, असे महात्मा गांधी यांनीं दक्षिण आफ्रिकेंत प्रत्यक्ष प्रयोगानें ज्या थोड्या हिंदी लोकांना शिकविलें त्यांपैकीं सत्याग्रहाचे

काही निस्सीम भक्त बारडोलीचे रहाणारे आहेत. दक्षिण आफ्रिकेतील सत्याग्रहात भाग घेणारे काही लोक बारडोलींत आहेत, आणि बारडोलीकडे पैसे दक्षिण आफ्रिकेतून येत असतात, एवढयाच आधारावर बारडोलींतील शेतकऱ्यांचे बंड उभारलें आहे अशी आरोळी मुंबईच्या 'टाईम्स' ने फोडली आहे. बंड व बोल्शिव्हिकांचें सोव्हिएट सरकार, हीं दोन नांवे बारडोलीच्या सत्याग्रहाला देऊन मुंबईच्या 'टाईम्स' ने सरकारची एकप्रकारची निर्भत्सना केली आहे. शल्य ज्याप्रमाणें कर्णाला लढाईच्या वेळी टोचून बोलत असे त्याचप्रमाणे मुंबईचा 'टाईम्स' आज बारडोलीच्या बाबतींत सरकारला टोचत आहे. तेजोभंग करण्याचा मात्र उद्देश नाही; सरकारला नाहक चेतविण्याचा उद्देश आहे. दे. पटेल यांनीं बारडोलीला सोव्हिएट सरकार स्थापले आणि तुम्ही नामर्दाप्रमाणे गप्प काय बसला आहात, अशा आशयाची ही टोचणी आहे. ८८ पाटिलापैकी ७९ पाटील आणि ४८ तलाठयापैकीं २०–२५ तलाठी दे. वल्लभभाई पटेल यांनीं फितविले असून सर्वांच्या सर्व पाटील व सर्वांच्या सर्व तलाठी लवकरच पूर्णपणे फितूर होतील, असे सदर बातमीदाराचें मत आहे. पाटील व तलाठी म्हणजे खेडयातील मोंगल बादशहाच, सरकारचे डोळे व हातपाय. इंग्रज सरकारचे हे अहीमही रावण सत्याग्रह आश्रमाने जर बोल्शेव्हिक बनविले तर सरकार पार मरून गेलें म्हणून बारडोलीच्या शेतकऱ्यानी कां समजूं नये, असा सवाल सदर बातमीदारानें मुंबई सरकारास टाकला आहे. तुमचे पाय मेले, डोळे गेले, कान फुटले व जबरदस्त म्हणून समजलेले बाहूहि गळाले, मग लुल्यासारखे पडून बारडोली तालुक्यात तुमचा निभाव कसा लागणार, अशा तऱ्हेनें मुंबई सरकारचे कान मुंबईच्या 'टाईम्स 'नें आपल्या बातमीदाराच्या मार्फत उपटले आहेत. वेळींच महात्मा गांधींच्या सत्याग्रहाच्या पायरूणाखालील

बोल्शेव्हिक स्वरूपाच्या चेष्टा बंद करा, दे. वल्लभभाई पटेल यांचें बोल्शेव्हिक सरकार नष्ट करा, आणि बारडोली तालुक्यातील सोव्हिएटच्या चौक्या उलथून पाडा; नाही तर प्राणावरच गाठ येईल असा इषारा देण्याचा हा उद्देश आहे. गेल्या दीडशे वर्षांत हिंदुस्थानांत कोठेंहि व कधींहि झाला नाहीं अशा तऱ्हेचा बोल्शेव्हिक थाटाचा बारडोलीचा हा प्रयोग दे. वल्लभभाई पटेल यांच्या मार्फत महात्मा गांधी यांनीं सुरू केलेला आहे; हा अभूतपूर्व प्रयोग जर बारडोलींत सिद्धीस गेला तर सरकारच्या दराऱ्यास कोणीहि भीक घालणार नाहीं, असा मुंबईच्या 'टाईम्स'चा सिद्धांत असल्यामुळें बंगाल्यातील वरवटयाच्या कायद्यासारखे कायदे सुरू करून सोव्हिएट शेतकऱ्यांचे हे बंड सरकारनें हाणून पाडलें पाहिजे, असा सदर लेखाचा एकंदर कटाक्ष आहे. बारडोलीचें प्रकरण तडजोडीनें मिटविण्याऐवजीं वरवटयाच्या कायद्याखालीं बारडोलीच्या दे. पटेल यांच्यासारख्यांच्या अनुयायांना ठेचून हे प्रकरण मिटविलें पाहिजे, असा नोकरशाहीचा अंशत: तरी हट्ट असल्याबद्दलची साक्ष मुंबईच्या 'टाईम्स'मधील लेख देत नाहीं काय ?

---

# * पाहिजे दाता

सुरतच्या खलबतांत बारडोलीच्या प्रश्नासंबधानें गव्हनरसाहेब व दे. वल्लभभाई पटेल यांचें मेतकूट नीट जुळलें नाहीं. दोन तीन किरकोळ बाबींसबंधानें आणि एका मुख्य बाबीसंबधानें मतभेद झाला व गव्हर्नर साहेब सुरतेहून पुण्याकडे तडजोड न करता निघून गेले. तडजोडीची आशा अद्याप नाहींशी झालेली नाहीं तडजोड घडवून आणण्यास कालाचा अवधि अद्याप बराच आहे. सध्या बारडोलीस शेतकरी आपापल्या शेतांतील कामकाज दरसालप्रमाणें करीत आहेत व सरकारनें जप्तीचें काम बंद ठेवलें आहे. लढाई तात्पुरती तहकूब आहे. येत्या ऑक्टोबरमध्ये पीक कापणीस येईतों तट्याबखेडा होण्याचा फारसा संभव नाहीं, त्याच्या आंत तडजोड झाली म्हणजे भागणारें आहे. देशभक्त वल्लभभाई पटेल आज उद्या पुण्यास जाणार आहेत, आणि सोमवारपासून सुरू होणाऱ्या कायदेकौन्सिलमार्फत पुन्हा उघड व खाजगी चर्चा सुरू होऊन सुरतेचें खलबत पुण्यास पुढें चालू करण्यांत येईल, अशीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. सुरतेच्या खलबतांतील सरकारतर्फेच्या सूचना सरकारी जाहीर पत्रकांत प्रसिद्ध झाल्या आहेत आणि दे. वल्लभभाई पटेल यांनींहि आपल्यातर्फेच्या मागण्या प्रसिद्ध केल्या आहेत. दे. वल्लभभाई पटेल यांच्या मागण्या इतक्या साध्या, सोप्या व जरुरीच्या आहेत की, त्यांच्या चांगुलपणाबद्दल देशभक्त नरसिंह चिंतामण केळकर यांनाहि संदेह उरलेला नाही. सरकारी सूचना व लोकांच्या मागण्या यांची तुलना केली असता एका मुद्याशिवाय इतर बाबींत तडजोड होण्यासारखी आहे, असेंच मुंबईच्या 'टाईम्स'चे देखील मत पडलें आहे.

---

* नवाकाळ, ता. २१ जुलै १९२८

एक रिव्हेन्यू ऑफिसर व हायकोर्टाचे न्यायाधीश याची कमिटी नेमून सारावाढीची चौकशी करण्यास सरकार तयार आहे; बिनसरकारी कोणी तरी या कमिटीत असल्याशिवाय स्वतंत्र स्वरूपाची ही चौकशी होणार नाहीं असें बारडोलीच्या शेतकऱ्यांचें म्हणणें आहे. लेजिस्लेटिव्ह कौन्सिलातील गुजराथच्या ज्या सभासदांनीं बारडोलीकरिता आपले राजीनामे दिले त्या सभासदांपैकीं एखादा विद्वान व निस्पृह सभासद जर या कमिटीवर नेमला गेला तर कोणतीच तक्रार रहाणार नाहीं. मुंबईच्या कौन्सिलला असली शिफारस सहज करता येण्यासारखी आहे. कौन्सिलनें अशी शिफारस केली असता सरकारासहि ती मान्य होणारी आहे. चळवळीला भीक घालून आम्ही बिनसरकारी सभासद कमिटीवर घेतला असे नव्हे तर कौन्सिलच्या शब्दाला मान दिला, असे म्हणून आपली इभ्रत सभाळण्यास सरकारला अडचण पडणार नाहीं. अशा दृष्टीनें विचार केला असता, कमिटीवर कोणास नेमावयाचें यासबंधाचा प्रश्न दोनहि पक्षास समाधान होईल अशा रीतीनें सोडविता येणार आहे. एकदा चौकशीस प्रारभ झाला म्हणजे आजूबाजूच्या दोन चार बाबींच्या संबंधानेंहि पुरावा गोळा करण्यांत आल्यानें कोणाचेंहि बिघडणारें नाहीं. सारावाढीच्या मुख्य प्रश्नाचा निकाल काय तो या कमिटीनें द्यावयाचा आहे. सदर निकाल मान्य करण्यास व त्याप्रमाणें वागण्यास दोनहि पक्ष तयार आहेत. जप्तीमुळें झालेलें नुकसान कसें भरून द्यावयाचें हा एक प्रश्न आहे. ज्या जमिनी इतरांना विकल्या गेल्या त्या जमिनी परत घेता यावयाच्या नाहींत, पण नुसत्या जप्त केलेल्या जमिनी परत देऊं, असे सरकारचें म्हणणें आहे; जप्तीमुळें झालेलें नुकसान मिळालें पाहिजे अशी लोकांची मागणी आहे. इतरांना सरकारनें विकलेल्या जमिनी कायदेशीर रीतीनें त्यांजपासून पुन्हा परत सरकारास मागता येणार नाहींत हे खरें आहे; पण सरकारची तशी मर्जी दिसून आल्यास ज्यांनीं

जमिनी विकत घेतल्या ते जमिनी परत देणार नाहींत असा थोडाच भाग आहे ? याकामीं कागदोपत्रीं सरकार स्वतःस बाधून घेणार नसेल तर सरकारचें वजन या कामीं खर्च करण्यास येईल एवढें आश्वासन असलें म्हणजे बस्स आहे. पाटील व तलाठी याना पुन्हा कामावर घेणें व तुरुंगात टाकलेल्या सत्याग्रहींना सोडून देणे, या गोष्टी सरकारास सहज करता येण्यासारख्या असल्यामुळें तेवढ्याकरिता तडजोड मोडेल असा रंग मुळींच नाहीं अडचण आली आहे ती सारावाढीचे पैसे कोणी तरी सरकारी खजिन्यांत अगोदर भरले पाहिजेत या सरकारी हट्टासंबधाची आहे. सरकारला सारा-वाढीचे पैसे अगोदर कशाला पाहिजेत ? आज तडजोड झाली नाहीं तर ज्या पद्धतीनें सरकार आज नाही उद्या पैसे वसूल करणार आहे त्या पद्धतींतील शक्ति नवी चौकशी संपल्यानंतर थोडीच नष्ट होणार आहे ? आपला पक्ष सत्पक्ष आहे असा बारडोलीच्या शेतकऱ्याचा सिद्धान्त असून या सिद्धान्ताला अनुसरून सारावाढीचे पैसे द्यावयाचे नाहींत अशा शपथा शेतकऱ्यानीं घेतलेल्या आहेत. आपणास संमत असलेल्या चौकशीमध्यें जी साऱ्याची वाढ योग्य ठरेल तीहि द्यावयाची नाहीं, अशा स्वरूपाच्या शेतकऱ्याच्या शपथा नाहीत. नवी चौकशी होऊन जाईतों साऱ्याची वाढ द्यावयाची नाहीं एवढीच काय ती बारडोलीची प्रतिज्ञा आहे. नवी चौकशी होऊन गेल्यावर त्या चौकशीत जी वाढ योग्य ठरेल ती देण्यास शेतकरी नाकबूल नाहीं. दोनहि पक्षास संमत असलेली कमिटी नेमून चौकशीस सुरवात होण्याबरोबर एकजुटीच्या शपथेच्या बंधनांतून शेतकरी मुक्त होणार आहेत. ज्या सरकारला येत्या आक्टोबरात पिकें उभीं असताना जमिनीचा सर्व महसूल शेतकऱ्याच्या जुटीला न जुमानता वसूल करण्याची शक्ति आहे त्या सरकारनें चौकशी कमिटी नेमण्याबरोबर जूट मोडलेल्या शेतकऱ्यापासून योग्य ती वाढ वसूल करण्यास कोणता त्रास पडणार आहे ? चौकशी

कमिटी नेमल्यानंतर सारावाढीच्या वसुलासंबंधानें अडचण रहात नाही. मग सरकारला अगोदर पैसे पाहिजेत कशाला? प्रसंग विशेषीं साऱ्याची तहकुबी सरकार मंजूर करीत नाहीं काय? चार सहा महिन्यापुरती बारडोलीच्या वाढीची तहकुबी देण्यास सरकारनें का पुढें येऊं नये? अशी तहकुबी दिली असता आपली इज्जत जाते, अशी खोटी समजूत असल्यामुळेंच तडजोडीच्या बाबींत आज गोंधळ माजला आहे. या इज्जतीला वळी पडल्यामुळे सरकारच्या वर्तनाला पोरकट स्वरूप येऊं लागलें आहे. शेतकऱ्यानींच साऱ्याची वाढ दिली पाहिजे असे नव्हे, तर त्याच्याकरिता कोणी तरी लक्ष सव्वा लाख रुपये सरकारी तिजोरींत भरले असता ते रुपये सारा म्हणून नव्हे तर ठेव म्हणून घेण्यास सरकार तयार आहे. बारडोलीचे शेतकरी नव्या चौकशींत ठरल्यास साऱ्याची वाढ देण्यास तयार आहेत. ते तसे पैसे भरतील म्हणून हमी सरकारास पाहिजे आहे. हमीचें कारण काय? शेतकऱ्याच्या जमिनी लाखों रुपये किंमतीच्या आहेत. पाहिजे त्याप्रमाणें या जमिनींना पायाखालीं तुडविण्याचें सामर्थ्य सरकारच्या अंगीं आहे. लँड रेव्हेन्यू कोडनें जबरदस्तीनें या जमिनीची एक तऱ्हेची मालकीच सरकारच्या पदरीं टाकली असून, शेतकऱ्याला बाहेर फेकून देऊन बटकीप्रमाणें या जमिनीला वापरण्यास सरकारला मुभा दिली आहे. ही मुभा म्हणजेच साऱ्याबद्दल हमी होय. या हमीहून आणखी मोठी हमी कोणती असणार? सरकारच्या मुठींत अशी हमी असताहि लाख सव्वा लाख रुपये हमी म्हणून कोणाकडून तरी घेण्यास सरकारनें तयार व्हावे म्हणजे पोरकटपणानें भलत्या इभ्रतीच्या नादीं आपण लागलों आहोंत असे जाहीर करणेच नव्हे काय? कसेहि असो, सरकारनें आपली इभ्रत या मुद्यावर ठेवली आहे, आणि सुरतेच्या खलबतांतून पुण्याच्या खलबतात हा मुद्दा टाकला तरी सरकार आपला

हट्ट सोडील असें दिसत नाहीं. या मुद्यासंबधानें बार्डोलीच्या लोकाचें असे म्हणणे आहे कीं, साऱ्याची वाढ द्यावयाची नाहीं, अशा शपथा घेतलेल्या असल्यामुळे कोणाकडून तरी एकदम रक्कम पटविण्याचा उद्व्याप बारडोलीच्या लोकानीं करणे शक्य नाहीं. सरकारला कोणी तशी रक्कम दिल्यास बारडोलीच्या लोकाची ना नाहीं, पण आपणात वर्गणी भरून अथवा इतर कोणापाशीं भीड खर्च करून पैसा गोळा करण्यास बारडोलीचे लोक तयार नाहींत. या कामासाठीं दे. वल्लभभाई पटेल यानी फंड उभारला असता योग्य मुदतींत लाख सव्वा लाख जुळणार नाहींत असेहि म्हणता येत नाहीं. पैसे जुळतील, पण सारावाढीच्या विरुद्ध चळवळ करावयाची आणि पुन्हा सारावाढीच्या हमीकरिता फंड उभारावयाचा, या परस्परविरोधी गोष्टी सत्याग्रहाला मानवणाऱ्या नाहींत. सरकारला वाढीची तहकूबी सहज करता येण्यासारखी आहे. बाब अगदी छोटी आहे. केवळ इभ्रतीच्या नादी लागून सरकारनें हा हट्ट धरला आहे. अशा स्थितींत एक अब्रु वाचविण्यासाठीं दुसरी अब्रु सरकार गमावीत आहे. इभ्रत राहिल्यासारखें वाटेल खरें, पण पोरकटपणा पदरीं पडेल, हे सरकारच्या ध्यानीं आलेले नाही. केवळ पोरकटपणामुळें तडजोड मोडली असा सरकारास दोष लागणार आहे. मुंबईच्या टाईम्सच्या लक्षात ही गोष्ट आली असून मुंबई इलाख्यातील कोणी तरी धनिकाने पुढे यावे आणि एक लक्ष रुपये सरकारी खजिन्यात ठेव म्हणून ठेवण्यास तयार व्हावे, अशी सरकारतर्फें मुंबईच्या 'टाईम्स'नें धनिकाजवळ कालच्या अंकात याचना केली आहे. सबध लाख सव्वालाखाची रक्कम ठेवली पाहिजे असेहि नाहीं, एक चतुर्थांश रक्कम ठेवली असता भागणार आहे, असा कायद्याचा आधार सापडला आहे. तेव्हा मुंबईच्या 'टाईम्स'च्या अर्धवट सरकारी याचनेला अनुसरून कोणी तरी दाता पाच पन्नास हजार रुपये भरण्यास

पुढे येईल, असा अदाज आहे. मोठया मोठया मठातून अयाचित वृत्तीनें राहणारे असे महत असतात. तसेच महत मुंबईच्या सेक्रेटरीएटमध्ये साप्रत शिरले असले पाहिजेत, असा सशय येतो. आम्हाला असे पैसे मिळाले तरी चालतील, पण याचना आम्ही करणार नाहीं, असा सरकारी महताचा हट्ट आहे. सरकारच्या मोठेपणाकडे लक्ष देऊन ही अयाचित वृत्ति धनिक लोकांनीं साभाळली पाहिजे. सेक्रेटरीएटमधील अधिकाऱ्यानीं तसा इषारा दिला असताना एक लाख काय, दहा लाख रुपये हां हां म्हणता जमतील, पण अयाचित वृत्तीला तसे करणे शोभत नाहीं. कारण जवळच्याच चेल्यानें किंवा सेवेकऱ्यानें महतासाठीं भिक्षा मागितली असतां अयाचित वृत्ति पाळली जात नाही. अयाचित वृत्तीचा गवगवा गावात गावाच्या लोकानींच करावयाचा असतो, महताच्या चेल्यानीं करावयाचा नसतो. नाहीं तर पुन्हा इभ्रत जाते. मुंबई सरकार अशा पेचात सापडलें असल्यामुळे सरकारला पैसे भरणारा कोणी तरी दाता पाहिजे अशी जाहिरात मुंबईच्या ‘ टाईम्स ’नें आपल्या कालच्या अग्रलेखात प्रसिद्ध केली आहे; अशी जाहिरात लागल्यानंतर कोणी तरी दाता पुढे आल्यावाचून कसा राहील !

———

# * अफगाणिस्थानांत राज्यक्रांति

गेल्या चार पांच दिवसात अफगाणिस्थानची राजधानी काबूल येथें राज्यक्रांति घडून आली असून, अमीर अमानुल्लाखान याना आपली गादी सोडून कंदाहारकडे पळून जावें लागलें, व त्याच्या मागून गादीवर बसलेले त्याचे वडील बंधू सरदार इनायतुल्लाखान यानाहि दोन दिवसाची अमिरी भोगून हिंदुस्थानात पेशावर येथे यावे लागलें! सांप्रत काबूल शहरात चोराचे व लुटारूचे प्रमुख बचा–इ–साकू, (बच्चा–ए–सक्काई, ह्याचा अर्थः बच्चा (मुलगा) ए (चा) सक्काई (भिस्ती) 'भिस्तीचा पोरटा,) हें हबीबुल्लाखान गाझी असे नाव धारण करून अफगाणिस्थानच्या गादीवर बसले आहेत. सरदार इनायतुल्ला यांना बचा–ई–साकूचे परवानगीनें हिंदुस्थान–सरकारच्या विमानातून पेशावरास आणण्यात आलें असलें तरी क्वेट्टाच्या मार्गानें ते कंदाहार येथे रहावयास जाणार आहेत. बचा–ई–साकू याचे वडील पाणक्याचा किंवा भिस्त्याचा धंदा करणारे असून, लष्करात काहीं दिवस सामान्य शिपायाची नोकरी करून लुटारूंच्या धंद्यास त्यानी काहीं वर्षांपूर्वी प्रारंभ केला. धाडसी, हुषार व श्रीमंताना लुटून गरिबाना अन्नदान करणारा, अशी बचा–ई–साकू याची ख्याति चोहोंकडे पसरली असल्यामुळे, डिसेंबर महिन्यात जलालाबादचे टापूंत शनिवारीं पठाणाचें बंड सुरू असताना काबूलच्या आसपासच्या प्रांताला त्रस्त करून सोडण्याचें काम बचा–ई–साकू याजकडे सोंपविण्यांत आलें. डिसेंबरच्या दुसऱ्या आठवड्यातील जलालाबाद व काबूल येथील बंडाळीची हकीकत रशियांत मास्को येथे सविस्तरपणें प्रसिद्ध झाली असून, त्यातील

* नवाकाळ, ता. २० जानेवारी १९२९

महत्त्वाचे भाग आता हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाले आहेत. गरिबांचा कैवारी व श्रीमंताचा लुटारू बचा–ई–साकू ह्याचे डोके तोडून आणणारास अमीर अमानुल्ला यांनी डिसेंबरचे दगलीत मोठे बक्षीस लाविले होते. उलट बचा–ई–साकू यानेहि अमीर अमानुल्ला याचे डोके उडविणारास मोठे बक्षीस मिळेल अशा जाहिराती काबूल–जलालाबाद या रस्त्यावर त्या वेळीं लावल्या होत्या. सामान्य चोर व दरवडयाचे पैसे गरिबाना वाटणारा दरवडेखोर यापलीकडे बचा–ई–साकू याची किंमत डिसेंबरच्या पहिल्या आठवडयात नव्हती. पण डिसेंबरच्या दुसऱ्या आठवडयात बचा–ई–साकू याने काबूल शहरास वेढा देऊन अमीर अमानुल्लाखान याना चार दिवस 'जगतों का मरतो' असे करून सोडले होतें. काबूल शहरातच नव्या भरतीचीं माणसे म्हणून बचा–ई–साकूचे लोक शिरले होते, व काबूल शहराजवळील माऱ्याची टेकडी, विमानाचें स्टेशन आणि बिनतारी तारायंत्र यांच्या जागा आपल्या स्वाधीन केल्या होत्या. थोडक्यात चुकलें, नाहींतर त्याचवेळी अमीर अमानुल्ला ह्याना बचा–ई–साकूनें जीवत धरलें असतें, पण आयत्यावेळीं अमीरसाहेबाना नव्या सैन्याची कुमक मिळाली, व बचा–ई–साकू याचा पराभव डिसेंबरच्या दुसऱ्या आठवडयात होऊन काबूलच्या उत्तरेस १०–२० मैल बचा–ई–साकूला पळून जावे लागलें! डिसेंबरच्या दुसऱ्या आठवडयापासून परवापर्यंत बचा–ई–साकूच्या सैन्याच्या व अमीरसाहेबाच्या सैन्याच्या चकमकी केव्हा काबूलपासून २० मैलावर तर केव्हा काबूलपासून ४–५ मैलावर एकसारख्या झडत होत्या. डिसेंबरच्या दुसऱ्या आठवडयांत बचा–ई–साकूचें सैन्य सहा हजाराहून अधिक होतें, ह्या सैन्याच्या बंदुका अफगाण बंदुकाहून अधिक चांगल्या होत्या; लढाऊ सामान ह्या सैन्यापाशीं भरपूर होतें, सैन्याची शिस्त व बंदोबस्त उत्तम होता; इतकेच नव्हे तर

लढण्याचे डावपेचहि युरोपियन तऱ्हेचे होते ! सैन्याच्या ह्या बदोबस्तावरून मास्को येथील रशियन पत्रकारानीं असा आरोप इग्लडवर ठेवला आहे कीं, इग्रजाच्या चोरटया मदतीशिवाय बचा–ई–साकूचे प्रस्थ अशा रीतीने माजलेलें नाहीं. बचा–ई–साकू याजपाशी नव्या तऱ्हेचीं हत्यारे कोठून आलीं ? चोरात व लुटारूत लष्करी शिस्त कोणी उत्पन्न केली ? नवीन तऱ्हेच्या लढाईचे ज्ञान बचा–ई–साकूंत कसे हस्तगत पडले ? पेशावर–खायबर–जलालाबाद–काबूल या पट्ट्यात बडाचा धुमाकूळ चालला असताना जलालाबादच्या दक्षिणेकडील शिनवारी पठाण व उत्तरेकडील मोहमदी पठाण या दोन पठाणाच्या जातीनी राजे अमानुल्ला याच्या सुधारणाविरुद्ध व विशेषतः स्त्रियाचा गोषा काढून टाकण्याच्याविरुद्ध तक्रारी केल्या, आणि अफगाणिस्थानातील व पजाबातील मुल्लाचें पाठबळ ह्या तक्रारीना मिळाले. राजे अमानुल्ला मुसलमानी धर्माला हरताळ लावीत आहेत अशी ओरड मुल्लानीं केल्यामुळें शिनवारीच्या बडास सुरवात झाली. हें बड शात करण्याकरिता जानेवारीच्या पहिल्या आठवड्यात मुल्लाची अठरा कलमाची यादी राजे अमानुल्ला यानी मान्य करून आपल्या सुधारणा मागे घेतल्या आणि अफगाणिस्थानात स्थिरस्थावर झाले असे जाहीर करण्यात आलें. मुल्लाच्यापुढे हात टेकल्यानें अमानुल्लाखान याची शक्ति न वाढता उलट काबूल शहरात ते कमकुवत ठरले, आणि पाच सहा दिवसापूर्वी बचा–ई–साकू पुन्हा काबूल शहराच्या सभोंवती दंगा करू लागला. अमीर साहेबाच्या सैन्यापैकी बरेच लोक बचा–ई–साकू याना मिळाले, आणि बडखोराची सख्या १२ हजाराहून अधिक झाली. अमीर-साहेबाचा तोफखाना शत्रूला मिळाला, आणि राजे अमानुल्ला याच्याच तोफा काबूल शहरावर डागण्यात आल्या ! मुल्लाच्या मागण्या कबूल केल्या तरी भागत नाही असे पाहून राजे अमानुल्ला यानीं आपले वडील बंधु

सरदार इनायतुल्ला याना गादीवर बसविलें, आणि मुल्लाचें शिष्टमंडळ बचा–ई–साकू याना वरील बातमी कळवून बंड शांत करण्याकरिता बडखोरांकडे निघून गेले. ह्या दिवशीं अमानुल्ला कंदाहारकडे पळून गेले; मुल्लानीं बंड थंड केलें, व इनायतुल्लाखान अमीर झाले; अशा बातम्या चोहोंकडे पसरविण्यात आल्या. हिंदुस्थानातील मुल्लांना पाहिजे तेथें संचार करण्याची व लोकाकडून धर्मगुरु म्हणून पूजा करून घेण्याची सनद एक तऱ्हेनें देण्यात आली आहे, असेहि सरदार इनातुल्लाखान यांच्या औट घटकेच्या अमीरीच्या प्रारंभी प्रसिद्ध करण्यांत आलें! काफीर अमानुल्ला पडले व मुल्लाचें बाहुलें गादीवर बसलें, असा अमीर अमानुल्लाखान याच्या पलायनाचा अर्थ झाला. अमीर इनायतुल्ला याचे राज्य एक दोन दिवस टिकतें न टिकतें तोंच असे प्रसिद्ध झालें कीं मुल्लाच्या तंत्रानें बचा–ई–साकू वागणारे नसून काबूल शहरांत शिरून बडखोरांनीं राजवाड्याला गराडा दिला आहे! ज्या मुल्लानीं व सरदारानीं अमीर अमानुल्लाखान याच्याशीं बेइमानी करून अमीर इनायतुल्लाखान यास गादीवर बसविलें त्याच्याहि तोंडाला बचा–ई–साकू यानें पानें पुसलीं; आणि इनायतुल्लाखान याना पेशावर येथें इंग्रजी विमानातून निघून जाण्यास परवानगी देऊन आपल्या स्वतःच्या नावाची द्वाही हबीबुल्लाखान गाझी म्हणून काबूल शहरात फिरवून बचा–ई–साकू अफगाणिस्थानचे राजे झाले. रशिया, फ्रान्स व जर्मनी या देशातील लोकमत इंग्रजाच्या चोरट्या मदतीने बचा–ई–साकूची राज्यक्रांति घडून आली असे आहे; व विलायतचीं वर्तमानपत्रें अफगाणिस्थानच्या अंतस्थ स्थितीशीं इंग्रजांचा काहीं संबंध नाहीं असें ठासून सांगत असून, फ्रान्सनें इंग्रजांवर असा आरोप करणें म्हणजे इंग्रजी विमानांनी काबूल येथील फ्रेंच वकिलातींतील बायकामुलांना सुरक्षितपणे पेशावर येथें आणल्याबद्दल चांगले उपकार फेडणें होय, अशी

टीका विलायतचीं पत्रे फ्रान्सवर करीत आहेत. मुल्लानीं बंड उभारलें, पण मुल्लाना तोंडघशीं पडावे लागून इंग्रजाच्या बंदुकींच्या आश्रयानें पुढें आलेला एक लुटारू आज काबूलच्या गादीवर बसला! काबूलच्या गादीच्या अंगीं आज हुकमत कोणती आहे? खजिन्यात पैसा नाहीं, बाहेरून आलेल्या दहा बारा हजार बंदुकीना नवीन दारूगोळयाचा पुरवठा करण्याचें सामर्थ्य नाही, पूर्वपरंपरेच्या श्रीमतीचें व मुल्लाचेंहि आता पाठबळ नाहीं! असला हा हबीबुल्ला गाझी, गरिबाचा कैवारी व श्रीमताचा कर्दनकाळ म्हणून नावाजलेला मूळचा पाणक्या, कितीहि हुषारीने वागला, तरी इंग्रजाच्या हातातलें बाहुलें होऊन नाचण्यापलीकडे व दरसालची पूर्वीची सतरा लाखाची देणगी इंग्रजाकडून पुन्हा घेण्यापलीकडे बचा–ई–साकू याचे हातून अधिक करामत अफगाणिस्थानात होऊं शकेल असे दिसत नाहीं. अमीर अमानुल्लाखान ह्याचा कल इंग्रजापेक्षा रशियाकडे अधिक होता, ह्यामुळें बचा–ई–साकू याना १०–१५ हजार बंदुकाची मदत मिळून काबूल येथील बोल्शेव्हिकाच्या बस्तानाची खच्ची करण्यात आली, असे जर्मन पत्रकाराचें मत आहे. अमानुल्लाखान कंदाहार येथे आता राहिले असून, काबूलच्या दक्षिणेकडील गझनीपासून कंदाहारपर्यंतचा मुलूख त्याच्या हुकमतींत असल्यासारखा आहे. कंदाहारचे पठाण दुराणी जातीचे असून सूरिया राणीहि दुराणी जातीचीच आहे. गझनी, कंदाहार व हिरात हे टापू अमानुल्लाखान याच्या बाजूचे आहेत व तीस हजारपर्यंत सैन्य अमानुल्लाखान याना चार सहा अठवडयात उभें करता येईल, असा अंदाज आहे. अमानुल्लाखान यानीं तीस हजार सैन्य उभें केलें तरी हिरातच्या बाजूनें हत्याराची व दारूगोळयाची मदत झाल्याशिवाय काबूलवर चाल करून जाणें त्याना शक्य नाहीं. अफगाणिस्थानच्या दारूगोळयाचा साठा, तोफखाना व नव्या तऱ्हेच्या बारा

पधरा हजार बदुकी बचा–ई–साकू उर्फ अमीर हबीबुल्ला गाझी याच्या हातीं असून, रशियाच्या मदतीशिवाय अफगाणिस्थानात काबुलातून ह्याना पिटाळून देण्यास कोणीहि समर्थ नाही. काबूलचा टापू पेशावरला जितका जवळ आहे तितकाच कदाहार–गझनीच्या मुलुखालाहि जवळ आहे. पूर्वी डिसेंबरात ज्या मार्गाने बचा–ई–साकू याला हत्याराची व दारू-गोळ्याची मदत मिळाली त्याच मार्गाने पुढेहि मदत मिळणारी असल्यामुळें, कदाहार–गझनीच्या टापूचें रशियाची चोरटी मदत मिळूनहि तावडतोब फारसे चालेल असे म्हणता येत नाही. काबूल येथून बचा–ई–साकूचें उच्चाटण होण्यास, काबूलच्या उत्तरेकडील सोव्हिएट तुर्कस्थानातून म्हणजे बोल्शेव्हिकाच्या टापूंतून उत्तर अफगाणिस्थानातील चोराच्या व लुटारूच्या प्रमुखाना हत्याराची व दारूगोळयाची भरपूर मदत मिळून बचा–ई–साकूसारखे कित्येक लुटारू गरिबाचा कैवार घेत व श्रीमताना लुटीत किंवा बोल्शेव्हिकाच्या मताचा प्रसार करीत काबूलच्या आसपास येऊन पोहोंचले पाहिजेत. तोपर्यंत कदाहार–गझनी–हिरात प्राातातील अमीर अमानुल्लाखान याच्या वर्चस्वाला महत्त्व येणार नाहीं. बचा–ई–साकूसारख्या लुटारूला बदुकाची व दारूगोळ्याची मदत इग्रजानीं केली, असा आरोप मास्कोचे बोल्शेव्हिक इग्रजावर उघडपणें करीत आहेत. तेव्हा उत्तर व पश्चिम अफगाणिस्थानात म्हणजे काबूल व सोव्हिएट तुर्कस्थान याच्यामधील टापूंत बोल्शेव्हिक मताचे लुटारू चोहोंकडे पेरून टाकण्यास बोल्शेव्हिकाचे एजट मागेपुढे पहाणार नाहींत, असा अदाज आहे. पश्चिम अफगाणिस्थानात बडाळीला सुरवात झाल्याची बातमी आली, म्हणजे ज्यानीं बचा–ई–साकूला बदुका पुरविल्या त्याना बोल्शेव्हिक स्वरूपाची बडाळी उत्तर किंवा पश्चिम अफगाणिस्थानात दृष्टीस पडल्या-नतर आपल्या चेहऱ्यावरील बुरखा दूर करणें भाग पडेल, हें उघड आहे.

दक्षिणेच्या भागात अमानुल्लाखान याचें वर्चस्व, उत्तरेच्या व पश्चिमेच्या भागात बोल्शेव्हिक चळवळीची बडाळी, सरहद्द व जलालाबाद येथें तोंडघशी पडलेल्या मुल्लाची धादल, व काबूल येथे परकी बदुकींच्या जोरावरील बचा–ई–साकू याची सत्ता, अशा चार पाच वाटण्या अफगाणिस्थानच्या होऊन हिंवाळ्यानतर जोराची लढालढी सुरू झाल्यावर, इग्लडची किंवा रशियाची आजची तटस्थवृत्ति कायम टिकणें शक्य आहे काय?



# श्री. कृ. प्र. खाडिलकर यांचेवरील राजद्रोहाच्या खटल्यास कारणीभूत झालेला लेख



## * मुंबईचे दंगे व बोल्शेव्हिक बिल

ता. ७ रोजीं दिल्लीस असेंब्लीमध्यें बोल्शेव्हिक बिल ६१ विरुद्ध ५० अशा बहुमतानें सिलेक्ट कमिटीकडे सोपविण्याचा ठराव पास झाला. या ठरावाला बहुमत मिळण्यासाठी नोकरशाहीच्या घटकांनीं ज्या गोष्टींचा फायदा घेतला, त्यात मुंबईच्या दंग्याची प्रामुख्याने गणना करावी लागते. येथील दंग्याचे निमित्तकारण पठाण लोक मुलें पळवितात अशा अर्थाची हूल असून, गिरणी कामगारात अलिकडे बरेच दिवस पसरलेला असंतोष हा त्या अफवेला पडलाच तर एक प्रकारे केवळ पार्श्वभूमीसारखा उपयोगीं पडणारा आहे; परंतु नोकरशाहीच्या सभासदांनीं असेंब्लींत कम्युनिस्टांचीं हिंदुस्थानातील कारस्थानें व मुंबईतील दंगे यांचा संबंध जोडून आपल्या बाजूला बरींच मतें ओढलीं. कम्युनिस्टांच्या तत्त्वाची असेंब्लींत जी चर्चा झाली ती लक्षात घेतली किंवा या तत्त्वाचा प्रसार थांबविण्याकरिता प्रत्यक्ष जीं कलमें आहेत त्यांचा विचार केला तरी मुंबईतील दंगे हें कम्युनिस्टांच्या कारस्थानाचें फळ कसे ठरतें, याचा पत्ता लागत नाहीं. कम्युनिस्ट हे भांडवलशाहीचे कट्टे शत्रू समजले जातात. पठाणांनीं मुलें पळविण्याच्या

* नवाकाळ, ता. ९ फेब्रुवारी १९२९

हुलीचा व भांडवलशाहीचा साहजिकच काहीं संबंध नाही. शिवाय पठाण हे किरकोळ सावकारी करणारे असले तरी त्यांचा भांडवलशाहीमध्यें अंतर्भाव होत नाहीं. मग त्यांच्याविरुद्ध सुरू झालेल्या दंग्याचें कम्युनिस्टांच्या कारस्थानाशीं नातें कसे जोडलें जातें, हें एक फक्त नोकरशाहीलाच ठाऊक! देशातल्या मजूरवर्गात स्वस्थितीविषयीं निःसंशय असंतोष आहे आणि त्याचीं कारणें पं. मालवीय व सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांनीं आपल्या भाषणांत उत्कृष्ट रीतीनें दाखविलीं आहेत. देशाचें दारिद्र्य दिवसानुदिवस वाढत आहे. या कारणाला हिंदी कारखानदारांच्या बाजूनें ब्लॅकेटसाहेबांनीं ठरविलेल्या हुंडणावळीच्या भावाची भर पडली आणि अप्रत्यक्षरणें या भावाने कारखानदार मालकाच्या बरकतीला खोडा लागून कामगारांची आर्थिक प्रगति अडकवून धरली गेली. कामगारांच्या असंतोषांत जर बोल्शेव्हिकाचें भूत दिसत असेल तर त्याला गाडण्यास उपयोगी पडणारा मंत्र शोधण्यासाठीं पुढाऱ्यांना एकत्र बोलावून उभयपक्षीं दिलसफाईनें या प्रश्नाची साधकबाधक चर्चा होऊं द्या असे आव्हान सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांनीं नोकरशाहीला केले होते. पं. मालवीय यांनीं लोकांच्या सर्वसामान्य दैनेचा जास्त तपशिलवार विचार आपल्या भाषणांत केला असून मजूर आणि शेतकरी यांच्या असंतोषाचे मूळ नोकरशाहीच्या कारभाराशीं नेऊन भिडविले आहे. परंतु नोकरशाहीला आपल्या कारभारांत सुधारणा करावयाची नसून त्या कारभारांत फेरफार घडवून आणण्यासाठीं उत्पन्न झालेल्या चळवळी नव्या नांवाखालीं नव्या साधनांच्या साह्यानें झोडपून काढावयाच्या आहेत. मजूर व शेतकऱ्यांच्या असंतोषाला नोकरशाहीनें कम्युनिस्टांच्या कारस्थानाचा अवतार असे नांव दिलें असून तिला अगदीं ऐनवेळीं पूर्वी जणूं काय योजनाच केल्याप्रमाणे मुंबईचे दंगे आयती पोळी भाजून घेण्याला उपयोगी पडले आहेत. जेव्हां जेव्हां विवेचनांत अडवणुकीचा

प्रश्न आला तेव्हा तेव्हा मुंबईच्या 'सध्याच्या परिस्थितीकडे पहा' अशा अर्थाचे उद्गार नोकरशाहीच्या लोकांनी व त्यांच्या पुरस्कर्त्यांनी बेधडक काढले. मि. फेरार, सर डेनिस ब्रे, सर डार्सी लिंडसे यांनी कितीहि कठशोष केला तरी 'बोल्शेव्हिकांच्या मतप्रसाराशी सध्याच्या परिस्थितीचा साक्षात् संबंध बिलकूल नाहीं' या लोकपक्षातील पुढाऱ्यांच्या ठाम सिद्धान्ताविरुद्ध वरच्यापैकीं कोणालाहि सयुक्तिक मुद्दा मांडतां आलेला नाहीं उलट उत्तर न देतां या दंग्याकडे बोट दाखविण्याचा नोकरशाहीच्या लोकांनीं सपाटा ठेवल्यामुळे, बोल्शेव्हिक बिल असेंब्लींत निघायला व मुंबईत दंग्याची आग भडकायला एकच गांठ पडली तेव्हां या चमत्कारपूर्ण योगायोगाच्या मुळाशी बोल्शेव्हिक बिलाचे पाठीराखे तर नसतील ना, हा संशय फोफावण्यास जागा झाली आहे. बोल्शेव्हिक मताच्या वर्चस्वाखाली भावी काळांत केव्हां तरी चार पांच पिढ्यानंतर हिंदी राष्ट्र जाण्याच्या शक्यतेचे भय आज येथील ब्रिटिश राज्यकर्त्यांचे धाबे दणाणून सोडीत आहे. त्या शक्यतेचीं कारणें उत्पन्न होण्यापूर्वीच उपटून काढण्यासाठीं बोल्शेव्हिक बिलाचा जन्म आहे आणि बिलाच्या आवश्यकतेचा पुरावा काय तर असेंब्लींत बिल निघण्याच्या सुमारास मुंबईस सुरू झालेले दंगे! द्राविडी प्राणायामानें देखील सिद्ध न होऊं शकणारा हा बादरायण संबंध पाहिला म्हणजे, मि. फेरार प्रभृति मंडळीनें हिंदी लोकमतामागे असलेल्या बुद्धिमत्तेची थट्टा चालविली होती कीं, त्यांच्या समजुतीप्रमाणे कां होईना देशांत उत्पन्न झालेल्या बोल्शेव्हिक मतप्रसाराच्या भयंकर परिस्थितीची ते गंभीर व अंतःकरणपूर्वक चर्चा करीत होते, हेंच कळेनासे होतें. आयत्या वेळच्या दंग्याचा ज्यांनीं अशा रीतीनें खोटा फायदा घेतला, त्यांच्याकडेच दंग्याच्या उत्पत्तीचा संबंध त्यांच्या बुद्धिवादाचें अनुकरण करून जोडण्यास काय हरकत आहे? हिंदुस्थानातल्या ब्रिटिश नोकरशाहीची

अनियंत्रिक सत्ता पुढे देखील अबाधित रहावी यासाठीं तळमळणाऱ्या लंडन टाईम्स, डेलीमेल वगैरे पत्राच्या संपादकांना तर मुंबईचे दंगे ही एक अमृतसिद्धियोगाची पर्वणीच वाटत आहे. या दोन्ही पत्रांनीं मुंबईच्या दंग्याकडे सायमन कमिशनचें लक्ष वेधलें असून असे दंगे जेथे घडतात तेथले लोक स्वराज्याला अपात्र आहेत, अशी इषारत कमिशनला दिली आहे. कोलबोस व मुंबईस झालेल्या दंग्यात मजूर वर्गाचा अंशतः संबंध आहे, यावरून मास्कोच्या मदतीने सार्वजनिक संपाची दंग्याच्या रूपात हिंदी मजुरांनी रंगीत तालीम चालविली आहे, असा अभिप्राय लंडन टाईम्सने ठोकून दिला असून मजूर पक्षात नेमस्त व जहाल असे भेद पाडण्याचा यत्न केला आहे. डेलीमेल पत्राला हिंदुस्थानातल्या ब्रिटिश भांडवलाची काळजी पडली असून, हिंदी पुढाऱ्यांना राज्यकारभारात जे हक्क द्यावयाचे असतील ते हक्क बहाल करतांना इंडियन गव्हर्मेंट सिक्युरिटीची व्यवस्था ते ठेवतील असा बंदोबस्त करावा, असे सायमन कमिशनला मोठ्या कळकळीने सुचविलें आहे. वस्तुतः जो कोणी मुंबईतील दंग्यांची निर्विकार बुद्धीने छाननी करील त्याला स्वच्छ दिसेल कीं, दंग्यात कामगारांचा जो संबंध आला तो रोजगाराच्या नात्याचा नसून मुलें पळवून नेण्याच्या भीतीने क्षोभलेले मुलांचे पालक या दृष्टीचा संबंध आहे. परंतु ज्यांनी येनकेन प्रकारेण हिंदी चळवळ ठेचण्याकरितां बुद्धिपुरःसर आपल्या सारासारज्ञतेला सोडचिठ्ठी दिली आहे, त्यांच्यापासून वरच्यासारख्या निर्विकार तारतम्याची अपेक्षा कशी धरतां येईल? दंग्यात मजूर होते या बातमींतल्या मजूर शब्दावर दृष्टि खिळून बोल्शेव्हिकांच्या बागुलबोवाने त्यांच्या मेंदूचा कबजा घेतल्याप्रमाणे 'हा घ्या बोल्शेव्हिकांच्या मतप्रचाराचा पुरावा' अशा आरोळ्या इकडे असेंब्लींत मि. क्रेरार व त्यांच्या मताची री ओढणारे यांनीं ठोकल्या, तर

तिकडे लंडन टाईम्स, डेलीमेल यानीं 'बोल्शेव्हिकाच्या कारवाईची रगीत तालीम सुरू झाली' 'हिंदी जनता स्वराज्याला नालायक आहे' 'हिंदुस्थानातलें ब्रिटिश भाडवल बुडण्याच्या पथास लागलें, त्याला तारण्याची तजवीज करा', अशा अर्थाच्या किंकाळयानी ब्रिटिश जनता भेदरून सोडण्याला प्रारभ केला! बोल्शेव्हिक बिल ४ महिन्यामागे असेब्लींत आलें होतें, आणि तेव्हा हिंदुस्थानात किंवा सिलोनात दग्याचें स्वप्न देखील नव्हते. चार महिन्यामागे बिल आणले; यावरून तेव्हाच नोकरशाहीपाशीं बिलाच्या समर्थनाकरिता भक्कम पुरावा होता, हें उघड आहे. मग आयत्या वेळच्या दग्याचा फायदा नोकरशाहीनें का घ्यावा? चार महिन्यापूर्वी नोकरशाहीचे चाललें नाही, मुबईच्या दग्याचा आश्रय घेऊन आता बिल पुढे सरकलें, मग प्रेताच्या टाळूवरील लोणी चाटून खाण्यासारख्या पद्धतीने या दग्याचा फायदा घेणाऱ्या ह्या बिलाच्याच माथ्यावर दंग्याच्या उत्पत्तीचें खापर का फोडूं नये? दग्याच्या बातम्यानीं मनावर पडलेल्या ताणामुळे असेब्लींतील बऱ्याच लोकनियुक्त सभासदाचा बुद्धिभेद मि. करार प्रभृतींना करता आला व या एकाच गोष्टीवरून नोकरशाहीकडे झुकलेल्या बहुमताचा उलगडा होण्यास हरकत नाहीं. एका शहराच्या स्थानिक दग्यावरून एकदम सगळया देशाच्या राजकारभाराची तपासणी करून सुधारणा सुचविण्यासाठीं नेमलेल्या कमिशनकडे धाव घेणें यासारखा बुद्धीचा दुरुपयोग कोणता असणार? पण हा अत्याचार लडन टाईम्स, डेलीमेल या एरवी विचारी व भारदस्त समजल्या जाणाऱ्या बिलायती पत्रानीं केला आहे! यावरून त्याची दानत व हिंदुस्थानाविषयींची भावना सहज ध्यानात येते. हिंदुस्थानात जबाबदार राज्यपद्धति सुरू व्हावी अशी निर्मल इच्छा असेल तो कोणीहि, डेलीमेल, लंडन टाईम्सप्रमाणें निमित्ताला टेकल्यासारखा या इच्छेला न शोभणारी

भलतीच हाकाटी करणार नाहीं. मि. क्रेरार याचें बोल्शेव्हिक बिल तर बोलून चालून हिंदी चळवळीचा गळा आवळण्याचा फास आहे आणि सायमन कमिशनपासून कसलीच प्राप्ति होणार नाही, अशी हिंदी पुढाऱ्याची खात्री झालेली आहे. बोल्शेव्हिक बिल, विलायती वृत्तपत्रें आणि सायमन कमिशन याचें एकंदर मेथकूट सिद्धसाधकाच्या टोळीसारखें असल्यावर त्यांनीं या दंग्याचा फायदा घ्यावा यांत आश्चर्य कसलें?

---

# खाडिलकरांचीं अध्यक्षीय भाषणें

## नाट्य संमेलनापुढील भाषण

१९१७ सालीं ता. ४ जून रोजीं गंधर्व नाटक मंडळीतर्फे पुणें येथें भरलेल्या नाट्य संमेलनाचे अध्यक्ष या नात्यानें कै. काकासाहेब खाडिलकर यांनीं केलेल्या भाषणाचा वृत्तांत पुढें दिला आहे—

### तत्त्वज्ञानी व कवि

" मला आपण ह्या अध्यक्षपदाचा बहुमान दुसऱ्यादा दिलात याबद्दल मी आपला फार आभारी आहे. गंधर्व नाटक मंडळीमार्फत होणाऱ्या संमेलनाचें अध्यक्षस्थान स्वीकारणें म्हणजे सारा 'घरगुती प्रकार झाला' असा समज होण्याचा संभव असल्यानें मी ते नको म्हणत होतों. पण सन्मित्राच्या आग्रहावरून ह्या पदाचा स्वीकार करणें मला भाग पडत आहे. शिवाय माझा धंदा नाटकें लिहिण्याचा, माझी उपजीविका नाटकावर, आणि माझा चरितार्थहि नाट्यलेखनच. तेव्हा नाट्यकलेतील दोष दाखविणारा या धंद्याच्या बाहेरील माणूस कोणी असता तर बरें झालें असतें. परंतु हल्ली २।४ वर्षें याच धंद्यातील मनुष्य अध्यक्षस्थानीं नेमण्याचा प्रघात पडला असल्यामुळे मीं आपली आज्ञा मान्य केली आहे. आजच्या दिवसाचें माहात्म्य व विशिष्टपणा म्हणून मी 'बादशहास आयुरारोग्य प्राप्त व्हावें व ब्रिटिश सरकारचा महायुद्धात जय व्हावा' असा ठराव आपल्यापुढे मांडतो. हा ठराव आम्हाला यापूर्वी मान्य झालेला आहे व ब्रिटिश प्रजाजन या नात्यानें हें आपलें कर्तव्य आहे. काव्याचा मुख्य विषय संसार, समाजाचा, देशाचा

संसार कसा काय चालला आहे हे राजसंस्थेवरून कळतें. 'राजा कालस्य कारणम्' या न्यायाने राजा हा देशाच्या संसाराची खूण होय. 'बादशहा सुखी होवो!' असे ज्यावेळी आपण म्हणतों त्या वेळीं 'बादशहाचें घराणें सुख भोगो' असा आपला ज्याप्रमाणे अर्थ असतो, तसेच 'लोकसमाजातील स्वराज्य सत्तेचा अंश वाढीस लागो' असेहि आपण चिंतितों.

तत्त्वज्ञानी हा सत्य जाणतो, परमेश्वरी आनंदात तल्लीन होतो, पण तो वेदाभ्यासजड व 'विषय-व्यावृत्त कौतूहल' असतो. तत्त्वज्ञान खुंटतें, तर्कशास्त्र कुंठित होतें, तेथेहि कवीची प्रतिभा सत्यशोधन करते. हा कवि व तत्त्वज्ञानी यामधील फरक होय! आनंद हा तुडुंब वाहू लागला म्हणजे त्याला रसाची पातळ अशी 'वाहणारी' अवस्था प्राप्त होत असते. ह्या रसाचें कोणीहि व कितीहि जरी पान केले तरी तो कमी न होता वाढतच असतो. कवि हा स्वतः संसारातील आनंद उपभोगून दुसऱ्याचा संसार आनंदमय करीत असतो.

## राजसत्तेला व्यापून उरणारा कवि

कवि हे मुख्यतः संसाराभोवतींच गुरफटलेले असतात. संसाराचें केंद्र म्हणजे राज्यव्यवस्था होय. राजाला कवि प्रिय असेल तर तो कवीला आश्रय देतो, पण तोच अप्रिय असेल तर तो कवीला घालवून देतो, त्याची पुस्तके जप्त करतो. मी हा जो राजा शब्द वापरता आहे तो 'पंचमजॉर्ज' या अर्थी नव्हे, तर 'अधिकारी' या अर्थी आहे हें पक्के ध्यानात ठेवले पाहिजे. कवीचें जीवित राजसत्तेच्या मर्जीवर अवलंबून असते. तिला एखादा कवि अप्रिय असला म्हणजे असे वाटूं लागते की 'हा कवि बोकाडी बसणारा पिशाच्च आहे!' मग ती मांत्रिक बोलावते व कवीच्या नाकात मिरच्याची धुरी घालावयालाहि कमी करीत नाहीं. मी 'हा मिरच्याचा धूर अनुभवलेला' मनुष्य आहे. कवीनें जवळ जावे व राजाने दूर सारावे अशी अप्रिय कवीची

स्थिति होते. मी राजा असतों तरी मलाहि एखादे वेळीं असेंच करावें लागलें असते! तेव्हा अमूक एकावर मी दोष ठेवूं इच्छित नाहीं. असे काहीं राजकारणाचे प्रसग येतात कीं त्यावेळीं कवीचीं कितीहि लाडकीं व मुख्य अपत्यें असलीं तरी राजसत्तेच्या निर्घृण वृत्तीला तीं बळी पडतात. जेव्हा रूळ रस्त्यावरून फिरतो तेव्हा क्षुद्राचा चुराडा व्हावयाचाच, त्यात रूळाला दोष देण्यात अर्थ नाहीं. बा रूळा, तूं केवढा हा भक्कम, तूं फार मोठा, असेहि म्हणून काहीं उपयोग नाही. ही क्षुद्रकणाची परीक्षेची वेळ असते. राजाची परीक्षा ज्याप्रमाणे रणागणावर त्याचप्रमाणेच तादुळाची परीक्षा उखळात होत असते. मुसळाचे घाव बसत असता जो तादुळाचा दाणा अखड राहील तोच तेजाला चढेल व त्याचेच मोल वाढेल!

कवि हा काही केल्या राजसत्तेच्या झाडाला सोडीत नाही, तो मात्रिकाला जुमानीत नाही. त्याची प्रतिज्ञा असते की 'रसाने मी राजाला भिजवून टाकीन.' ब्रह्म जसे विश्वाला व्यापून दशागुळे उरते तसाच कवि हा राजसत्तेला व्यापून पुन्हा रगभूमीवर प्रकट होतच असतो. रसामध्ये जो एकप्रकारचा वेग असतो त्यामुळेच कवीमध्यें सामर्थ्य येत असतें. अधिकाऱ्याना किंवा राजाला बरे वाटत असो वा नसो, आम्हीं कविराज सिंहासनाच्या वर, खाली, बाजूला चोहोकडे व्यापून रहातों. अर्थात या प्रवृत्तीला अनुरूप असाच हा बादशहाच्या अभिनदनाचा ठराव आहे.

## रणभूमीचें सामर्थ्य

महायुद्धात रणांगणावर तलवार चालवावी, पराक्रम गाजवावा, सरकारास मदत करावी, वीराची ओझी उचलावीं, अशी इच्छा स्वाभाविकच वीराची असते या वीराच्या कारभारात नट, नाटककार, कवि, रसिक याचे काहीं काम नाहीं, फ्रान्सच्या रणागणावर नाटकाचें प्रदर्शन फुकट जाईल, तुर्क–जर्मन हे गवयाच्या तानबाजीला झुगारतील, असा आक्षेप आग्रहावर येण्याचा

संभव आहे. कवींची गोष्ट सध्या बाजूला टाका, पण इतर लोक तरी युद्धाच्या बातम्या मोठ्या प्रेमाने का वाचतात ? 'युद्धस्य कथा रम्या' असे यावर उत्तर येईल युद्धाची बातमी वाचण्याची ज्याना चटक लागली त्याना बारीक सारीक लढाईची, १०।१५ माणसे मेल्याची, बातमी ऐकून बरेच वाटत नाही ! ५।२५ हजार लोक ठार झाले, पाचपन्नास तोफा डागल्या गेल्या किंवा राष्ट्रेच्या राष्ट्रे बेचिराख झाली, अशा बातम्या ऐकल्या म्हणजे वाचकाला बरे वाटत असते ! युद्धकथेचा वाचक केवळ यमसदृश होत असतो ! ही मनुष्याची सहज अशी निर्घृण वृत्ति का बरे ? आपली मडईतून भाजी आणावी, खावे, प्यावे, बायकामुलामध्ये आनदाने कालक्रमणा करावी, अशी कोणी वृत्ति धारण केली तरी सरकार त्याला लढाईची बातमी देते ! सरकार व्याख्यानकार गावोगावी पाठविते. मेसापोटेमियात अशी लढाई झाली, तसा जय झाला, हे कळवितं व लोकात युद्धाविषयीं गोडी ( Interest ) उत्पन्न करते, ते का ? महायुद्धाच्या काळात वृत्तिच शात राहू शकत नाहीत. रणभूमीच्या अगी ससाराकडून लक्ष खेचण्याचे सामर्थ्य आहे.

रणभूमीचे सामर्थ्य परमेश्वरी सामर्थ्यापेक्षाहि मोठे आहे. परमेश्वराने बायबल, गीता, वेद, निर्माण करून अनेक तऱ्हानी मनुष्याना जागृत करण्याचा प्रयत्न केला, पण शेवटी त्याला हात टेकावे लागले. आपल्या देशातील ससारी लोकाची स्थिति अत्यत निर्बुद्ध प्राणी जो गाढव—वाईट शब्दाबद्दल रागावूं नका, अश्लील भाषा मानूं नका—त्याच्यासारखी झाली आहे ! या देशातील ३३ कोटी दगडाना, बुद्धिहीन जनाना, गाढवाना, परमेश्वराच्या उपदेशाने काही जागृति आली नाही. 'अडला नारायण गाढवाचे पाय धरी' या न्यायाने परमेश्वरानें हात टेकले तरी आम्हीं जागे

झालो नाही ३३ कोटी लोकाची ही जडावस्था पाहिली की मनाला लाज उत्पन्न होते. जे परमेश्वराच्या उपदेशानें, लोटांगणानी झाले नाही ते आज या रणांगणाने केले आहे. आता कोठे जगावरील या उलाढाली पाहून आम्ही जागे होऊ लागलो आहो.

## कवि व वीरपुरुष

रणांगणापासून जसा वीरवृत्तीचा उगम तशीच पुरुषार्थापासून, वीरवृत्तीपासून, राजवैभवापासून रसाची–काव्याचीहि उत्पत्ति आहे. आम्हा कवीच्या मागोमाग वीरपुरुष आणि वीरवृत्तीच्या मागोमाग आम्ही, असा हा पराक्रम व रस यामधील अन्योन्य संबंध आहे! महायुद्धामुळे कवीच्या स्फूर्तीना एक प्रकारचा वेग उत्पन्न होत असतो!

माझा हिंदुस्थान, माझे महाराष्ट्र, वीरपुरुषानी केव्हा गजबजून जाईल, यश उज्ज्वल स्वरूपाने केव्हा वावरू लागेल, अशी तळमळ कवीना लागून राहिलेली असते. ‘कवी व वीर पुरुष’ याचा हा आधी-मागूनचा परस्परपोषक चमत्कार पूर्वी महाराष्ट्रात स्वराज्याच्या वेळी दिसून आला. कवीचे राज्य व वीरपुरुषाचे राज्य महाराष्ट्रात एकाच वेळी नांदले. नाटककाराच्या भोंवती जशा नटवर्गाच्या संस्था तशा या कवीच्या भोंवती हरिकीर्तनाच्या संस्था निर्माण झाल्या. हरिकीर्तनाचा पूर्वरंग धार्मिक, पण उत्तररंगात मात्र एखाद्या वीर पुरुषाच्या पुरुषार्थाचा प्रसंग घेऊन तो हरिदास समजावून सांगतो. हरिदास हा आख्यानातील सर्व पात्राचीं–पुरुषाची–नायकाची–भाषणे स्वतःच व नटाच्या अभिनयाने बोलतो! स्वराज्यामुळेच ही हरिकीर्तन–संस्था महाराष्ट्रात उज्ज्वल स्वरूपाने विनटली. ही संस्था इतक्या उज्ज्वल स्वरूपात महाराष्ट्राबाहेर दिसत नाहीं. मद्रासला कथेत मोरोपंताच्याच आर्या म्हणतात असे सांगतात! मी एकदा नेपाळात गेलों होतो, तेथे एकदा मला नाटकाला बोलावणे आलें. सूत्रधार हातात मशाली घेऊन

नाचं लागला तरी त्याचे लक्ष माझ्याकडे होते. तो न समजेल असे काहीं तरी मराठी बोलत होता ! इतकी आमची हरिकीर्तनाची संस्था परप्रांतींसुद्धां प्रिय आहे.

## कालचे शास्त्री-हरिदास आजचे नाटककार-नट

या हरिकीर्तन संस्थेपासूनच नाट्यकलेचा महाराष्ट्रांत अभ्युदय झाला. पूर्वी जे पंडित, शास्त्री, कथेकरी होते तेच स्वराज्यकाळी राजकारणांत पडले. रामशास्त्री इतके निस्पृह व विरक्त की घरामध्ये फक्त एक दिवसाची सामग्री ठेवावयाची, पण तेच राजकारण करीत होते त्यांचा निस्पृहपणा एवढा की त्यांनी स्वतःच्या संसारावर पाणी सोडले. पण राघोबाला देहांत शिक्षा फर्मावली ! त्यावेळी लोकांना शास्त्री लोक महाभारताचेंच शिक्षण देत. पुढे स्वराज्य गेले. पूर्वीचीच संस्था, तेच शास्त्री, पुन्हा इंग्रजींत निराळ्या रूपाने पुढे आले. कृष्णशास्त्री, विष्णुशास्त्री यानींच आपल्यापुढे बी. ए. एम. ए. पदव्या लावून लोकशिक्षणाचे काम अंगावर घेतले. विष्णुशास्त्र्यांनी न्यू स्कूल काढले तेव्हां हेच हरिदास-पुराणिक तेथे गोळा झाले. त्यांच प्रभावळींत रा. देवल प्रकट झाले त्या रामशास्त्र्यांच्याच स्वार्थत्यागानें व निस्पृहपणानें 'केसरी' काढला व चालविला. त्यांनी सरकारवर स्पष्ट व निर्भीड टीका करून आपला निस्पृहपणा सिद्ध केला. तेच हे शास्त्री. टिळकांच्याच जवळचे आश्रित-पुराणिक पुढे नाटककार आत्मचरित्रपर बनले ( गर्हिवरानें उचबळून व अस्पष्ट शब्दांनी ) पूर्वीच्या टिळकांच्या या आश्रित-पुराणिकांनीं 'केसरी' सोडल्यावर जायचे कुठे ? परिस्थितीप्रमाणें नाटककार व्हावे लागतें. हे सारे पूर्वसंस्थेला धरूनच आहे ! हे शास्त्री जसे पुढे नाटककार बनले तसे हरिदास नट बनले. सध्याचे गंधर्व मंडळींतील हीरो हरिदासच होते. हे असेच आहे. लोकांमध्ये मिसळून जागृति करावयाची ही महाराष्ट्राची पुरातन पद्धतीच आहे.

## वीर वृत्तीशीं तादात्म्य पावणारा तोच कवि

'दुनियेचें कल्याण मी करीन' अशी वीरवृत्ति ज्याच्यांत आहे त्याची कीर्ति कवींनीं गायची नाहीं, तर काय डुकराची गावयाची? संसारी जनास कर्मयोगाला, प्रवृत्त करणे हें वीराचें काम, हें कवीचें काम!— राष्ट्राला सुखी करीन हा पीळ वीराना पडेल तेव्हां कवीच्या अंतःकरणात कालवाकालव होईल, तो काव्य बोलेल, तो रस ओतेल, तो नाटक गाईल! काममोहित क्रौंचमिथुनाला मारताना पाहून वाल्मीकिसारख्या आद्य कवीच्या तोंडून काव्यरूपानें शापवाणी प्रकट झाली 'मा निषाद प्रतिष्ठा त्वमगमःशाश्वतीःसमाः॥ यत्क्रौंचमिथुनादेक अवधीः काममोहित॥ ही ती शापवाणी होय. संसारसुखाची राखरागोळी झालेली पाहून शापवाणी उच्चारणें कवीला अपरिहार्य आहे. कवि शाप बोलेल, तोच वीरवृत्ति ओळखील. स्वराज्यामध्ये महाभारत जास्त उमजत होते. आज इतकें भारत सवग पण तें कळतच नाहीं. तपः सामर्थ्य वाढवा, पुरुषार्थाकडे दृष्टि लावा, म्हणजे काव्यरस सहज प्रकट होईल. ज्याचें कीर्तनविषयाशीं तादात्म्य होतें तोच उत्तम हरिदास असे रामदासानीं सांगितले आहे. ज्याचें राष्ट्राच्या वीरवृत्तीशीं, परम पुरुषार्थाशीं तादात्म्य झालें तोच उत्तम नाटककार होतो, व जो स्वतःच्या भूमिकेशीं तादात्म्य पावला तोच उत्तम नट होतो. हा कर्मयोगाचा संप्रदाय महाराष्ट्रांत फार पुरातन आहे. महायुद्धानें राजकीय वातावरण धडाडून पेटले आहे, हाच काळ कवींना अनुकूल, वीराना अनुकूल, राष्ट्रभाग्योदयाला अनुकूल होय. याच काळीं महाभारत समजेल. हाच काळ नटाना व नाटककाराना हितावह आहे. महाराष्ट्राचें, हिंदुस्थानचें, हित व्हावें म्हणून आम्हींहि पहिल्या प्रथमच बादशहाना आयुरारोग्य चिंतिलें बादशहाना यशःप्राप्ति होवो अशी प्रार्थना केली."

# कीर्तन संमेलनापुढील भाषण



१९२१ सालीं नाशीक शहरीं भरलेल्या पाचव्या कीर्तन समेलनाचे अध्यक्ष या नात्याचे कै. काकासाहेब खाडिलकर याचें भाषण झालें त्याचा वृत्तात कीर्तन मासिकाच्या दुसऱ्या वर्षाच्या पाचव्या अंकात आलेला होता. तो वृत्तात पुढे दिला आहे--

## प्रास्ताविक

प्रथमतः श्रीहरि-चरणाला नमन करून, या समेलनाचें अध्यक्षस्थान आपण मला दिलें, याबद्दल मी आपले आभार मानतो. आपण शेंसवाशे वर्षे कीर्तनस्वरूपी हरीचें रूप धारण करणारे महत येथे जमला असता मजसारख्यानें अध्यक्ष होणें उचित नाही. आपण परमेश्वराचें घरी वावरणारे हरीचे दास आहात व मी भूमितलावर वावरणारा एक ससारी मनुष्य आहे. हें जरी खरें तरी मीं केवळ आपलपोटेपणाने हे स्थान स्वीकारलें आहे. काहीं तरी सेवा होईल या बुद्धीनें माझी पात्रता नसताहि मीं हे स्थान स्वीकारलें आहे. नाशिक क्षेत्र, श्रीरामसीता-सान्निध्य, गोदावरीतटाक व सिंहस्थ पर्वणी, हा योगायोग अपूर्व असल्याकारणाने गोदावरीचें स्नान करावे व पातके टाकून देता यावीत या बुद्धीने मी येथें आलों. रामचरण शितोष्णपणा समजतात. पण हरिदास बोलते चालते देवदूत आहेत. त्याना आपल्या पापाचे वाटेकरी करून आपला बोजा त्याजवर लादावा असे मला वाटलें! आपण परमेश्वराच्या घरचे दूत असल्यामुळे हा बोजा सभाळून मजवर अनुग्रह कराल अशी आशा आहे. नागपूरच्या कॉंग्रेसचे वेळीं स्वागत-मडळाच्या उपाध्यक्षानीं मला अध्यक्ष होण्याची आज्ञा केली व मीहि वरील हेतु मनात धरून हपापलेल्या वृत्तीनें हो म्हटलें. तरी पण

औधकारासारखे अध्यक्ष आपणास लाभले असते तर बरे झाले असतें. कीर्तन–समेलनाचा हा पाचवा प्रसग आहे. समेलनाच्या पूर्वीच्या अध्यक्षाकडे लक्ष दिले असता, लो. टिळक व त्याच्या सभोवतीच्या मडळीपैकी अध्यक्ष निवडण्याचा आपला परिपाठ दिसतो, व त्याच अनुसधानाने माझी निवडणूक आपण केली असावी असे मला वाटते. नाटकी विषयाशी माझा विशेष सबध असतो, एवढया करिता मला हे स्थान द्यावयास नको होते. तरी पण माझी निवड करून गोदावरीच्या तीरीं सर्व पातके धुवून टाकण्याची मला सधी दिलीत याबद्दल मी आपला अत्यत आभारी आहे!

## आसन विधिप्रमाणें काम

नागपुरास अशा समेलनास सुरवात होऊन लो. टिळक व डॉ. मुजे यानी आपणास प्रोत्साहन दिले. लो. टिळकाची गोष्ट सोडली तर त्याच्या सभोंवतीच्या इतर मडळींना अध्यक्ष निवडण्यात आपला काही हेतु दिसतो. राष्ट्रीय सभेसारखाच अशा समेलनाचा एक आसन–विधि असतो असे मला वाटते. ही समेलने कशीं भरवावी, त्याविषयी नियम कोणते आहेत, हे समजून सघटित कार्याची दिशा सापडावी व कार्य सुकर व्हावे या हेतूनेच आपण माझी निवड केलेली दिसते व मीहि या आसन–विधी–प्रमाणेच काम करणार आहे.

## हरिदास व राष्ट्रीय कार्यकर्ते

हरिदास व राष्ट्रीय सभेचे चळवळे लोक यात एक प्रकारचे साम्य आहे. राष्ट्रीय सभेत कार्याची दिशा ठरविणारे महात्मे व त्याच्या भोवती गोळा होणारे मजसारखे चळवळे लोक असतात. धर्मासबधींहि तीच स्थिति आहे. महत, साधु वगैरे परमेश्वर–कृपेचे साठे यांचें काम निराळे व त्याच्या चेल्याचें कार्य निराळे असते. कीर्तन सप्रदायातहि अशी महत मडळी आहेत, पण हा जो २००–३०० हरिदासाचा पसारा आहे हा धार्मिक

चळवळ्यांचा होय. हरिदासासारखे धार्मिक चळवळे व मजसारखे राजकीय चळवळे या दोघानी एकत्र होऊन एकमेकाची अडचण लक्षात घेऊन उभयताचा मार्ग सोपा करणे हेच आपणास उचित होय.

मुबईच्या कीर्तन-समेलनाच्या सहाव्या ठरावाकडे लक्ष दिलें असता, वृत्तपत्रकार, लेखक व वक्ते यानी ह्या सप्रदायाकडे लक्ष पुरवून ठिक-ठिकाणी त्याचा उल्लेख करावा व उत्तेजन द्यावे हाच त्यातील हेतु दिसतो. आह्मा राजकीय चळवळ्याचीहि तीच स्थिति आहे. आमचा उल्लेख करावा, उत्तेजनपर दोन शब्द बोलून लोकाश्रय मिळावा व त्याने कार्यास हुरूप यावा हाच आमचाहि हेतु असतो. दुसराहि एक महत्त्वाचा उल्लेख त्या ठरावात आहे. कीर्तनकाराची स्थिति खालावलेली आहे त्यास उपाय काय याची चर्चा करून त्या स्थितीचे निदान करावे हीच ती महत्त्वाची गोष्ट होय. माझ्या मते याची तीन कारणे दिसतात. पहिले कारण सुशिक्षितांचें औदासिन्य, दुसरे रुचिवैचित्र्य व तिसरे दानपद्धतीसबधीं अनास्था हे होय. या कारणाकडे व १५-२० वर्षापूर्वीच्या राजकीय चळवळीकडे पाहिले असता त्या वेळेलाहि आह्माला असेच उद्गार काढावे लागत असत. अतःकरणाला पीळ पडून राजकीय प्रगतीकरिता खटपट करावी, पण लोक मात्र उदासीन. १९०८ सालीहि हीच स्थिति होती. स्वदेशीचा उपदेश ऐकावा पण अमलात मात्र आणूं नये अशी स्थिति होती.

## लोकांचे औदासिन्य

आजहि महात्माजीचा वकील-वर्गावर रोष झाला आहे याचे कारण त्याची उदासीनता होय. इग्रजी शिक्षणाने तयार केलेला माल (हा सुशिक्षि-ताचा वर्ग) देशकार्यात नेहमी उदासीन असतो. या बाबतीत आमची व तुमची स्थिति सारखीच आहे. ज्या महाराष्ट्रामध्ये देशकार्यार्थ हजारो लोक

प्राण देण्यास तयार असत तेथेच आज उदासीनता पसरलेली दिसत आहे. पानिपतचे लढाईचे वेळी दीड लाख बांगडी फुटली असे म्हणतात. एवढी प्रचंड शक्ति ज्या महाराष्ट्रात नांदत होती त्याच महाराष्ट्राला जागे करता करता लोकमान्य टिळकांना जन्मभर हाडाची काडे करावी लागली! याचे कारण येवढेच की, लोकाचीं रुची पालटली. लोकाची द्रव्य देण्यास तयारी नाही. तुह्मी पैसे न मागता स्वार्थत्याग करा, त्यास त्यांची हरकत नाहीं! याचें कारण लोकाची प्रवृत्ति बदलली, दानपद्धतीत फरक झाला.

हरिदास हे परमेश्वराचे स्वरूप समजून सांगणारे व परमेश्वराविषयी प्रेम उत्पन्न करणारे संत होत. गेली १५० वर्षे इंग्रजी शिक्षणानें व या राज्ययंत्रानें आमच्या धार्मिक कल्पना तोडण्याचे काम केलें आहे. या अवधीत शाळामास्तर, प्रोफेसर, पुस्तके हीं सर्व ह्या प्रेमाखालीं आग पेटवीत होतीं. धर्म जाळणाराच्या हातात गेलीं १५० वर्षे हिंदुस्थानच्या अभ्युदयाचा अर्धा भाग आहे. शिक्षण, व्यापार, कलाकौशल्य यापैकी कोठेहि दृष्टिक्षेप करा. आपला अभ्युदय इतरांच्या हातींच आहे. राज्यकर्त्यांची शक्ति मोठी, त्यांचें तत्त्वज्ञान उज्वल, त्यांचा धर्म चांगला, असा या असत्संगानें सुशिक्षितांच्या मनावर अनिष्ट परिणाम झाला होता. अशा स्थितींतहि आमचें तत्त्वज्ञान शिल्लक आहे हेच आश्चर्य! त्याच्यात असे ओज व सत्यत्व आहे कीं, बिकट परिस्थितीशी टक्कर देऊनहि ते जिवंत राहू शकते.

कीर्तनकारात परमेश्वरी निष्ठा प्रकट होत असते. भक्तीची भावना व धर्माविषयीं आस्था स्त्रियामध्ये विशेष जागृत असते हे कोणीहि कबूल करील. ही आस्था जर नसती तर महाराष्ट्रात आज हरिदासाची जी २००–३०० घराणीं दृष्टीस पडतात तींहि नामशेष झालीं असतीं. गेलीं १५० वर्षें अशा खालावलेल्या स्थितींतच काढावीं लागलीं.

## पालटलेली स्थिति

गेल्या ४–५ वर्षांपासून मात्र जगाची स्थिति पार पालटली आहे व हा योगायोग ध्यानात ठेवण्यासारखा आहे. परिस्थिति पालटली आहे, लोक मार्ग शोधूं लागले आहेत, विचार करू लागले आहेत. लोकात चलनशक्ति जागृत झाली आहे. भक्ताचा भाव व देवाची इच्छा काळालाहि आटोपणें शक्य नाहीं. हे दोन ओघ कसे उत्पन्न झाले व ते एकमेकाकडे कसे वाहू लागले आहेत याकडे लक्ष द्या, हा प्रेमाचा ओघ जाळण्याचा खटाटोप करणाराची आज परमेश्वरानें काय स्थिति केली आहे याकडे लक्ष द्या. आज त्याना अभ्युदयाच्या प्रसगीं उपयोगी पडत नाहीं हे रशियाच्या व ऑस्ट्रियाच्या सध्याच्या स्थितीवरून व्यक्त होत आहे. ख्रिस्ती धर्माचे पोप काय म्हणतात त्याच्याकडेहि लक्ष पुरवा. देवानें मनुष्याकरिता अन्न निर्माण केले, पण आज ऑस्ट्रियातील लोकाना त्याच्या पाश्चिमात्य सुधारणेनेंच अन्नान्न स्थितीस पोहोचविलें आहे. ऑस्ट्रियातील लोक आज स्वातंत्र्य देऊन पोटाला मागत आहेत. हीच त्या ख्रिस्ती धर्माची महति. उच्च नीच भावना नाहींशा करणारें बोलशेविझमचें भूत त्याच्या समाजरचनेच्या मानगुटीस बसून, उघडी नागडी झालेली ती समाजरचना आज जगापुढे वावरत आहे. ही समाजरचना परमेश्वरी कशी असूं शकणार? जे भक्तानें भाविलें तें परमेश्वरानें आपणची केले. (टाळया) या रामदासाच्या उक्तीची सत्यता आज आपणाला पटत आहे. सुशिक्षिताना युरोपियनाचा पेहराव, आचार, विचार कशास हवा, असा प्रश्न करून काही दिवसापूर्वी हरिदासानीं जर राष्ट्रीय सभेला वेढा दिला असता तर ज्या सुशिक्षितानीं तुम्हाला वेडयात काढलें असतें, त्याच सुशिक्षिताची आस्था आता तुम्हाकडे वळूं लागली आहे. तुमच्या सिद्धातात काय जादू आहे हें ते शोधूं लागले आहेत. त्याचीं तोंडें घराकडे वळलीं आहेत. लवकरच आम्हाला हे गूढ सागा असा ते

आग्रह धरतील. ५।१० वर्षांत ही गोष्ट घडलीच पाहिजे. एका पिढीत ही फळें आपल्या पदरात पूर्ण पडतील अशी तयारी आम्ही केली पाहिजे. परमेश्वर काम करून चुकला आहे तुमचें कार्य मात्र राहिलें आहे.

## लोकाभिरुचीला नवें इष्ट वळण

लोकांची रुची बिघडली होती, पण ती आता पुनः शुद्ध स्वरूपाकडे वळली आहे. परमेश्वरानें तें विघ्न दूर केलें आहे. आपलें सामर्थ्य वाढवा, लोकसंग्रह करा, आपला भक्तिभाव सर्वांना मुबलक मिळेल, सुशिक्षित येतील, कीर्तनें ऐकतील हा हव्यास धरा व त्याच मार्गास लागा. या मार्गास अनुरूप असें वर्तन करा. श्रीसमर्थ रामदास हे आपल्या संप्रदायाचे मोठे प्रवर्तक होते. त्यांचें स्मरणें ध्यानांत ठेवा. प्रबोधशक्ति स्वाधीन करून घेतली पाहिजे. बहुतांची मनोगतें हातीं घेतली पाहिजेत. सुशिक्षितांचें मनोगत जाणलें पाहिजे व मनोगत ओळखून कार्याची दिशा ठरविली पाहिजे. लोकीं जें केलें तें यानें उलथविलें. आपल्या देवता लोकांच्या मंदिरांत स्थापन करणें अशी एक इंग्रजी म्हण आहे. लोकीं जें तर्किलें तें दाविलें निष्फळ करूनी. सुशिक्षितांच्या मनांत उत्पन्न झालेल्या भावना निष्फळ करून दाखविल्या पाहिजेत व 'आमच्या कुळीं असे समर्थ। आमच्या कुळीं असे परमार्थ॥' या समर्थांच्या उक्तीतील मर्म ओळखून आपल्यांतील आकर्षणशक्ति या हरीची सेवा करण्याकरतांच प्रकट केली पाहिजे. या सेवेचा अभाव म्हणजे अधःपातच होय. कीर्तन ही नवविधा भक्तींतील दुसरी भक्ति आहे. दास्य ही सातवी भक्ती आहे. परमेश्वराचें हें प्रेमाचें दास्य पत्करून सेवा करतांकरतांच 'हे यादव हे सखा इति' या उक्तीप्रमाणे सखा या पदवीस मनुष्य प्राप्त होतो. सर्वस्वाचा त्याग करून देवाचें दास्य केलें पाहिजे. म्हणून प्राणांचें पतनहि करावें लागलें, जिवलगांची तुटी झाली तरी ती पत्करून परमेश्वराचें कार्य करावें (दुष्टांचा) दुर्गुणांचा

संहार करणें व साधूंना (सद्गुणाना) आधार देणें हे परमेश्वराचें कार्य आहे. रामदासाचा समुदायाचा हव्यास धरा व प्रबोधन शक्तीनें सुशिक्षिताचीं मनोगते हातीं घेऊन कार्यास लागा.

## सुशिक्षितांचीं मनें काबीज करण्याचें शस्त्र

आज हरिदासानीं सुशिक्षिताना लहान मुले समजून त्याच्या चालीनें चालावें व त्याच्या बोलीनें बोलावें. दीडशे वर्षे इंग्रजी शिक्षणानें लागलेली सुशिक्षिताची बोबडी सवय हरिदासानीं समजून घेतली पाहिजे. बहुताचीं मनोगतें हातीं घेतल्याशिवाय हरिदासाना कार्य करून दाखविता येणार नाहीं. सुशिक्षित लोक राजकारणाचा जो विटीदांडूचा खेळ खेळत आहेत त्यात हरिदासानीं प्रत्यक्ष भाग जरी न घेतला तरी सावलीत बसून खेळ कसा चालला आहे, कोणाची सरशी होत आहे हे कौतुकपूर्ण दृष्टीने मात्र पाहिलें पाहिजे. राजकारणाविषयीं उदासीन राहून मात्र चालणार नाहीं. हरिदासानीं दुसऱ्या धर्माच्या हालचालीकडेहि सेनानायकासारखे लक्ष पुरविलें पाहिजे. दक्षता राखली पाहिजे. रामदास स्वामीनी शिवरायाला सागितले होते की तुला परमेश्वराची मदत आहे पण सावधपणा ठेविला पाहिजे. चतुरपणानें सुशिक्षिताचें मनोगत ओळखून त्याला वेसण घालून परमेश्वरी कार्याकडे लावणें हेच हरिदासाचें कार्य आहे. बुद्धी ही मनाच्या वरची स्थिति आहे. इंद्रियामधला सापेक्षपणा ती पाहात असते. मनाच्या ठिकाणीं सर्व शक्ति आहे. ‘इंद्रियाणा मनश्चास्मि’ असे गीतेंत सागितलें आहे. मन वाईटहि आहे, त्याप्रमाणें चागलेहि आहे. मनाच्या यत्रावर आरूढ होऊनच परमेश्वर कार्य करीत असतो असें गीतेंत सागितलें आहे. भक्ताच्या मनात शिरण्याचा मार्ग सापडावा म्हणून परमेश्वर भक्ताभोंवती घिरट्या घालीत असतो याचा विचार करा. सूक्ष्म विचार करा, एकात सेवा, अखड चालना करा, परमेश्वर बुद्धीला केव्हा तरी गति देईलच. बुद्धि एकाग्र होऊन प्रफुल्ल

होते. बुद्धि प्रफुल्ल झाली कीं तिथे परमेश्वर शिरलाच म्हणून समजा; कुशाग्र बुद्धीचें महत्त्वहि एवढयाचकरिता आहे. एकदा बुद्धि कुशाग्र झाली, तेथें परमेश्वराचें अधिष्ठान झालें कीं चागले बोलावें कसे, लिहावें कसे हें सर्व सुचते. सुचलें सुचलें म्हणजे काय ? तें कसे सुचलें ? कोठून सुचलें ? पाश्चात्यानीं अजून या सुचण्याची उपपत्ति लाविली नाही. सुचलें म्हणजे काय झालें हे त्याना सागता येणार नाहीं. हे आपल्या तत्त्वज्ञानात आहे. सुचलें म्हणजे परमेश्वरानें प्रेरणा केली. लोकाची मनोगतेंहि आकर्षून घेण्याची आपल्यात शक्ति उत्पन्न होते. लोकाचीं मनोगतें कशीं आकर्षण करावीं हे शिकायचें असल्यास लोकमान्य टिळकाचा गीतारहस्य ग्रथ पहा. पूर्वीचेच विचार नवीन शब्दानी कसे नटवावे हें व त्याचप्रमाणें भाषेचा तार्किकपणाहि त्यात पूर्ण दाखवून दिला आहे. श्री शिवरायाच्या काळास जसा दासबोध तसाच गीतारहस्य हा ग्रथ आधुनिक काळास अनुसरून आहे. हें लक्षांत बाळगून त्याचा अभ्यास करा. ते शास्त्र सुशिक्षित लोकाचीं मनें वळविण्यास फार उपयोगी पडेल.

मनाला आकर्षून घेण्यासाठींच गायनाचें कीर्तनात महत्त्व आहे. गाण्याचा महिमाच असा आहे कीं तें तार्किकानाहि आपणाकडे ओढून घेतें, गायनाच्या केवळ कलेकडेच लक्ष पुरवून कलावान होऊन मात्र राहू नका.

कीर्तनकाराच्या सप्रदायाचे आद्य प्रवर्तक हे वीणा हातीं घेऊन गात असत. गायनाचा महिमा समजणें निराळें व गाणें निराळें. हरिकथा ही गावयाची असते. मनात आनंदाच्या उर्मि उत्पन्न होतील तेव्हांच आपण गातों. तो प्रहर्ष, तो अनुराग गायनात असल्याशिवाय गायन मधुर लागणार नाहीं. वेद–वाक्यसुद्धा नुसतें म्हणण्यापेक्षा गाइल्यानें अधिक प्रिय वाटतें. वेदाना 'सामवेदोऽस्मि' वेदाचा मी सामवेद आहें असें भगवतांनीं

सांगितलें आहे. या वाक्यावरील गीतारहस्यातील टीका आपण अवश्य वाचावी म्हणजे गायनाला प्राधान्य का आहे हें समजेल.

सुशिक्षिताबरोबर चालावें कसे, बोलावे कसे हे रामदास स्वामींना विचारा. 'मुख्य हरिकथा निरूपण। दुसरे तें राजकारण॥' सुशिक्षिताची ही दुसरी चाल ओळखली पाहिजे. या मुलाबरोबर आपण खेळलें पाहिजे. अंगणांत चाललेला हा खेळ सावलीत बसून पाहिला पाहिजे, नाहींतर आपले पतन होईल. मुलाचें ऐकणें, त्याचे विचार नापसत असले तरी समजून घेणें हें कार्य आपण केलें पाहिजे. अंगणात खेळत असलेली सुशिक्षित मंडळी आपणाकडे पाहतील असे वागा.

या सर्व गोष्टी नीट लक्षात घेऊन आपण परमेश्वराचें अव्याहत कार्य चालवले तर आपणास परमेश्वर खास यश देईल. आज आमच्या कोणी पाया पडतच नाहीं अशी तुमची तक्रार आहे. पण याच पद्धतीनें आपण सतत कार्य चालू ठेवल्यास आपल्या पाया पडण्यास फार लोक येतात व त्यामुळे त्रास होतो अशी तक्रार करण्याची आपल्यावर पाळी येईल ! (टाळ्या)

---

# नागपूर साहित्य संमेलनाचें अध्यक्षीय भाषण

नागपूर येथे महाराष्ट्र साहित्यसमेलनाचें अठरावे अधिवेशन ता. २५ डिसेंबर १९३३ रोजीं भरलें होतें. त्यावेळी श्री. कृ. प्र. उर्फ काकासाहेब खाडिलकर यानी अध्यक्ष या नात्यानें जे भाषण केले तें पुढे दिलें आहे.

ॐ भद्रं कर्णेभिः श्रृणुयाम देवा. । भद्रं पश्येमाक्षभियजत्राः ।।
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिः । व्यशेम देवहितं यदायुः ।।
भद्रं नो अपि वातय मे मनः ।।
ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।।

स्वागताध्यक्ष कुलगुरु श्री. भवानीशंकर नियोगी, समेलन प्रतिनिधी, व मराठी भाषेचे अभिमानी बंधु भगिनींनो, नागपूर येथील महाराष्ट्र साहित्य-समेलनाच्या १८ व्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान मला देऊन आपण माझा जो बहुमान केला त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. आपलें आमंत्रण स्वीकारताना, स्वीकारल्यानंतर आतापर्यंतच्या वेळात, आणि आपल्या सेवेस आरंभ करीत असताहि मनाचा भित्रेपणा सुटला नाहीं व सुटत नाहीं. ह्या परिषदेच्या अध्यक्षाचें काम करून मी आपणास प्रसन्न करू शकेन असे माझें मलाच वाटत नाहीं. आपणास मी प्रसन्न करू शकलों नाहीं, तरी मराठी भाषेच्या सेवेच्या आपल्या पराक्रमात माझा अपशकुन मी होऊ देणार नाहीं. एवढी खबरदारी मला दोनतीन दिवसात घेता आली तरी मी स्वतःस भाग्यवान समजल्यावाचून रहाणार नाहीं. माझ्यामागे गेल्या तीस चाळीस वर्षातील निरनिराळ्या प्रकारच्या उद्योगाचीं बरीवाईट ओझीं आहेत आणि ह्यातील काहीं काहीं ओझीं फार जड असून सोबतीच्या सताच्या पाठीवर तीं लादल्याशिवाय मला कोणताच मार्ग पाय न अडखळता

किंवा ठेच न लागता आक्रमिता येत नाहीं. माझी स्वतःची दुबळेपणाची अशी स्थिति असल्यामुळें, दुसऱ्याला त्रास द्यावयास बाहेर जा कशाला, अशा तऱ्हेचा घरकोंबडेपणा मला स्वीकारावा लागत आहे; पण इतिहास-प्रसिद्ध भोसल्याच्या नागपूरचे लोक वीरवृत्तीचे असल्यामुळें नागपूरच्या कर्तबगारीवर भिस्त ठेवून, माझ्यातील दोष आपण सहज लीलेनें खालीं दडपून टाकाल आणि संमेलनाचें कार्य निर्विघ्नपणें आपण तडीस न्याल, असा मला पूर्ण भरंवसा वाटत आहे. आपण कर्ते आहांत, तेव्हां माझ्यातील न्यून भरून काढून माझा गबाळी अव्यवस्थितपणा सहज एका बाजूला कोणाच्या लक्षांत येतो न येतो तोंच आपण सारून टाकावा, अशी प्रारंभीच आपणाला माझी नम्रपणाची विनति आहे. हें काम करण्यास आपण समर्थ आहां; आपला पूर्वीचा इतिहास तसा आहे, आपली तडफहि तशीच आहे, आणि कार्यास एकदा वाहून घेतलें म्हणजे काहीं झालें तरी मागें फिरावयाचें नाहीं असा आपला बाणा आहे.

## नागपूरचें महत्त्वाचें केंद्रस्थान

नागपूर–वऱ्हाड म्हणून मराठी भाषेचा जो प्रांत समजला जातो तो प्रांत संस्कृत भाषेतील काहीं प्रसिद्ध ग्रंथकारांची जन्मभूमि ह्या नात्यानें पवित्र आहे, इतकेंच नव्हे तर पुराणांतील काही प्रसिद्ध राजघराण्याचें निवासस्थान म्हणूनहि नामांकित आहे. संस्कृत भाषेस ह्या प्रांतानें जशी मदत केली आहे तशीच मदत ‘प्राकृत महाराष्ट्री’ भाषेसहि केली. पाली, अर्धमागधी व शूरसेनी ह्या प्राकृत भाषांचे प्राकृत महाराष्ट्रीशीं संमेलन साहजिकपणें नागपुरांत होते, आणि त्याच प्राकृत भाषांचे अपभ्रंश होऊन आस्ते आस्ते बनलेल्या हिंदी, बंगाली व मराठी भाषांचें संमेलनहि नागपुरांत केंद्रस्थान ह्या नात्यानें झालेलें आहे. मराठेशाहींतील नागपूरचा प्रचंड उद्योग, मराठीला पूर्वेस कलकत्त्यातील बंगालीजवळ नेऊन ठेवण्यास आणि

हिंदी व मराठी याना एकमेकाशी सलगीनें मिसळून टाकण्यास कारणीभूत झालेला असल्यामुळे, नागपूरला मराठी भाषेच्या दृष्टीनें ग्वालेरहून अधिक महत्त्व आहे. अशा महत्त्वाच्या ठिकाणीं मराठी भाषेंत अति चपलतेनें मुलुखगिरी करणारा एखादा थाडमी लेखक अध्यक्षस्थानीं असता तर अधिक बरें झालें असतें. मुबई शहरात मराठी बोलणाराची संख्या सर्वात जरी मोठी आहे आणि मुंबई शहर जरी महाराष्ट्राचा भाग म्हणून गणलें जात आहे, तरी मराठी भाषेला शहराच्या कर्तबगारीत आणि लौकिकात काहीं मान नाहीं. दुबळ्या व हलक्या स्थितींत आम्ही मराठी लेखक तेथें आहों. आमची भाषा म्हणजे ताटाखालच्या माजराची भाषा मुबईस आहे. मुबई शहर पूर्णपणे इग्रजी भाषेच्या घशात उतरलेलें आहे. कोणत्याच देशी भाषेला स्वतत्रपणे मिरविण्याची पदवी नाहीं. मुबई शहर 'कॉस्मापॉलिटन' होऊन चुकलें आहे. मोडके तोडके सटर फटर इग्रजी येत असलें म्हणजे मग तो चिनी असो, इटालियन असो, सरहद्दीवरला पठाण असो, बगाली असो, किंवा मद्रासी असो, मुबईस त्याला आपापल्या कर्तबगारीप्रमाणें, एक दिडकीची कोथिंबीर विकत घेण्यास किंवा विकण्यास, दहा वीस लाखाचीं मोतीं खरेदी करण्यास किंवा बाहेरगावी पाठविण्यास, आणि पाच पन्नास लाखाच्या गिरणीचा कारभार थाटण्यास किंवा एकदम बंद पाडण्यास, मराठी किंवा गुजराथी भाषेची क्षणभरहि जरुरी लागत नाहीं. तीस चाळीस वर्षांपूर्वी देशी भाषाना थाब्यावर बसविणारी म्हणजे 'कॉस्मापॉलिटन' मुंबई नव्हती. तीस चाळीस वर्षांपूर्वी काहीं काहीं बाबींतील प्रत्यक्ष अनुभव आज आठवून डोळ्यापुढे ठेवला आणि आजची मुबई शहरांतील देशी भाषाची गुदमरलेली स्थिति पाहिली म्हणजे नागपूर–वऱ्हाडकडे पळून जावें असें मुबईत असताना मनात आल्यावांचून रहात नाहीं. दोन चार दिवसापुरतें तरी आपण मला मोकळ्या हवेंत येऊं दिलें आहे, हा आपला मजवर प्रसादच झालेला आहे.

## नागपूरचें मराठी विद्यापीठ

पुण्या-मुंबईच्या बाजूला मराठी युनिव्हर्सिटींच्या गोष्टी कानावर येत असतात. पारिभाषिक शब्दकोश साहित्य परिषदेनें तयार करून ठेवला आहे; शास्त्रीय पुस्तके लिहिण्याची कसरत झपाटयानें चालू आहे, टिळक विद्यापीठानें उच्च दर्जाच्या परीक्षेकरिता मराठी भाषेत ग्रंथाची कशी तयारी सहज करता येईल त्याचा स्तुत्य उद्योग गेलीं दहा बारा वर्षे फार दक्षतेनें केला आहे; मुंबई युनिव्हर्सिटीच्या काहीं भागावर मराठी भाषेत लिहिलेल्या पाटया लावल्याबरोबर एकदम दुसऱ्या क्षणाला पुण्यास मराठी विश्वविद्यालय कसे निर्माण होऊ शकतें याचे मोजमाप घेण्यात आलेलें आहे. सर्व तयारी आहे, पण मराठीच्या जेवणाची घटा काहीं केल्या तेथे वाजत नाहीं. हातात दोरी धरून मोठया चतुराईने घटा वाजविण्याचा प्रयत्न झाला, पण अन्न शिल्लक राहिलेले नाही असा अनुभव आला. युनिव्हर्सिटीच्या दृष्टीनें विचार करता आपण नागपूरचे लोक अधिक भाग्यवान् आहा; दहा पधरा वर्षांनीं केव्हातरी पुण्यास मराठी युनिव्हर्सिटी होण्याच्या अगोदर मराठी-हिंदी भाषाची युनिव्हर्सिटी नागपुरास दृष्टीस पडेल, आणि हल्लींच्या नागपूरच्या युनिव्हर्सिटीचे स्वतंत्र अस्तित्व नागपुरास दृष्टीस न पडता प्रमुख भाषेचा मान इंग्रजीकडून जाऊन मराठी व हिंदी या दोन देशीं भाषाकडे आपोआप येईल, असा अंदाज आहे. मराठी भाषेला उत्तेजन देण्याच्या कामीं नागपूरची युनिव्हर्सिटी आज मुंबई युनिव्हर्सिटीच्या फार पुढे गेली आहे. युनिव्हर्सिटीचे कुलगुरु श्रीमत् भवानीशंकर नियोगी आज नागपुरात मराठी साहित्य संमेलनास स्वागताध्यक्ष होऊ शकले आहेत. मजसारखा अध्यक्ष असताना देशी भाषेच्या समेलनांस हजर राहण्याची विनति मुंबई युनिव्हर्सिटीच्या बडया कर्णधाराना कोणी केली तर, सरकार करीत आहे त्याहून अस्पृश्योद्धाराची अधिक चळवळ

करण्याची कोणती जरुरी आहे म्हणून बिनदिक्कत सवाल टाकण्यात येईल, असे मुंबई नागपूर ह्यामध्ये अंतर आहे. नागपूरची युनिव्हर्सिटी मराठी भाषेला जो मान देत आहे आणि मराठी भाषेचें संमेलन पार पाडून नेण्यास स्वागताध्यक्ष या नात्याने जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेण्यास ज्या हौसेनें कुलगुरु श्री. नियोगी पुढे आले आहेत तो मान व ती हौस म्हणजे मराठी युनिव्हर्सिटीची मुहूर्तमेढ इतर ठिकाणाहून येथे अगोदर रोवली जाणार अशी प्रसादचिन्हेंच झपाट्याने आपणाकडे धावत येत असलेल्या शुभ कालाचीं आज प्रत्यक्ष दिसूं लागलीं आहेत!

## मराठी भाषेचे सेवेकरी

बंधुभगिनीनो, मी आपल्यापुढे अवलोकनाकरितां गेल्या बारा महिन्यातील प्रसिद्ध झालेल्या काहीं प्रमुख पुस्तकांची यादी या भाषणास जोडलेल्या परिशिष्टात ठेवीत आहे. ह्या यादींतील सर्व पुस्तके विकत घ्यावयाचीं म्हणजे जवळ जवळ शंभर रुपये खर्च करणे होय. शालोपयोगी क्रमिक पुस्तके आणि पूजेसाठी किंवा पठणासाठीं लागणाऱ्या धार्मिक पुस्तकाच्या पुनरावृत्त्या याचा हिशेब या यादीत नाहीं. इतराच्या सांगण्यावरून नव्हे किंवा धंद्याच्या प्रेरणेमुळें नव्हे तर स्वतःच्या हौसेमुळे व गोडीमुळे मेधावी लेखक जे लिखाण करीत असतात त्याची ही यादी आहे. सामान्यत: दोन हजार प्रति प्रत्येक पुस्तकाच्या निघतात असा हिशेब केला तर दोन लाख रुपये किंमतीचा हा उद्योग होतो. यादींतील ग्रंथकाराच्या सांपत्तिक स्थितीकडे पाहिलें तर नियम खरा ठरण्यास अपवाद म्हणून जेवढे थोडे पुढे यावे लागतात तेवढे थोडे या यादींत छापण्याचा व प्रकाशनचा खर्च स्वतःच्या शिरावर बिनदिक्कत घेणारे आहेत. दुसऱ्यावर अवलंबून रहाणाऱ्या गरिबांचा भरणा या यादींत फार मोठा आहे.

मासिकें व वर्तमानपत्रें या दोन लाखांच्या बोजात पडत नाहींत. सर्वांचा हिशेब केला आणि पैशाच्या दृष्टीनें भयंकर भोवऱ्यात सापडलेल्या व आधीच दरिद्री म्हणून नावाजलेल्या आपल्या देशाची सांपत्तिक स्थिति मनात आली म्हणजे मराठी भाषेचे सेवेकरी आळशी झाले आहेत, असें कोणासहि मुळींच म्हणता येणार नाहीं.

लेखक मेधावी व तपस्वी आहेत, त्यांच्या उद्योगाचें पाऊल मंदगतीनें का होईना पण पुढे पडत आहे, तेव्हा निराशेला जागा नाहीं, असे म्हणणें भाग पडते. आजकालच्या सांपत्तिक ग्रहदशेचा काल मराठी भाषेच्या उत्कर्षाला त्रासदायक झाल्यावाचून रहाणार नाही हे खरें, पण हा काल आमच्यातील गरीब श्रीमंत लेखकाना, छापखानेवाल्याना, ग्राहकाना व वाचकाना तेवढाच भोवतो आहे असे नाही, तर हिंदुस्थान सरकारपासून युरोप व अमेरिका खंड येथील सर्व सत्ताधाऱ्यापर्यंत सर्वांनाच आज ह्या पैशाच्या ढचाईनें अत्यंत जिकिरीस आणलेलें असल्यामुळे, सर्वांच्याबरोबरचें मरण शुभच होय ह्या न्यायानें मराठी भाषेच्या कैवाऱ्यानीं पैशाच्या आपत्तीमुळें गांगरून जाण्याचें काहींच कारण नाहीं. दारिद्र्याच्या ह्या काल-चक्रात जर कोणी मरणार असतील तर ते मोठे सत्ताधारी व मोठे श्रीमंत! आजच्या मनूंत मरणाची पाळी गरिबांवर नाहीं. मरणाचें भय श्रीमंताना आहे; मराठी भाषेला नाहीं. कारण ही भाषा दरिद्री लोकाची आहे. गरीब जर तपस्वी नसेल तर त्याच्या गळ्यात दगड बांधून त्याला पाण्यांत बुडवावा आणि श्रीमंत जर आपल्या पैशाचा उपयोग दानधर्म करून गरिबाच्या कल्याणाकडे करीत नसेल तर त्याला गळ्यात दगड बांधून पाण्यांत बुडविण्यांत यावें, अशी स्मृति म्हणजे महाभारताची शिकवणूक आहे.

द्वावम्भसि निवेष्टव्यौ गले बध्वा दृढां शिलाम्।
धनवन्तमदातारं दारिद्र्यं चातपस्विनम्॥ ६०॥

—उद्योगपर्व अ. ३३

महाभारतातील ह्या वचनाप्रमाणें मोठया क्रांतीच्या वेळीं तपस्या न करणारे गरीब व दानशून्य श्रीमंत यांचा नायनाट होत असतो, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## निर्भय मराठी भाषा

राज्यक्रांति, विचारक्रांति, दुर्गादेवीच्या दुष्काळासारख्या दैवी आपत्तीनें घडून येणारी लोकक्रांति, या सर्व क्रांत्यांमुळे भाषेचें स्वरूप पालटून एक भाषा अधोगतीला लागते व तिच्या जागीं येणाऱ्या दुसऱ्या भाषेच्या अभ्युदयास सुरवात होते. महायुद्धापासून सुरू झालेल्या व चालू सालीं प्रत्यक्ष प्रकट झालेल्या आर्थिक क्रांतीच्या प्रवाहांत आपण सापडलेले आहों. दोन तीन वर्षांपूर्वी ह्या प्रवाहाचे पूर्ण स्वरूप सर्वांच्या ध्यानांत आलेलें नव्हते. सूक्ष्म विचार करणारांना ते कळलेलें होते पण इतरांना त्याचा गंध नव्हता. गेल्या बारा महिन्यांत, सहा महिन्यांत किंबहुना दोन तीन महिन्यांत अमेरिकेतील प्रेसिडेंट रुझवेल्टसारखीं धेंडे या दारिद्र्याच्या प्रवाहानें पार उखडून जाऊन, सुवर्णभूमि म्हणून नावाजलेली अमेरिका अशी कशी क्षणांत उलथी पालथी होते, याचा सर्वांना अचंबा वाटत आहे, आणि भयभीत होऊन प्रत्येक श्रीमंत खिन्नवदन झालेला आहे. अशा स्थितींत मराठी भाषेच्या उत्कर्षासंबंधानें विचार करणाराच्या मनावर खिन्नतेचा पगडा पडणें साहजिक आहे. पण त्यातल्या त्यांत समाधानाची गोष्ट अशी आहे कीं, मराठी भाषा मुळचीच दरिद्री असल्यामुळे आणि हजार बाराशें वर्षे दारिद्र्यातच दिवस काढून आपला जोम वाढविण्याची संवय त्या भाषेच्या हाडींमासीं खिळलेली असल्यामुळें, महाप्रलयाच्या वेळेप्रमाणें युरोप व अमेरिका खंडाला बुडवूं पहाणाऱ्या दारिद्र्याच्या महापुराविषयीं स्वतः निःशंक व निर्भय रहाण्यास मराठी भाषेस मुळींच हरकत नाहीं. दारिद्र्याला दरिद्री कसा भील ? शिवाय आम्ही तपस्वी नसतों तर गोष्ट निराळी होती.

आम्ही तपस्वी आहोत, दारिद्याच्या वेळी निर्भय राहून आपली ताकद वाढविण्याचें संधान आम्हाला माहीत आहे. इग्रजी भाषेनें श्रीमच्या जोरावर आम्हास सहानुभूति दाखवून मोठा प्रसाद म्हणून अल्पस्वरुप मदत करण्याची ऐट मिरविण्याचे दिवस राहिलेले नाहीत. दारिद्यानें आम्हास निर्भय केलें आहे, त्याचप्रमाणें आमच्या भाषेस इतराना मदत करण्याच्या पदवीस चढविलें आहे. मराठी भाषेचा पहिला मुख्य ग्रथ म्हणजे ज्ञानेश्वरी ह्या वर्षात इग्रजी भाषेच्या रूपाने युरोप खडास अर्पण करण्यात आला आहे. ज्ञानेश्वरीचें सर्व अध्ययाचें सस्कृत भाषातर जत सस्थानचे श्री. विष्णुपंत खासनीस यानी केलें आहे, तर इग्रजी साराशरूप भाषातर श्री. मनु सुभेदार याचेकडून प्रसिद्ध करण्यात आले आहे, व आर्थिक क्रातीमुळे दृग्गोचर होणाऱ्या नव्या मनूस ज्ञानेश्वरीच्या त्या इग्रजी भाषातरानें प्रारभ झालेला आहे. तेव्हा यापुढे ज्ञानेश्वरी देखील इग्रजीतून वाचण्याची शिकण्याची पाळी तुम्हा आम्हावर येईल अशी शका या भाषातरामुळे, मराठी भाषा दोन चारशे वर्षांनी मरणार तेव्हा तिच्या सेवेत व्यर्थ वेळ का घालविता असे म्हणणाऱ्याकडून या ठिकाणी शका घेण्यात येईल हे खरें, पण आजकालच्या परिस्थितीकडे पाहिलें असता त्या शकेत काही अर्थ नाहीं, असेच दिसून येईल. मराठी भाषेच्या गेल्या पाचसात समेलनाच्या वेळी, मराठी भाषा मरणारी आहे काय, ह्या प्रश्नाचा बराच ऊहापोह झालेला आहे. माझ्या मतें मराठी भाषा मरणार आहे काय, ह्या शकेच्या भुतास कायमचें गाडून टाकण्याची आजची वेळ आहे! इंग्रजी भाषा श्रीमंत आहे, सत्ताधारी आहे, आणि मोठा मासा लहान माशाला सहज खाऊन टाकतो या न्यायानें दरिद्री मराठीला आपल्या वाढत्या पोटात दोनचारशें वर्षांत सहज पचवून टाकील, असें इंग्रजी भाषेच्या आजच्या वाढीकडे पाहिलें असता म्हणता येईल. पण नुसत्या वाढीकडे पाहून काय उपयोग? पोट

वाढत असलें आणि स्वा स्वा झालेली असली तरी एवढयाच चिन्हावरून जवळच्यावर आक्रमण करून हातीं लागलेल्याना आत्मसात करणाऱ्या जिवंतपणाची शक्ति वृद्धिंगत होत आहे असे म्हणता येत नाहीं. कालचक्राचीं चिन्हे तशी नाहीत ! दारिद्रयाचा महापूर काही वर्षांनीं ओसरून गेल्यावर इंग्रजी भाषा मराठी प्रमाणे दरिद्रयाची होईल असे नाहीं. आणखी कित्येक पिढया इग्रजी भाषा श्रीमतांचीच राहील, ह्यात संशय नाहीं. पण स्पर्श झाला कीं, हातीं लागलेल्याला अल्पकाळात खाऊन गिळून टाकण्याची अमर्याद धमक युरोपातील कोणत्याच भाषेच्या अंगीं ह्या पुढे दृष्टीस पडणें शक्य नाहीं. युरोपातील क्रात्यामुळे युरोपखडातील सर्व भाषा आज उतरणीस लागल्या आहेत. घसरगुडीवर कोण कोण आपल्या भाषेस सावरून धरतो, याचीच कसरत युरोप खडाकडे पहात असताना ह्यापुढें इतर जगाच्या दृष्टीस पडावयाची आहे. ही कसरत आपल्या चापल्याने व पराक्रमानें तुमच्या आमच्या या दरिद्री भाषेला व हिंदुस्थानातील इतर देशी भाषाना आश्चर्यचकित केल्यावाचून रहाणार नाहीं, पण सर्कशींतील वाघसिंहाची कसरत अगदीं आपल्या शेजारीं चाललेली असली तरी आश्चर्यचकित करण्यापलीकडे भयभीत करूं शकत नाहीं. युरोप खंडातील सर्व भाषाचीं अस्वलें, वाघ व सिंह आर्थिक क्रातीच्या पिंजऱ्यात सापडले असून ह्या पिंजऱ्यांतून बाहेर पडण्याच्या उद्योगातच त्याच्या काहीं पिढया जावयाच्या आहेत. हा काळ इतर सर्व भाषाना निर्भयतेचा आहे आणि ह्या निर्भयतेच्या काळाचा म्हणजे पुढील शेपन्नास वर्षाचा देशी भाषानीं जर पूर्ण उपयोग करून घेतला तर मराठी, गुजराथी , हिंदी, बगाली, इतर देशी भाषा इग्रजी भाषेच्या दडपणाखालीं चिरडून जाण्याचा प्रसंग हिंदुस्थानवर केव्हाहि येणार नाहीं.

## भाषांचें जन्ममरण

हिंदुस्थानांतील काहीं भाषा मेलेल्या आहेत व कांहीं भाषा मेलेल्या भाषाच्या मरणातून उत्पन्न झालेल्या आहेत. खुद्द मराठी भाषा व मराठी भाषेपूर्वी असलेल्या व मराठीला जन्म देऊन मेलेल्या महाराष्ट्रातील मृत भाषा याच्या इतिहासाकडे पाहिलें, तर साप्रतच्या आर्थिक क्रातीच्या वेळीं मराठी भाषेवर मरणाची पाळी येणार नाहीं इतकेंच नव्हे तर गेल्या हजार वर्षात दृष्टीस पडणाऱ्या तीव्र जोमानें आपलें डोके वर काढण्याची सधि आज मराठी भाषेस मिळाली आहे, असे ध्यानीं आल्यावाचून रहात नाहीं. मराठी भाषा जन्मली कशी व तिची वाढ ज्ञानेश्वरीपासून इग्रजी भाषेचा पूर्ण अमल बसेपर्यंत म्हणजे विष्णुशास्त्री चिपळूणकर याच्या काळापर्यंत कसकशी होत गेली, ह्याचा विचार व माहिती डॉ. भाडारकर, राजवाडे व रा. कृष्णाजी पाडुरग कुळकर्णी याच्या लेखातून झालेला आहे. 'मराठी भाषा, उद्गम व विकास' या पुस्तकात ह्यासबंधाची माहिती बऱ्याच विस्तारानें रा. कुलकर्णी यानीं दिली आहे. या बाबतींतील सर्व लेखकाचे मुद्दे एकसारखेच आहेत असे नाहीं; वादग्रस्त प्रश्न बरेच आहेत. तें एका बाजूस ठेवले तरी एक भाषा मरते कशी व त्या मरणातून दुसरी उत्पन्न होते कशी ह्या सबधाचे सामान्य नियम आता ठरून गेलेले आहेत. दुसऱ्या कोणत्याहि बाहेरच्या भाषेनें आक्रमण केले नाहीं तरी देश व काळ याच्या तावडींत सापडून भाषेचें रूपातर होऊन एका रूपास मरण येतें व दुसऱ्या रूपाचा जन्म होतो. या मर्त्य लोकच्या नियमास अनुसरून साप्रतच्या मराठी भाषेस आणखी हजार दीड हजार वर्षानीं केव्हा मरण यावयाचें असेल तर येवो; त्याबद्दल मृत्युलोकीं अत्यंत उच्च कोटींतल्या मानवानींहि काळजी वहात बसण्याची मुळींच जरुरी नाहीं. इग्रजी भाषेसारख्या युरोप-

खंडातील भाषांच्या आक्रमणामुळे होणाऱ्या शक्तिपाताचा तेवढा विचार करणें भाग आहे ऋग्वेदातील संस्कृत मागें पडून पाणिनी–कालचें संस्कृत पुढे आले, तेहि संस्कृत मागे पडून पाली, अर्धमागधी, शौरसेनी, महाराष्ट्री यांचा जन्म व प्रसार झाला. सर्व हिंदुधर्माच्या विचारावर व विचार करण्याच्या पद्धतीवर सर्वांत सारखा दिसणारा छाप पडणाऱ्या महाभारत-रामायण वगैरे राष्ट्रीय ग्रंथांची रचना ज्या संस्कृतांत झाली त्या संस्कृत भाषेचा काळ पाणिनीनंतरचा आहे संस्कृत भाषा तीन चार स्वरूपांत दृष्टीस पडून नंतर अंतर्धान पावली. संस्कृत जोमांत असतांना पाली, अर्धमागधी, महाराष्ट्री, शौरसेनी या प्राकृत भाषांनीं हातपाय पसरलेले होते. या प्राकृत भाषांतून त्यांचे अपभ्रंश जन्मून व काही काळ नांदून मराठी, हिंदी, गुजराथी व बंगाली, अशा देशी भाषा जन्मास आल्या चौथ्या पांचव्या शतकाच्या वेळी मराठी भाषा, महाराष्ट्री प्राकृत भाषेचे अपभ्रंश स्वरूप टाकून, हल्लींच्या स्वरूपांत पुढे येऊं लागली होती. आठशें नऊशें शतकाच्या सुमारास लघुकथा व लहान सहान काव्यें मराठी भाषेंत होत होतीं. ११००, १२०० व १३०० शतकांतील मराठींतील ग्रंथरचना उपलब्ध आहे. पण तेराव्या शतकांत ज्ञानेश्वरी उत्पन्न होईतों संस्कृतकडे विद्वानांचें लक्ष होते. शंकराचार्यांनी संस्कृत भाषेचें सहाय्य घेतलें; द्वैत, विशिष्टा द्वैत वगैरे मतांचा प्रसार मध्वाचार्य व रामानुजाचार्य यांनीं संस्कृत भाषेचें सहाय्य घेऊनच केला; भक्तिमार्गास पुष्टि देणारें भागवत संस्कृतांतच रचलें गेलें. गंगायमुनेच्या कांठीं गुप्त घराण्याचें वैभवशाली साम्राज्य तिसऱ्या चौथ्या शतकांत स्थापलें गेल्यानंतर संस्कृतालाच नवा जोम आलेला होता, आणि बुद्धाची क्रांति हिंदुस्थानांत नामशेष व्हावयाच्या वेळीं तर म्हणजे चौथ्या पांचव्या शतकापासून पुढें पांचसहाशे वर्षें पाली वगैरे प्राकृत भाषांना अपभ्रंशाच्या अधोगतीला लावून, हल्लींच्या देशी

भाषाच्या सामान्य वाढीच्या वेळीं संस्कृत भाषा ही विद्वानाच्या व सत्ताधारी लोकाच्या खाद्यावर बसून चोहोंकडे पट्टाभिषिक्त महाराणीप्रमाणें मिरवत होती!

## ज्ञानेश्वरीची प्रेरणा

अशा स्थितींत ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ ज्ञानेश्वरांनीं मराठी भाषेत कां लिहिला? मराठी भाषेचें सहाय्य घेऊन आपली मते प्रदर्शित करण्यास त्याना सागितलें कोणी? संस्कृतमध्ये जर हा ग्रंथ झाला असता तर त्या वेळच्या विद्वानाकडून त्याची वाहवा चागली झाली असती, नाहीं असे नाही; ज्ञानेश्वरमहाराजाचा संस्कृतचा अभ्यास फार! उपनिषदें, भाष्यें व इतर संस्कृत ग्रंथ त्यानीं फार अवलोकन केले होते, हें त्याच्या ग्रंथाकडे वरवर पहाणारासहि दिसून येईल. हल्लीं जसे काही लेखक म्हणतात की, लिहिणें व बोलणें इंग्रजींत त्याना सोपे जाऊन देशी भाषा इंग्रजीप्रमाणें पेलता येत नाहीं, तसे ज्ञानेश्वरमहाराजाच्या संस्कृतच्या अभ्यासाकडे पाहिलें तर श्रीमद्भगवद्गीतेवर भावार्थ दीपिका म्हणून भाष्य संस्कृतात करणें त्याना अधिक सोपे झालें असतें; मग मराठींत ज्ञानेश्वरी लिहिण्याची उठाठेव ज्ञानदेवाना सागितली कोणी? ह्या प्रश्नाचें उत्तर देणें म्हणजे मराठी भाषेस महत्त्व कसें प्राप्त झालें व ह्यापुढे दोन चार पिढया मराठी भाषेस विशेष महत्त्व कसे मिळणारें आहे, ह्या प्रश्नाचा उलगडा करणें होय. ज्ञानेश्वर-महाराज मच्छेंद्रनाथाच्या नाथ संप्रदायातील असून, गहिनीनाथानीं ज्ञानदेवाचे गुरु व वडील बंधु निवृत्तिनाथ याना अशी आज्ञा केली कीं, कलिकाल जोरानें पुढे पाऊल टाकत आहे, तेव्हा जगाच्या रक्षणाकरिता आपल्या हातून शक्य तितक्या पराकाष्ठेचा उद्योग करणें जरूर आहे. आपल्याजवळील समाधिस्वरूपाचें धन ज्ञानदेवमहाराजाच्या हातीं देताना भक्तिमार्गातील तत्त्वविचाराचा व मराठी भाषेतील सर्व निवडक शब्दरत्नाचा आणि

साहित्याचा मोठा पाऊसच आपणांवर गुरूंनीं पाडला आणि त्या तीर्थोदकाचा आपण केलेला निवडक साठा म्हणजेच आपला ग्रंथ होय, असें ज्ञानेश्वरीच्या प्रेरणेसंबंधाचें वर्णन ज्ञानेश्वरमहाराजांनीं केलें आहे. मोठा आणीबाणीचा प्रसंग आला आहे आणि ह्या प्रसंगीं सामान्य जनसमूहाला जागृतावस्थेत ठेवण्याचा जर उपाय योजला नाहीं तर बहुजनसमाजाचा म्हणजे 'जगाचा' नाश होईल, ही महत्त्वाची प्रेरणा म्हणजे नाथ संप्रदायाचा आदेश किंवा संस्कृत विद्येत ज्ञानदेवांना तयार केल्यावर निवृत्तिनाथानीं त्यांना दिलेली दीक्षा होय! ही दीक्षा आपण पाळली आणि आपल्या संप्रदायानें व गुरूनें आपणाला निमित्त करून जगाचें रक्षण केलें, अशा तऱ्हेचे उद्गार प्रेरणे-संबधींच्या विवेचनात ज्ञानेश्वरमहाराजांनीं काढले आहेत. आणीबाणीच्या प्रसंगीं करावयाचें कार्य त्यावेळच्या विशिष्ट विद्वानांच्या संस्कृतानें होण्या-सारखें नव्हतें. देशी भाषेच्या उपायाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि उद्योगानें बहुजनसमाजाच्या अंगीं किंवा लोकांच्या अंगीं किंवा 'जगा'च्या अंगीं स्वतःचें रक्षण करण्याचें सामर्थ्य उत्पन्न झालें नसतें. मराठी भाषा बोलणारा महाराष्ट्र–देशांतील जो 'समुदाय' त्याला 'जग' ह्या शब्दानें ज्ञानदेवांनीं आपल्या ग्रंथात संबोधिलें आहे. त्यावेळचे विद्वान लोक जगास किंवा 'समुदाया'स किंवा हल्लींच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे बहुजनसमाजास कोणत्या मार्गानें जागृत करीत असत? हल्लीं ज्याप्रमाणें निरनिराळ्या चळवळींतून काम करणारे लोक आपला मार्ग प्रथम इंग्रजींत मुक्रर करतात आणि नंतर त्या इंग्रजी ठरावाचें देशी भाषांतून भाषांतर होऊन त्याचा फैलाव करण्यांत येतो, तीच पद्धत ज्ञानेश्वराच्या वेळीं रूढ होती. शास्त्री मंडळीनें संस्कृतात निश्चय करावयाचा आणि नंतर पुराणिक व कीर्तनकार यांनीं त्या ठरावाचें देशी भाषेंत भाषांतर करून गावोगावीं आणि प्रांतोप्रांतीं त्याचें संकीर्तन म्हणजे फैलावानें कीर्ति वाढविण्याचा उद्योग

चालू ठेवावयाचा असा यज्ञकालापासूनचा प्रघात आहे. मोठा यज्ञ होत असताना अशा फैलावाच्या किंवा बहुजनसमाजाच्या जागृतीच्या उद्योगाकरिता, ' उत्सव ' असाच शब्द वापरून, कथाकीर्तनाना व तत्सादृश्य मिरवणुकीना मुद्दाम रोज दोन तीन तास सायकाळी देण्याचा प्रघात होता. ह्या पद्धतीमुळे प्राकृत भाषेचें व संस्कृत विद्येचें आपोआप संमेलन होत असे. बुद्धाच्यावेळीं व बुद्ध मरून गेल्यावर संस्कृताशीं संमेलन करून फैलावाचे काम करणें साहजिकपणेच त्रासदायक झालें, प्रथम प्रथम बुद्धाच्या शिष्यानीं संस्कृतचाच उपयोग केला, पण संस्कृताची मदत न घेता स्वतंत्र रीतीने फैलाव केल्याशिवाय डाळ शिजेना. तेव्हा प्राकृत भाषेचा उपयोग करून स्वतंत्र मार्गानें बहुजनसमाजास गाठणे बुद्धधर्मीयाना भाग पडलें, आणि त्या धर्माचे महत्त्वाचे ग्रंथ पाली भाषेत निर्माण होऊ लागले. जैनानीं ह्याच कारणाकरिता अर्धमागधी व महाराष्ट्री या दोन प्राकृत भाषाचा प्रसंगानुसार एकमेकात अंशतः मिसळ करून उपयोग केला.

## लोकांची भाषा व लोकसंग्रह

बहुजन समाजास जागे करण्याचा प्रसंग कर्त्या विद्वानावर येऊन पडला म्हणजे त्या त्या वेळच्या त्या समाजाच्या बोलत्या चालत्या भाषेला शरण जावे लागतें. ही शरण जाण्याची स्थिति—तदर्थ, तन्निष्ठ आणि तत्परायण—ही स्थिति प्राप्त होण्यास त्या त्या भाषेतील हरएक तऱ्हेच्या गोडीशीं लेखकाचें तादात्म्य व्हावे लागते. गोडी नाही तर समाजाच्या अंतःकरणापर्यंत शब्दच पोहोंचत नाहीं! त्यातच सर्वस्वीं सुख पहाण्याची संवय मनास लागल्याशिवाय—त्या त्या भाषेत मन बांधलें गेल्याशिवाय—म्हणजे मनाचा देशबंध होऊन धारणाशक्ति उत्पन्न झाल्याशिवाय—आणि या बंधाला प्रेमाचें स्वरूप येऊन वृत्ति तल्लीन झाल्याशिवाय किंवा ध्यान लागल्याशिवाय, कार्यनिष्पत्ति किंवा समाधि प्राप्त होत नाहीं. भाषेची उत्पत्तीच मुळीं

गोडीकरितां म्हणजे धारणेकरिता, ध्यानाकरिता म्हणजे तन्निष्ठतेकरितां— आणि कार्यनिष्पत्तिकरिता म्हणजे समाधिधनाकरिता होय. शे-दोनशे वर्षांच्या कालावर छाप पडणारे ग्रंथकार अशा समाधिधनानेंच परिपूर्ण असतात. त्यात नटावें म्हणजे तत्त्वप्रसाद होतो !

अस्तीत्येवोपलब्धस्य तत्त्वभावो प्रसीदति ।
( कट—२—६—१३ )

मोठ मोठया क्रांति घडवून आणणाराचे ग्रंथ प्रासादिक असतात हें खरें आहे. कारण गोडी व प्रसाद यापासूनच भाषेची उत्पत्ति झाली असें कृष्णयुजर्वेदात वर्णन आहे.

" वाग्वै पराच्यव्याकृतावदते इन्द्रमब्रुवन्निमा नो वाचं व्याकुर्वंति सोऽब्रवीद्वर वृणै मह्य चैवेष वायवे च सह गृह्याता इति तस्मादैन्द्रवायवः सह गृह्यते तामिन्द्रो मध्यतोऽवक्रम्य व्याकरोत्तस्मादिय व्याकृता वागुद्यते ! "

भाषेचे निरनिराळे भाव स्पष्ट व्हावेत किंवा निरनिराळ्या लोकाची व उद्योगाची बोलती चालती भाषा एकमेकापासून अलग व स्पष्ट स्वरूपाची व्हावी अशी विनति देवानीं इद्रास केली असताना, एकाच पेल्यात मजकरिता व वायुकरिता म्हणजे शक्तीकरिता सोमरस ओता असें इद्रानें देवाना सागितलें; दोघाच्याकरिता एकाच गोडीचा एकच प्याला तयार झाल्यावर त्या पेल्यात शिरून इद्रानें पृथक्करण केलें; आणि तेव्हापासून विश्वमोहिनी सरस्वतीला म्हणजे भाषेला व्यक्त व प्रकट स्वरूप मिळालें; अशी भाषेच्या उत्पत्तीची हकीकत आहे. कोणत्याहि बहुजन समाजाची भाषा घ्या, त्या समाजाची गोडी व त्या समाजांतील वायु म्हणजे बळ या भाषेत असतें. मोठया ग्रंथकाराला भाषेतील ह्या मूळच्या गोडीशीं आपल्या ग्रंथातील गोडीचा संगम घडून आणावा लागतो, आणि आपल्या तत्त्वविचाराचें बळ भाषेतील मूळच्या वायूशीं म्हणजे सामर्थ्याशीं मिसळून

टाकावे लागतें. असा ग्रंथ निर्माण झाला म्हणजे तो कार्यकर्ता होतो, आणि कार्य सिद्धीस गेल्यावर त्याला प्रासादिक ग्रथ असे म्हणतात. बहुजनसमाजांत साहजिकपणें अव्यक्त व निद्रित स्थितींत असलेला प्रसाद ग्रथकर्त्याच्या सामर्थ्यानें 'अलख' म्हटल्याशिवाय 'आदेश' म्हणून केव्हांहि ओ देत नाहीं. रूढ झालेल्या सामर्थ्याच्या व वैभवाच्या मार्गानें काम होत नाहीं, असा अनुभव आल्यावर कर्त्या पुरुषाना आपलें सर्वस्व पणाला लावून— सर्व परिग्रह सोडून—आपल्या कार्याच्या गोडींतच मन व बुद्धि पूर्णपणें गुतवून—बहुजनसमाजाला हाक मारून—तुमच्या नेहमींच्या क्रमाहून तुमच्या ध्यानात न आलेला असा उपदेश मी अत्यंत कळकळीने तुम्हास करीत आहें—असा हबरडा अगदीं निकराच्या वाणीने फोडावा लागतो; मग बहुजनसमाज 'ओ' देऊन "आज्ञा सागा" असे म्हणावयास तयार होतो व लोकसग्रहाचें काम तडीस जातें. पाली भाषा पुढे येण्यास जीं कारणें बुद्धाच्या वेळी झाली, ज्या कारणामुळे जैनानीं अर्धमागधीस हातीं धरलें, त्याच कारणामुळे ज्ञानदेवानीं मराठीवर अनुग्रह केला. सस्कृताला धरून चालणाऱ्या पुराणानीं व कीर्तनानीं काम भागणारें नव्हतें. फैलावाचा हा मार्ग गुप्ताच्या कारकीर्दीत व त्यानतर दोनतीनशें शतकापर्यंत पुराणिकानी व कीर्तनकारानीं फार चागल्या रीतीनें अमलात आणला. संस्कृताबरोबर प्राकृत, अपभ्रष्ट, व हल्लीच्या देशी भाषा, यांचें सरक्षण पुराणाचें वेळीं प्रकट होणाऱ्या भक्तीमार्गाच्या फैलावासाठीं सस्कृत पडितांना करावें लागलें; भागवत–पुराण व इतर सर्व पुराणें यांचा फैलाव संस्कृत भाषेनें देशी भाषाना बटिक म्हणून हाताशीं धरून केला. सत्ताधारी राजाचें व श्रीमंताचें पाठबळ सस्कृताला जोंपर्यंत होतें तोंपर्यंत ती भाषा वरील फैलावाच्या मदतीनें बहुजन समाजास एकतऱ्हेनें जागृत ठेवण्यास उपयोगी पडली. पण हजार, अकराशे व बाराशे या शतकाच्या सुमारास

हिंदुस्थानांत बरींच शतकें टिकणारी राज्यक्रांति यवनांकडून घडून येत आहे असें लोकनायकांच्या व विचारप्रवर्तकांच्या ध्यानीं येऊन चुकलें, भक्ति-मार्गास विशेष पुष्टि देणारे विशिष्टाद्वैताचे प्रवर्तक रामनंद यांनीं उत्तरेस जाऊन तुळशीदास व कबीर यांच्या देशी भाषांच्या संप्रदायांना प्रोत्साहन देण्यापूर्वी व अत्यंजासकट सर्वांना गंगायमुनेच्या काठीं भक्तिमार्गात समानतेने वागविण्यास उद्युक्त होण्यापूर्वी, राघवानंदानीं उत्तरेस देशी भाषांतील भक्तिमार्गाची भूमिका रचून ठेवली होती. राघवानंदाचा हा संप्रदाय ज्ञानदेव महाराजांना आपल्या अनुगृहीतांत ओढतो; पण तसा पुरावा मराठींत सांपडत नाहीं. त्या सांप्रदायाचे लोक बंगाल्यांत व दिल्लींत मुसलमानांची सत्ता स्थापली गेल्यामुळे भयभीत झाले होते; मुसलमानांच्या स्वाऱ्या दिल्लीपासून बंगालपर्यंत होऊं लागल्या होत्या; यामुळें दूरदर्शी कार्यकर्ते मोठ्या काळजींत पडले होते. राजसत्ता हातची गेल्याबरोबर संस्कृतची व संस्कृतांतील विचारांचा फैलाव करण्याकरितां हातीं घेतलेल्या देशीं भाषांची सहाजिकच दैना होऊं लागली. अशावेळीं संस्कृतांत साठवून ठेवलेलें आपलें ज्ञान नव्या देशीं भाषेंतून म्हणजे बंगाली, हिंदी व मराठी या भाषांतून चोहोंकडे पसरून टाकून, बहुजन समाजास आपलें आपण संरक्षण करण्यास तयार केल्याशिवाय घरांत येऊन शिरलेल्या अरिष्टापासून बचाव करण्याचा दुसरा मार्गच राहिला नाहीं. मंत्रविद्या व योगसाधनें यांचा फैलाव नाथ संप्रदायानें त्यावेळीं चोहोंकडे केला आणि गुप्त गुप्त म्हणून ठेवण्याच्या घातुक सवयीच्या शैव संप्रदायाच्या व शक्ति संप्रदायाच्या ?दिवासांतून, दत्तात्रयाच्या शिकवणीनें म्हणजे शैव व वैष्णव यांच्या संमेलनानें चालणाऱ्या नाथ–संप्रदायानें योगविद्येची सुटका केली.

## मराठी भाषेचा आईपणा

दक्षिण महाराष्ट्रांत यादवांच्या सत्तेला ज्ञानेश्वर महाराजांच्या वेळीं

मुसलमानांच्या आगीची ज्वाळा लागलेली नव्हती हें खरें; पण मुसलमानांनीं धडवून आणलेली क्रांति कित्येक शतकें टिकणारी आहे आणि बहुजनसमाजास शरण गेल्याशिवाय संस्कृत भाषा व देशी भाषा या सर्वांचाच नाश परदेशी भाषेकडून झाल्यावाचून रहाणार नाहीं, याची जाणीव त्यावेळच्या विचारप्रवर्तकांना पूर्णपणें होती. तुमच्या महाराष्ट्रातहि कलिकाल जवळ आला आहे; तुमच्या घराचा नाश होणार आहे, आणि हा नाश टाळण्याकरितां संस्कृत पंडितांना चिकटून रहाण्यांत हशील नसून बहुजनसमाजाची भेट देशी भाषेच्या मार्फतच घेतली पाहिजे आणि 'जगा'चें रक्षण केलें पाहिजे, अशी आज्ञा गहिनीनाथाकडून निवृत्तिनाथाला आणि निवृत्तिनाथाकडून समाधिधनासकट ज्ञानदेवापर्यंत येऊन पोहोंचली व ज्ञानेश्वरीमुळें मराठी भाषेला एकदम नागर स्वरूप प्राप्त झालें. नागर म्हणजे मोठ्या नगरांतील संस्कृति. हा नागरपणाचा मान शके १२१२ पूर्वी मराठी भाषेला नव्हता. राजाश्रयाच्या अभावामुळें संस्कृत जरी म्लानवदन झाली तरी संस्कृताच्या सर्व संस्कृतीचा छाप नागर भाषा म्हणून मराठीवर मारून, स्वतःच्या जिवतपणाकरितां व उत्कर्षाकरितां संस्कृताकडे पाहू न शकणाऱ्या बहुजन समाजाच्या घरांत संस्कृतच्या ऐवजी मराठी भाषा 'आई' म्हणून ज्ञानेश्वरीमुळे नांदूं लागली नसती, तर मराठी भाषा संस्कृतच्या रोडकेपणाच्या वेळींहि नागर पदवीस म्हणजे संस्कृतच्या बरोबरीच्या श्रेष्ठतेला चढली नसती. मराठी भाषेला संस्कृताच्या ऐवजी आईपणाचा मान हिंदुजगांत ज्ञानेश्वरमहाराजांनीं आणून दिल्यावर मराठी भाषा बोलणारे लोक हिंदी भाषा बोलणाऱ्या लोकांच्या मदतीला त्यांचा हात मुसलमानी अमलाच्या चरकांत पूर्णपणें सांपडला असतां धावून गेले आणि मराठी भाषेनें आपलें सेवढेच नव्हे तर हिंदी, बंगाली, कानडी वगैरे सर्व देशी भाषांचें संरक्षण केलें! जगाचें रक्षण गुरूंनीं केलें अशा आशयाचे जे उद्गार ज्ञानेश्वर

महाराजांनीं आपल्या ग्रथाच्या अखेरीस प्रेरणेचें विवेचन करतांना काढले आहेत, त्याचा अर्थ वरील तऱ्हेचा आहे. समाधिधनाशिवाय म्हणजे आपल्या कार्यांतच पूर्णपणें गुग होऊन इतर सर्व परिग्रहाचा त्याग केल्याशिवाय, आणि बहुजनसमाजास जागृत करण्याचें आपलें कार्य आजन्म चोहोंकडे एकसारखे फिरत राहून सकीर्तनाच्या मार्गानें करीत राहिल्याशिवाय म्हणजे लोकसग्रह करण्याचा उपाय योजल्याशिवाय, आणीबाणीच्या प्रसगातून म्हणजे अपमृत्यूच्या व महामृत्यूच्या भयातून बहुजन समाज पार पडूं शकत नाहीं, हीच शिकवणूक मराठी भाषेची आई सर्वांना शिकवीत आहे! लोकसग्रहाकरितां जागृतीचा फैलाव करण्याची चळवळ मराठी भाषेनें जशी परिणत स्थितींत आणली तशी महाराष्ट्राबाहेर इतर ठिकाणी दृष्टीस पडत नाहीं. ज्ञानेश्वरामागून एकनाथानीं पढरीच्या सप्रदायास नागरपणाचा नवा पोषाख चढवून मुसलमानी अमदानींत फैलावाच्या ह्या मार्गाला अधिक जोर आणला. एकनाथाचे गुरु जनार्दन स्वामी, दत्तात्रय सप्रदायातील होते व त्यावेळच्या या दीक्षाकाराचा दीक्षा म्हणजे गुरुमत्र द्यावयाचा आणि फैलावाच्या कामाला लागणारे पुरुष एकविचारानें भरून काढून लोकजागृतीकरिता त्याचे मठ किंवा अड्डे किंवा नुसत्या एकटया व्यक्ति चोहोंकडे विखरून टाकावयाच्या, अशा स्वरूपाचा दीक्षाकाराचा लोकसग्रहाचे चळवळीचा त्यावेळचा मार्ग होता. चैतन्य, तुळसीदास व कबीर यानीं उत्तरेस जें कार्य केलें तेंच कार्य नामदेव, तुकाराम याच्या सारख्या प्रमुख सतानीं महाराष्ट्रात केलें. वारकऱ्यांच्या माळेची दीक्षा सर्व जातींना देऊन पढरीच्या वारकऱ्यात ते प्रमुख दीक्षाकार झाले. मराठी भाषेंतील अभगाच्या द्वारें चोहोंकडे जिवंतपणाचा फैलाव करावयाचा व कोणासहि मरू द्यावयाचें नाहीं, असा वारकऱ्याच्या दीक्षाचा कटाक्ष आहे. चोहोंकडे फिरून कीर्तन करणें हा तुकाराम महाराजांचा मुख्य व्यवसाय!

ह्या व्यवसायाच्या गुर्गीत व आनंदातच त्यांच्या हातून अभंग रचले जात; व त्या अभंगात त्याच्या व्यवसायातील सर्व गोडी समाधिधन म्हणून ओतली गेल्यामुळे संस्कृताप्रमाणें त्याचे अभग आपोआप ' अमर-अमृत ' होत. कधीं न मरणारे व न मेलेले अशी स्थिति प्राप्त होण्यास लोकसग्रहाकरिता करावयाच्या फैलावाच्या ह्या मार्गाशिवाय दुसरा मार्ग किंवा निष्ठा नाही ! ह्या मार्गात साधनाची किंवा द्रव्याची अपेक्षा नाहीं ! कोठेंहि उभे राहून परमेश्वराच्या नावाचें भजन करावयाचें आणि नंतर जमलेल्या मंडळींना उपदेश करावयाचा, असा हा चळवळीचा मार्ग आहे. एकटा पुरुष तन्निष्ठ झाला म्हणजे त्याला दाहीदिशा मोकळ्या, अशी ही शक्ति आहे.

## मराठी भाषेची मुलुखगिरी

भाषेची चळवळ द्रव्यसंचयावर चालत नसते, मुलुखगिरीवर चालत असते. युरोप खंडात लष्कर पोटावर चालते, साधुसंतांचें लष्कर महाराष्ट्रात पोटावर चाललें नाहीं, मुलुखगिरीवर चाललें. मुलुख म्हणजे लोक आमचे आहेत आम्ही त्याचे आहो, आमच्यामधील मधु किंवा अमृत लोकांचें आहे आणि लोकाचें मधु किंवा अमृत आमचे आहे, अशा तऱ्हेचें तादात्म्य झालें कीं मुलुखगिरीवर म्हणजे लोकाकडून मिळणाऱ्या त्या त्या क्षणापुरत्या सहाय्यावर पाहिजे तेवढी मोठी चळवळ सर्व परिग्रहावर उदक सोडणाऱ्या पुरुषाला चमत्काराप्रमाणें करून दाखविता येते आणि लोकसग्रहाचें काम पार पाडून नेता येते, असा महाराष्ट्रातील मराठी भाषेचा इतिहास आहे. महाराष्ट्रातील सेनानायकानीं व राजानीं पैशाची पूर्णपणें टचाई असताना एक प्रकारच्या दारिद्र्यातच मुलुखगिरीच्या जोरावर मोठमोठया स्वाऱ्यात यश मिळविलें. मुलुखगिरीस दोषार्ह स्वरूप केव्हा केव्हा प्राप्त होत असे, हें खरें; पण तो आपद्धर्म होता. लोकाचेंच लष्कर, लोकाचेंच यश, आणि

लोकानींच आपापल्या मुलुखात त्या त्या वेळेपुरते लष्कराच्या भाकऱ्या भाजून यशाचे भागिदार व्हावयाचें आणि अमर पदवीस चढावयाचें, अशी मुलुखगिरीच्या संप्रदायाची दीक्षा आहे ! राज्यकर्त्यांनीं व सेनानायकानीं ही मुलुखगिरीची दीक्षा शोधून काढली असे म्हणण्यापेक्षा, मराठी भाषेनें व मराठी भाषेच्या चळवळ्यानीं राज्यकर्त्याना व सेनानायकाना ही दीक्षा दिली असे म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. रामदासानीं ह्या दीक्षेच्या व्रतावरच उपदेशाचे निरनिराळे समास रचून नियमबद्ध केले म्हणून त्यास चळवळीच्या दीक्षाकारात विशेष मान आहे. बैरागी, जोगी व संत महाराष्ट्रात मंत्रकर्ते म्हणजे लोककर्ते, आणि दीक्षाकर्ते म्हणजे मार्गकर्ते, या नात्यानें मुसलमानीं अमलात जोराजोरानें पुढे येत असताना, शंकराचार्यानीं संस्कृतात निर्माण केलेले सन्यासी आपोआपच अस्तास जाऊं लागले. ह्या सन्याशाचा वर्ग अस्तास न जाता लोकसंग्रहाचें व दीक्षाकाराचे काम त्या वर्गाच्या हातून व्यवस्थित रीतीनें पार पडावे म्हणून मुसलमानी अमलातच वऱ्हाड प्रातात कारजे येथें श्रीगुरुदत्तात्रेयाचा अवतार नरसिंह सरस्वतीच्या रूपानें झाला. श्रीगुरुचरित्रात ह्या अवताराची कारणें सागताना हा पुरुष दीक्षाकार होणार आणि एकविचारानें भरलेल्या मंडळ्या स्थापून कलीचें पुढे पडत चाललेलें पाऊल मागे हटवणार, अशा तऱ्हेचें वर्णन करण्यात आलेलें आहे. कृष्णातटाकाच्या एका ठिकाणीं स्नान, दुसऱ्या ठिकाणीं भोजन, तर तिसऱ्या ठिकाणीं शयन असे त्याच्या चळवळीच्या चपलपणाचें वर्णन आहे. असल्या चपळपणाशिवाय फलावाचें काम त्या त्या प्रसगाच्या बंधनातून मुक्त होऊ शकत नाहीं. प्रासंगिक व स्थानिक बंधनें आपल्या मार्गाच्या आड येऊ नयेत अशी जर इच्छा असेल तर एकेकट्यानें भिंगरीसारखें चोहोंकडे फिरत रहाणे हा मुख्य उपाय आहे. मच्छिंद्रनाथ कोल्हापुरात जेवत, गंगातटाकीं स्नान

करीत, व हिमालयात निजावयास जात, अशा तऱ्हेचीं जीं वर्णनें आहेत तीं वर्णनें भिमवडी, नरसोबाची वाडी व गाणगापूर येथून चाललेल्या चळवळीलाहि जशींच्या तशीं लागू पडतात. उत्तरहिंदुस्थानात भक्तिमार्गानें कबीर वगैरे मुसलमानानाहि आपल्या परिघात ओढून घेतलें आहे; पंढरीच्या संप्रदायात कित्येक मुसलमान सामील झालेले आहेत व होत आहेत; आणि यवनराजाना त्याचे रोग बरे करून व त्याच्यावर अनुग्रह करून आपल्या चळवळीला मदत घेण्यास कृष्णतटाकच्या दत्तसप्रदायानें मागेंपुढे पाहिलें नाहीं. अत्यजोद्धार हे महाराष्ट्रातील सतांचें प्रमुख काम होतें. आणि सस्कृत सप्रदायातील अत्यत सोवळ्या व विरक्त संन्याशाच्या समूहाला बौद्धाच्या महायान मार्गाप्रमाणें लोकसग्रहाच्या कामास जुंपीत असताना नरसिंह सरस्वती योगीराजानीं 'अत्यजाचें मुखीं निगम सपूर्ण' असा चमत्कार केल्याबद्दल जयजयकाराची आरती श्रीगुरुचरित्राचे ग्रथकार गंगाधर–तनय यानीं केली आहे. देशी भाषा हे मुख्य साधन, समतेची दृष्टि हे दुसरें साधन, आणि लोकसग्रहाचा आग्रह किंवा रामदासी भाषेंत बोलावयाचें म्हणजे 'समुदायाचा हव्यास' या तीन पायावर महाराष्ट्राची उभारणी तत्त्वनिश्चयी पुरुषामार्फत झाली असून, राजकारणाचा चौथा पायाच काय तो राज्यकर्त्याच्या वाटणीला मराठी भाषेनें दिला आहे. चळवळ करणें हाच आपला मुख्य धदा, त्या चळवळीशीं तादात्म्य पावत असता जे उद्गार लोकाना उद्देशून समाधिधन म्हणून बाहेर पडतील तेंच आपलें सामर्थ्य, आणि मुलुखगिरी हा आपला योगक्षेम अशी मराठी भाषेची चार पाचशें वर्षांची मुख्य शिकवणूक आहे. त्या शिकवणुकीचा उदय भक्तिमार्गातील जी प्रमुख तत्त्वें श्रीमद्भगवद्गीतेंत भगवानानीं सांगितलीं आहेत, त्या तत्त्वापासूनच झालेला आहे. भक्तानीं एकसारखी चळवळ केली पाहिजे, गप्प बसता कामा नये, असा विभूतियोगाचा म्हणजे

गीतेच्या दहाव्या अध्यायाचा मुख्य उपदेश आहे. दहाव्या अध्यायातील आठ, नऊ, दहा व अकरा या चार श्लोकात भगवतानीं चळवळीचीं मुख्य तत्त्वे सागितलीं आहेत. तत्त्वविचाराचे सूत्र भगवतापर्यंत नेऊन आनंदानें आणि सतोषानें सर्वाना बोध करीत व सकीर्तन करीत जर लोकसग्रहाचे काम आरंभिलें तर त्याना मी बुद्धियोग देतो व आपल्या ज्ञानदीपानें त्याना मार्ग दाखवितो, असे भगवताचें सकीर्तनाच्या म्हणजे फैलावाच्या मार्गास आश्वासन आहे. आपल्या मुलाना उत्तेजन देण्याकरिता आई ज्याप्रमाणे निरनिराळे खेळ मुलापुढे ठेवते त्याप्रमाणे सोनियाचा खेळ दावून आणि हातात कापराची दिवटी धरून,

मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।
कथयन्तश्च मा नित्य तुष्यतिच रमन्तिच ॥
(गीता अ. १०, श्लो. ९)

या श्लोकांत वर्णिलेल्या चळवळ्यापुढे वरीलप्रमाणेच भावार्थ मराठी भाषेच्या आईनें माडलेला आहे. चळवळ्याच्या शास्त्राचें हे निरूपण गीता-रहस्यात आधुनिक पद्धतीनें जरी आलेलें असलें, तरी त्या तत्त्वाचें दर्शन होऊन त्या तत्त्वाला अनुसरूनच लोकाचें वर्तन ज्ञानेश्वरीपासून झालेलें आहे. बुद्धाच्या अनुयायानीं पालींत चळवळ केली, जैनानीं अर्धमागधींत चळवळ केली, तर भगवत्गीतेनें दहाव्या शतकानतर सस्कृत मागे-पडूं लागल्यावर मराठींतून चळवळ करण्यास प्रारभ करून हिंदी, बगाली, वगैरे भाषा व्यापून टाकल्या आहेत. तत्त्वें भगवत्गीतेची, पण चळवळ मराठी भाषेची, असा हा योग आहे. चळवळीचा उगम भगवत्गीतेच्या दहाव्या अध्ययापासून होत असून भक्तिमार्गात चळवळीला फार मोठी जागा दिली आहे, अशा तऱ्हेचेच उदगार डॉ. भाडारकर यानीं दहाव्या अध्यायावर लिहिताना काढले आहेत.

(There is to be observed here one special characteristic of Bhakti school that is, that all devotees meet together, enlighten each other as to the nature of God, and contribute discourses on Him to each other's elevation and gratification. This is almost a characteristic mark of Bhakti as distinguished from the yogis who have to go through their exercises singly in solitude-Vaishnavism-P 28)

## ज्ञानेश्वरी व गीतारहस्य

मुसलमानी आमदानीत लोकसंग्रहाच्या चळवळींचें हे तत्त्व मराठी भाषेच्या जितकें अंगवळणी पडलें होते तितके हिंदी किंवा बंगाली भाषेच्या अंगवळणी पडले नाहीं, हा दोष तेथील धुरीणाचा किंवा लोकाचा नसून मुसलमानी अमलाच्या तेथील व्यापामुळे व कडवेपणामुळे हिंदी बंगाली भाषांना तितका अवसरच मिळाला नाही. ह्या प्रसंगाच्या विशिष्ट अवस्थेतील चळवळीच्या मार्गाच्या वाढीचा मक्ता अशा रीतीनें मराठी भाषेकडे आल्यामुळे इंग्रजी अमलातहि बहुजनसमाजाला उद्देशून चळवळ करण्याचा प्रसंग येण्याबरोबर, मराठी भाषेने दाखविलेल्या पूर्वीच्या पावलाच्या खुणांना नमस्कार करून–रुपेरी बेडी तोडून टाकून–पूर्वीच्याच पद्धतीनें बहुजन-समाजास उद्देशून लोकमान्य टिळक याना चळवळ करावी लागली; आणि ज्ञानेश्वरीप्रमाणे मंडालेच्या तुरुंगात सर्व समाधिधन खर्च करून, आणीबाणीचा प्रसंग किंवा कलिकाल येत चालेला आहे असे पाहून गीतारहस्य ग्रंथ निर्माण करावा लागला. मराठी भाषाच प्रसंगानुसार पुन्हा आई झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं, ज्ञानेश्वरीचें कालांतर–शब्दांतर–भाषांतर–म्हणजे गीतारहस्य होय, हें भाषेतील लोकसंग्रहाच्या पद्धतीकडे पाहिलें असता कोणाच्याहि लक्षात आल्यावाचून रहाणार नाहीं. ज्या भाषेंत तत्त्वांचा निश्चय बहुजन समाजांतील कमी अधिक दर्जाच्या विचारवंतांना सुलभ

रीतीनें करण्याची व्यवस्था झालेली असते, त्याच भाषेचे लोक स्वार्थत्यागास पूर्णपणें उद्युक्त होऊं शकतात, आणि दृढ निश्चयी व स्वार्थत्यागी पुढाऱ्याच्या मदतीनें बहुजनसमाज आणीबाणीच्या प्रसंगांतून पार पडूं शकतो. सर्वांना समजणाऱ्या रीतीनें व तत्त्वाचा दृढनिश्चय करणाऱ्या पद्धतीनें ग्रंथ लिहिला गेला म्हणजे तो ग्रंथ त्या काळची 'आई' किंवा हरएक उद्योगात मार्गदर्शक 'शास्त्र' होऊन बसतो. गेली पाचशें वर्षें ज्ञानेश्वरी आईच्या पदवीला किंवा शास्त्राच्या पदवीला चढून सर्वांना महाराष्ट्रांत मार्गदर्शक झाली; आणि नंतर महाराष्ट्र भाषेच्या संतांनी केलेल्या सेवेनें औरंगजेब बादशहाचा तळ दहा पांच लाख सैन्यासकट महाराष्ट्रांत कित्येक वर्षें पडून राज्यसत्ता व लष्करी सामर्थ्य उच्छिन्न झालें असतानाहि, महाराष्ट्रातील लोक स्वयंस्फूर्तीनें त्या संकटांतून निभावून बाहेर पडले, अशा तऱ्हेचे उद्गार न्या. मू. रानडे यांनी War Of Independence ह्या आपल्या लेखांत काढले आहेत. शब्दाचें सामर्थ्य कसें सर्वव्यापी असतें याचें हें ठळक उदाहरण आहे. भाषेचा प्रभाव सूक्ष्म पद्धतीनें पडत असतो, कर्त्या पुरुषाचा पराक्रम तत्काळ फलदायी होत असतो. वेदांतून भाषेला धेनु असें म्हटलें आहे; आणि ही धेनु रोजच्या व्यवहाराला लागणारें दूध तर देतेच, पण तसेंच भक्त मिळाल्यास कामधेनूहि होते. कांहीं ऋषी भाषेला कामधेनु म्हणतात तर कांहीं वाणीला 'जाया' या नावानें संबोधितात. पत्नी या नात्यानें वाणी संसार गोड करणारी असते, इतकेंच नव्हे तर वाक् ही 'परिवेष्ट्री' आहे, म्हणजे हरेक प्रकारचें तुमचें कामकाज रोजच्या रोज व प्रसंगविशेषीं तुमच्या मनाप्रमाणें पार पाडून नेणारी व तुमच्याजवळ बटकीप्रमाणें राबणारी तुमची शक्ति आहे, असें वाणीचें महत्त्व उपनिषदांतून गाईलेलें आहे. परिवेष्ट्री म्हणून भाषेचा उपयोग पूर्णपणें करून घ्या, डोळ्यांना 'गोप्ता' म्हणजे संरक्षण करणारा तुमचा सेनानायक अशा

कामकाजाला लावा, कानांना 'श्रावयिता' म्हणजे आपल्याला मंगलकारक असें तेवढे ऐकविणारा दूत म्हणून योग्य कामगिरी सांगा, म्हणजे 'न याचयेत् इति उपनिषद्' कोणत्याहि वेळीं कोणत्याहि कामीं दीनपणानें दुसऱ्याच्या तोंडाकडे पहाण्याची पाळी यावयाची नाहीं, असा कौषीतकी उपनिषदाचा उपदेश आहे. स्वार्थत्याग व स्वावलंबन याचें ह्या उपदेशात समेलन आहे. ह्या समेलनाशिवाय कार्यसिद्धि होऊ शकत नाहीं; स्वार्थत्यागाची व स्वावलंबनाची दीक्षा जो ग्रंथ देऊं शकतो तो ग्रंथ त्या भाषेची आई किंवा ती भाषा बोलणाराचें शास्त्र आपोआपच होतो!

## गीतारहस्य हें शास्त्र आहे

तत्त्वाबद्दलचा दृढनिश्चय, स्वार्थत्याग व स्वावलंबन या तीन धर्मांचा प्रसार करून ज्ञानेश्वरीनें व संत मंडळींनीं मराठी भाषेवर जे उपकार केले तेंच उपकार इंग्रजी विचार–पद्धतीच्या साच्यात पडलेल्या आजच्या नव्या महाराष्ट्रावर व मराठी भाषेवर गीतारहस्यानें केलेले आहेत! नव्या आणीबाणीच्या प्रसंगी हे 'संसाराचें शास्त्र' मी लोकांपुढे ठेवीत आहे, असे उद्गार लोकमान्य टिळक यांनीं गीतारहस्याच्या प्रस्तावनेत काढलेले आहेत. स्वतःच्या चारित्र्याच्या मागे असलेल्या तत्त्वाचा दृढ निश्चय आणि तीं तत्त्वें संसारांत उतरविणारी स्वार्थत्यागाची व स्वावलंबनाची दीक्षा व निष्ठा, एवढ्यापुरताच हा ग्रंथ आहे अशा तऱ्हेची टीका गीतारहस्याच्या प्रसिद्धीच्या वेळीं झाली होती. हें शास्त्र आहे म्हणजे लाखों लोकांच्या प्रेरणेची ही आई आहे, अशी कबुली त्यावेळी देण्यात येत नव्हती. पण गेल्या तीन चार वर्षांच्या विलक्षण चळवळीमुळे महाराष्ट्रात हजारो लोकांनीं व त्यांच्या लाखों इष्टमित्रांनीं स्वार्थत्यागाच्या व स्वावलंबनाच्या ज्या हालअपेष्टा सोसल्या आणि उगीच वेडगळासारखे काही तरी केलें असें म्हणणाराची निंदा ज्या हालअपेष्टांना कित्येक वर्षें सोसावी लागणार आहे,

त्या हालअपेष्टा गीतारहस्यांतील उपदेशाने महाराष्ट्रातील लाखों लोक आज गोड करून घेत आहेत. लोकमान्य टिळक यानी गीतारहस्यांत कर्मयोगाचा जो सिद्धात लोकापुढे माडला तोच बरोबर असून, इतर कोणीहि मला दूर लोटलें तरी गीता माऊली मला दूर लोटीत नाही इतकेच नव्हे तर आई-प्रमाणे आपल्या माडीवर डोके घेऊन थोपटते, अशा तऱ्हेचे उद्गार महात्मा गाधी यानी काढले आहेत. आणीबाणीच्या प्रसगीं लाखो लोकाना मनाची शाति देण्याचे सामर्थ्य गीतारहस्यात आहे, ही गोष्ट चार पाच वर्षांपूर्वी काहीं विद्वानानी नाकबूल केली असती, पण हाताच्या काकणाला आरसा कशाला, या न्यायानें अवघ्या चार पाच वर्षांच्या अवधींत तो ग्रथ शास्त्राच्या पदवीस चढलेला आहे असा आपणास पावलोपावलीं अनुभव येत आहे. भाषा सूक्ष्म रीतीनें हरेक उद्योगात व कार्यकर्त्यांना स्वत:कडे कोणतेंहि श्रेय न घेण्याच्या आईच्या पद्धतीनें कशी मदत करीत असते, याचें हे उदाहरण आहे. ससार कर्त्या मुलाचा असतो, आईचा नसतो, पण संसाराला आईच सावरते व कार्यक्षम बनविते! अभिजात व नागर वाङ्मयाचा उलाढालीशीं प्रत्यक्ष सबध नसतो आणि दुसऱ्याच्या पराक्रमाचें श्रेय प्रत्यक्ष सबध ठेवून आपल्याकडे घेण्याचें काम अभिजात वाङ्मय करीत नाही. तसा प्रत्यक्ष सबध नसणे हेच उभयतास पुण्यकारक आहे. तथापि आईबापाकडून मिळणाऱ्या शिक्षण-सस्काराचा उलगडा केल्याशिवाय कर्त्या मुलाच्या पराक्रमाचा उलगडा जसा करता येत नाहीं, त्याचप्रमाणें सकटकाळातील पराक्रमाचें भविष्य वर्तविताना शास्त्रपदवीस चढलेल्या गीतारहस्यासारख्या ग्रथाचें संकीर्तन करणे भाग पडते. ज्ञानेश्वरीला आई म्हणताना जसे सताच्या सर्व काव्याचें आपण सकीर्तन करतों तसेच गीतारहस्यास शास्त्र किंवा आई म्हणून आज हाक मारताना तत्त्वनिश्चय, स्वार्थत्याग व स्वावलबन यांना प्रसविणाऱ्या सर्व आधुनिक वाङ्मयाचें

आपण संकीर्तन करीत असतों. कारण हे सर्व लेखक लोककर्ते व मार्गकर्ते या नात्यानें आपली कामगिरी बजावीत असतात. ज्ञानेश्वरापासून आतापर्यंत होऊन गेलेल्या कर्त्या ग्रथकाराचें सकीर्तन केल्याशिवाय कोणाच्याहि मनास शाति प्राप्त होणार नाहीं!

लोककृतः पथिकृतो यजामहे ये देवाना हुतभागा इहस्थ ॥

अशा ऋचेनें लोककृत व पथिकृत म्हणजे लोकाचा संग्रह करणारे व दृढनिश्चित तत्त्वाना अनुसरून लोकाना पथ किंवा मार्ग किंवा निष्ठा बाधून देणारे दीक्षाकार जे असतील त्याचे संकीर्तन झाल्याशिवाय भाषादेवाचा उत्सव कोणत्याहि काळीं व कोणत्याहि स्थळीं पूर्णतेस जाऊ शकत नाहीं.

## गीतारहस्याची टांकसाळ

कलीचा काळ म्हणून पूर्वीच्या आणीबाणीच्या प्रसगाचें वर्णन करण्यात येत असे. युरोपियन भाषांचा गेल्या तीन चारशे वर्षांचा काळ आर्थिक तत्त्वाच्या परिपोषाचा आहे. इग्रजी भाषेचे दडपण मराठीवर पडूं लागल्या-पासून मराठी भाषेच्या ज्या हालअपेष्टा झाल्या व होत आहेत, त्याची मीमासा आर्थिक स्वरूपाची आहे; धार्मिक किंवा राजकीय स्वरूपाची तितकीशी नाहीं. आर्थिक स्वरूपाचे जर दडपण नसतें तर मुसलमानी अमलाखाली जी भाषा मरून गेली नाहीं, ती भाषा भ्रष्ट इग्रजीच्या स्वरूपातच व तसल्या शब्दाच्या रूपानें कायम राहील, अर्थात् एक तऱ्हेचा मृत्यु मराठीला आल्यावांचून रहाणार नाही, असे अनुमान काढ-ण्यास अवसर मिळाला नसता. या अनुमानानें उत्पन्न केलेल्या वेदनातून बाहेर पडण्यास दोन तीन वर्षांपूर्वी साधन नव्हतें. साप्रतच्या राजकीय उलाढालींना पुढील पाच दहा वर्षांत कोणतेहि स्वरूप प्राप्त होवो, त्या स्वरूपाशीं आपला मराठी भाषेचे अभिमानी या नात्यानें प्रत्यक्ष व स्थूल

संबंध येत नाहीं! इंग्लंडचा व हिंदुस्थानचा हल्लींचा राजकीय संबंध निरनिराळया स्वरूपातून यापुढे शंभर वर्षें टिको किंवा दोनशे वर्षें टिको, आर्थिक सामर्थ्यानें सर्व भाषाना खाऊन टाकण्याची शक्ति इंग्रजी भाषेंत यापुढे उरणार नाहीं. दारिद्र्याचा व पैशाच्या टंचाईचा सांप्रतचा काळ तुम्हा-आम्हाला दु:सह होणारा असला तरी पुढील निदान एक दोन पिढ्या आर्थिक प्रश्न नीट व्यवस्थेने सुटेपर्यंत, केवळ पैशाच्या टंचाईमुळे, युनिव्हर्सिटीसकट सर्व शिक्षण खाते कमी जास्त प्रमाणाने देशी भाषेतील स्वार्थत्यागी व स्वावलंबी सद्गृहस्थाच्या हातीं दिल्याशिवाय कोणत्याहि प्रांतिक सरकारचा कारभार सुरक्षितपणे पार पडणार नाहीं. इंग्रजी भाषेंत तरबेज झालेल्या विद्वानाचा खर्च देशी भाषेतील विद्वानापेक्षां केव्हाहि डोईजड होणारच. हा डोईजड खर्च तुम्हीं-आम्हीं मागणी न करता कालाच्या ओघामुळे आपोआप मरणाऱ्या पथाला लागल्यावाचून रहाणार नाहीं. इंग्लंड आणि हिंदुस्थान ह्यामधील संबंधाला अनुसरून सत्ताधारी इंग्रजाच्या शेजारी बसून करावयाच्या चर्चेत डोईजड खर्चाच्या इंग्रजी भाषेंत प्रवीण झालेल्या देशी विद्वानाची थोडीशी सोय पैशाच्या टंचाईच्या सांप्रतच्या मनूंत देखील लागेल, नाहीं असे नाही. पण नुसत्या दक्षिणेवर नजर ठेवणाऱ्या संस्कृत भाषेंत पंडित झालेल्या दीक्षितांची जी फजिती ज्ञानेश्वरींत व इतर संताच्या काव्यात आढळते, तीच टवाळी डोईजड ठरलेल्या आमच्यांतील इंग्रजी पंडितांची झाल्यावाचून रहाणार नाहीं. असलें डोईजड पांडित्य आर्थिक टंचाईच्या मनूंत आपल्याजवळ नांदूं देणें म्हणजे एक प्रकारचा उपद्रवच गळयात बांधून घेण्यासारखें आहे. सत्ताधारी इंग्रजानाहि तो उपद्रव आवडणार नाहीं व देशी भाषा तर असल्या पंडिताकडे भर रस्त्यावर नाकें मुरडल्यावाचून रहाणार नाहीं. आर्थिक टंचाईमुळे 'पढे पारसी बेचे तेल'-अशी स्थिति झाल्यावर पांडित्याकरिता

करावयाच्या तपश्चर्येचा ओघ इंग्रजी भाषेकडून मराठी भाषेकडे प्रचंड वेगानें वळणार हे उघड आहे. तपस्वी दारिद्र्यांना एरवी शांति कशी मिळणार? स्वार्थत्यागी व स्वावलंबी पुरुष निर्माण करण्याची टांकसाळ ज्ञानेश्वरीप्रमाणें गीतारहस्यानें आज महाराष्ट्रांत सुरू केली आहे. ह्या टांकसाळीतून बाहेर पडणारे पुरुष पैशाच्या मोहामुळे आपल्या स्वार्थत्यागावर अर्धवट बिब्बा घालून इंग्रजी भाषेकडे युरोप खंडाच्या आर्थिक वर्चस्वामुळें तोंडे फिरवून बसलेले आहेत. मूळ विहिरींतच पैशाची टंचाई ह्यापुढे कांहीं वर्षें तरी खात्रीनें रहाणारी असल्यामुळे विहिरींतून बाहेर निघणाऱ्या पोहोऱ्याकडे पाहून कोणत्या विद्वानाची तहान भागणार आहे? द्रव्याच्या आशेनें ह्या तपस्व्याच्या तोंडास पाने पुसलीं गेल्यावर 'कर्तुं नेच्छसि यन्मोहात् करिष्यस्यवशोऽपि तत्' ह्या भगवताच्या ताकिदीप्रमाणें देशी भाषेच्या सेवेत आनंद मानल्याशिवाय गत्यंतर रहाणार नाहीं. मराठी भाषेला सर्वस्व अर्पित करण्याची पाळी विद्वानावर फार थोड्या अवधींत येणारी आहे. आज मराठी भाषेची जे विद्वान–नुसती पूजा व अर्चा करतात त्यांना 'पूजित' व 'अर्चित' ह्या दोन अवस्थांतून वर जाऊन 'अर्पित' म्हणजे सर्वस्व अर्पण करून जी स्थिति प्राप्त होते त्या स्थितीत अव्याहत सेवा करीत राहण्याची तिसरी 'अवस्था' प्राप्त झाल्यावर, अत्यंत काटकसरीच्या खर्चात नागपूर युनिव्हर्सिटीसारख्या युनिव्हर्सिटीचें कामकाज देशी भाषेंतून चालविण्यास नागपूर वऱ्हाडचे लोक कसे समर्थ ठरणार नाहीत? असल्या कामास लायक असलेले जाडे विद्वान आजहि तुमच्या प्रांतात भरपूर आहेत. मुंबई इलाख्यात चोहोंकडे पसरलेली स्वार्थत्यागाची व स्वावलंबनाची वावटळ आज तुमच्या येथेहि आहे. यवतमाळच्या शारदाश्रमाकडून प्रसिद्ध होणाऱ्या मालेंत महाभारताचे कालसंबंधानें लेख लिहिणारे श्री. माधवरावजी अणे यांच्यासारखे मराठी भाषेचे अभिमानी लोकनायक तुम्हास मार्ग दाखविण्यास

तयार आहेत. महाराष्ट्र साहित्य समेलनाचे ग्वाल्हेरचे अध्यक्ष आज ह्या प्रसंगीं मंडपात हजर नसले तरी स्वार्थत्यागाची व स्वावलंबनाची त्यांची मूर्ति तुम्हां आम्हा सर्वांच्या डोळ्यापुढें प्रत्यक्ष उभी आहे. निष्ठावंत व तपस्वी या नात्यानें माधवरावजी आज कारागृहात आहेत आणि त्यांच्या ह्या तपस्येमुळें महात्मेपणात ते तुम्हा आम्हासारख्यांच्या कल्पनेबाहेर वजनदार व कणखर ठरले आहेत. कणखर स्वार्थत्यागी लेखक नागपूर-वऱ्हाडच्या बाजूस कमी नाहींत आणि मराठी भाषेसंबंधाच्या आपल्या उद्योगात लागेल तेवढी मदत आपणांस नागपूर वऱ्हाडातूनच मिळणारी आहे, हें तत्त्व आपल्या नजरेआड होऊ नये म्हणून ग्वाल्हेरच्या समेलनाच्या अध्यक्षाचें आजकालचें चरित्र मी आपणापुढें ठेवलें आहे. सर्व हिंदुस्थानभर चाललेल्या चळवळीचा फायदा मराठी भाषेला कसा मिळत आहे व मिळणारा आहे याचें दुसरें उदाहरण पाहिजे असल्यास मजुरांच्या दृष्टीनें लिहिल्या गेलेल्या पुस्तकाकडे आपण लक्ष द्यावें, अशी आपणास माझी विनति आहे. यादींतील पुस्तकाकडे पाहिलें असता श्री. रघुनाथशास्त्री कोकजे याचें धर्मस्वरूपनिर्णय व दिवेकरांचें धर्ममंथन, श्री. विठ्ठल रामजी शिंदे याचें अस्पृशाचा प्रश्न व श्री. माटे यांचे अस्पृष्टाचा प्रश्न हीं चार पुस्तके चळवळीमुळेंच पुढें आलेली आहेत. वर्तमानपत्रें व मासिके याचे बरेंच जीवन चळवळीवर अवलबून असल्यामुळें त्याच्याकडून होणारी आजची भाषेची सेवा म्हणजे चळवळींचेंच एक प्रकारचें फळ होय. तेव्हा त्याच्या भाषेच्या सेवेसंबधानें विस्तृतपणें विचार करणें म्हणजे भाषेच्या पटांगणातून राजकीय आखाड्यात उतरण्या-सारखें आहे; आणि मराठींतील वर्तमानपत्राशीं व मासिकाशीं माझा स्वत:चा सबध चाळीस वर्षांचा असला तरी भाषेच्या समेलनात चालू राजकारण आणणें केव्हाहि प्रशस्त होणार नाहीं. नाटकें व कादंबऱ्या

वगैरे मनोरंजनाकरितां उत्पन्न होणाऱ्या वाङ्मयाशींहि माझा संबंध वर्तमानपत्राइतकाच चाळीस वर्षांचा आहे आणि अजूनहि निभवतील तितके दिवस हा संबंध मला ठेवावयाचा असल्यामुळें प्रसिद्ध झालेल्या नाटकांत व कादंबऱ्यांत ह्या किंवा त्या पुस्तकाची अध्यक्ष ह्या नात्याच्या माझ्या ह्या भाषणात मी शिफारस करणें धदेवाईक ह्या नात्यानें योग्य होणार नाहीं. गेल्या चाळीस वर्षांतील मराठी भाषेंतील नाटकाकडे व कादंबऱ्याकडे पाहिलें असता हिंदी, बंगाली किंवा गुजराथी भाषाच्या मागे आमची मराठी भाषा पडली आहे, असें कोणासहि म्हणता येणार नाहीं. उलट मराठी भाषा इतराच्यापुढे एक दोन पावलें गेलेली आहे असा तज्ञाचा अभिप्राय आहे. मराठी भाषेला स्वतःचे गाणें नाहीं, हरिदासी गाणें काय ते मराठी भाषेत आहे, गाण्याच्या चिजा कानडी प्रदेशातून किंवा उत्तरहिंदुस्थानातून घेतल्या पाहिजेत, ही वीस पचवीस वर्षांपूर्वीची स्थिति पालटली असून मराठी रंगभूमीवर गाइलीं जाणारीं पदे आज चिजाच्या पदवीला चढलीं आहेत. इतिहाससंशोधनाचें काम निरनिराळ्या संस्थाकडून सांप्रतच्या दारिद्र्याच्या दिवसातहि चांगल्या रीतीनें चाललें असून चालू साली मुंबई सरकारच्या सहकार्यानें पेशवे दप्तराचे बरेच भाग प्रसिद्ध झाले असून ४५ भागापैकीं ३३ भाग बाहेर आले आहेत, चार पाच भाग लवकरच प्रसिद्ध होणारे आहेत, आणि बाकीच्या आठ भागाचें छापखान्यातील कार्य पाच सात महिन्यात पुरें होईल असा अंदाज आहे. पेन्शन घेतल्यावरहि केवळ स्वार्थत्यागाच्या बुद्धीनें ऐतिहासिक कागदपत्राच्या संशोधनाचें हें काम श्री. सरदेसाई यानीं आता बहुतेक संपविल्यासारखे केले आहे. त्या कामाकडे पाहिलें असता भाषेच्या सेवेच्याकामीं स्वार्थत्यागाच्या अहमहमिकेनें नोकरी संपल्यावर घरीं स्वस्थ बसावयाच्यावेळींहि सर्वांना कसें पछाडलें आहे हें आपल्या ध्यानीं येईल. बडोदे संस्थानात नोकरींत असतांना

व नोकरीचे दिवस संपल्यावरहि रा. देसाई यांनीं आपली इतिहासाच्या सेवेची गोडी कायम ठेवली आहे हें त्यांना भूषणावह आहे. पेन्शनराच्या मराठी भाषेच्या सेवेसंबधानें बोलताना ग्वालेर संस्थानांतील इंजिनियर म्हणून काम करून पेन्शन घेतलेले व चालू सालीं वारलेले कै. माधवराव व्यंकटेश लेले यांची आठवण झाल्यावाचून रहात नाहीं. नोकरी करीत असताना श्री. लेले यांना मराठी भाषेच्या सेवेचा नाद लागला व पेन्शन घेतल्यानंतर त्यांनीं तो अव्याहत पुढे चालविला, त्याचें राजतरंगिणीचें समग्र भाषांतर प्रसिद्ध आहे, त्याचप्रमाणें प्रमुख पर्शियन पुस्तकांचीं पर्शियन भाषा शिकून त्यांनीं चांगलीं भाषांतरें केलीं असून, संस्कृत नाटकावरील त्यांच्या विवेचनाप्रमाणेच भागवत पुराणाचें त्यांचें विवेचनात्मक भाषांतर सर्वांना उपयोगी पडणारें आहे.

## मराठी विद्यापीठ

मराठी भाषा बोलणारें लोक दरिद्री असले तरी मराठी भाषा बिलकूल दरिद्री नाहीं आणि इतर देशी भाषांचे लोक पैशाच्या किंवा लोकसंख्येमुळे मिळणाऱ्या आश्रयाच्या जोरावर ग्रंथ व लेख प्रसिद्ध करण्याचें काम आमच्याहून अधिक त्वरेनें आजकाल करीत असले तरी नागर भरीवपणांत मराठी भाषा कोणाच्याहि मागें नसून काहीं काहीं बाबींत आमचें अनुकरण इतरांना करावे लागत आहे. ही स्थिति लक्षांत घेतली असता, सरकारमार्फत स्थापावयाच्या मराठी विद्यापीठाचा प्रश्न धसास लावण्यास जो तो मदत करील, ह्यात संशय रहात नाहीं. मुंबई इलाख्यात स्वार्थत्यागी व स्वावलंबी लेखक पसरलेले असल्यामुळें सरकार जेथें मनांत आणील तेथें मराठी विद्यापीठ सुरू करणें सरकारास मुळींच जड जाणार नाहीं. पुण्यास तर मराठी विद्यापीठाच्या जगलोटाची आयती तयारी आहे आणि

पैशाच्या टचाईच्या काळांत मुंबईसारख्या फार खर्चाच्या रहाणीच्या शहरांत नवीन विद्यापीठाचा स्वार्थत्याग करूनहि लागणारा डोईजड खर्च करण्यास प्रातिक सरकार पुढे येण्याचा मुळींच सभव नाहीं. बेताच्या खर्चाची पुण्याची राहणी असल्यामुळें नवीन उपक्रमास तेथें सोईचें होणार आहे. हजार बाराशे पानाचे ग्रथ योग्य खर्चांत छापणें आज पुण्यास परवडतें, एखादा नवा कोश असो, किंवा ऋग्वेदासारखा जुना ग्रंथ असो, विद्यापीठाच्या नावाला साजेसे छापण्याचें कामकाज दरिद्र्याच्या पैशाच्या पिशवीला झेपेल येवढया खर्चात मुबईत होऊ शकणार नाही. क्लिष्ट कामाच्या पुस्तकाना हस्तलिखित प्रत तपासण्यास आणि छापखान्यातील कामकाजात चुका राहूं न देण्यास विद्वान स्वयसेवकाची फार जरुरी असते. मुबईचे छापखाने पुण्याइतकेच सवग व सुबक काम काढूं शकतात; पण वर्षानुवर्षें विद्वान स्वयसेवकाची मुबईसारख्या डोईजड खर्चाच्या रहाणींत मदत मिळणें व मागणें सकटाचे होऊन बसते. मुबई शहराहून इतर ठिकाणीं अशी अडचण नसल्यामुळे ‘ वैदिक सशोधन ’ मडळाकडून पुण्यासच म्हणून युरोपखडातील आवृत्त्यापेक्षा अधिक सरस ऋग्वेदाची आवृत्ति साप्रत छापण्यात येत आहे आणि भागशः प्रसिद्ध होत आहे. वाईच्या प्राज्ञ पाठशाळेनें धर्मकोशाचें काम हाती घेतलेलें आहे. स्वार्थत्याग व स्वावलबन याच्या जोरावरच हीं कामे चाललेलीं असलीं तरी काहीं प्रमुख विद्वानाची बरीच वर्षे व हजारो रुपये या कामी खर्च होणार आहेत. असली कामे युरोपखडात निरनिराळी विद्यापीठे हातीं घेत असतात. विद्वानाना त्या त्या विद्यापीठाचा मोठा आश्रय असतो. विद्यापीठाना साजेशीं कामे करणारे विद्वान पुण्या-मुंबईस व इतर ठिकाणीं भरपूर आहेत, पण सर्व सामग्रीने सज्ज असलेल्या पुण्यासारख्या शहरातहि मराठी भाषेचें विद्यापीठ नाहीं. टिळक विद्यापीठ हें मराठी भाषेचें विद्यापीठ आहे खरें, पण असलें विद्यापीठ आणीबाणीच्या

प्रसंगीं कायद्यामुळे म्हणा किंवा इतर कारणामुळे म्हणा बंद पडल्यावर पुन्हा घडी बसविणे दुरापास्त होय. ज्या परिस्थितीमुळे टिळक महाविद्यालयासारख्या संस्था बंद पडतात त्याच कारणामुळें मुंबई इलाख्यात मराठी विद्यापीठ सरकारी अनुग्रहानें सुरू होणें काही वर्षें तरी दुरापास्त आहे. नागपूर–वऱ्हाडची तशी स्थिति नाही. हिंदुस्थानसरकारच्या साम्राज्यात भूगोलाच्या दृष्टीने नागपूर–वऱ्हाडचा प्रांत खरोखर मध्यप्रांत आहे आणि त्यामुळे लष्करी किंवा आरमारी स्वाऱ्याच्या व बचावाच्या दृष्टीनें हिंदुस्थानसरकारच्या कारस्थानातून ह्या प्रांतास अजीबात वगळल्यासारखें आहे. मोठ्या कारस्थानीं मुत्सद्यांना ह्या प्रांताकडे कापूस व गहू पिकविणारा प्रांत ह्या दृष्टीहून निराळ्या राजकारणानें पहाण्याची काहीं जरुरी नाहीं. बड्या मुत्सद्देगिरीची दृष्ट ह्या प्रांतांतील उपक्रमांना व योग्य उद्योगांना लागूं शकत नाहीं. अशा दृष्टीनें विचार केला असता मराठी विद्यापीठासंबंधानें स्थानमाहात्म्याचा फायदा पुण्या–मुंबईपेक्षा नागपूरच्या पदरीं पडणें अधिक सोपें आहे. मराठी भाषेची सेवा आनंदानें करून नागपूर युनिव्हर्सिटींत मराठी व हिंदी भाषांना आपण मुंबई युनिव्हर्सिटीहून अधिक योग्यतेचें स्थान दिलें आहे. प्रांतिक स्वराज्यात देशी भाषेसंबंधानें करावयाचे सरकारी उद्योग प्रयोग या दृष्टीनें नागपुरास इतर ठिकाणापेक्षा अगोदर सुरू होतील, यांबद्दल वाद नाहीं. तत्त्वनिश्चय, स्वार्थत्याग, व स्वावलंबन यासंबंधाची ज्ञानेश्वरीपासून गीतारहस्यापर्यंतची महाराष्ट्राची परंपरा आपल्या प्रांतात वाढीस लागलेली आहे; पैशाच्या टंचाईच्या मनूंत इंग्रजी भाषेचे डोईजड जूं मराठी भाषेच्या मानेवर फार वेळ बसूं शकणार नाही; असले स्वयंभू सवलतीचे दिवस मराठीकडे झपाट्यानें धावून येत आहेत. तेव्हा पैशाच्या टंचाईचे हे दिवसच मराठी भाषेला मृत्यूच्या जबड्यातून सोडवून अभ्युदयाच्या मार्गास इतर ठिकाणापेक्षा अगोदर नागपुरास लावतील

असें का मानूं नये ? थोड्या वर्षांच्या अवधींत नागपुरच्या युनिव्हर्सिटीचें रूपांतर देशी भाषाच्या विद्यापीठात होईल, आणि तसें झाल्याची शुभवार्ता आज उतारवयातहि असलेल्याच्या कानीं परमेश्वर घालील असा मला पूर्ण भरंवसा वाटत आहे हीच मगलदायक हकीकत वृद्धाच्या कर्णाना ऐकावयास मिळावी, हाच मंगलदायक सोहाळा सर्वांच्या डोळ्याना पहाता यावा, आणि मराठी भाषेच्या सेवेंत रोडकीं शरीरे केविलवाण्या स्थितींत राबविण्याची पाळी न येता कणखर व समर्थ शरीरानीं मराठी भाषेची सेवा करण्याची संधि सर्व तरुणाना मिळावी, अशी परमेश्वराची प्रार्थना करून प्रारंभी झालेल्या शानीच्या मंत्रानीं अध्यक्ष या नात्याचें माझे भाषण मी सपवीत आहें.

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः । भद्र पश्येमाक्षभिर्यजत्राः
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवासस्तनूभिः । व्यशेम देवहितं यदायुः ॥
ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥



खाडिलकरांची

# आध्यात्मक ग्रंथमाला

## (१) खाडिलकरांचा रुद्र (२) खाडिलकरांचें संध्यावंदन व पुरुषसूक्त (३) खाडिलकरांचें ऐतरेय आणि ईशावास्योपनिषद् (४) खाडिलकरांचें तैत्तिरीयोपनिषद् (५) खाडिलकरांची ॐकाराची उपासना. (६) खाडिलकरांचा याज्ञवल्क्य-मैत्रेयी संवाद व त्रिसुपर्णाची शिकवणूक.

श्री. कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब खाडिलकर यानीं वैदिक वाङ्मयाचें सतत भक्तिपूर्वक मननचिंतन करून वरील ग्रथ तयार केले आहेत. या सहाहि ग्रथात मूळ मंत्र सार्थ व सटीप दिलेले आहेत. वैदिक शिकवण दररोजच्या संसारापासून ब्रह्मप्राप्तीपर्यंत सर्वत्र उपयुक्त कशी आहे याबद्दलच्या अभिनव प्रकाश पाडणारीं त्या त्या ग्रथावरील विस्तृत व तेजस्वी विवेचने प्रत्येक पुस्तकात दिलेलीं आहेत. त्यामुळे नित्य पाठातरासाठीं व अध्ययनमननासाठीं हे ग्रथ अत्यत सग्राह्य असे झाले आहेत. किंमत प्रत्येकीं १ रुपया.

ग्रंथ मिळण्याचीं ठिकाणें:—नवाकाळ ऑफिस, मुंबई नं. ४; चित्रशाळा प्रेस, पुणें, दत्त एजन्सी, बुधवार पेठ, पुणें.